

# अमरवाणी

धन्यास्ते पुरुषश्रेष्ठा ये बुद्धया कोपमुद्धितम्
निरुंधंति महात्मानो दीप्तमग्नि मिवांभसा । ॥ १ ॥

[क्रोध आला असतां पाणी ओतून विस्तव विझवून शांत करतात, तसा जो पुरुष आपला क्रोध आवरतो तो थोर पुरुष होय.]

क्रुद्धः पापं न कुर्यात् कः क्रुद्धोहन्यात् गुरूनपि
क्रुद्धः परुषया वाचा न स्साधू नधिक्षपेत् । ॥ २ ॥

[क्रुद्ध होऊन पाप न करणारा कोण आहे? क्रुद्ध माणूस गुरुहत्त्यादेखील (करायला मागे पुढे पहात नाही) करतो.]

वाच्या वाच्यं प्रकुपितो न विजानाति कर्हिचित्
ना कार्य मस्ति क्रुद्धस्य, ना वाच्यं विद्यते क्वचित् । ॥ ३ ॥

[क्रुद्ध माणसाला काय बोलावे किंवा काय बोलू नये, असे काही नसतेच. त्याला अमके करू नये किंवा अमके बोलू नये हे कळतच नाही.]

य स्समुत्पतितं क्रोधं क्षमयैव निरस्यति
यथोरगस्त्वचं जीर्णां स वै पुरुष उच्यते ।· ॥ ४ ॥

[जसा साप आपली कात टाकतो तसा सहनशक्ती दर्शवून आलेल्या रागाचा जो त्याग करतो तोच खरा पुरुष होय!]

वाल्मीकि



# यक्ष पर्वत

## [ १८ ]

[वीरपूरच्या सैनिकांचा पराभव करून समरबाहूचे अनुयायी रानटी जातीच्या लोकांच्या मदतीने पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघासिंहांना घेऊन स्वर्णाचारी होता त्या जागी आले. समरबाहूच्या अनुयायांशी दोन हात केल्याशिवायच प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी आणखी एका सैनिकाबरोबर वीरपूरला घोड्यावर बेऊन पोचला. पुढे–]

वीरपूरच्या राजाच्या प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी आणि त्याच्या बरोबरचा सैनिक घोड्यावर बसून राजधानीच्या रस्त्यावर पळत येत असतां मोठमोठ्याने ओरडून प्रजेला सावध करीत होते. प्रजा देखील आश्चर्यचकित होऊन पळत असतां जो आरडाओरडा झाला तो राजा वीरसिंह आणि त्याचा मंत्री दोघांनी राजवाड्याच्या गच्चीवरून ऐकला. त्या वेळी दोघे राज्य-कारभाराच्या कोणत्यातरी प्रश्नावर सल्ला मसलत करण्यात गर्क होते.

राजा वीरसिंहाने गच्चीच्या कठड्या-वरून वांकून रस्त्यावर पाहिले आणि आश्चर्याने मंत्र्याला विचारले–"प्रधान! ही काय गडबड आहे? आपला प्राणिसंग्र-लयाचा अधिकारी आणखी एका सैनिका-बरोबर पाठीस वाघ लागल्या सारखा ओरडत पळत येतो आहे, हे काय?"










मंत्र्यानेदेखील कठड्यावरून वाकून पाहिले. त्याला प्राणिसंग्रहालयाचा फक्त अधिकारी आणि त्याच्याबरोबरचा सैनिकच नव्हे तर प्रजादेखील ओरडत पळत असलेली दिसली. राजवाड्याच्या बालेकिल्ल्याच्या दारावर जे पाहरेकरी उभे होते त्यांच्या प्रमुखाला हांक मारून, काय भानगड आहे विचारावे या विचारांत मंत्री असता प्राणि-संग्रहालयाचा अधिकारी व त्याच्या बरोबरचा सैनिक तेथे येऊन पोंचले. पाहरेकऱ्याने त्यांना अडवून घोड्यावरून उतरून आंत जायला सांगितले. परंतु दोघे तिकडे दुर्लक्ष करून पाहरेकऱ्याला ओरडून विचारू लागले—"काय म्हणतोस? राजधानीवर

तुला? असले नियम आणि कायदे पहायची वेळ आहे का ही?"

"देशावर संकट! राज्यावर प्रसंग! शत्रू......" असे ओरडत दोघे आत शिरले. पाहरेकऱ्याने आपला भाला सैनिकावर फेंकला. तो सैनिक भाला लागताच "वीरसिंह महाराज की जय" असा जयघोष करीत जमिनीवर आदळला.

राजवाड्यातून राजाने आणि मंत्र्याने ते दृश्य पाहिले. राजा आनंदाने प्रधानाला म्हणाला—"आपल्या पाहरेकऱ्याची स्वामि-भक्ती पाहिलीत का? असे स्वामिभक्त नोकर असल्यावर आपल्याला अनेक राज्ये जिंकून एक साम्राज्य स्थापन करता येईल. परंतु आपण त्यांच्या या राज्यभक्तीचा सदुपयोग न करून चांदण्यात वनविहार केल्यासारखे आरामात बसलो आहो."

मंत्र्याला राजाचे बोलणे प्रसंग ओळखून बोलल्यासारखे वाटले नाही. प्राणिसंग्रहाल-याचा अधिकारी आणि सैनिक पाहरेकऱ्याला म्हणाले ते ओक्षरते त्याने ऐकले होते. त्यावरून राज्यावर कोणतेतरी मोठे संकट ओढवले असल्याशिवाय त्या दोघांनी नियम-बाह्य काम केले नसावे असे त्याला वाटले. म्हणून तो पाहरेकऱ्याला ओरडून म्हणाला—"अरे! त्यांना राजवाड्यात लौकर येऊ दे!"

प्राणिसंग्रहालच्या अधिकाऱ्याला प्रवेश करा-यला वाट सोडली आणि जमिनीवर पडले-ल्या सैनिकाला हात देऊन उभे केले. प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी घोड्यावर बसून पुढे निघाला व त्याच्या पाठीमागून सैनिक लंगडत चालू लागला. मंत्र्याने दोघांना बोलावून घेऊन यायला एका नोकराला पाठविले.

दोघे वर चढून राजवाड्यात आले व राजाला आणि मंत्र्याला नमस्कार करून थोड्या अंतरावर उभे राहिले. मंत्र्याने घोड्याशा करड्या स्वरात विचारले—"तुम्ही दोघे राजसेवकच आहां, नाही का? राजवाड्याच्या बालेकिल्ल्यात घोड्यावर बसून प्रवेश करणे नियमबाह्य असल्याची गोष्ट तुम्हांला माहीत नाही का?"

प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी तो प्रश्न ऐकून थरथर कांपत म्हणाला—"प्रधानांनी क्षमा करावी, राज्यावर भयंकर मोठे संकट ओढवले आहे, हे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहून आल्यामुळे आम्ही घाई केली."

ते उत्तर ऐकून राजा वीरसिंहाला आश्चर्य वाटले. राज्यावर संकट? आणि ते कसं काय? अशा प्रश्नार्थक नजरेने राजा दोघांकडे पहात असतां आणि काही बोलणार इतक्यात मंत्र्याने विचारले—"राज्यावर संकट? कोणी शत्रू राजधानी-वर चालून आला आहे का? आपले सैनिक सीमेवर पहारा देत उभे आहेत की





नाहीत! तसा कोणी शत्रू येत असेल तर सेनापतींना ती बातमी आधीच कळली असती. प्राणिसंग्रहालयात प्राण्यांवर देखरेख ठेवण्यासाठी तुला नेमले असता तुला शत्रूच्या स्वारीची बातमी आधी कशी काय मिळाली रे?”

प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी पुन्हां एकदां मंत्र्याला नमस्कार करून कांपऱ्या आवाजात म्हणाला–“प्रधानांनी या सेवकाला उलट बोलल्याबद्दल क्षमा करावी. मी प्राणिसंग्रहालयात नवीन प्राणी धरून आणण्यासाठी आपल्या राज्याच्या उत्तरेकडील सीमेवरच्या जंगलात कांही सैनिकांना बरोबर घेऊन हिंडत असतां समरबाहु नांवाच्या कर्तव्याला जागून शौर्याने त्यांच्याशी आत्मरक्षणार्थ दोन हात केले आणि त्याच्यापैकी पुष्कळांना आमच्या तलवारींचे पाणी पाजले. परंतु तेवढ्यात उंटावरून आणखी एक तुकडी आमच्यावर चालून आली. आम्ही आपल्या पराक्रमाची शिकस्त करून लढलो. कित्येक शत्रुसैनिकांना आम्ही कापून काढले. आमच्या पैकी काही जण घायाळ झाले, काही मरण पावले. प्रसंग ओळखून बातमी पोंचती करण्यासाठी आम्ही शत्रूची फळी फोडून निघून आलो.”

प्राणिसंग्रहालयाच्या अधिकाऱ्याने ती गोष्ट जणुकाही एका श्वासांत सांगून टाकली. ती ऐकून राजाला व मंत्र्याला जंगलात कोणी शत्रू शिरला असावा असे वाटले. कदाचित संधी पाहून तो आपल्या राजधानीवर चालून येणार नाही कशावरून? अशी भीतीदेखील त्यांना साहजिकच वाटली.

राजा वीरसिंह दोनतीन मिनिटे विचार मग्न होऊन बसल्यावर प्रधानाला म्हणाला–“आपल्या या अधिकाऱ्याच्या सांगण्याप्रमाणे त्याने जी बातमी आणली आहे तीवरून राज्याच्या सरहद्दीजवळच्या प्रदेशात शत्रूचा धमाकूळ चालू आहे हे दिसते





आहे. तेव्हा सेनापतींकडे निरोप पाठवायला हवा.”

प्रधानाने एका नोकराबरोबर सेनापतींकडे निरोप पाठविला आणि प्राणिसंग्रहालयाच्या अधिकाऱ्याकडे वळून त्याला व त्याच्याबरोबरच्या सैनिकाला जास्त माहिती कळावी या हेतूने खोदून खोदून प्रश्न विचारू लागला. म्हणाला–“काय रे तुझे काम रानटी श्वापदांना धरून आणायचे आणि प्राणिसंग्रहालयांत त्यांच्या खाण्यापिण्याची व सरक्षणाची व्यवस्था करण्याचे असतां तू एखाद्या तलवार बहाद्दरासारखा शत्रूशी लढायला कशाला गेला होतास?”

“प्रधानांनी प्रश्नाचे उत्तर देतो आहे, याबद्दल क्षमा करावी! अरण्यात वाघासिंहांना पकडण्याचा प्रयत्न करीत असता मला कधीकधी त्यांच्याशी झुंजावे लागते. त्यांच्याशी दोन हात करणाऱ्या माझ्यासारख्याला शत्रुशी लढावे लागले तर पाय मागे घेणे बरोबर दिसेल का?” प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी म्हणाला.

परंतु मंत्र्याला प्राणिसंग्रहालयाच्या अधिकाऱ्याच्या फुशारक्या ऐकायला वेळ नसल्यासारखा दिसला. तो कितपत युद्ध करू शकतो याची त्याला पूर्ण कल्पना होती. म्हणून त्याला जवळ बोलावून स्वत:भोंवतीच एकदा फिरायला सांगितले तो तसा फिरू



लागल्यावर त्याच्या अंगावर किंवा कपड्यावर रक्ताचा एकदेखील डाग किंवा जखम न पाहून मंत्री राजाला म्हणाला–“महाराज! आपल्या देशातल्या जंगलात उंटवाहनावर कोणतातरी नवा तांडा आला असावा असे वाटते. परंतु हा तिकडे जे युद्ध झाले म्हणतो आहे...”

मंत्री बोलतच असता सेनापती येऊन दाखल झाले. येतांना त्यांच्या तलवारीच्या म्यानेचा आवाज होत होता. सेनापतीने प्रवेश केल्याबरोबर प्रथम राजाला व नंतर प्रधानाला नमस्कार केला आणि राजा व मंत्री काही विचारतील किंवा आज्ञा करतील म्हणून वाट पाहू लागला मंत्री, प्राणि-



संग्रहालयाच्या अधिकाऱ्याच्या तोंडी ऐकले होते ते सांगून म्हणाला–"या सर्व गोष्टी घडल्या असतां त्यांची माहिती सेनापतींना असू नये याचे आश्चर्य वाटते."

सेनापती, मंत्री म्हणाला त्यातले शेवटचे वाक्य ऐकून थोडा दचकून प्राणिसंग्रहालयाच्या अधिकाऱ्याकडे एक तीक्ष्ण नजर टाकून राजाला व मंत्र्याला उद्देश्यून म्हणाला–"महाराजांनी ऐकले त्यांत सत्याचा अंश थोडा असला तरी याने पराचा कावळा करून शत्रूच्या स्वारीचे वर्णन केले आहे, अशी माझी खात्री आहे. उंटांवर बसून जंगलात फिरणाऱ्या लोकांविषयी मी हेरांकडून ऐकले आहे. त्यांच्या हालचालीविषयी

काही हेर पाठविले होते. त्यांच्या नायकाने जंगली जातीच्या एका सुंदर मुलीशी लग्न करून घेतले आहे. तो त्यांना सामील झाल्यामुळे इत्थंभूत माहिती मिळायला थोडा उशीर होतो आहे."

"हा जो उशीर झाला त्याचा फायदा शत्रूने घेतल्यासारखा दिसतो आहे." मंत्री थोडासा रागानेच म्हणाला. नंतर पुढे म्हणाला–"अजून परिस्थिती हाताबाहेर गेली असेलसे वाटत नाही मला. हेरांची निवड करतांना त्यांचे लग्न झालं आहे की नाही, त्यांना मुलंबाळं आहेत की नाहीत, पाहून घेणे बरोबर होईल. ब्रह्मचाऱ्यांना हेर म्हणून पाठविल्याचा काय परिणाम झाला, तुम्हांला दिसतोच आहे!"

राजा मिशा पिळवटीत म्हणाला–"सेनापती! उगाच जास्त विचार कसला करतां आणि वेळ कशाला घालवितां? त्या शत्रूचा समरबाहू नांवाचा कोणी राजा आहे, म्हणे! त्याने किल्ल्यासारखे थोडे फार बांधकाम सुद्धा केल्याचे कळते. तेव्हां ताबडतोब सैन्यानिशी जाऊन तुम्ही त्यांचा तो किल्ला जमीनदोस्त करून टाका आणि त्यांच्या राजाला मुसक्या बांधून माझ्या समोर हजर करा, माझी ही आज्ञा आहे, लक्षांत असू द्या!"

सेनापती घाईघाईने शंभर घोडेस्वार, दोनशे पायदळ बरोबर घेऊन समरबाहूचे अनुयायी किल्ला बांधीत होते त्या दिशेने निघाला.

समरबाहू अस्वल जातीच्या लोकांच्या हाती कैद झाला त्या दिवसापासून त्याच्या अनुयायांचे नायकत्व स्वर्णाचारीने आपल्या हाती घेतले होते. जंगलात शिकारीला म्हणून गेलेले त्याचे अनुयायी काही रानटी लोकांना, पिंजऱ्यातल्या वाघासिंहाबरोबर घेऊन आल्यावर त्यांनी जे सांगितले ते ऐकून स्वर्णाचारी अर्धवट बांधलेला किल्ला लौकर बांधून पुरा कसा होईल आणि स्वसंरक्षणासाठी काय काय केले पाहिजे या काळजीत पडला. त्याला खड्गवर्मा आणि जीवदत्त यांच्या शौर्य साहसाबरोबर चातुर्याची पूर्ण कल्पना होती. ते समरबाहूला अस्वल जातीच्या लोकांच्या हातातून सोडवून कोणत्याही क्षणी हजर होतील याची खात्री वाटत होती. वीरपुरच्या महाराजाने किल्ल्याला वेढा देताच आपण कदाचित त्यांच्या हाती कैद होऊ, या भीतीने किल्ला सोडून निघून गेलो तर आपण कोठे आहो हे त्यांना कळणे कठीण नाही का जाणार? स्वर्णाचारी असा विचार करून किल्ल्याचे रक्षण कसे करतां येईल आणि पळून जावेच लागले तर शत्रूच्या हाती सांपडल्याशिवाय कसे जायचे याचा



विचार करून, शक्य तर एक दोन भुयारी चोरवाटा तयार करतां आल्या तर ते करावे असे ठरवून कामाला लागला. त्याने जंगली जातीच्या लोकांना रसद पुरवून आणि थोडेसे पैसे देऊन डोंगर चढून यायला सोपी होईल, अशा जागी गुहेत लपून बसायला सांगितले. त्यांच्या हातात पिंजऱ्यातले दोन वाघ आणि एक सिंह होता. शत्रू त्या बाजूने डोंगर चढू लागला की त्यांनी सिंहाला व वाघांना पिंजऱ्यांतून बाहेर काढून शत्रूवर सोडावे, म्हणजे शत्रू घाबरून पळून जाईल किंवा त्या गडबडीत वाघ जंगलात पळून जाण्याची शक्यतादेखील आहे. अशा परिस्थितीत समरबाहूच्या अनुयायांना जंगली जातीच्या लोकांनी मदत केली तर त्यांना मनसोक्त बक्षिसे दिली जातील असे वचन दिले.

स्वर्णाचारी किल्लधाच्या रक्षणार्थ सर्व तयारी करीत असतां आणि सर्व तयारी पुरी होत आली तेव्हां एके दिवशी समर-बा[illegible] पू[illegible] आहे. स्वर्णाचारीने आपल्या अनुयायांना भाले बरची देऊन शत्रु डोंगराच्या पायथ्याजवळ येतांच त्याच्यावर कोणत्याही प्रकारच्या आज्ञेची वाट न पाहता हल्ला करायला सांगितले.

वीरपूरचा सेनापती घोडदळ आणि पायदळ घेऊन डोंगराखाली आल्यावर तलवार उंच करून समरबाहूच्या अनुयायांकडे पहात उच्च स्वरात म्हणाला—"ऐका रे! मी वीरपूरचे महाराज वीरसिंह यांचा सेनापती आहे. तुम्ही सर्व हातातली हत्यारे खाली ठेवा! आणि शरण या, नाहीतर तुमची कत्तल होईल."

तो बोलतच असतां डोंगरावरून समरबाहूच्या अनुयायांनी वीरपूरच्या सैन्यावर भाल्यांचा वर्षाव केला. त्यांपैकी एक वीरपूरच्या सेनापतीच्या खांद्याला लागला आणि त्याला जबर जखम झाली.

(क्रमशः)





# वचनभंग

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू कोणाला तरी वचन देऊन ते पालन करण्यासाठी इतके कष्ट सहन करीत आहेस असे वाटते आहे. परंतु गत्यंतर नसल्यान मगध देशाचा राजा वीरसिंह याला आपल वचन मोडावे लागले होते. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

राजा वीरसिंह युवराज असतांना नित्य शिकारीला जात असे. एकदां तो शिकारीला गेला असतां तहान लागल्यावर एका सरोवराच्या काठी गेला. तेथे त्याला एक रानटी जातीची तरुण युवती स्नान करीत असलेली दिसली. तिचे सौंदर्य

## वेताळाच्या गोष्टी



पाहून वीरसिंहाच्या मनात तिच्याशी लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याने तिला विचारले–"तू अरण्यवास करते आहेस, हे बरोबर दिसत नाही. तू एक राज-महिषी होण्यालायक आहेस. तू माझ्याशी लग्न केलेस तर मी तुला आपली पट्टराणी करून घेईन."

ती म्हणाली–"मी एका अटीवर तुमच्याशी लग्नाला तयार आहे. माझ्या पोटी जो मुलगा जन्मेल त्यालाच तुमच्या मागे गादी मिळाली पाहिजे."

त्या गोष्टीस वीरसिंहाने होकार दिला. त्याने तिच्याशी विवाह केला आणि तिच्या महालातच राहू लागला.

भागविण्यासाठी गेला. तेथे त्याला पहिल्या तरुण युवतीपेक्षा जास्त सुंदर स्त्री स्नान करीत असलेली दिसली. तिच्याशी लग्न करून घेण्याची इच्छा त्याच्या मनात उपजली. त्याने तिला तसे विचारले व तिने, तिच्या पोटी जन्माला येणाऱ्या मुला-लाच गादी दिली पाहिजे, या अटीवर विवाह करून घेण्यास होकार दिला. तिला तसे वचन दिले आणि विवाह करून तिच्या महालात राहू लागला.

पुढे काही दिवसांनी तो पुन्हां त्याच अरण्यात शिकारीला गेला. तहान भाग-विण्यासाठी पुन्हां त्याच सरोवरावर गेला असतां त्याला पहिल्या दोघीपेक्षा जास्त सुंदर अशी रानटी जातीची एक स्त्री स्नान करीत असलेली दिसली. तिच्याशी सुद्धा विवाह करून घेण्याची इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. तिने तिच्य पोटी जन्माला येणाऱ्या मुलालाच गादी मिळाली पाहिजे ही अट घातल्यावर राजाने ती अट मान्य करून तिच्याशी विवाह करून घेतला आणि काही काळ तिच्या महालात राहला.

पुढे पुन्हां एकदां तो त्याच जंगलात शिकारीला गेला असतां तहान भागविण्या-साठी त्याच सरोवरावर गेला. तेथे त्याला



पेक्षां ही जास्त सुंदर होते. परंतु त्याने ती लग्नाला तयार आहे का, असा प्रश्न न विचारतां विचारले–"कोण ग बाई तू? येथे एकटी कां बसली आहेस?"

"माझ्या तिघी मोठ्या बहिणी एका-मागून एक, मला काही सांगितल्याशिवाय कोठे तरी निघून गेल्या आणि मी एकटी मागे राहिल्ये. आतां मला काय करावे, कळत नाही." ती म्हणाली.

त्याच्या तिघी बायकाच तिच्या मोठ्या बहिणी असल्या पाहिजेत हे ओळखून तो तिला राजवाड्यात घेऊन गेला आणि तिच्याशी लग्न करून घेतले.

त्यानंतर वीरसिंहाचा राज्याभिषेक झाला. त्याच्या चौघां राण्यांना एकेक मुलगा झाला.

चारही मुले चौघां बहिणींचीच होती तरी चवथा मुलगा आपल्या इतर भावां-पेक्षां प्रत्येक बाबतीत निराळाच होता. तो त्यांच्याबरोबर कधीच रहात नसे. तो बापापासूनही दूर दूरच राही. तो नेहमी रानात जाऊन आपल्या आईच्या जातीच्या लोकांमध्येच जास्त मिसळून राही.

तिघे मोठे नेहमी बापाच्या सेवेला हजर रहात. तिघांपैकी कोणी तरी राजा होणार



हे समजून मंत्री, प्रधान वगैरे तिघांना खूष ठेवण्याचा प्रयत्न करीत. ते मंत्र्याने सांगि-तल्याप्रमाणे वागत. चवथामात्र राजाने सांगितलेले काम स्वतः न करता दुसऱ्या कोणाकडून करवून घेई.

मध्यंतरी एक विचित्र गोष्ट घडली. जंगली जातीच्या लोकांनी चवथ्याला आपला नायक म्हणून निवडले आणि त्यालाच जंगलाचा राजा म्हणून घोषित केले.

राजाला उतारवय येऊ लागले तेव्हा प्रधानाने, चौघां मुलांपैकी कोणाला तरी आपला वारस करून घ्यावे असे सुचविले. राजाने जंगलात जाऊन आपल्या चवथ्या मुलाला बोलावून आणून त्यालाच आपला

वारस म्हणून जाहीर करून त्याला युवराज्यपद दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले–" राजा! मला हे नाही कळत की वीरसिंहाने आपल्या तिघां राण्यांना दिलेले वचन कां मोडले? तिघे मोठे राजकुमार कधी त्याच्या आज्ञेबाहेर नव्हते. परंतु त्यांच्या पैकी एकालाही आपला वारस न करून घेता, नेहमी बेफिकीरवृत्तीने राहणाऱ्या बंडखोर मुलालाच युवराज्यपद कां दिले? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–" राजाने आपल्या चवथ्या मुलाला युवराज्यपद दिले, त्यात नवीन वचनभंग असा झाला नाही. तिघां राण्यांना तो एकच वचन देत गेला, तेव्हांच वचनभंग झाला होता. मोहवश दिलेली वचने होती ती आणि रानटी जातीच्या स्त्रियांना दिलेली वचने ती. राजकन्यांना [illegible] [illegible] राजकुमारात राज्यकारभार संभाळण्याची योग्यता नव्हती, फक्त 'हांजी' 'हांजी' करण्याचीच योग्यता त्यांच्यात होती. राजाने किंवा मंत्र्याने सांगितलेली कामे ते डोळे मिटून करीत. परंतु चवथ्यात राजपुरुषाला शोभेसे गुण होते. बापाने सांगितलेले काम करण्याची योग्यता कोणात आहे हे ओळखून त्याला ते काम करण्यास चवथा सांगत असे. तो स्वतंत्र विचारांचा राजकुमार होता. त्याचे ते गुण ओळखून रानटी जातीच्या लोकांनी त्याला आपला राजा करून घेतले होता. या सर्व गोष्टींचा विचार करून त्याला युवराज्यपद देऊन वीरसिंहाने काही चूक केली असे नाही वाटत."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





## प्राप्तीचा अर्धा वांटा

एका गावी रामू नावाचा एक गरीब भोळा भावडा मनुष्य रहात असे. एकदां त्याला पांचशे रुपयाची गरज भासली. गावभर हिंडून कोणी काही मदत दिली नाही तेव्हां निराश होऊन घरी परतत असतां वाटेत देऊळ लागले. त्याने देवाला नमस्कार करून मागणे घातले–" देवा! मला पांचशे रुपयांची आज गरज आहे. मला तुझ्या कृपेने जी रक्कम मिळेल त्या रकमेची अर्धी रक्कम तुझ्या चरणी वाहीन."

आणि आश्चर्य, असे की, शेतात त्याला एक पैशांची पिशवी सांपडली. त्या पिशवीत एक हजार रुपये होते. त्याने देवाला नमस्कार करून बायकोला देव कसा पावला ते सांगितले.

रामूची बायको सर्व ऐकून घेऊन म्हणाली–" देवळाचे सर्व विश्वस्त वगैरे एकाहून एक लबाड आहेत. तुम्ही घाल ते सर्व 'स्वाहा' करतील. म्हणून देवाच्या नावाने दरिद्रनारायणाला जेवण द्यावे."

बायकोचा तो सल्ला रामूला पटला. तो गांवच्या पाटलाकडे गेला आणि घडलेली गोष्ट सांगून म्हणाला–" दरिद्रनारायणाला जेवण द्यायचे आहे." पाटलाला परमानंद झाला. दुसऱ्या दिवशी रामू दरिद्र-नारायणाला जेवण देणार असल्याची त्याने दवंडी पिटविली.

देवळाच्या प्रमुख विश्वस्तास पुजाऱ्याच्या तोंडी रामूने देवाजवळ मागितलेले मागणे ऐकले होते. तो सरळ पाटलाकडे धांवला आणि त्याला विचारले–" ही काय भानगड आहे?" पाटील म्हणाला–" रामूने देवा-जवळ हजार रुपये मागितले होते ते त्याला मिळाले."

विश्वस्त म्हणाला–" रामूने मिळेल त्या रकमेतली अर्धी रक्कम देवाला देतो म्हणून

क. गो. न. देसाई

       



मागणे मागितले होते. तेव्हां त्या हजार रुपयातले पांचशे रुपये त्याने देवालयाला दिले पाहिजेत. असे उघळून टाकणे चूक आहे."

देवालयाचा विश्वस्त देवालयाचे धन गडप करण्यात वस्ताद असल्याची गोष्ट पाटलाला चांगली माहीत होती. परंतु तो म्हणाला ते देखील रास्तच होते. म्हणून पाटलाने रामूला बोलावून पांचशे रुपये त्याने देवालयाला दिले पाहिजेत, असा आपला निर्णय सांगितला.

रामू विचारमग्न होऊन घरी गेला तेव्हां बायकोने त्याला विचारले—"झाले तरी काय ?" रामूने घडलेली गोष्ट थोडक्यात सांगितली आणि म्हणाला—"काय वाटेल ते होवो, दरिद्रनारायणाला जेवण द्यायचेच. उरलेले पांचशे देवालयाला देऊन टाकतो."

रामूच्या बायकोला अकस्मात् एक गोष्ट सुचली. तिने ती नवऱ्याला सांगितली.

दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे गावांत दरिद्रनारायणाला जेवण देण्यात आले. रामूने विश्वस्ताला पांचशे रुपये दिले नाहीत.

[illegible] त्याने पाटलाकडे फिर्याद नोंदविली. पाटलाने रामूला बोलावून जाब विचारला.

रामू हात जोडून म्हणाला—"देवाचे पैसे मी कधी ठेवून घेईन का ? द्यायचा विचारच करतो आहे......" असे सांगून थांबला.

"मग उशीर कां ?" विश्वस्ताने रागाने विचारले.

"देवाच्या चरणी पैसे व्हायला म्हणून दुसऱ्या दिवशी मी देवळात गेलो आणि आणखी एक हजार रुपये मिळावे आणि त्यातले अर्धे देवाच्या चरणी वाहीन असे मागणे घातले. एकदमच एक हजार रुपये देवाला देऊन टाकता येईल म्हणून विचार केला. परंतु मला त्या दिवशी काहीच मिळाले नाही. मी मागितलेले हजार रुपये देवाचेच तर आहेत. तेव्हां त्याने आपला वाटा ठेवून घेऊन माझा वांटा मला दिला असावा असा मी विचार केला.

पाटलाने स्मित करून देवालयाच्या विश्वस्ताने जी फिर्याद केली होती रद्द केली.



# विहीर आणि पाणी

गोपू नावाच्या शेतकऱ्याच्या मालकीची एक मोठेची विहीर होती. तो फार गरीब होता म्हणून एकदां त्याला नाइलाजाने ती विहीर विकावी लागली. शिवू नांवाच्या दुसऱ्या एका शेतकऱ्याने मोलभाव करून ती विहीर सहाशे रुपयाला विकत घेतली.

काही काळ लोटल्यावर गोपूने थोडी कोरडवाहू जमीन विकत घेतली त्याला आपल्या विकलेल्या विहिरीच्या पाण्याची गरज भासली. तो शिवूकडे जाऊन म्हणाला—"मी तुला तुझे पैसे देऊन टाकतो, माझी विहीर मला परत दे."

"तू दुप्पट पैसे दे, मी तुला तुझी विहीर परत देतो." शिवू म्हणाला.

गोपूला त्या गोष्टीचा राग आला व तो गावच्या पाटलाकडे न्याय मागायला गेला. पाटलाने शिवूला बोलावून विचारले तेव्हां त्याने तेच उत्तर दिले.

तेव्हां गोपू म्हणाला—"मी शिवूला विहीर विकली होती. विहिरीतले पाणी विकले नव्हते. त्या पाण्यावर माझी मालकी आहे."

हे ऐकून शिवू पाटलाला म्हणाला—"कबूल ! तरमग त्याला त्याचे पाणी माझ्या विहिरीतून काढून घेऊन जायला सांगा. नाही तर त्याने माझी विहीर आपले पाणी ठेवून घेण्यासाठी वापरली याबद्दल दरमहा पंधरा रुपयाप्रमाणे भाडे दिले पाहिजे."

हे उत्तर ऐकून गोपूचे तोंड बंद झाले.



     



# शोध व बोध

फार जुनी गोष्ट आहे. कांचीपुरम् येथे इंद्रभूपति नावाचे एक जैन मुनी रहात असत. त्यांच्या दर्शनासाठी दोघे जैन संन्यासी येत असतां वाटेत एका घरी विश्रांती घेण्यासाठी थांबले. त्यांनी आपली पथडी काढली. खाद्यपदार्थांचा वास येताच एक भुकेला कुत्रा समोर उभा राहिला. दोघांपैकी एकाला कुत्र्याची दया आली. त्याने पथडी सोडून खायला कुत्र्यासमोर काहीतरी टाकले.

नंतर त्यांनी तांबे काढून पाणी आणायला जातांना आपापली पथडी झाडाच्या बुंधाच्या ढोलीत ठेवून दिली. दोघे पाणी घेऊन परत आले तेवढ्यात कुत्र्याने पथडीचे टोक लोंबत होते ते ओढून पथडी बाहेर काढली आणि जे काही खायला मिळाले ते खाऊन टाकले.

ती पथडी ज्या संन्याश्याची होती त्याला फार भूक लागली होती त्याला ते पाहून राग आला की त्याने पाण्याने भरलेला तांब्याच कुत्र्याच्या टाळक्यात मारला. कुत्रा कोकलत पळून गेला.

"कुत्र्याला कृतज्ञ प्राणी म्हणतात ते खोटे. मी त्याच्यावर दया केली आणि त्याने माझीच पथडी ओढून आत होते ते खाऊन टाकले त्याला ठार केले तरी पाप लागणार नाही." तो संन्यासी म्हणाला.

ते ऐकून दुसरा म्हणाला—"या घटनेवरून कुत्रा कृतज्ञता नसलेला प्राणी आहे हे कसे काय ठरेल? आपलीच चूक नव्हती का? आपण त्याचे तोंड लागणार नाही इतक्या सावधगिरीने आपली पथडी ठेवली नव्हती. बुद्धिमान म्हणविणाऱ्या आपल्या सारख्यांनी चूक केली तर बरेवाईट कळण्या इतका विवेक नसलेल्या कुत्र्याच्या हाती चूक झाली म्हणून त्याला मारणे बरोबर नाही."

[illegible] शिक्षा केली." पहिला संन्यासी म्हणाला.

"कुत्र्याचीच चूक तू म्हणतोस त्यावरून मला नंदीवर्माचा न्यायनिवाडा आठवतो." दुसरा संन्यासी म्हणाला.

"कोण रे तो नंदीवर्मा? त्याने कोणता न्याय निवाडा केला होता?" पहिल्याने विचारले.

दुसऱ्याने आपली पथडी सोडून त्यातले अर्धे खाद्यपदार्थ दुसऱ्याला खायला दिले आणि नंदीवर्माची गोष्ट सांगितली.

कांचीपुरम् येथे नंदीवर्मा नांवाचा एक राजा राज्य करीत असे. तो कोणी अनीतिकर काम केले तर चवकशी करून त्यांना योग्य शिक्षा करीत असे. न्याय निवाडा करण्यात आपली बरोबरी करू शकणारा कदाचितच कोणी असू शकेल असे नेहमी त्याला वाटे.

एकदां इंद्रभूपती मुनी राजाला आशीर्वाद देऊन पुढे जावे म्हणून राजसभेत गेले. त्या वेळी एका चोरीची चवकशी चालू होती. त्या चोराने एका व्यापाऱ्याच्या घरात चोरी केली होती. चोरीचा अपराध सिद्ध झाला. नंदीवर्माने त्या चोराला जन्मठेपेची शिक्षा केली आणि "मी दिलेला न्याय कसा वाटला आपल्याला?" असे इंद्रभूपती मुनींना विचारले.



जैन मुनी म्हणाले—"मला यात न्याय असा काहीच दिसला नाही. चोरी केल्याबद्दल चोराला शिक्षा मिळाली. हे कायद्या प्रमाणे असेल. परंतु अशी शिक्षा करून चोरीच्या अपराधाला खंड कसा काय पडेल? आपापल्या कर्तव्य धर्माच्या दृष्टीने विचार केल्यास चोराबरोबर त्या व्यापाऱ्याला व न्याय देणाऱ्या राजालादेखील शिक्षा व्हायला हवी होती. परंतु या जगात आपापला कर्तव्यधर्म कोण पाळतो?"

ते ऐकून राजाचा चेहरा उतरला. व्यापाऱ्याला त्याचा अपराध काय हे विचारून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. परंतु ते विचारण्याचे धाडस त्याला होईना. तेवढ्यात

श्री ग. ना. कामत

इंद्रभूपती मुनीच पुढे म्हणाला–" सर्वशास्त्रात पारंगत, सर्व कर्त्तव्याकर्त्तव्याची कल्पना असणाऱ्या सोमदत्त नांवाच्या एका ब्राह्मण पंडितानेदेखील चोरी केली होती. त्याच्यासमोर या चोराचा अपराध काहीच नाही."

सोमदत्ताची कथा सांगायला राजाने विनंती केल्यावर जैनमुनींनीं ती कथा सांगितली.

एकदां जैनांना देवतुल्य असे वर्धमान अरण्यात तपश्चर्या करीत असतां देवेंद्राने त्यांची काही सेवा व्हावी या हेतूने त्यांना धोतरउपरण्याच्या दोन जोड्या दिल्या. वर्धमानाने एक धोतरउपरणे स्वत:साठी आपल्या वस्त्रांच्या गाठोड्यात बांधून ठेवले आणि दुसरी जोडी जवळ ठेवून दिली.

त्याच वेळी सोमदत्त नांवाचा एक विद्वान ब्राह्मण वर्धमानाच्या दर्शनास आला. त्याची नजर त्या धोतरउपरण्याच्या जोडीवर पडली. म्हणाला–" मला तेवढी धोतरजोडी दान करायला काही हरकत आहे का ?" वर्धमानाने त्याच्या जवळची एक धोतर-[illegible] त्याचे समाधान झाले नाही. वर्धमान ध्यान मग्न असतां तो दुसरी धोतरजोडी चोरून घेऊन निघून गेला.

वर्धमानांनी त्यानंतर डोळे उघडून पाहिले तेव्हां त्यांना सर्व समजले. म्हणाले–" त्याने मागितले तेव्हांच मी दोन्ही जोड्या द्यायला हव्या होत्या. त्याने केलेल्या चोरीला कारण मीच. कोणाजवळ नसलेली वस्तू आपल्याजवळ असली तर ती चूकच. म्हणून त्यांनी अंगावरचे वस्त्रदेखील सोडून त्याच्या लंगोट्या केल्या. त्या आपल्या सर्व शिष्यांना वांटल्या आणि स्वत: एक लंगोटी लावून बसले.

ती गोष्ट ऐकून नंदीवर्माला आपल्या न्यायनिवाड्यातली चूक कळली. त्याने चोराला दिलेली शिक्षा माफ केली आणि त्याला आयुष्यभर पोटभर खायला मिळेल याची व्यवस्था करून दिली.

ते ऐकल्यावर पहिल्या संन्याश्याला आपण कुत्र्याला मारले ते चुकीचे होते हे कळले.





# खरा कवी

एका गावी खान म्हणून एक सरदार रहात असे. त्या देशात अनेक कवी व शाहीर होते. ते खानाची स्तुतीवर कविता रचून म्हणत. खान खूष होऊन त्यांना इनामे देई.

एकदां त्या खानाने कोणाला तरी एक कविता म्हणतांना ऐकले. त्या कवितेत खानाचा क्रूरपणा, अन्याय व अत्याचारांचे वर्णन होते. खानाच्या अंगाचा जणुंकाही भडकाच उडाला त्याने ती कविता रचणाऱ्याला कैद करून आणायला हुकूम सोडला. पुष्कळ शोध झाला, परंतु त्या कवितेचा रचयिता कोण हे कळले नाही. तेव्हां खानाने कैद करून आणलेल्या सर्व कवींना विचारले–"बोला, तुमच्यापैकी माझ्या क्रूरपणाचे व अन्यायी वृत्तीचे वर्णन करून कोणी कविता लिहिली आहे का ?" कोणी उत्तर दिले नाही.

तेव्हां त्याने सर्वांना आपापल्या कविता म्हणून दाखवायला सांगितले. सर्वांनी खानाच्या दयाशील शीलवृत्तीचे व दानधर्माचे वर्णन करून लिहिलेली कविता म्हणून दाखविली. त्याने सर्वांना कैदेतून मुक्त करायला सांगितले. फक्त एकाने कविता म्हणण्याचे नाकारले होते.

त्या कवीला भीती दाखविण्याच्या हेतूने खानाने एक चिता रचून त्याला ती दाखवून म्हटले–"तू कविता म्हणून दाखविली नाहीस तर तुला जिवंतच या चितेवर ठेवून अग्नी दिला जाईल. तरीदेखील त्याने कविता म्हटली नाही. शेवटी त्याला हातपाय बांधून चितेवर ठेवण्यात आले आणि विचारले–"आतां तरी कविता म्हणशील की नाही ?"

तेव्हां त्या कवीने एक कविता म्हटली. खानाच्या क्रूरपणाचे व अन्यायाचे वर्णन करून लिहिलेली तीच ती कविता होती. ती ऐकून खान ओरडून म्हणाला–"सोडा त्याला. तोच खरा कवी आहे."



# लोभाला पडलेला बळी



एका गावी रामशास्त्री नांवाचे भटजी रहात असत. त्या गावच्या पंचक्रोशीत कोठे काही धार्मिक कार्य झाले की शास्त्रीबुवांशिवाय ते होत नसे.

शेजारगांवच्या कुळकर्ण्यांच्या मुलीचे लग्न उरकून शास्त्रीबुवा आपल्या गावी परत जायला निघाले तेव्हां यजमानांनी लाडू-जिलब्या वगैरे पक्वान्ने बांधून दिली.

शास्त्रीबुवा सावकाश आपल्या गावी जात होते. वाटेत एक जंगल होते आणि काळोख पडू लागला होता. तरी वाट चांगली पायाखालची होती म्हणून शास्त्रीबुवा चालत राहिले. ते एका मोठ्या चिंचेच्या झाडाखाली पोचले त्यावेळी अकस्मात् एक भूत दत्त म्हणून समोर उभे राहिले आणि म्हणाले—"कसा वेळेवर आलास बघ! फार भूक लागली आहे मला. नरमांस खाऊन बरेच दिवस झाले."

शास्त्रीबुवा भुताला पाहून थोडेदेखील भ्याले नाहीत व म्हणाले—"मला ठार करून नरमांस खाल्लेस तर या वाटेने पुढे कोणी येणारच नाही आणि तुला उपाशी मरावे लागेल. माझ्या मांसापेक्षा गोड पक्वान्ने मी तुला खायला देतो. पहा पाहिजे तर."

"पाहूं तरी!" भूत म्हणाले.

शास्त्रीबुवा गाठोडे सोडून म्हणाले—"हे घे लाडू आणि या जिलब्या."

भूत सर्व लाडू व जिलब्या खाऊन विचारू लागले—"आणखी नाहीत का?"

"आणखी हवं असेल तर उद्यां घेऊन येईन. परंतु ही सर्व पक्वान्ने तयार करायला मला पुष्कळ सामान लागेल. पैसे नाहीत माझ्याजवळ!" ब्राह्मण म्हणाला.

"मी देतो पैसे!" म्हणत भूत झाडाच्या ढोलीत शिरले आणि दुसऱ्या क्षणाला बाहेर

श्रीमती शांता म. कुळकर्णी

म्हणाले—"पक्वान्ने दररोज या वेळी घेऊन आलास तर तुला इतके सोने देत जाईन."

पक्वान्नांच्या गाठोड्यात त्यांच्या वजना-एवढे सोने बांधून घेऊन शास्त्रीबुवा, "वांचलो, देवाची कृपा!" म्हणत आपल्या गावच्या वाटेने पुढे चालू लागले.

घरी पोचल्यावर त्यांनी सोन्याचे गाठोडे बायकोच्या हातात दिले आणि घडलेले सर्व वृत्त सांगितले.

नवरा कोणत्याही प्रकारे भूतबाधा झाल्या-शिवाय घरी सुखरूप परत आला म्हणूनच तिला दहा लाख रुपये 'मिळाल्यासारखा आनंद झाला होता. म्हणाली—"हे सोने आपल्याला दोन पिढ्या सुखाने घालवायला पुरे आहे. भुताचा काय विश्वास? त्या बाजूला पाऊलदेखील टाकू नका!"

"तू म्हणालीस तेच खरे. लाभले त्यांत समाधान मानून घेण्यातच शहाणपण आहे.

शास्त्रीबुवा घरी आल्याबरोबर काही नवीन ऐकायला मिळेल या आशेने शेजारीण घाईघाईने आली आणि सोने पाहून बाहेरच काळोखात उभी राहून शास्त्रीबुवा आणि त्यांच्या बायकोचे बोलणे ऐकत राहिली.

ती लगेच घरी परतली व नवऱ्याला सर्व सांगून म्हणाली—"तो खुळा ब्राह्मण



म्हणे त्या भुताच्या वाटेला सुद्धा जाणार नाही. मी लाडू, जिलब्या आणि पुरण-पोळ्या करून देते. तुम्ही उद्यां रात्री जाऊन त्या भुताला खायला द्या आणि सोने घेऊन या. दररोज थोडे थोडे सोने आणून जमविता येईल." नवऱ्याने आनंदाने ते कबूल केले.

दुसऱ्या दिवशी गोपाळशास्त्री नांवाचा तो भट पंचवीस पंचवीस लाडू, जिलब्या व पोळ्या बायकोकडून करवून घेऊन चिंचेच्या झाडाखाली गेला.

ठरल्या वेळेला ते भूत आले आणि "पक्वान्ने आणलीस का?" म्हणून विचारू लागले.

गोपाळशास्त्राने गाठोडे सोडून भुतासमोर ठेवले. भुताने सर्व पक्वान्नांचा फडशा उडविला आणि दोन्ही हातांच्या मुठी भरून सोने आणून त्या ब्राह्मणाला दिले. म्हणाले–"दररोज घेऊन येत जा, मी सोने देत जाईन!"

गोपाळशास्त्री रामशास्त्र्यापेक्षा जास्त लोभी होता तरी रामशास्त्र्याचे साहस त्याच्यात नव्हते. भूत दिसले तेव्हांपासून ते दृष्टीआड होईपर्यंत तो थरथर कांपतच होता. सोने घेऊन तो घरी गेला आणि त्याने जे पाहिले ते सांगून सोने बायकोच्या हातात दिले. म्हणाला–"या धंद्यात लाभ पुष्कळ असला तरी दररोज त्या भुताजवळ जाऊन बोलायला आपल्याला धीर होत नाही बुवा!"

गोपाळशास्त्र्याची बायको थोडा वेळ विचार करून म्हणाली–"खरं पण काय हो, ते भूत झाडाच्या ढोलीतून सोने काढून घेऊन आले होते ना? आपण दिवसाउजेडी जाऊन त्या ढोलीतले सर्व सोने येत नाहीत, म्हण."

गोपाळशास्त्र्याला बायकोची ती सूचना विचित्रच वाटली. परंतु भुतापेक्षा त्याला बायकोचीच भीती जास्त वाटत असल्याने "होय" म्हणाला. तो दुसऱ्या दिवशी उजाडतांच त्या चिंचेच्या झाडाजवळ एक कुऱ्हाड घेऊन गेला. त्याने ती ढोली तोडून झाड खाली पाडले. ढोलीच्या तळाशी लाकडाच्या कोळशाशिवाय काही मिळाले नाही. ते सांगितले तर बायकोला खरे वाटणार नाही असे समजून तो कोळशाचा चुरा एका गाठोड्यात बांधून घेऊन आला. तो चुरा बायकोला दाखवून त्याने तो एका कोपऱ्यात टाकून दिला. जमिनीवर पडल्याबरोबर त्याच्यातून एकदम जाळ आला आणि क्षणभरात सर्व घर जळून गेले. त्याचे सर्वस्व त्यात भस्म झाले. दो जिवंत वांचले, एवढेच. कोणी हे सर्व ऐकून हसतील असे वाटून दोघं नवराबायको ते गाव सोडून पळून गेली.





# धर्मभीरू

एका गावी एक गरीब वैश्य कुटुंब रहात असे. त्या कुटुंबात वृद्ध न॰ ॰बायकोशिवाय त्यांचा एक तरुण मुलगापण होता. लहानसहान व्यापार करून त्या गरीब कुटुंबाचा उदरनिर्वाह चाले. परंतु त्या व्यापारावर फार दिवस चालेलसे त्यांना दिसेना. म्हणून तरुण रामूशेटने मोठ्या शहरात जाऊन मोठा व्यापार करण्याचे ठरविले. हळूहळू व्यापार वाढेल व कुटुंबाची जास्त जास्त जबाबदारी उचलतां येईल असा विचार करून त्याने आईवडिलांना तसे विचारले. आईवडिलांनी होकार दिला.

वाटेत खायला शिधोरी आणि कपडे बांधून घेऊन दूरच्या शहरात जायला रामूशेट निघाला. त्या वाटेवर मध्येच एक तीर्थक्षेत्र होते. तेथे एक कुंड होते, आणि अमरनाथाचे देऊळ होते. त्या देवालयाजवळ एक लग्नाचे वऱ्हाड उतरले होते. राघवशेट नांवाच्या एका वैश्य व्यापाऱ्याच्या यशोदा नांवाच्या मुलीचे लग्न शह॰त राहणाऱ्या आणखी एका कोट्याधीश व्यापाऱ्याच्या जयदेवशेट नांवाच्या मुलाशी होणार होते. दोन्ही पक्ष देवळात उतरले होते. लग्नाच्या मुहूर्ताला बराच वेळ होता. म्हणून सर्व आपापली राहलेली कामे उरकून घेण्यात गुंतले होते.

रामूशेटने देवळाजवळच्या कुंडात स्नान करून घेतले आणि देवाला नमस्कार करून घेऊन येण्यासाठी आपले गाठोडे सोयीच्या जागी ठेवण्याचा विचार करू लागला. एका झाडाखाली त्याला एक म्हातारी दिसली. तिच्या जवळ बरीचशी गाठोडी ठेवलेली होती. तो तिच्या जवळ जाऊन म्हणाला–"आजी! मी आंघोळ करून देवाचे दर्शन घेऊन येतो. माझ्या या गाठोड्यावर थोडं

श्री नारायण ज्ञं. पाटील

लक्ष ठेवता का?" म्हातारीने होकार देतांच त्या देवळात जाऊन अमरनाथाजवळ डोके टेकून विनंती केली—"देवा! मी व्यापार करायला जातो आहे. त्यात मला यश येईल असा आशीर्वाद दे." नंतर त्याने म्हातारीला सांगून आपले गाठोडे उचलून घेतले आणि पुढच्या वाटेवर चालू लागला.

काही अंतर चालून गेल्यावर रामूशेटला भूक लागली. एक तलाव दिसला. त्याच्या काठावरच्या झाडाखाली त्याने आपले गाठोडे ठेवले आणि पाणी आणून गाठोडे सोडले. परंतु त्या गाठोड्यात त्याचे कपडे किंवा खायला म्हणून आणलेले खाद्यपदार्थ काहीच दिसले नाही. त्या जागी दा[illegible] [illegible] तरी होते. त्या म्हातारीने चुकून त्याच्या गाठोड्याऐवजी वऱ्हाडकऱ्यांचे गाठोडे उचलून दिले होते.

ते लक्षात आल्यावर रामूशेट अमरनाथाच्या देवालयाजवळ परत आला. त्याआधी वधू पक्षातील आणि वरपक्षांतील लोकांमध्ये फार मोठे भांडण झाले होते.

वधूपिता राघवशेट दागिने चोरीला गेल्याचे सांगू लागला. त्याला वरपिता म्हणाला—"तू खोटे बोलतो आहेस, लुच्चा लबाड आहेस, अशा लोकांशी संबंध जोडून घेणे, डोळे उघडून विहिरीत उडीटाकण्यासारखा मूर्खपणा आहे."

[illegible] तर माझ्या मुलीशी लग्न करायला कोणी तयार होणार नाही. लग्न होऊन गेल्यावर मी दिलेल्या वचनाप्रमाणे सर्व करून देतो. त्याने वरपित्याचे पाय धरून किती विनवले, परंतु त्याने मुळीच ऐकले नाही. उलट म्हणाला—"आमचा तुम्ही जो अपमान केला आहे त्याला काही प्रायश्चित्त नाही."

ते भांडण चालू असतां रामूशेट परतला आणि राघवशेटला विचारू लागला—"झाडाखाली गाठोड्यां जवळ बसल्या होत्या त्या आजी कोठे गेल्या?"

"ती थेरडी विचारतोस? तिच्यामुळेच तर हे सर्व महाभारत झाले?" राघवशेट्टी म्हणाला.

"हे पहा, हे गाठोडे तिने मला चुकून दिले. यात दागिने व रुपये आहेत. हे तुम्ही ठेवून घ्या आणि माझे गाठोडे मला द्या." रामूशेट म्हणाला.

लग्नाला आलेल्या वरवधूपक्षांवरचे संकट टळले. पुन्हां आकाश निवळल्यासारखे वाटू लागले. वरपक्षाचा अपमान झाला नाही. वधूपक्ष खरा ठरला.

राघवशेट रामूशेटची ओळख करून देत यशोदेला म्हणाले—"यानेच आपले मानरक्षण केले. आतां तुझे लग्न निर्विघ्नपणे पार पडेल."

यशोदाने रामूशेटजवळ सर्व गोष्टी विचारून घेतल्या आणि त्याच्या घरच्या सर्व लोकांची चवकशी करून घेतली.



"बाबा रे! तू आम्हांला ऐनवेळी देवासारखा पावलास. आमच्या मुलीचे लग्न संपल्यावर मग कोठे तो जा." राघवशेट रामूशेटला म्हणाला. रामूशेट त्याप्रमाणे त्यांचा अतिथी म्हणून लग्न घरी थांबला.

लग्नातले सर्व शास्त्रविधी सुरू झाले. वरवधू बोहोल्यावर येऊन उभे राहले. वधूपित्याने हुंडा म्हणून जे दागिने द्यायचे होते ते एका चांदीच्या ताटात वरवधूंच्यासमोर आणून ठेवले.

मंगळसूत्र बांधण्याची वेळ आली. वर जयदेवशेट वधू यशोदेच्या गळ्यात मंगळसूत्र बांधायला उठला. यशोदेने त्याला दागिन्यांच्या ताटाकडे बोट दाखवून म्हटले—"मंगळसूत्र या ताटाला बांधा. तुम्हांला दागिने पाहिजे होते ते त्या ताटात आहेत. तुम्ही माझ्याशी लग्नाला थोडेच आलां होतां! या दागिन्यांसाठी, पैशांसाठी आलां होतां." नंतर समोर उभा असलेल्या रामूशेटकडे बोट दाखवून म्हणाली—"हा पहा,

करायला, वाटेल तिकडे जायला तयार आहे. त्याला फुकटात मिळालेले हे सर्व दागिने व पैसे परत आणून दिले याने. त्याला जी नीती अनीती कळते त्याचा सहस्रांशदेखील तुम्हांला कळत नाही. तुमच्यासारख्याच्या हातून मंगळसूत्र बांधवून घेण्यापेक्षा ह्याच्या हातून बांधवून घेण्यात माझे जास्त हित आहे."

वरपक्षवाले ओरडू लागले, आतांपर्यंत झाला तो अपमान नव्हताच, आतांच आपली खरी शोभा झाली. राघवशेटने मुलीची समजूत घालण्याचा किती प्रयत्न करून पाहिला. परंतु तिने मुळीच ऐकले नाही. "करीन लग्न तर रामूशेटशीच करीन" म्हणाली. राघवशेटच्या मित्रांनी वधूच्या म्हणण्याला दुजोरा दिला. शेवटी रामूशेटने सर्वांच्या आग्रहाने यशोदेच्या गळ्यात मंगळसूत्र बांधले. वरपक्षवाले पहात राहले आणि माना खाली घालून आपल्या गावी निघून गेले.





# राजकन्येचे धाडस

वल्लभपूरचा राजा रंगादित्य याने अपत्य व्हावे म्हणून अनेक नवस उपास केल्यावर त्याला एक मुलगी झाली. त्याने तिचे सुखलता असे ठेवले आणि तिचे सर्व लाड पुरविले. राजवाड्यातल्या सर्व लहान थोर लोकांना सुखलता जीव की प्राण वाटे.

सुखलता लहानाची मोठी होत गेली तसतशी सर्वशास्त्र व कलांत तिने प्राविण्य संपादन केले. एवढेच नव्हे तर युद्धविद्येतही तिने अपूर्व प्राविण्य संपादन केले. ते राजाला मुळीच आवडले नाही. तरी सुखलता राजकन्या सूनही राजकुमारासारखी तयार झाली.

सुखलता पंधरा वर्षांची झाली असेल, वल्लभपूर राज्याच्या पश्चिमेकडील सरहद्दीवरच्या काही रानटी जातीच्या लोकांनी बंड पुकारले. ते बंड कोणी मोडू न शकल्याचे ऐकून सुखलता अत्यंत उत्साहाने म्हणाली—"मी सैन्य घेऊन जाते आणि बंडखोरांचे पारिपत्य करून येते."

रंगादित्य राजा चकित होऊन तिला म्हणाला—"काय म्हणालीस? तू बंडखोरांचे परिपत्य करणार? ओठ पिळले तर दूध निघेल, म्हणे युद्ध करणार तुम्हांला काय वाटते प्रधान?" त्याने आपले मंत्री धीमान यांस विचारले.

"महाराज! राजकन्येत ते सामर्थ्य नाही असे नको समजायला. तिला युद्धकलेचे उत्तम शिक्षण मिळाले आहे. सैन्य तिच्या म्हणण्याबाहेर वागणेच शक्य नाही. सैन्यातल्या प्रत्येकाला आपल्या राजकन्येच्या शौर्य व साहसाची चांगली कल्पना आहे. ती बंडखोरांना नक्कीच जिंकून परत येईल." प्रधान म्हणाला.

"ते काही मानायला मी तयार नाही. जिला कर्तव्याकर्तव्याची कल्पना नाही,

श्री ए. सी. सरकार, जादुगार

अजून घरकुलात बाहुलाबाहुलीचे लग्न लावण्याचे जिचे वय आहे ती रणांगणावर कशी काय जाऊ शकेल?'' राजाने विचारले.

राणीदेखील प्रधानाला तेच म्हणाली– "काय म्हणता प्रधान? तुम्हीसुद्धा पोरीला फार चढवता आहां? बायकांनी युद्ध करणे कधी ऐकले आहे का? आपल्याकडे एकाहून एक शूर सरदार आहेत. त्यांच्यापैकी कोणालातरी पाठवा."

"महाराणी, राजकन्येची मूर्ती लहान असली तरी कीर्ती थोर आहे. ती युद्धकलेत अद्वितीय आहे.'' प्रधान म्हणाला.

"मी हे सर्व ऐकायला तयार नाही. मी मुलीला असले धाडस करू देणार नाही.'' राणीने निश्चयपूर्वक सांगितले.

[illegible] तिला सुचविले की काही भिण्याचे कारण नाही.

दरबारी जादुगार त्याच वेळी एकदां उठून काहीतरी महत्वाची सूचना करण्या-साठी उभा राहिला. म्हणाला–"राजकन्ये-च्या मनात युद्ध करण्यास जाण्याची तीव्र इच्छा आहे. प्रधानांचा त्या गोष्टीस दुजोरा आहे. परंतु महाराजांना व राणीसरकारांना ते मुळीच पसंत नाही. त्यामुळे राजकन्येचा उत्साहभंग होत आहे. हा प्रश्न वादविवाद करून मिटण्यासारखा नाही. तेव्हां दैवावर सर्व भार टाकून चिट्ठ्या टाकून पाहू या. प्रश्न नक्कीच सुटेल."

[illegible] कन्या वडिलांना म्हणाली.

रंगादित्य महाराज थोडे नरमले व त्यांनी होकार दिला. "होऊ दे काय तो निकाल.'' दीर्घ-श्वास सोडीत महाराज म्हणाले. "तसे असेल तर चिट्ठ्या टाकायला उशीर कां?'' जादुगार म्हणाला आणि शेजारीच प्रधानांची बैठक होती त्या खोलीत जाऊन कागदाच्या चिट्ठ्या फाडून घेऊन आला आणि लेखणी घेऊन म्हणाला–"महाराज! सेनापतित्व कोणाला द्यावे त्याचे नांव सांगण्याची कृपा करावी."

"गंगाधर!'' महाराज म्हणाले.

इंद्रपालाने "गं...गा...धर" असे मोठ्याने म्हणत एका कागदावर लिहून कागदाची घडी करून ठेवून दिली.

नंतर त्याने महाराजांना आणखी एक नाव सांगण्यास सांगितले.

राजा म्हणाला–"रघुपती!"

"इंद्रपालाने "र...घु...प...ती" असे मोठ्याने म्हणत आणखी एका कागदावर लिहून त्या कागदाची घडी करून बाजूला ठेवून दिली. नंतर त्याने प्रधानाला नांव सुचविण्यास विनंती केली.

मंत्री म्हणाला–"सुखलता!"

"सु...ख...ल...ता!" असे मोठ्याने म्हणत इंद्रपालाने आणखी एका कागदावर लिहून त्या कागदाची सुद्धा घडी करून ठेवून दिली.

त्याच प्रमाणे राजाने आणखी नऊ नावे सांगितली आणि इंद्रपालाने आणखी एकेक





कागद घेऊन त्यावर एकेक नाव उच्चारीत लिहिले आणि कागदांच्या घड्या करून ठेवून दिल्या.

सर्व चिट्ठ्या घेऊन इंद्रपालाने राजाजवळ येऊन एक चिट्ठी उचलायला सांगितले. राजाने एक चिट्ठी उचल्यावर बाकी चिट्ठ्या उचलून जाळून टाकल्या आणि राख उचलून दूर फेकून दिली.

मध्यंतरी रंगादित्याने घाईने चिट्ठी उघडून कांपऱ्या आवाजात वाचले–"सुख-लता!" आणि निरुपाय होऊन राजाने मुलीला बंडखोरांचे पारिपत्य करण्या-साठी सैन्याचे सेनापतित्व दिले. सुखलताने युद्धास जाण्याची सर्व तयारी केली आणि सैन्य घेऊन जाऊन बंडखोरांचा बिमोड केला. तिने त्यांच्या नायकाच्या मुस्क्या बांधून त्याला राजासमोर आणून उभे केले.

विजयलक्ष्मीला घेऊन येणाऱ्या मुलीला आईवडिलांनी पोटाशी घेऊन आशीर्वाद दिला. ते दृश्य पाहून प्रजेला अपरंपार ... स्वरूप प्राप्त झाले.

नंतर संधी पाहून सुखलतेने इंद्रपालाला आणि प्रधानाला आपल्या महालात बोलाबून त्यांना मेजवानी दिली आणि त्यांना मानाचा पोशाख वगैरे देऊन त्यांचा सत्कार केला. नंतर विचारले–"माझी इच्छा कशी काय पुरी झाली सांगाल का?"

मंत्री म्हणाला–"मला का...ही माहीत नाही. इंद्रपालानेच काही तरी जादू केली."

इंद्रपालाने फक्त त्यांनाच ऐकू जाईल, इतक्या हळू स्वरात सांगितले–"काही नाही, राजकन्या. मी सर्व चिट्ठ्यांत तुमचेच नांव लिहिले आणि वरून मोठ्याने दुसरी नांवे म्हणत गेलो."

सुखलता आश्चर्यचकित होऊन म्हणाली–"बाबांना ही गोष्ट कळली असती तर तुमचे डोकेच उडाले असते!"

"होय हो! तुमच्यासाठी मी आपल्या तळहातावर आपले शीर घ्यायला तयार होतो." स्मित करून इंद्रपाल म्हणाला.



# फणसाची चव

एकदा एक काबुली बंगाल देशात फळे विकत घ्यायला दुकानात गेला. एक फणस पाहून चकित झाला आणि म्हणाला–"मी अनेक प्रकारची फळे पाहिली आणि खाल्ली आहेत, परंतु इतके मोठे फळ कोठे पाहिले नाही. या फळाला काय म्हणतात?"

"तो फणस आहे. फार गोड आणि चवदार फळ आहे." फळवाला म्हणाला.

काबुल्याने फणस विकत घेतला आणि घरी जाऊन निश्चितपणे बसून दातांनी फणसाचा एक लचका तोडून घेतला. वास किती गोड होता आणि चवदेखील अवीट होती. परंतु त्याला फणसाचे गरे खाण्याची जी मजा असते ती काही मिळाली नाही. त्याच्या हातांना, तोंडाला, मिशांना आणि दाढीला फणसाचा चीक लागला. त्याने पाण्याने खूप धुतला तरी जाईना. उलट जास्तच पसरला. राखेने धुवायला निघाला तर हातातोंडाला व दाढी मिशांना राख चिकटून बसली. बंगाली बाबू ही फळे कशी काय खातात व त्यांत त्यांना कसा काय आनंद मिळतो बुवा? तो काबुली मनातल्या मनात विचार करू लागला.

शेवटी तो एका वृद्ध बंगाल्याला भेटून आपल्या मनातली शंका विचारायला गेला. तेव्हां तो म्हणाला–"फणस खायचा झाला तर प्रथम हाताला व शक्य तर तोंडाला देखील तेल लावून घ्यावे लागते. दाढी मिशांना लागलेला चीक तुम्हांला तेलानेच सोडविता आला तर सुटेल नाहीतर वस्तऱ्याने दाढी करून घ्यावी लागेल."

काबुल्याने तसे केल्यावरच फणसाचा चीक सुटला. पुढे कोणी तुळतुळीत दाढी करून आलेला मनुष्य त्याला भेटला की तो विचारी–"तुम्ही सुद्धां फणस खाल्ला आहे वाटते?"





# चांगला व वाईट

एका गावी सुमंत नावाचा एक थोर महात्मा रहात असे. कोणी अपकार केला तरी तो त्याच्यावर उपकार करी. गावाबाहेर एक झोपडे बांधून तो एकटा त्यात रहात असे. वेळी अवेळी कोणी पाहुणा आला तरी तो त्याला पंचपक्वान्नांचे जेवण वाढी.

एके दिवशी एक चोर उन्हाची झळ लागल्याने सुमंतच्या झोपडीच्या दारासमोर येऊन बेशुद्ध होऊन पडला. सुमंतने अनेक प्रयत्न केल्यावर तो शुद्धीवर येऊन खुणेने त्याला भूक लागली असल्याचे सांगू लागला. पांचच मिनिटात सुमंतने त्याला पंचपक्वान्नांचे जेवण वाढले. चोर हावऱ्यासारखा जेवल्यावर विचार करू लागला, इतक्या थोडया वेळात हे जेवण तयार कसं काय झाले ?"

त्याने सुमंताला विचारलेदेखील–"काय हो ! भरदुपारी इतक्या थोडया वेळात पंच पक्वान्नांचे जेवण कसे काय तयार झाले ?"

"माझ्याजवळ एक मंत्रवलेले पात्र आहे. त्याच्या मदतीने क्षणार्धात वाटेल तो पदार्थ तयार होऊन हजर होतो." सुमंत म्हणाला.

चोराने ते ऐकून आश्चर्यचकित होऊन विचारले–"ते पात्र मला एकदां दाखवू शकाल का ? त्याचा महिमा मला पहावासा वाटतो आहे !"

सुमंतने घरात जाऊन एक भांडे आणले आणि चोरासमोर ते जमिनीवर उपडे ठेवून म्हणाला–"केळी पाहिजे आहेत." भांडे उचलून पाहिले तर खाली सुंदर पिकलेली केळी होती.

ते पात्र पाहून चोराच्या मनात ते भांडे गडप करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याने त्या दिवशी रात्री सुमंत झोपल्यावर ते भांडे पळविले. त्याने विचार केला, ते भांडे जवळ असले तर लक्षाधीश होता येईल. परंतु

कु. कुमारी वसुंधरा जतकर

[illegible] त्याला त्या भांडयाने दिले नाही

दुसऱ्या दिवशी चोराने सुमंतला ते पात्र परत आणून दिले व म्हणाला–"अहो, चुकून मी तुमचे हे भांडे घेऊन गेलो होतो. क्षमा करा आणि आपले भांडे ठेवून घ्या." सुमंत थोडादेखील रागावला नाही. त्याने चोराजवळून भांडे घेतले आणि जागच्या जागी खीर वगैरे मागून घेऊन त्या चोराला मेजवानी दिली.

चोराला इतके आश्चर्य वाटले की सुमंतला विचारल्याशिवाय त्याला राहवले नाही. म्हणाला–"काय हो, हे पात्र माझ्या जवळ होते तेव्हां त्यात हा महिमा नव्हता, साध्या भांडयासारखेच होते !"

सुमंत स्मित करून म्हणाला–"मी जिवंत असेपर्यंत कोणाला या पात्राचा उपयोग करून घेता येणार नाही."

चोराला तेव्हां कोठे त्या भांडयाचे गुपित कळले. सुमंतचा शेवट करून त्या भांडयाचा उपयोग करून घ्यावा असे मनाशी ठरवून त्याने सुमंतला विषप्रयोग करून ठार करण्याचा घाट घातला. एक दिवशी अन्नात विष कालवून तो ते सुमंतकडे घेऊन येऊन म्हणाला–"तुम्ही मला दोन वेळां मेजवानी दिलीत, तेव्हां या गरिबाच्या हातचे अन्न थोडे तरी एकदां ग्रहण केलेच पाहिजे. मी धन्य होईन !"

सुमंतने निःसंकोचपणे चोराने जे काही आणले होते, ते त्याच्यासमोरच खाल्ले. त्यानंतर चोर आनंदाने निघून गेला.



       

त्या दिवशी बरीच रात्र उलटल्यावर चोर सुमंतच्या घरी आला. सुमंत खाटेवर झोपला होता. चोर त्या मंत्रवलेल्या पात्राजवळ जात असता कशाला तरी त्याचा पाय लागला आणि ते पडल्याचा आवाज झाल्याबरोबर सुमंतने डोळे उघडून विचारले– "कोण आहे?" चोराने विचारले–"म्हणजे तुम्ही अजून जिवंतच आहां का?"

"पण मी जीवंत नाही असे कसे वाटले तुला?" सुमंतने चकित होऊन चोराला विचारले.

आज मी तुम्हांला जे खायला दिले होते त्यात विष घातले होते. त्याचा परिणाम या वेळेपर्यंत तुमच्यावर नक्कीच होईल असे मला वाटत होते." चोर लपवालपवी केल्याशिवाय म्हणाला.

"मी योगाभ्यास केला असल्यामुळे माझ्यावर विषप्रयोगाचा काहीच परिणाम होऊ शकत नाही. कसले भयंकर विष असले तरी ते पचविण्याची शक्ती माझ्यात आहे." सुमंत शांत स्वरात म्हणाला

[illegible] त्या पात्राचा उपभोग करण्याची इच्छा माझ्या मनात होती. पण ते माझ्या नशिबी नव्हते." चोर हताश होऊन म्हणाला.

"तुझ्या नशिबात ते नव्हते. बरे तर जेवून जा." सुमंत चोराला म्हणाला.

चोर फार लज्जित झाला. त्याचबरोबर एक शंका त्याच्या मनात आली.

"काय हो, मी तुमच्याशी दुष्टपणाने वागलो, तरी तुम्ही माझा द्वेष केल्याशिवाय माझ्याशी सद्व्यवहार करीत आहां. मला हे सर्व विचित्र वाटते." चोर म्हणाला.

"परंतु यात विचित्र असे काहीच नाही. दुसऱ्याशी सद्व्यवहार करणे इतरांचे चांगले करणे, हा मी आपला धर्म मानून करतो आणि तू इतरांचे वाईट करणे हाच आपला धर्म मानतोस. आपला स्वभाव व संशय तुला सोडता येत नाहीत. तसाच मला माझा संशय व स्वभाव सोडता येत नाही. असे कां तुला वाटू नये?" सुमंतने विचारले.



# चवदार चटणी

एकदा एक राजा जंगलात शिकारीला गेला असतां वाट चुकून भटकत राहिला. राजाच्या बरोबर त्याचा सैंपाकी होता. दुपारची वेळ होती. दोघांना भूक लागली होती. दोघे जंगलानजीकच्या एका लहानशा खेड्यात गेले. एका झोपडीचे दार सैंपाकाने वाजविले. एका म्हातारीने येऊन दार उघडले. तिने पाहुण्यांसाठी सैंपाक केला. तिने गवताची चटणी करून दोघांना पानावर वाढली. राजाला भूक लागली होती म्हणून मिटक्या मारून त्याने चटणीखाल्ली जेवण झाल्यावर राजाने त्या म्हातारीला एक रत्नहार बक्षिस म्हणून दिला.

पंचपक्वान्नांचा सैंपाकदेखील ज्या राजाला आवडत नसे त्याने गवताच्या चटणीची एवढी वाखाणणी केलेली पाहून सैंपाक्याला आश्चर्यच वाटले. त्यानंतर दोघे राजधानीत परत आले. काही दिवसांनी एकदां सैंपाक्याच्या मनात आले की महाराजांना गवताची चटणी आवडते तेव्हा ती करून वाढावी. परंतु ती चटणी तोंडात घातल्याबरोबर महाराजांना सैंपाक्याचा इतका राग आला की त्यांनी त्याला रागावून नोकरीवरून काढून टाकले.












# वरपरीक्षा

फार पूर्वी विशालनगरच्या गादीवर देवदत्त नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्याला चंद्रमती नावाची एकुलती एक मुलगी होती. तिने राजवाड्याबाहेर कधी चुकून सुद्धां पाऊल टाकले नव्हते. परंतु ती अप्रतिम सुंदर असून तिच्या करस्पर्शाने जुने मुरलेले आजार सुद्धा बरे होतात अशी तिची प्रसिद्धी होती.

चंद्रमतीचे वय लग्नाला योग्य झाले तेव्हां बापाने तिला विवाहाविषयी विचारले.

"माझ्याशी विवाह योग्य तुम्हांला जे वर वाटतील त्यांना तुम्ही बोलावून घ्या. त्यांच्यापैकी एकाला मी माझ्या मताप्रमाणे निवडून घेईन." चंद्रमती म्हणाली.

देवदत्ताने जवळपासच्या सर्व राजकुमारांविषयी चवकशी करून स्वतःच चार राजकुमारांची निवड करून त्यांना स्वयंवरासाठी बोलावणे पाठविले. जय, अजय, विजय आणि विनय या नावाचे चौघे राजकुमार चंद्रमतीशी विवाहाच्या उद्देश्याने विशालनगरला येऊन दाखल झाले. देवदत्त चौघांना दिवाणखान्यात बसायला सांगून स्वतः सुद्धां तेथे बसला.

तेव्हां जवळून जाणाऱ्या एका दासीला हांक मारून देवदत्त म्हणाला—"चंडी! राजकन्येला जरा येऊन जा म्हणावे."

चंडी घाईघाईने अंतःपुरात जाऊन येऊन म्हणाली—"धाकट्या सरकार पूजागृहात बसल्या आहेत. पौर्णिमेपर्यंत पुजा पुरी होणार नाही, म्हणे. त्या पूजागृहातून तोपर्यंत बाहेर येऊ शकणार नाहीत."

म्हणून देवदत्त चौघां राजकुमारांना म्हणाला—"तरमग तुम्हांला हे चार दिवस कोणत्याही प्रकारे त्रास होऊ नये, याची मी व्यवस्था करून देतो. तुम्हांला जी वस्तू ज्या वेळी हवी असेल ती सांगा, ही [illegible] ती गोष्ट मान्य केली. राजवाड्यातच चौघांच्या उतरण्याची व्यवस्था करण्यात आली. चंडी एका मागून एक सर्वांच्या सेवेला हजर राहू लागली आणि त्यांची विचारपूस करू लागली.

जय नावाच्या राजकुमाराने चंद्रमतीच्या सौंदर्याचे वर्णन ऐकले होते. त्यामुळेच तो तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने आला होता. तिचे रूप पहायला मिळावे म्हणून त्याची उत्कंठा वाढत होती. तेव्हां चार दिवस म्हणजे त्याला चार युगासारखे वाटू लागले.

पहिल्या दिवशी चंडी जयच्या खोलीत फुलांचा गुच्छा फुलदाणीत सजवून ठेवायला म्हणून आली. तेव्हां जयने तिला जवळ बोलावून विचारले—"काय ग चंडे! मला राजकुमारीला पहायचे आहे कोणाला कळू दिल्याशिवाय आजच मला पाहतां येईल का तिला?"

चंडी थोडेसे भ्याल्यासारखे दाखवून म्हणाली—"तुम्हांला आजच पहायचे असेल तर माझ्या पाठोपाठ कोणत्याही प्रकारे आपली चाहूल न देता या." असे सांगून अंधुक प्रकाशात ती त्याला अंतःपुरात घेऊन गेली.



पुजेच्या खोलीजवळ नेऊन चंडीने दारावरचा पडदा थोडा बाजूला सारून आत पहायला जयला सांगितले. त्याने आत डोकावून पाहिले आणि दचकल्यासारखा मागे सरकला. त्याला पार्वतीची पूजा करीत बसलेली एक काळी, लठ्ठ, दात पुढे आलेली स्त्री दिसली.

"नको बुवा, या कंदाशिणीशी कोण लग्न करतो?" असे मनात म्हणत चंडीने किती सांगितले तरी मागे वळून न पाहता तो आपल्या खोलीत गेला आणि त्याच दिवशी रात्री स्वदेशी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी चंडी अजय होता त्या खोलीत पलंगावरचे अंथरूण झाडून पुन्हा घालायला म्हणून गेली. असतां अजयने तिला विचारले—"जय काही बोलल्या-

सौ. सुगुणा म. साठे



शिवाय सांगितल्याशिवाय निघून गेला, असे कारण तरी काय झाले?"

चंडी जवळ जाऊन दुसऱ्या कोणाला ऐकू जाणार नाही इतक्या हळू आवाजात म्हणाली–"जयजींना राजकन्येला पहावयाचे होते. मी दाखविले. त्यांना धाकट्या सरकारांचे रूप आवडले नाहीसे दिसते. म्हणून निघून गेले."

अजयने थोडा विचार केला व म्हणाला–"जिच्याशी लग्न करायचे तिच्या रूपाकडे काय पहायचे? पण तिच्या बरोबर जे वैभव येईल ते पाहले पाहिजे तेव्हां त्याने एवढे पळून जायला नको होते."

करून घेण्यास आला होता

चंडी चकित झाली आणि म्हणाली–"धाकट्या राणी सरकारांशी विवाह झाला तर राज्य मिळेल असे समजून का तुम्ही आला आहां? महाराजांनी आपल्या भावाच्या मुलाला दत्तक घेतल्याची गोष्ट माहीत नाही वाटते तुम्हाला?"

ते ऐकून अजय निराशच झाला. "तरमग मला येथं राहण्याची गरजच काय?" असे म्हणत लगेच स्वदेशी निघून गेला.

तिसऱ्या दिवशी चंडी फुलबागेत जाईची फुलं तोडू लागली तेव्हा विजयने तिच्याजवळ जाऊन तिला विचारले–"काय ग, काल कोठे दिसली नाहीस? कोठे गेली होतीस?"

तिने त्याला जय आणि अजय निघून गेल्याची गोष्ट सांगितली.

ते सर्व ऐकून विजय हसला व म्हणाला–"वेडे आहेत. ठीक विचार केला असता तर अजयला त्याचे राज्य पुरणार नाही का? राजकुमारी कुरूप असली आणि बरोबर राज्य घेऊन येत नसली तरी मला हरकत नाही. तिच्या करस्पर्शानेच मुरलेले रोग बरे होतात असे मी ऐकले आहे मी! माझ्या आईवडिलांना कित्येक दिवसांपासून कोणतातरी आजार झाला आहे. त्यांना

घ्यायला आलो आहे मी."

चंडी चकित होऊन म्हणाली–"अहो, नुसत्या करस्पर्शाने रोग बरे होण्याची गोष्ट कोणी कोठे ऐकली आहे का? कोणी सांगितले तुम्हांला आणि तुम्ही त्यावर विश्वास तरी कसा काय केलात?"

विजय हताश होऊन म्हणाला–"अस्सं! बरं झालं, मला आधीच कळली ही गोष्ट!" तो त्याच दिवशी स्वदेशी निघून गेला.

त्या दिवशी रात्री चंडी विनयच्या खोलीत गेली तेव्हां तो अंथरुणावर कण्हत पडला होता. "काय झालं हो तुम्हांला?" तिने त्याला विचारले.

"चंडी! मी फार दिवस जगेनसे वाटत नाही मला. एकाएकी माझ्या छातीत दुखू लागलं आहे!" असे म्हणत विनय अंथरुणावर असह्य वेदनेने पाय आपटून तडफडू लागला.

चंडीने वैद्याला बोलावून आणले आणि विनयला औषध देववून त्याला चांगली झोप येऊन विश्रांती मिळेल अशी व्यवस्था केली. औषध प्याल्यावर विनयला बरे वाटले. त्याचे पाय आपटणे बंद झाले आणि तो डोळे मिटून स्वस्थ पडून राहल्यावर तिने त्याच्या छातीवर कसलं तरी औषध चोळले.

दुसऱ्या दिवशी झोप मोडली तेव्हां विनयला छान बरे वाटू लागले होते.



त्याच्या उशाशी बसून चंडी त्याला वारा घालत असलेली त्याला दिसली.

विनयनं आश्चर्य करीत विचारले– "चंडे! रात्रभर तू येथेच होतीस का? तुझे हे उपकार मी कधीच विसरणार नाही. अद्‌भुत औषध देवविलेस तू. माझा हृदय विकार जसा आला तसाच गेला सुद्धा. मिनिटात प्राण जातो की काय वाटत होते, पण आतां चांगला बरा झालो आहे. हे पहा चंडे! मी राजकन्येशी विवाह करण्याचा विचार मनातून काढून टाकला आहे. मला पाहिजे आहे ती प्रेमळ अशी पत्नी. चार दिवसांपासून पाहतो आहे, तुझ्याहून जास्त प्रेमळ आणि सेवापरायण स्त्री मला कोठून मिळेल? लग्न करायचे तर तुझ्याशीच असे मी ठरविले आहे. तू माझ्याबरोबर आमच्या देशात येशील का? मी तुझ्याशी लग्न करून तुला आपली पट्टराणी करून घेईन."

ते ऐकून चंडीला फार आनंद झाला. म्हणाली–"मी तुमच्याशी खुशीने लग्न क[illegible] अ[illegible] माझे नाव चंडी नसून चंद्रमती आहे."

विनय चकित झाला. "म्हणजे तूच का राजकन्या चंद्रमती?" त्याने चकित होऊन विचारले.

"होय, मीच तुमची चौघांची परीक्षा घेत होते. तिघांना पाहिजे होती ती मी नव्हे. कारण एकाला माझे सौंदर्य पाहिजे होते तर दुसऱ्याला माझे राज्य हवे होते आणि तिसऱ्याला माझी अद्‌भुत मंत्रशक्ती. तुम्हांला फक्त प्रेम हवे होते. म्हणून तुमच्याशी विवाह करायला मी कबूल झाले." चंद्रमती म्हणाली.

तिच्या करस्पर्शानेच आपला हृदयरोग बरा झाला हे विनयने ओळखले. तिच्या विषयी त्याच्या मनात कृतज्ञताभाव उत्पन्न झाला.

लौकरच चांगलासा मुहूर्त पाहून राजाने आपल्या मुलीचे लग्न विनयशी करून दिले आणि त्यालाच आपला वारस करून घेतले.





# महाभारत

पांडवांविषयी धृतराष्ट्र म्हणाला ते ऐकून संजय त्याला म्हणाला–"राजा! पांडवांजवळ मंत्रबळ, माया किंवा तशी अद्‌भुत शक्ती कोणतीही नाही. ते फक्त स्वतःच्या पराक्रमाच्या बळावर अवलंबून आहेत. ते धर्माचरण करूनच युद्धात यश मिळविणार आहेत. तुझ्या मुलांच्या दुष्कृत्यांचा विषवृक्ष फोफावत आहे आणि त्याची फळे त्यांना भोगावीच लागतील. तुला हिताच्या गोष्टी कोणी कोणी सांगितल्या नाहीत? पण तू ऐकलेस का? विदुराने, भीष्माचार्यांनी, द्रोणाचार्यांनी आणि मी किती सांगितले? पण तुला ते सर्व आवडले नाही. तू मला विचारलेस अगदी तसेच दुर्योधनाने भीष्माचार्यांना विचारले होते."

तो म्हणाला–"आजोबा! तुम्ही स्वतः, द्रोणाचार्य, कृपाचार्य आणि इतर महारथी माझ्यासाठी प्राणार्पण करायला तयार असूनही पांडवांसमोर टिकाव धरून उभे राहू शकलां नाही. त्याचे कारण काय?"

भीष्माचार्य म्हणाले–"बाबा रे! मी किती वेळां तुला सांगितले, ते पुन्हां आतां सांगतो आहे. पांडवांशी संधी करून घे. तू आणि तुझे भाऊ सर्व सुखाने पुढील आयुष्य घालवा. श्रीकृष्ण पांडवांच्या पाठीशी असतां त्यांचा वध कोणालाही करणे शक्य नाही." असे सांगून त्याला भीष्माचार्यांनी विश्वोपाख्यान सांगितले.

एकदां ब्रह्मदेव गंधमादन पर्वतावर बसला असतां देव, ऋषी आणि मुनी

भीमाचा पराक्रम



त्याच्या चारी बाजूला घोळका करून बसले. त्यावेळी त्यांना आकाशात एक उज्वल कांति असलेले एक विमान दिसले. ते पाहून ब्रह्मदेव हात जोडून ध्यानमग्न झाला. देव आणि ऋषी मुनींनी नमस्कार केला,

ब्रह्मदेव त्या विमानाचे स्तवन करीत म्हणाला–"हे देवाधिदेवा! तू आपला अंश या पृथ्वीवर पाठव व तो यदुवंशात जन्म घेईल असे कर!"

"तुझी प्रार्थना मी ऐकली. तसेच करीन. तथास्तु!" असा आवाज ऐकू आला आणि ते विमान अंतर्धान पावले.

तेव्हां देवांनी आणि ऋषी मुनींनी ब्रह्मदेवाला विचारले–"हे पितामह! तू ती होतीस?"

ब्रह्मदेव म्हणाला–"तो भगवान विष्णू होता. पूर्वी मरण पावलेले दैत्य, दानव आणि राक्षस या पृथ्वीवर पुन्हां जन्मले आहेत. त्यांचा नाश करण्यासाठी नराबरोबर नारायणाने सुद्धां जन्म घेतला पाहिजे. त्यांच्याबरोबर देवदेखील जन्म घेतील. त्यांना जिंकणे अशक्य होईल. मूर्खांना ही गोष्ट कळणार नाहीं."

भीष्माचार्यांनी ही गोष्ट सांगितली आणि दुर्योधनाला म्हणाले–"तू एक क्रूर राक्षस असला पाहिजेस. म्हणूनच कृष्णार्जुनांशी तुझे वैर आहे."

त्यानंतर सर्व आपापल्या शिबिरात निघून गेले.

युद्ध सुरू होऊन पांचवा दिवस उजाडला. दोन्ही बाजूंची सैन्ये व्यूह करून उभी राहली. कौरवसैन्य मकर व्यूहात उभे राहले तर पांडव सैन्य ससाणा व्यूहात उभे राहले. त्या व्यूहासमोर भीम, शिखंडी आणि धृष्टद्युम्न उभे राहले. त्यांच्या पाठीमागे सात्यकी, अर्जुनादि वीर उभे राहले.

दुर्योधन द्रोणाचार्यांना म्हणाला–"गुरुवर्य! आज पांडवांचा वध झाला पाहिजे." ते ऐकतांच द्रोणाचार्य सात्यकीशी युद्ध करू लागले. सात्यकीच्या सहायार्थ भीम,



शल्य घेऊन युद्ध करू लागले.

भीष्माचार्य आणि द्रोणाचार्यांनी भयंकर मोठे युद्ध सुरू केलेले पाहून त्यांना तोंड द्यायला अभिमन्यू, उपपांडव, शिखंडी वगैरे वीर धांवून आले. शिखंडीशी भीष्माचार्य युद्ध करीत नव्हते. द्रोणाचार्यांनी शिखंडीवर जोराचा मारा सुरू केल्यावर तो तेथून पाय काढून निघून गेला. तेव्हां पांडवांच्या मदतीला अर्जुन धावला व त्याने भीष्माचार्यांशी द्वंद्वयुद्ध सुरू केले. दोघे खूप पराक्रमाने लढले. त्याच वेळी दोन्ही बाजूंच्या इतर वीरांनी आपला पराक्रम दाखविला. या युद्धांत दोन्ही बाजूंचे असंख्य सैन्य हताहत झाले.

पांचव्या दिवसाच्या युद्धांत मोठमोठ्या लक्षात राहण्यासारख्या गोष्टी घडल्या. अश्वत्थामा व अर्जुन या दोघांचे जे युद्ध झाले त्यात अर्जुनाने अश्वत्थाम्याचे कवच आपल्या बाणांनी तोडून टाकले. अश्वत्थाम्याने त्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून धीर सोडल्याशिवाय युद्ध केले. अर्जुनाने त्याला गुरुपुत्र समजून सोडले आणि शत्रूच्या इतर वीरांना हुडकत रणांगणावर हिंडू लागला. द्रोणा चार्य आणि भीम यांचे आपसांत फार मोठे युद्ध झाले. अभिमन्यु आणि लक्ष्मणाच्या मुलाशी झालेल्या युद्धात



कृपाचार्य लक्ष्मणाच्या मुलाच्या मदतीला धावले आणि त्याचा बचाव करून त्याला सुरक्षित स्थानी घेऊन गेले.

त्या दिवशी सात्यकीने पराक्रम दाखवून कौरव सैन्याचा जो संहार केला तो पाहून दुर्योधनाने त्याच्यावर अनेक अति रथींना सोडले. सात्यकीने सूर्यास्ताच्या आधी त्या सर्व अति रथींना नकोजीव करून सोडले आणि त्यांचा नायक जो भूरिश्रवा त्याच्याशी येऊन भिडला. भूरिश्रवा सामान्य योद्धा नव्हता. त्याच्याशी युद्ध करणे अशक्य वाटू लागल्यावर सात्यकीच्या मदतीला आलेले काही वीर पाय काढून पळून जाऊ लागले. तेव्हां सात्यकीचे मुलगे त्याच्या मदतीला



धावून आले. त्यांनी भूरिश्रवाला चारी बाजूंनी घेरले. परंतु भूरिश्रवाने मर्मी-वार करून त्यांना माघार घ्यायला लावली. ते पाहून सात्यकीला त्वेष चढला आणि तो भूरिश्रवाशी द्वंद्वयुद्ध करू लागला. दोघांच्या रथांचा चक्काचूर झाला. दोघांनी तलवारी उपसून जमिनीवर उड्या मारल्या. त्याच वेळी भीम आला. त्याने सात्यकीला आपल्या रथात बसवून घेतले. त्याचप्रमाणे दुर्योधनाने भूरिश्रवाला आपल्या रथात बसवून घेतले.

सूर्यास्ताची वेळ होत आली. त्यावेळेपर्यंत दोन्ही बाजूंची सैन्ये दमून गेली होती. म्हणून आपापल्या शिबिरांकडे निघाली

सुरू झाले. पांडव सैन्य मकर व्यूहात आणि कौरव सैन्य क्रौंच व्यूहात उभे राहले. परंतु हे व्यूह तोडण्यास फार वेळ लागला नाही. सुरवातीलाच भीम व द्रोण दोघांचे युद्ध सुरू झाले. द्रोणाचार्यांनी भीमावर बाणांचा वर्षाव केला. भीमाने चिडून जाऊन द्रोणा-चार्यांच्या सारथ्याचा वध केला. तेव्हा द्रोणाचार्य स्वतःच रथ हांकीत युद्ध करीत राहले. त्यांच्या शौर्यासमोर पांडवांच्या सैन्याचा टिकाव लागेना. त्याच वेळी भीष्माचार्य द्रोणाचार्यांच्या मदतीला आले. तिकडे भीमार्जुनांनी अतुल्य पराक्रम दाखवून कौरवांचा व्यूह छिन्नभिन्न करून टाकला. तेव्हां गदायुद्ध सुरू झाले.

भीम भीष्माचार्यांच्या शौर्यपराक्रमाची फिकीर न करता धृतराष्ट्र पुत्रांचा बध करण्याचे ठरवून कौरव सैन्यात शिरला. कौरवांनी भीमाला जिवंत धरण्याचे ठरविले आणि चारी बाजूंनी घेरले. भीमाने ते ओळखले आणि गदा घेऊन रथांतून जमिनीवर उडी मारली. त्याने चारी बाजूला जमलेल्या कौरव वीरांची डोकी फोडायला सुरवात केली.

द्रोणाशी युद्ध करीत असतां धृष्टद्युम्नाने दुरून भीमाचा रथ पाहिला आणि द्रोणा-चार्यांना सोडून भीमाच्या रथाजवळ धावून

सारथी म्हणाला–"राजा! मला भीमाने दोन घडी येथच उभे राहण्यास सांगितले आणि कौरव सैन्यात शिरला आहे." ते ऐकून भीमावर संकट येण्याची शक्यता ओळखून धृष्टद्युम्न भीमाच्या पाठोपाठ कौरव सैन्यात शिरला. त्याला भीम त्याच्या वाटेत आडवे उभे असलेल्या हत्तींचा आणि कौरव वीरांचा फडशा उडवीत असलेला दिसला. ते पाहून कौरव वीर धावून आले आणि त्यांनी भीमाला घेरले. त्यांनी भीमावर शरवृष्टी सुरू केली. धृष्टद्युम्न आला त्यावेळी भीमाचे शरीर रक्तान माखलेले होते. परंतु तो मृत्युदेव यमधर्मासारखा युद्ध करीत होता हे पाहून धृष्टद्युम्न चकित झाला. धृष्टद्युम्नाने भीमाला आपल्या रथात बसवून घेतले आणि त्याच्या शरिरात शिरलेले बाण काढून त्याला प्रेमाने भेटला.

मध्यंतरी धृतराष्ट्राचे मुलगे भीमाला आणि धृतद्युम्नाला एकदम ठार करण्याच्या हेतूने धांवले. त्यांच्या शरवृष्टीखाली धृष्टद्युम्न झांकला गेला तरी त्याचा युद्धो-त्साह रत्तीभरही कमी झाला नाही. त्याने त्या सर्वांवर संमोहनास्त्र सोडले. तेव्हां बेशुद्ध होऊन पडलेल्या वीरांना द्रोणाने प्रज्ञास्त्र सोडून शुद्धीवर आणले.

तिकडे धर्मराजाला काळजी वाटू लागली. भीमाची किंवा धृष्टद्युम्नाची काहीच बातमी





त्याला मिळत नव्हती. म्हणून त्याने अभिमन्यूबरोबर बारा वीरांना मदतीला पाठविले. त्यांना मदतीला आलेले पाहून भीमाने आणि धृष्टद्युम्नाने द्विगुणित उत्साहाने युद्ध सुरू केले. त्याच वेळी धृष्टद्युम्नाला त्याचे वडील द्रुपद द्रोणाचार्यासमोर उभे राहू न शकल्याने पळून निघाल्याचे कळले. म्हणून तो द्रोणाचार्यांच्या वाटेवर आडवा उभा राहिला. परंतु त्याचा रथ ध्वंस झाला आणि सारथी मारला गेला. हे पाहून धृष्टद्युम्न अभिमन्यूच्या रथात बसला. द्रोणाचार्य पांडव सैन्याचा संहार करीत असलेले पाहून धृष्टद्युम्न व अभिमन्यू तिकडे धावले, परंतु दोघे द्रोणाचार्यांना अडवू शकले नाहीत.

वीरांनी फार वाखाणणी केली.

दुर्योधन आदिकांच्या मनांत पुन्हां भीमाला जिवंत धरण्याचा विचार आला. परंतु धर्मराजाने पाठविलेल्या अभिमन्यू आदिकांनी त्यांना मागे परतविले. आपल्या हातात येऊन दुर्योधन आदिक जिवंत निसटलेले पाहून भीमाला थोडे वाईट वाटले.

युद्धभूमीच्या उत्तरेकडील प्रदेशात अर्जुनाने असंख्य शत्रुसैन्याचा संहार केला.

सूर्य अस्ताचलाकडे वळू लागला त्या वेळी दुर्योधनाच्या मनात भीमाला ठार करण्याची इच्छा उत्पन्न झाली. तो भीमाच्या वाटेवर आडवा उभा राहिला. भीमाने त्याचे छत्र आणि ध्वज तोडून त्याच्यावर असे मर्मी वार केले की त्याला शेवटी कृपाचार्यांच्या रथात जाऊन विश्रांती घेणे भाग पडले. तेव्हां धृष्टकेतु, अभिमन्यू, उपपांडव, केकय यांनी धृतराष्ट्राच्या पुत्रांशी युद्ध सुरू केले. त्या युद्धात दुष्कर्णाचा वध झाला.

थोड्या वेळाने सूर्यास्त झाला. दोन्ही सैन्यांत शांतता पसरली. दुर्योधनाने त्या दिवसाचे युद्ध संपल्याची घोषणा केली आणि आपल्या शिबिरात निघून गेला. धर्मराजाने भीमाला आणि धृष्टद्युम्नाला त्यांच्या शौर्याबद्दल पाठ थोपटून प्रेमालिंगन दिले आणि आपल्या शिबिरात गेला.

काही वेळ विश्रांती घेतल्यावर दुर्योधन भीष्माचार्यांच्या शिबिरात येऊन म्हणाला– "आजोबा! आपण एकाहून एका अभेद्य व्यूहांची रचना केली असूनही पांडवांनी तो व्यूह तोडून जय मिळविला. भीमाने आपल्या मकरव्यूहात प्रवेश केला आणि मला नकोजीव करून सोडले. त्याचा तो भयंकर देह पाहूनच मला मूर्च्छा आल्यासारखे झाले. माझे मन आज का कोणास ठाऊक भयभीत झाले आहे. तुमच्या सहाय्याने पांडवांचा वध करून विजयी होण्याची आशा धरून मी आहे."

भीष्माचार्य म्हणाले–"बाबा रे! तुला विजयी करण्यासाठी मी आपले सर्वस्व पणाला लावले आहे. मी अंग चोरून युद्ध करीत नाही. पांडवांच्या बाजूने युद्धाला आलेले वीर शूर व पराक्रमी आहेत, महारथी आहेत आणि शस्त्रास्त्रात अद्वितीय आहेत. जिवावर उदार होऊन युद्ध करणाऱ्या त्या वीरांना सहजी जिंकणे शक्य नाही. मी स्वतःच्या प्राणाची पर्वा केल्याशिवाय [illegible] पाहणार नाही."

ते ऐकून दुर्योधनाच्या मनाचे समाधान झाले.

भीष्माचार्यांनी थोडा वेळ विचार केला आणि दुर्योधनाला म्हणाले–"तुझ्यासाठी उत्साहाने युद्ध करणाऱ्यास माझ्याशिवाय द्रोणाचार्य, शल्य, कृतवर्मा, अश्वत्थामा, सोमदत्त, जयद्रथ, विंदानुविंद, बृहद्बल, चित्रसेन, बाल्हिक इत्यादी वीर सहस्रावधी रथी, गजदल, अश्वदल तयार आहे. तरी तुझ्या हिताची म्हणून एक गोष्ट सांगणे आवश्यक आहे; इंद्र आपल्या देवांचे सैन्य घेऊन आपल्या मदतीला आला तरी पांडवांना जिंकणे शक्य नाही. म्हणून पांडवांना मी जिंकतो की पांडव मला जिंकतात हे मी सांगू शकत नाही."

असे सांगून भीष्माने दुर्योधनाला त्याच्या अंगाला पडलेल्या जखमा भरून याव्या यासाठी विशल्यकरण नावाचे औषध दिले.





# मित्रभेद

[ ५ ]

दमनकने दंतिलची गोष्ट सांगितली ती ऐकून संजीवक म्हणाला–"ती सांगितलेली गोष्ट फार चांगली आहे. तर मग तू म्हणालास तसं करायला मी तयार आहे."

त्यानंतर दमनक संजीवकाला पिंगलकाकडे घेऊन जाऊन त्याला म्हणाला–"महाराज, हा पहा संजीवक आला आहे. यानंतर जशी प्रभूची मर्जी!"

संजीवकाने पिंगलकाला नमस्कार केला आणि नम्रपणे बसला.

पिंगलकाने आपला भयंकर व बळकट नखे असलेला उजवा पंजा वर करून संजीवकाचा नमस्कार स्वीकार करीत विचारले–"कसं काय, तुझी तब्येत बरी आहे ना? तू या अरण्यात कसा काय आलास?"

संजीवकाने वर्धमानाच्या गाड्यांच्या तांड्याबरोबर येत असतां एकटा पडल्यामुळे त्याला त्यानंतर जो त्रास झाला, तो सर्व सिंहाला वर्णन करून सांगितला.

तो ऐकून पिंगलक त्याला म्हणाला– "मित्रा! तुला मुळीच भिण्याचे कारण नाही. तू या अरण्यात वाटेल तिकडे मनसोक्त हिंड फिर. परंतु माझ्या नजरेआड मात्र राहू नकोस. कारण तू माझ्या दृष्टीआड झालास आणि जंगली श्वापदांची वांकडी नजर तुझ्यावर पडली तर तू विनाकारण संकटात सांपडशील. तुला त्रास देणारी, पापाची भीती यत्किंचितही नसणारी क्रूर जनावरे या अरण्यात अनेक आहेत."

"ठीक!" असे सांगून संजीवक यमुना नदीवर गेला, पोटभर पाणी पिऊन घेतले

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



आणि पूर्वीप्रमाणे मनाला वाटेल तिकडे निर्भयपणे अरण्यात हिंडू फिरू लागला.

दिवसामागून दिवस जात होते आणि पिंगलक व संजीवक यांचा परस्पर स्नेह वाढत गेला. सिंह संजीवकाचा सल्ला घेऊन प्रत्येक गोष्ट करू लागला. संजीवक हुशार होता. तो दमनक आणि करटक वगैरेंची कारस्थाने ओळखून त्यांची माहिती पिंगलकाला देऊन त्याला सावध करीत असे.

तेव्हां दमनक एकदां करटकाला म्हणाला—"दादा! आपण आतां निराधार निराश्रित झालो, बघ! पिंगलक संजीवकाबरोबर गप्पा गोष्टीत किती रंगतो, तो पाहतो आहेसच. त्याने शिकारीला जाणे

पोटभर खायलादेखील मिळत नाही. तुझ्या मते आपण आतां काय करावे म्हणतोस?"

करटक म्हणाला—"जाऊन राजाला सावध कर. राजाने बोलाविले नाही, तरी त्याला सावध करणे मंत्र्याचे कर्तव्य आहे. गवत खाणाऱ्या या प्राण्याची ओळख राजाशी करून देण्याचे शहाणपण तुझेच नव्हते का?"

"बरोबर म्हणालास, चूक माझी खरीच, राजाची चूक नाही. स्वत: केलेल्या चुकीची फळे कशी चाखावी लागतात हे देवशर्माच्या कथेवरून कळतेच नाही का?" दमनक म्हणाला.

"ते, कसं काय बुवा?" करटकाने विचारले. तेव्हां दमनकाने ती गोष्ट सांगितली.

### देवशर्माची कथा

मनुष्यवस्तीपासून पुष्कळ दूर एका निर्जन प्रदेशात एक मठ होता. देवशर्मा नांवाचा एक यतीतुल्य साधू त्या मठात एकटा रहात असे. तो शिवलिंगाची पूजा करी. अनेक भक्त येत आणि मूल्यवान वस्त्रे दान करीत. देवशर्माने सर्वसंगपरित्याग केला होता, तरी त्याला सोन्याचा मोह होता. एकदा तो वेष पालटून सर्व उंची मूल्यवान वस्त्रे एका गाठोड्यात

घेऊन ती वस्त्रे विकली. त्याने ते सोने एका पिशवीत ठेवले आणि पिशवी खाकेत ठेवून मठात परत आला. त्या दिवसापासून तो कोणावर विश्वास नसल्यामुळे रात्रंदिवस ती पिशवी खाकेतच ठेवू लागला. "संपत्ती मिळविणे कष्टाचे असते; तिचे रक्षण कष्टाचे असते; ती हातची गेली तर दु:ख होते. खर्च करावी लागली तरी दु:ख होते. तिचे मूळच दु:खमय, तर परिणामी तिच्यापासून दु:खच मिळते."

आषाढभूती नावाचा एक नीच, पाप पुण्याचा विचार नसलेला मनुष्य होता. दुसऱ्यांना लुबाडणे हा जणुं काही त्याचा धंदाच होता. त्याची नजर देवशर्माच्या खाकेतल्या सोन्यावर पडली. ते कसे उडवायचे याचा तो विचार करू लागला. मठाच्या भिंती दगडी होत्या. म्हणून भिंतीला भोक पाडून आंत शिरणे शक्य नव्हते. खिडक्या फार उंचीवर होत्या. म्हणून आषाढभूतीने देवशर्माचा शिष्य होऊन त्याचा पूर्ण विश्वास संपादन करण्याचे ठरविले.

त्याप्रमाणे आषाढभूतीने देवशर्माकडे जाऊन त्याला "ओम नम:शिवाय!" असे म्हणत नमस्कार केला आणि त्याच्या पायांवर डोके ठेवले. नंतर अत्यंत नम्रतापूर्वक म्हणाला—"महात्मन्! या संसारसागराचा



वीट आला आहे. संसार गवतासारखा क्षणात जळून जाणारा,—क्षणभंगूर आहे. सुख पांढऱ्या निर्जल ढगासारखे आहे. बंधुमित्र, पुत्रकलत्र स्वप्नासारखे, हा केवळ भ्रम आहे. अशी मनाची पूर्ण खात्री झाल्यामुळे मोक्षप्राप्तीचा मार्ग आपण दाखवाल असे समजून आपणांकडे आलो आहे."

ते ऐकून देवशर्मा म्हणाला—"बाबा रे! इतक्या लहान वयांत तुला ही ज्ञानप्राप्ती झाली. तू खरोखरच धन्य आहेस. तारुण्यात मनावर ताबा ठेवणे हाच खरा मनोनिग्रह होय. मला तू मोक्ष मार्ग विचारतो आहेस, तर हे पहा, "ओम् नम:शिवाय!" म्हणून देवाला एक फूल जरी वाहलेस तरी पुरे

आहे. या जगात तुला पुन्हा जन्म घेण्याची गरजच नाही."

देवशर्माचे पाय धरून आषाढभूती म्हणाला–"गुरुवर्य! ह्या मंत्राचे पुनश्चरण कसे करायचे हे सांगून मला कृतार्थ करावे!"

"मुला! तेदेखील सांगतो. तू रात्री मठात येता कामा नयेस. रात्री एकट्याने राहाणे आवश्यक आहे. उपदेश मिळाल्यावर तू बाहेरच्या झोपडीत जाऊन झोप." देवशर्मा म्हणाला.

आषाढभूती म्हणाला–"स्वामी! आपली आज्ञा शिरसावंद्य आहे!"

त्या दिवशी रात्री देवशर्माने झोपायला जाण्यापूर्वी मंत्रोपदेश करून आषाढभूतीला आपला शिष्य करून घेतले. शिष्य दररोज पहाटे उठून गुरूला पूजेसाठी फुले पत्री वगैरे आणून देई. परंतु खाकेतली पिशवी शिष्याजवळ ठेवून देण्याइतका शिष्यावर विश्वास बसल्याचे एकही चिन्ह दिसले नाही.

बरेच दिवस लोटले. आषाढभूती विचार करू लागला–"या माणसाचा पूर्ण विश्वास [illegible] नाही. पहाटे उठून याचा गळा दाबून टाकावाचा की याला विषप्रयोग करून वाटेला लावावे."

इतक्यात एका भक्ताच्या मुलाने दुसऱ्या दिवशी त्यांच्या घरी व्रतबंध म्हणजे मुंज असल्याचे सांगून बटूस आशीर्वाद देण्यासाठी येण्यास आमंत्रण केले.

दुसऱ्या दिवशी देवशर्मा आषाढभूतीला बरोबर घेऊन बोलावणे आले होते त्या गांवी निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर एक नदी लागली. देवशर्मा स्नानसंध्यादी आटपून घेण्याचे ठरवून आपले कपडे व खाकेतली पिशवी आषाढभूतीच्या हातात देत म्हणाला–"हे बघ, मी आलोच. तोंपर्यंत माझ्या या कपड्यांवर आणि मुख्य करून या पिशवीवर नजर ठेव. ही शिवशंकराची ठेव आहे." असे सांगून निघून गेला. तिकडे देवशर्मा दृष्टीआड झाला आणि इकडे आषाढभूतीने ती सोने ठेवलेली पिशवी घेऊन तेथून पाय काढला.



# १४३. विषुववृत्तावरील बर्फाच्छादित पर्वत

केनिया देश भूमध्य रेषेवर असला तरी त्या देशातल्या पर्वतांची शिखरे बर्फाच्छादित असतात. सर्वात उंच शिखर १७,०४० फुट उंच आहे. एकेकाळी हा ज्वालामुखी पर्वत होता. ह्याच्या शिखरावर चढणे फार कठीण आहे. ह्याच्या दऱ्या व खोरी वृक्ष वनस्पतींनी झाकलेली (?) असतात.



# अमरवाणी

गुणा: खलु गुणा एव
न गुणा भूति हेतव:,
धनसंचय कर्तृणि
भाग्यानि पृथगेव हि ।  ॥ १ ॥

[ सद्गुण हे सद्गुणच असतात. त्यांपासून ऐश्वर्यलाभ होत नसतो. धनवैभव प्राप्ती ज्याने होते ते प्रारब्ध निराळेच असते. ]

आत्मायत्ते गुणग्रामे,
नैर्गुण्यम् वचनीयता,
दैवायत्तेषु वित्तेषु
पुंसां का नाम वाच्यता  ॥ २ ॥

[ सद्गुणाची प्राप्ती स्वत:च्या शक्तीनेच होते. त नसणे वाईट. भाग्याने मिळणारे धन नसले तरी त्यात काही बिघडत नाही. ]

यस्यास्ति वित्त स नर: कुलीन ,
स पंडित, स्स श्रुतवान्, गुणज्ञ (विदिज्ञ:),
स एव वक्ता, स च दर्शनीय:,
सर्वे गुणा: कांचन माश्रयन्ति ।  ॥ ३ ॥

[ ज्याच्या जवळ पैसा असतो तोच कुलीन, तोच पंडित, तोच शास्त्रज्ञ, तोच गुणवान (तोच कर्तव्याकर्तव्य समजणारा) तोच वक्तृत्वसंपन्न, तोच सुंदर. (एकूण) सर्व गुण पैशावर अवलंबून असतात. ]



# यक्ष पर्वत

[ १९ ]

[ वीरपूरच्या राजाच्या आज्ञेप्रमाणे सेनापती घोडदळ आणि पायदळ सैन्याच्या तुकड्या घेऊन समरबाहूच्या किल्ल्यापर्यंत येऊन पोचला आणि स्वर्णाचारीला शरण यायला धमकावून सांगितले. समरबाहूच्या अनुयायांनी फेकलेल्या भाल्यापैकी एक वीरपूरच्या सेनापतीच्या खांद्याला लागला. पुढे– ]

समरबाहूच्या अनुयायांनी फेकलेला एक भाला वीरपूरच्या सेनापतीला लागला आणि तो मोठ्याने किंकाळी फोडून घोड्यावरून खाली पडला. तेव्हां त्याच्या खांद्यात शिरलेला भाला सरकून बाजूला जाऊन पडला. सैनिकांनी आपल्या सेनापती-च्या जखमांना मलम लावून पट्टी बांधली.

स्वर्णाचारी समरबाहूच्या अनुयायांना सावध करीत म्हणाला–"आपण पहिल्याच हल्ल्यात शत्रूला घाबरवून सोडले आहे. आपण फक्त सव्वीस जणच आहो, परंतु त्याला आपले सैन्य फार मोठे असेलसे वाटत असेल नाही? तसं झालं तर तो वर चढून यायचे साहस करणार नाहीं."

ते ऐकून समरबाहूचा एक अनुयायी म्हणाला–"आचार्य मंत्री! समजा, शत्रूने साहस करून पर्वत चढून यायचा प्रयत्न केलाच तर आपण नेमलेले रानटी जातीचे



लोक त्यांच्यावर सिंहावाघांना सोडतील आणि त्यांना 'नको जीव' करून सोडतील."

स्वर्णाचारीने डोंगराच्यां पायथ्याजवळच्या वीरपूरच्या सैन्याकडे पाहिले व म्हणाला—"त्यांच्यापैकी फक्त थोडे घोडेस्वार घोड्यावर बसून तयार झाले आहेत. बाकीचे लोक सेनापतीच्या सेवाशुश्रूषेबरोबर डोंगरी किल्ल्यावर कशी स्वारी करायची, याचा विचार करीत असल्यासारखे दिसत आहेत. म्हणूनच ते व सेनापती मधूनमधून किल्ल्याकडे पहात आहेत."

समरबाहूच्या अनुयायांपैकी दोघे साहसी वीर स्वर्णाचारीजवळ येऊन म्हणाले—"आचार्य महामंत्री! शत्रूवर हल्ला करायला आत्तांच उत्तम संधी आहे असे मला वाटते. आपला हुकूम होण्याची खोटी, आम्ही एकदम शत्रूवर तुटून पडतो. आम्ही आपले भाले फेंकून त्यांना खाली पाडतो आणि त्यांच्या घोड्यांना धरून घेऊन येतो."

समरबाहूच्या अनुयायांचे धैर्य व साहस पाहून स्वर्णाचारीला आनंद झाला खरा, परंतु त्याला डोंगरावरून उतरून खाली शत्रूवर हल्ला करण्याचा विचार आवडला नाही. म्हणाला—"विनाकारण घाई करू नका. शत्रूसैन्य दहापट तरी असेल. आपण त्यांच्यावर हल्ला करण्यासाठी खाली उतरू लागलो तर ते लगेच शस्त्रास्त्रे घेऊन तयार होणार नाहीत का? घोड्यावर बसून ते डोंगर चढून येतील आणि आपल्या किल्ल्याला वेढा देतील. कदाचित आपल्याला माघार घ्यावी लागेल. आपण डोंगरापलीकडच्या खोलगट प्रदेशांत उंट बांधून ठेवले आहेत त्यांना सावध केलेत का?"

"त्यांना एका जागी एकत्र करून त्यांच्यावर पाहरा देण्यासाठी दोघांना नेमले आहे. आतां आपला काय हुकूम आहे? आपले भालाबरछी शत्रूपर्यंत पोंचणार नाहीत. इतका दूर आहे तो. शत्रू तिकडे आणि आपण इकडे. असेच राहायचे ना?" समरबाहूचे दोघे अनुयायी म्हणाले.

त्यांचे ते बोलणे ऐकून स्वर्णाचारी स्मित करून म्हणाला—"युद्ध एवढ्यात संपले, असे का वाटते आहे तुम्हांला? शत्रूचा सेनापती जखमी होऊन पडला म्हणून तो आपल्या सैनिकांबरोबर पळून जाईल असे वाटले का तुम्हांला? त्याने तसे केले तर वीरपूरचा राजा पळपुटा म्हणून त्याला दंड नाही का करणार?"

स्वर्णाचारी इकडे असे विचारीत असता शत्रूपक्षांतील काही जण धांवत जाऊन घोड्यावर बसले आणि पायदळ सैनिक आपापले भाले घेऊन डोंगराकडे चढण्याच्या विचाराने पाहूं लागले. दोघां सैनिकांनी सेनापतीला हात देऊन त्याला एका घोड्यावर बसविले. त्याच्याबरोबर चौघे पांचजण घोडेस्वार डोंगराच्या पायथ्याजवळ हिंडून वर चढायला सोयीची जागा कोणती होईल, हे पाहू लागल्यासारखे दिसले.

स्वर्णाचारीने ते पाहून ओळखले. समरबाहूचे सैनिक त्या डोंगरी किल्ल्यापर्यंत येण्यासाठी ज्या पायवाटेने येत असत त्या वाटेने येणे सेनापतीला व त्याच्यां सैनिकांना अशक्य नाहीं. ते चढू लागले तर त्यांच्यावर भाल्यांचा हल्ला चढविण्यास समरबाहूच्या सैनिकांना तयार राहण्यास स्वर्णाचारीने सांगितले आणि एका अनुयायाला घेऊन रानटी जातीच्या लोकांना



जेथे सिंहावाघांबरोबर लपून बसायला सांगितले होते तिकडे जायला निघाला.

स्वर्णाचारीला येत असलेला पाहून ते रानटी जातीचे लोक आनंदाने उठून उभे राहिले. त्यांचा नायक नमस्कार करून म्हणाला—"महाराज! वीरपूरच्या सैनिकांपेक्षां आपलेच सैनिक जास्त शूर दिसतात की! युद्धाचा चांगला अनुभव आहे यांना, पहिल्याच हल्ल्यात यांनी शत्रूला घाबरवून सोडले. सेनापतीला ठार केले."

"तो मेला नाही अजून, जखमी झाला आहे. या खेपेस शत्रू डोंगराच्या पायथ्याशी उभा राहून शरण या, असे म्हणून थांबणार नाही तर तो चढून वर येईल आणि अखंवट



बांधलेला किल्ला बळकावून बसेल. वर चढून यायला त्याला पाऊलवाट नक्कीच सोयीची होईल. तुम्ही संधी पाहून त्याच्या अंगावर दोघां तिघां सिंहावाघांना सोडायला तयार ठेवा." असे स्वर्णाचारीने त्यांना समजावून सांगितले.

रानटी जातीच्या लोकांचा नायक स्वर्णाचारीला पाऊलवाटेलगतच्या लहानशा गुहांजवळ घेऊन गेला. सिंहाचा पिंजरा एका गुहेच्या तोंडाजवळ होता. त्याचप्रमाणे वाघांचे पिंजरेसुद्धा दुसऱ्या एका गुहेच्या तोंडावर होते. त्या पिंजऱ्यांवर प्रत्येकी दोघे दोघे रानटी जातीचे लोक चढून बसले.

नायक आपल्या अनुयायांकडे बोट दाखवीत स्वर्णाचारीला म्हणाला–"पाहिलेत महाराज! वीरपूरच्या लोकांनी या बाजूने पुढे पाऊल टाकले की पिंजऱ्यांची दारे उघडून हे लोक वरच्या वर पळून जातील. ही भुकेली क्रूर जनावरे शत्रूवर तुटून पडतील. त्यांना खूप मेजवानी मिळेल."

"ती त्यांच्यावर तुटून पडू शकतील किंवा सुटका मिळालेली पाहून जंगलात पळून जाऊसुद्धा शकतील. जे होईल, ते होईल, परंतु एवढा प्रयत्न तुम्हीच काय तो करा. आणखी एक गोष्ट सांगून ठेवतो, तुम्ही मला महाराज म्हणतां तसा मी महाराज नाही, त्याचा मंत्री आहे. तुम्ही केलेल्या मदतीबद्दल आमचे महाराज तुम्हांला भरपूर बक्षीस देतील, विश्वास असू द्या." स्वर्णाचारी म्हणाला.

स्वर्णाचारी रानटी जातीच्या लोकांना जे काही सांगावयाचे होते ते सांगून परत समरबाहूच्या अनुयायांजवळ आला आणि त्याने डोंगरावरून खाली पाहिले. या खेपेस सेनापती डोंगरावरच्या लोकांना शरण यायला सांगून थांबणार नाही हे ओळखून डोंगरी किल्ला सर करण्यासाठी नवीन शक्कल काढीत असल्याचे दिसले. पायदळ सैन्य पायवाटेने डोंगरावर चढू लागले. त्यांच्या पैकी काही जणांजवळ धनुष्य-बाण होते. वरून समरबाहूच्या अनुयायांनी भाल्यांचा किंवा दगडांचा वर्षाव केला की वीरपूरचे पायदळ सैन्य थांबे व बाणांचा प्रतिहल्ला करू लागे.

वीरपूरच्या पायदळ सैन्यापैकी काही हताहत होऊन पडले तरी बाकी लोक वर चढून येणार आणि मग त्यांच्याशी होणाऱ्या चकमकीत आपली सव्वीस जणांची तुकडी अपुरी पडणार, हे लक्षात घेऊन स्वर्णाचारीने आपल्या अनुयायांना जवळ बोलविले व म्हणाला–"आपण शक्यतोंवर शत्रूला डोंगर चढू द्यायचा नाही, परंतु जर का त्याची पर्वा न करता शत्रू चढून येऊ लागला तर मात्र आपण आपला बचाव करण्यासाठी मागे फिरून जंगलात पळून जाणे हाच एक उपाय उरेल. उंटांना पळून जाण्यायोग्य तयारी करून ठेवण्यासाठी दोघांनी तिकडे जावे. तसे दोघे त्यांच्या देखरेखीकरितां तिकडे आहेतच."

मध्यंतरी वीरपूरचे पायदळ सैन्य पाऊलवाटेने चढून येऊ लागले. सेनापती एकटा डोंगराच्या पायथ्याशी राहून घोडदळाला काही तरी सूचना करीत होता आणि काही घोडेस्वार पायदळ सैन्याच्या पाठोपाठ डोंगर चढू लागले.

ते पाहून स्वर्णाचारी आपल्या अनुयायांना म्हणाला–"उष्ट्रवाहन वीर हो!



वीरपूरच्या मूर्ख सेनापतीने आपले उंट वर असतील असे समजून आपल्या घोडेस्वारांना कूच करायला सांगितलेले दिसते आहे. तुमच्यापैकी काही जण वरून मोठमोठे दगड त्यांच्यावर सोडा. उरलेल्यांनी भाल्या बरच्यांचा हल्ला करावा."

त्याप्रमाणे समरबाहूचे अनुयायी मोठमोठे दगड डोंगरावरून ढकलू लागले. परंतु सगळेच दगड खालपर्यंत पोचत नव्हते. वाटेतल्या खाचाखळग्यात अडकून रहात होते किंवा दुसरीकडेच कोठे तरी निघून जात होते. ते पाहून वीरपूरच्या पायदळ सैन्याचा उत्साह वाढला. ते जयजयकार करीत डोंगर चढून येऊ लागले.



त्यांच्या पाठोपाठ येणारे घोडेस्वारदेखील तलवारी वर करून वीरपूरच्या राजाचा जयघोष करू लागले.

वाघसिंह होते नेमके त्याच बाजूला वीरपूरचे पायदळ सैन्य व घोडदळ येत होते. रानटी लोक सिंहावाघांना शत्रूच्या अंगावर सोडतात की घाबरून जाऊन स्वस्थ राहातात हा विचार स्वर्णाचारी करीत असतां त्याला एकाएकी वाघासिंहाच्या डरकाळ्या ऐकू आल्या. दुसऱ्या क्षणाला सिंह आणि वाघ पिंजऱ्यांतून बाहेर पडले आणि समोर दिसले त्या वीरपूरच्या सैनिकांवर तुटून पडले. हाहाकार उडून गेला. अकस्मात् त्यांच्यावर झालेल्या या हल्ल्यामुळे वीरपूरच्या सैन्यात गोंधळ उडून गेला. काही जण सिंहावाघांच्या पंजाच्या तडाख्याने मेले तर त्यांना पाहून काही पळू लागले आणि परस्परांना धक्का देत पडून डोंगरावरून खाली घसरून जाऊ लागले.

त्या गोंधळात घोडे विथरले आणि मागे वळून पळू लागले. काही घोडेस्वार घोड्या-वरून घसरून पडले आणि घसरत डोंग-राच्या पायथ्यापर्यंत येऊन पोचले.

पाहतां पाहतां झालेला हा गोंधळ पाहून आधीच जखमी झालेला वीरपूरचा सेनापती आणखीच जास्त घाबरला आणि किंकर्तव्य-विमूढ स्थितीत जागच्या जागी उभा राहाला.

सिंहावाघांना समोर कोणी दिसला तों पर्यंत ते त्यांच्या अंगावर धावले. परंतु पुढे कोणी दिसला नाही तेव्हां जंगलाच्या वाटेने डरकाळ्या फोडीत निघून गेले.

स्वर्णाचारी व समरबाहूच्या अनुया-यांना अपार आनंद झाला. रानटी लोक इतक्या उत्तम तऱ्हेने आपली कामगिरी बजावतील याची कल्पना त्यांना नव्हती. शत्रूचे पायदळ सैन्य आणि घोडेस्वार माघारी वळले. परस्परांना मदत करीत किंवा हात धरून ते डोंगर उतरून जाऊ लागले. ते पाहून समरबाहूचा एक अनुयायी स्वर्णा-चारीला म्हणाला—"आचार्य महामंत्री! आता तरी आज्ञा करावी. आम्ही त्यांच्या-वर भाल्यांचा हल्ला चढवून त्यांना एका क्षणांत ठार करतो."

स्वर्णाचारीला ते ऐकू आले, परंतु त्याने काहीच उत्तर दिले नाही. त्याने पळवून लावलेले शत्रुसैन्य त्याच्या सैनिकांच्या दहा पट तरी होते. पुन्हां डोंगर चढून हल्ला कसा करायचा या विचारात शत्रुसैन्य असल्यासारखे त्याला दिसत होते. जर त्यांनी हल्ला केलाच तर त्यांना पळवून लावण्यासाठी त्यांच्यावर अकस्मात् सोडा-यला वाघसिंह कोणीच नव्हते.

वीरपूरचा सेनापती आपल्या सैनिकांची जमवाजमव करून त्यांना प्रोत्साहन देण्याचा उपाय करू लागला. घोडेस्वार डोंगराच्या दुसऱ्या बाजूला चढण्यासारखी जागा आहे की नाही, शत्रूची तयारी त्या बाजूला कशी काय आहे, हे पाहून येण्यासाठी त्या बाजूला गेले. स्वर्णाचारी त्यांच्याकडे बोट दाखवून आपल्या अनुयायांना म्हणाला—"साहस किंवा दुःसाहस दोन्हींचा अर्थ समजूनच शहाण्यांनी युद्ध करायचे असते. पहा ते, पुन्हां आपल्यावर चालून येण्यासाठी विचार करीत असलेले दिसत आहेत. या खेपेस पायदळ सैन्याशी व घोडेस्वारांशी दोन हात करावे लागणार. शत्रूच्या एवढ्या मोठ्या सैन्याला तोंड देणे आपल्याला शक्य



नाही. आपण पाय मागे घेऊन आपले उंट बांधून ठेवले आहेत त्या बाजूला पळून जाऊ या. उंटावर बसून पळून जाण्या-व्यतिरिक्त दुसरा उपाय दिसत नाही. कदाचित ते दोघे क्षत्रियवीर आणि आपले महाराज समरबाहू तिकडे भेटतील."

"सिंहावाघांच्या पिंजऱ्याजवळ ते जे रानटी लोक होते ते काय करीत आहेत कोण जाणे? त्यांनी मदत केली तर शत्रूला परतवणे तेवढे कठीण जाणार नाही." समरबाहूचा एक अनुयायी म्हणाला.

"शत्रुसैन्य पाहून ते घाबरून कोणाला काही सांगितल्याशिवाय पळून गेले अस-तील. आता आपण शत्रुसैन्य चढून येऊन

आपल्यावर हल्ला करण्याआधी येथून पाय काढावा." स्वर्णाचारी म्हणाला.

"परंतु, आचार्य महामंत्री! आपण पळून गेलो तर आपल्याला भितरे पळपुटे मानून शत्रू..." असे समरबाहूचा एक अनुयायी म्हणत होता, इतक्यात उंटावर देखरेख ठेवण्यासाठी नेमलेल्यापैकी एकजण येऊन म्हणाला–"आचार्य महामंत्री! चारपांच घोडेस्वार येऊन आपल्या उंटांची जागा पाहून जाऊ लागले तेव्हां आम्ही त्यांचा पाठलाग करू लागलो तर ते पळून गेले. या खेपेस ते घोड्यावर बसून आपल्यावर हल्ला करतील से वाटते आहे."

"यांत संशय कशाला, नक्की तेच करणार ते. त्यांनी आपले उंट धरले तर आपली जी दुर्गत होईल,...परंतु तो विचारच नको करायला. तर मग चला, उंट आहेत तिकडेच सर्व जण जाऊ या." असे सांगून स्वर्णाचारी निघाला.

सर्व जण उंट होते त्या जागी जाऊन उंटांवर बसले आणि त्या खोलगट जागेतून वर [illegible] वर पन्नास एक वीरपुरुष घोडेस्वार तलवारी भाले वर दाखवीत येत असलेले दिसले. अशा स्थितीत जिवावर उदार होऊन शत्रूची फळी फोडून पळून जाण्याशिवाय स्वर्णाचारीला दुसरा उपाय सुचला नाही. मागे पाऊल घेणे अशक्य होते. कारण त्या बाजूने पायदळ सैन्य आडवे उभे होते. स्वर्णाचारीने ते ओळखले.

तो लगेच तलवार उपसून ती फडकवीत म्हणाला–"उंष्ट्रवीर हो! माझ्या पाठोपाठ या. शत्रूला, तो किल्ल्यावर स्वारी कशाला करतो आहे, असे वाटले पाहिजे. समरबाहू महाराज की जय!" असे म्हणत त्याने उंटाला पुढे जायला खूण केली.

"वीरसिंह महाराज की जय!" असा जयघोष करीत घोडेस्वारांनी आपल्या घोड्यांना टांच मारली आणि वेगाने येऊन समरबाहूच्या उष्ट्र स्वारांवर त्यांनी हल्ला केला.





# मूळ कारण

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला आणि प्रेत खांद्यावर काढून घेऊन नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू ऐश्वर्यशाली आहेस म्हणून धनाशेने एवढे श्रम करीत नसशील. परंतु धन काय काय करवते हे तुला माहीत नसेल. धनामुळे परममित्र परमशत्रू होतात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

साकेत नगरी गोपू नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. तो दररोज रानात जाऊन लाकडे फोडी आणि ती विकून आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवी. तो एकदां रानात गेला असता त्याला कोणीतरी कण्हत असल्याचे ऐकू आले.

## वेताळाच्या गोष्टी



जवळ जाऊन पाहतो तर एका खड्डयात त्याला शेजारच्या गांवचा रामभद्र नावाचा एक श्रीमंत गृहस्थ पडला असल्याचे कळले.

तो श्रीमंत मनुष्य म्हणाला–"मला चोरांनी लुटले आणि खूप बडवून अर्धमेल्या स्थितीत या खड्डयात टाकून दिले. दोन दिवस झाले, मी कोणी येईल म्हणून वाट पाहतो आहे. तू देवासारखा पावलास."

गोपूने रामभद्राला खांद्यावर उचलून घेऊन त्याच्या घरी पोचते केले. रामभद्रने बरा झाल्यानंतर गोपूला बोलावून घेतले आणि म्हणाला–"बाबा रे! मी तुझे उपकार आयुष्यभर विसरणार नाही." तो त्याला इनाम म्हणून थोडे पैसे देऊ लागला. परंतु गोपूने ते घेतले नाहीत. म्हणाला–"माणसाने माणसाला मदत नाही करायची तर कोणी करायची? या मदतीबद्दल मोबदला घेणे मला आवडत नाही."

ते ऐकून रामभद्राला आनंद झाला. त्या दिवसापासून दोघांची परस्परांशी गाढ मैत्री झाली. गोपूला नेहमीच पैशाची अडचण असे. तो कोठून तरी कर्जाऊ पैसे घेई. त्याने चुकून सुद्धां रामभद्राकडून पैसे घेतले नाहीत. ती गोष्ट कळली तेव्हां रामभद्राला फार वाईट वाटले. परंतु गोपूच्या आर्थिक अडचणीविषयी उल्लेख करून व त्यासाठी गोपूने मदत घ्यावी ही गोष्ट बोलायला रामभद्राला संकोच वाटत असे.

त्यांच्या या परस्परांशी असलेल्या वागणुकीमुळे त्यांचा परस्परांवरचा स्नेह वाढत गेला. गावात आदर्श मित्र म्हणून दोघांची ख्याती होती. दररोज एकदां तरी भेट झाल्याशिवाय दोघांना झोप येत नसे.

असेच काही दिवस लोटले. एकाएकी गोपूची बायको फार आजारी पडली. तो आजार सामान्य औषधपाणी करून बरा होण्यासारखा नव्हता. सर्व लोक गोपूला सांगू लागले की, देवशर्माशिवाय या आजारातून तुझ्या बायकोला कोणी वांचवू शकणार नाही.

गोपूचे हृदय पिळवटून निघाले. बायकोवर त्याचे प्रेम प्राणापेक्षा ही अधिक होते. देवशर्माचे काळीज दगडाचे होते. पैसे मोजल्याशिवाय तो औषध देणार नाही, गरिबाच्या घरात तो पाऊलसुद्धा ठेवणार नाही, असा विचार करून गोपूने आशाच सोडली.

ती गोष्ट कळतांच रामभद्रने स्वतः देवशर्माला बोलावून गोपूच्या बायकोची प्रकृती तपासून औषध द्यायला सांगितले. त्याने प्रकृती तपासून म्हटले–"हा रोग नक्कीच बरा होईल. तीस दिवस औषध द्यावे लागेल. दररोजच्या औषधाची किंमत पन्नास वराह (सोन्याची नाणी) होतील."

रामभद्र म्हणाला–"काही हरकत नाही. तुम्ही औषध सुरू करा."

त्याप्रमाणे एक महिनाभर औषध घेतल्यावर गोपूची बायको चांगली बरी झाली. वैद्याला पंधराशे वराह रामभद्रने दिले.

बायको आजारातून वांचली म्हणून गोपूला एकीकडे परमानंद झाला, तर दुसरीकडे उपकाराच्या ओझ्याखाली आपली कंबर मोडणार या विचाराने तो अत्यंत दुःखी झाला. "काय वाटेल ते करून मी तुझे हे कर्ज फेडीन," असे गोपू म्हणाला. रामभद्र त्याचे उत्तर म्हणून काहीच बोलला नाही.

ते कर्ज फेडण्यासाठी गोपूने अनेक प्रकारचे कष्ट सहन केले, परंतु ते आयुष्यभरात शक्य होणार नाही, असा विचार करून मनातल्या मनात फार कष्टी झाला.





किती कष्ट सहन करावे लागले तरी माघार घ्यायची नाही असा त्याने निश्चय केला. परंतु गोपूला ते हळूहळू अशक्य वाटू लागले. अर्ध पोटी उपाशी राहूनसुद्धा एवढे मोठे कर्ज फेडणे आपल्याला अशक्य आहे. पंधराशे वराह् तर सोडूनच द्या, पंधरा वराहदेखील फेडणे आपल्याला अशक्य आहे. या गोष्टीची त्याला खात्री झाली. तरी त्याने आपले यत्न मात्र सोडले नाहीत.

पैसे मिळविण्यासाठी नवऱ्याला इतके कष्ट सहन असलेले पाहून त्याच्या बायकोला पाहवेना. ती म्हणाली—"तुमचे हे कष्ट मला पाहवत नाही बाई! मित्र म्हणून मानले तो काळच ठरला. त्या रामभद्राला पंधराशे वराह् म्हणजे हातचा मळ आहे. तो तुम्हांला एवढी मदतदेखील करू शकणार नाही का? घामाच्या धारांऐवजी रक्ताच्या धारा वहावल्या तरी आम्हांला ते कर्ज फेडतां येणे शक्य नाही!"

ती ते शेजारणींना याच शब्दांत कितीदां म्हणाली.

बायको म्हणाली ते गोपूलासुद्धा खरे वाटू लागले. आपल्या सामर्थ्याच्या उणीवेची जाणीव झाली ती बरोबरच त्याला रामभद्राचा राग येऊ लागला. त्यानेच नाही का रामभद्राला एकदां वांचविले होते. पण तो मदतीच्या नुसत्या गप्पाच मारीत राहीला. प्रत्यक्ष कृतीत काय दिसले?

गोपूने हळूहळू मित्राला भेटणेसुद्धां कमी केले. रामभद्र दिसला की गोपूला कर्जाचे ओझेच तेवढे आठवे. रामभद्रालासुद्धां त्याने आपल्याला दिलेले कर्जच आठवत असेल, असे गोपूला वाटे.

गोपूची बायको शेजारपाजारच्या लोकांना सांगे ते रामभद्राच्या कानावर आल्याशिवाय राहले नाही. काही विघ्नसंतोषी लोकांनी, तिखटमीठ लावून गोपूच्या बायकोने सांगितलेल्या गोष्टी गोपूनेच सांगितल्या म्हणून रामभद्राला येऊन सांगितल्या. कांही सज्जन मंडळींना दोघांची मैत्री अशी बिघडत चाललेली आवडली नाही. त्यांनी येऊन

साठी गोपू आकाशपाताळ एक करतो आहे. तू नुसता गंमत पहातो आहेस."

गोपूमुळे त्याला इतरांची अशी निंदा सहन करावी लागते आहे, हे रामभद्राला मुळीच आवडले नाही. त्याला गोपूचा भयंकर राग आला. कर्ज फेड म्हणून त्याने एका शब्दाने गोपूला कधी सांगितले नव्हते. तोच हट्टाला पेटून कर्ज फेडण्याच्या भानगडीत पडला होता. नको म्हणून सांगितले तर कदाचित् गोपू गैर समजेल म्हणून रामभद्र गप्प राहाला होता. "मला तुझे कर्ज फेडणे शक्य नाही," असे तो म्हणाला असता तर फेडलेच पाहिजे असे मी म्हटले असते का? तसे काही एक न बोलतां माझी निंदा करण्याचा काय अर्थ? रामभद्राचे मन पूर्णपणे खट्टू झाले. ते परस्परांचे हाडवैरी झाले.

येथवर गोष्ट सांगून वेतालाने विचारले—"राजा! गोपू व रामभद्र यांच्या परस्पर गाढ मैत्रीचा असा भंग व्हायला काय कारण असावे? गोपूचे दारिद्र्य की त्यांच्या बायकोने केलेली निंदा. रामभद्राचे मन पालटायला कारण पैसा होता की बाई? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला—"त्यांच्या मैत्रीचा शेवट शत्रुत्वात होण्यास यांपैकी एकही कारण नव्हते. वस्तुतः त्यांच्या मैत्रीच्या आड सुरवातीपासूनच पैसा आला होता. पैशाने प्रेम नष्ट होते हे त्या दोघांना चांगले माहीत होते. म्हणून परस्परांवरच्या प्रेमाचा आणि पैशाचा संबंध असू नये यासाठी त्यांचा प्रयत्न होता. त्यांचे परस्परांवरचे प्रेम खरे असते तर पैशामुळे त्या प्रेमाचा बिघाड कदापी झाला नसता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# कृपा अवकृपा

एका गावी एक विद्वान रहात असे. जवळपासच्या पंचक्रोशीत धर्मशास्त्रासंबंधी कोणाला काही विचारायचे झाले की ते त्या विद्वान शास्त्रीबुवांकडेच येत असत.

इतके थोर विद्वान होते ते, तरी त्यांना दोन्ही वेळच्या जेवणाची चिंता असे. त्यांची ती स्थिती पाहून त्यांच्या गावातील एका प्रमुखाने त्या विद्वान शास्त्रीबुवांचे दारिद्र्य कायमचे दूर करण्याच्या हेतूने राजदरबारात जाऊन राजाच्या कानावर त्यांच्या गरीबीची गोष्ट टाकून शास्त्रीबुवांवर राजाची कृपा व्हावी अशी विनंती केली. म्हणाला–"महाराज, शास्त्रीबुवा दारिद्र्याच्या समुद्रात अक्षरशः गटांगळ्या खात आहेत.

राजाने, त्या प्रमुखाने सांगितले त्याप्रमाणे आपल्या एका शिपायाकरवी शास्त्रीबुवांकडे सुवर्णनाण्यांची एक पिशवी पाठविली. तो शिपाई शास्त्रीबुवांना नमस्कार करून त्यांच्या समोर ती पिशवी ठेवीत म्हणाला–"आपल्या विद्वत्तेचे वर्णन ऐकून महाराजांनी आपणांकडे ही भेट पाठविली आहे."

"महाराजांची एवढी कृपा व्हायला मी तसे काही केले नाही. तेव्हां ही भेट महाराजांना परत नेऊन देण्याची तसदी घ्यावी." शास्त्रीबुवा त्या शिपायाला म्हणाले.

त्यानंतर शास्त्रीबुवांच्या पत्नीने शास्त्रीबुवांना म्हटले–"हा काय वेडेपणा ?"

शास्त्रीबुवा बायकोला समजावून सांगत म्हणाले–"कोणाच्या तरी खुशमस्कऱ्याच्या तोंडी काही ऐकून महाराजांची माझ्यावर ही कृपा झाली आहे. उद्यां दुसरा कोणी खोट्यानाट्या गोष्टी सांगेल तेव्हां महाराजांची अवकृपा होईल आणि माझे डोके उडविले जाईल."





# मायावी मांत्रिक

एका खेडेगावात दोघे भाऊ रहात असत. ते फार गरीब होते. मोठा भाऊ अण्णा खूप मेहनत करी, परंतु भोळा होता. धाकटा भाऊ लहानू हुशार होता. त्याला सर्व कामे करता येत असत.

ते दोघे काही काम मिळेल या आशेने राजधानीच्या गावी आले. दुसऱ्या दिवशी राजाकडे जाऊन काहीतरी काम मागून घ्यावे असा विचार करून अण्णा सकाळी लवकर उठून निघाला.

"संध्याकाळ व्हायच्या आंत घरी ये, बरं का!" लहानूने अण्णाला सावध करण्यासाठी सांगितले.

अण्णा आला तेव्हां राजा बागेत फिरत होता. त्याने अण्णाला विचारले–"कोण रे बाबा, तू ? काय पाहिजे तुला ?"

अण्णा हात जोडून नमस्कार करून म्हणाला–"महाराज! मी व माझा धाकटा भाऊ दोघे गरीब आहो, काही काम मिळाले तर आपल्या पायाशी पडून राहू ?"

"तुला काम देईन, परंतु काळजीपूर्वक जबाबदारी ओळखून करशील का?" राजाने विचारले.

"करीन महाराज!" अण्णा म्हणाला.

राजा त्याला राजवाड्यात बोलावून घेऊन गेला. बकरीचे एक सुंदर कोकरू दाखवीत म्हणाला–"या कोकराला रानात चरायला घेऊन जा. सूर्यास्त व्हायच्या आत घरी परत येऊन हे कोकरू माझ्याकडे आणून पोचते कर. एक गोष्ट लक्षांत ठेव, पूर्वेकडे एक टेकडी आहे, तिच्या पलीकडे जाऊ नकोस. मी सांगितल्याप्रमाणे वागला नाहीस तर तुला मी आयुष्यभर आठवेल अशी कडक शिक्षा करीन."

प्रत्येक गोष्टीला मोठ्याने डोके हलवून होकार देत राजाचे कोकरू एका खाकेत

श्री रामचंद्र ना. पाटील



धरून अण्णा रानात गेला. रानात खाली उतरविल्याबरोबर ते कोकरू उड्या मारीत धावू लागले. अण्णा त्याच्या पाठीमागून धावत गेला. दोघे बरेच दूर धावत गेले.

दुपारी अण्णा खायला बसला तेव्हां ते कोकरू सुद्धा जवळ आले. अण्णाने आपल्याच खाण्यातले अर्धे त्या कोकराला खायला घातले. त्यानंतर दोघांची पळापळ पुन्हा सुरू झाली. दोघे पूर्वेकडच्या टेकडीवर येऊन पोचले. त्या टेकडीवर पुष्कळ फळ-झाडे होती. झाडांवर खूप फळे लागली होती.

राजाने बजावून सांगितलेली गोष्ट अण्णा विसरला आणि झाडांवर चढून

हात इतका चिकट झाला की त्याला हात स्वच्छ धुवावासा वाटला. टेकडी पलीकडे त्याला एक झोपडी दिसली. त्याने कोकराला उचलून घेतले आणि त्या झोपडीच्या बाजूला चालू लागला. कोकरू पाय झाडीत मोठ-मोठ्याने ओरडू लागले. परंतु आण्णाला समजूतच कमी होती, म्हणून कोकराच्या ओरडण्याचा अर्थ न कळल्याने तो सरळ त्या झोपडीजवळ आला.

त्या झोपडीजवळ एक भयंकर आकृती असलेला मनुष्य बसलेला होता. त्याचे डोके टक्कल पडलेले गुळगुळीत होते. काचेचे डोळे आहेत की काय वाटे. त्याला चिटुकली दाढी होती. त्याच्याजवळ एका बाजूला बकऱ्याच्या मांसाचे तुकडे करून ठेवलेले होते. ते तुकडे भाजण्यासाठी एक लोखंडी सळई त्याच्या हातात होती. तो शेगडी पेटविण्याच्या खटपटीत होता.

त्याने अण्णाला पाहिले व म्हणाला– "येरे पोरा! शेगडी पेटव जरा."

"काळोख पडण्याच्या आधी मी परत गेले पाहिजे. येथे पाणी मिळेल म्हणून आलो होतो." अण्णा म्हणाला. कोकरू आपले जोर-जोराने पाय झाडीत मोठ्याने ओरडत होते.

तो भयंकर आकृतीवाला मनुष्य कोकराचे कान पिळवटीत म्हणाला–"काय ग, अजून तुझी घमेंड जिरली नाही वाटते?" नंतर अण्णाला म्हणाला–"हे कोकरू फार घमेंड-खोर आहे. ते तुझे नाही ऐकणार. तू त्या कोकराला त्या कोठडीत टाक आणि दार लावून शेगडी पेटव येऊन. मी तुला पाणी आणून देतो." असे सांगून त्याने अण्णाला एक कोठडी बोटाने दाखविली आणि स्वतः झोपडीत गेला.

अण्णाने नाइलाजाने त्या कोकराला कोठडीत बंद करून ठेवले आणि शेगडी पेटवायला बसला. त्याला ते जमले नाही. ती पेटली तोंपर्यंत चांगला काळोख पडू लागला होता. तेव्हां तो भयंकर आकृती-वाला मनुष्य एक तपेली भरून पाणी घेऊन आला. अण्णाने घाईघाईने हात धुतले आणि कोकराला उचलून लवकर घरी जावे या विचाराने कोठडीजवळ जाऊन दार उघडले. परंतु आत कोकरू नव्हते. एक विकृत आकृतीची बाई होती. तिला पाहून अण्णा भ्याला. "बाप रे भूत!" असा ओरडत पळून गेला.

तो रात्री फार उशिरा राजवाड्यात आला आणि त्याने राजाला घडलेले सर्व वृत्त सांगितले. म्हणाला–"अहो, ते सामान्य कोकरू नाही. भूत आहे भूत!"

सर्व ऐकून घेतल्यावर राजाला भयंकर राग आला. त्याने नोकरांना बोलावून



अंधार कोठडीत टाकायला सांगितले. त्या प्रमाणे नोकरांनी अण्णाला अंधारकोठडीत टाकून कोठडीचे दार बंद केले.

रात्र झाली तरी अण्णा परत आला नाही तेव्हां लहानू राजाकडे गेला. तो अण्णाचाच धाकटा भाऊ आहे हे कळल्यावर राजाला त्याचादेखील फार राग आला.

राजा जे म्हणाला ते शांतपणे सहन करून लहानूने जे घडले ते सर्व ऐकले व म्हणाला–"महाराज! यात काही तरी गुपित आहे. ते मात्र मला कळले नाही. ते तुम्ही मला सांगू शकल्यास मी तुमच्या कोकराला परत आणून देईन आणि आपल्या अण्णाला सोडवून घेऊन जाईन."



त्याच्या बोलण्याच्या पद्धतीवरून राजाला तो हुशार असला पाहिजे असे वाटले. तो त्याला आपल्या एकांताच्या खोलीत बोलावून घेऊन गेला आणि त्याने त्या कोकराचे गुपित काय ते सांगितले.

राजाला फार उशिरां एक मुलगी झाली होती. त्याने त्या मुलीला मुलासारखेच प्रेमाने वाढविले होते. तिला शिकारीला रानात जायचे म्हणजे फार आनंद होई. राजाच्या बरोबर ती शिकारीला जात असे.

एकदां राजा व राजकुमारी शिकार करीत फार दूर निघून गेली त्यांना पूर्वेकडे एक टेकडी दिसली. त्यांचे शिपाईवगैरे मागे कोठे तरी राहून गेले होते. दोघे टेकडी पलीकडे एक झोपडी दिसली तेथ प्यायला पाणी मिळेल म्हणून गेले.

झोपडीच्या बाहेर एक भयंकर आकृती असलेला मनुष्य बसलेला होता. तो सळईत बकऱ्याच्या मांसाचे तुकडे खुपसून ते शेगडीवर भाजून खात होता. राजकुमारीला बकऱ्याचे मांस पाहूनच घृणा वाटली, त्यात ते मांस भाजीत असतां जो घाणेरडा वास येत होता त्यामुळे तिला ओकारी येते की काय असे वाटू लागले.

- "इकडे कोठे प्यायला पाणी मिळेल का हो?" राजाने त्याला विचारले.

तो काही बोलला नाही. आत जाऊन एका तांब्यात पाणी आणून देत त्याने विचारले—"तुझी मुलगी नक्षत्रासारखी आहे. मला कां नाही देऊन टाकीत?"

राजाने लगेच तलवार उपसली.

"घाणेरडे मांस खाणारा तू कोणी राक्षस दिसतो आहेस! माझ्यावर का तुझी नजर?" राजकन्येने विचारले.

ते ऐकून त्याचे कांचेसारखे डोळे लालभडक झाले. त्याने बकऱ्याचे मांस भाजायची सळई उचलून तिच्या डोक्यावर ठेवली आणि म्हणाला—"तुला बकऱ्याचे मांस म्हणजे घृणा वाटते नाही का, तर तू आजपासून दिवसा बकरी होऊन राहशील आणि मला राक्षस म्हटलेस म्हणून रात्री माझ्याहून भयंकर रूप असलेले एक भूत होऊन राहशील."

तो कोणी भयंकर मांत्रिक होता. राजकन्या पाहतां पाहतां कोकरू झाली. त्या दिवसापासून ती दिवसा कोकरू आणि रात्री एक भयंकर भूत होऊ लागली. रात्री तिला कोणी पाहू नये राजा या गोष्टीची काळजी बाळगीत असे. राजकुमारीचे लग्नाचे वय होते. परंतु त्या मांत्रिकाच्या दुष्टपणामुळे ते अशक्य झाले. त्या मांत्रिकाची सर्व शक्ती त्याच्या दाढीत आणि त्या सळईत होती.

लहानूने राजाच्या तोंडी ते सर्व ऐकून घेतले आणि विचार करून म्हणाला—"महाराज! राजकन्येला आजच्या रात्रीत काही एक त्रास होणार नाही. ती मनुष्य रूपातच राहील. तिला सकाळपर्यंत वांचविले नाही तर मात्र धोका आहे. मला एक हृष्टपुष्ट बोकड आणि थोडी राळ द्या. मी करतो काय करायचे ते."

राजाने दिलेला बकरा आणि राळ घेऊन लहानू निघाला.

मांत्रिक आपल्या झोपडीसमोर एका हाताने मांस भाजीत खात होता आणि दुसऱ्या हाताने दारू पीत होता. लहानू बोकडाला घेऊन त्याच्यासमोर उभा रहात म्हणाला—"मामा! मांसाचा काय घाणेरडा वास येतो आहे हो!"



"येरे ये भाच्या! कोठे मिळाला बुवा तुला बोकड? चांगला दिसतो आहे की रे!" मांत्रिक म्हणाला.

"तुझ्यासाठीच तर घेऊन आलो आहे मामा!" लहानू म्हणाला.

"तरमग उशीर का? काप त्याला. हे मांस अगदी बेचव आहे! हा चांगला संकर जातीचा माजलेला बोकड दिसतो आहे." मांत्रिक म्हणाला.

"ते बरोबर नाही मामा! बोकड कोणत्याही जातीचा असला म्हणून काय झाले? चव एकच. तुला भाजताच येत नाही. मी दाखवितो कसे भाजायचे ते!" लहानू म्हणाला.

"पाहू तर दे, तू कसे भाजतोस ते." असे म्हणत मांत्रिकाने आपली मांस भाजायची सळई लहानूच्या हातात दिली.

लहानूने मांसाचा एक तुकडा सळईत खुपसून भाजायला सुरवात केली. थोडयाच वेळात छान वास येऊ लागला.

"भाच्या! खरंच की रे तुला छान भाजता येते. मांसाचा वास असा असावा लागतो. तो तुकडा टाक इकडे!" मांत्रिक म्हणाला.

मांत्रिकाला लहानू म्हणाला—"मामा! अशी घाई करू नकोस. आणखी थोडे भाजले पाहिजे. जवळ येऊन वांकून पहा, कसा खमंग वास येतो आहे तो." लहानू म्हणाला.

मांत्रिक जवळ येऊन शेगडीवर डोळे-मिटून वांकून वास घेऊ लागला. त्याच वेळी लहानूने विस्तवावर राळीची पूड टाकली. त्याबरोबर मांत्रिकाची दाढी क्षणार्धात जळून गेली. लहानूने तत्क्षण ती [illegible] "बकरी होऊन चालता हो, इकडून!"

मांत्रिक लगेच बकरी होऊन 'बें' 'बें', असा ओरडत रानात निघून गेला.

मांत्रिकाची शक्तीच नष्ट झाल्यामुळे राजकन्येला स्वतःचे रूप आले. तिने लहानूचे आभार मानले.

लहानूने मांत्रिकाची सळई झोपडीत फेकून शेगडीतल्या विस्तवाने झोपडीला आग लावली आणि राजकन्येला घेऊन उजाडण्यापूर्वी राजवाडयात परत आला.

कित्येक दिवसांनी आपली मुलगी स्वरूपे परतलेली पाहून राजाला परमानंद झाला. त्याच्या डोळ्यांना आनंदाश्रू आले. तिला पुन्हां मनुष्यरूप मिळवून देणाऱ्याशीच लग्न करणार असे राजकन्येने ठरविले होते. तिच्या इच्छेप्रमाणे राजाने लहानूशी राजकन्येचा विवाह करून देऊन त्यालाच आपला वारस करून घेतले. लहानूने अण्णाला सोडवून त्याला आपल्याबरोबर राजवाडयातच ठेवून घेतले.





# बदललेले जोडपे

एका गावी रंगनाथ आणि रत्ना नावाचे नवराबायको रहात असत. त्या जोडप्याचे लहानसहान कारणावरून दररोज भांडण होत असे. रात्रंदिवस त्यांचे भांडण होई. गांवातल्या काही वडीलधाऱ्या मंडळींनी त्यांना किती समजावून सांगितले. परंतु कोणाच्या उपदेशांचा त्यांच्या मनावर यत्किंचितदेखील परिणाम झाला नाही.

दोघांचे भांडण होत राही. परंतु परस्परांना दोघं धरून होती. त्यांना रामू नावाचा एक मुलगा झाला. तो दोघांना जीव की प्राण होता. परंतु त्याचा अर्थ असा नाही की त्यांचे भांडण थांबले. रामू लहानाचा मोठा होत गेला तसतसे आईवडिलांचे रोज होणारे भांडण त्याला मुळीच आवडतनासे झाले. ते तो पहात होता. तेव्हां हे भांडण कसे थांबवायचे याचा तो विचार करू लागला.

त्याला फक्त बारावेच वर्ष लागले असेल तो गुरे चरायला नेई तेथे देखील तो हीच चिंता करीत बसे.

एकदा तो असा बसला असतां त्याच्या गांवचा भूतबाधा दूर करणारा मांत्रिक आला. त्याने त्याला विचारले—"काय रे, फार विचारात दिसतो आहेस?"

रामू त्या मांत्रिकाला आईवडिलांच्या भांडणाची गोष्ट सांगून म्हणाला—"त्या दोघांचे भांडण चालू असले म्हणजे मला काही सुचतच नाही."

तो म्हणाला—"बाबा रे, तुझ्या आई-वडिलांचा स्वभाव बदलण्यासाठी तुला थोडे वदलावे लागेल. मी एक युक्ती सांगतो, तसे कर." असे सांगून त्याने रामूला काहीतरी समजावून सांगितले.

संध्याकाळी रामू गुरांना घेऊन घरी परतल्याबरोबर आईला म्हणाला—"आई,

कुमारी किशोरी मा. मराठे



माझा एक सदरा धुवून वाळत टाकायला तुला सांगितला नव्हता का सकाळी? इतकं कसं ग विसरतेस तू? तुला एकच एक मुलगा आहे, ही गोष्ट तरी तुझ्या लक्षात आहे की नाही, शंकाच!" असे म्हणत वांकडचा तिकडचा उडचा मारू लागला.

त्याचे हे विचित्र वागणे पाहून रत्ना घाबरून गेली. रामू पूर्वी कधी असे उलट बोलला नव्हता आणि आज एकाएकी त्याला काय झाले तिला कळेना. त्याने सदरा धुवून ठेव म्हणून सांगितलेच नव्हते. काही तरी विशेष कारण असले पाहिजे असा विचार करून ती काही बोलल्याशिवाय बाजारातून सामान घेऊन यायला निघाली.

काही वेळाने रंगनाथ शेतावरून परतला. त्याने मुलाला ढोपरात मान खुपसून बसलेला पाहून विचारले–"काय रे, असा कां बसला आहेस? बरं नाही का?"

"बरं नसायला काय झालं आहे? डोकं वर करून चालणंदेखील कठीण वाटू लागलं आहे!" रामू म्हणाला.

"तसं वाटू लागायला कारण काय, सांगशील तरी?" रंगनाथाने विचारले.

"अंगात घालायला चांगले कपडे नाहीत, ऊन असो, पाऊस असो, थंडी असो, अनवाणी चालावे लागते. एकुलत्या-एका मुलाला असंच वागवायचं असतं नाही का?" रामूने चिडल्यासारखे उत्तर दिले.

ते ऐकून रंगनाथाची भूक तहानच उडाली. रामू बापाजवळ असे उर्मटपणाने चुकूनदेखील कधी तो बोलला नव्हता.

इतक्यात रत्ना बाजार करून घरी आली. बापाजवळदेखील तो नेहमीसारखा बोलत नाही आहे हे पाहून तिच्या छातीत 'धस्स' झाले.

रात्री जेवतांनासुद्धा रामू आईवडि-लांशी विचित्रपणेच वागला बोलला. कारण तो मांत्रिकाच्या सल्ल्याप्रमाणे सर्व नाटक करीत होता. एक आठवडा लोटला.

[illegible] काही तरी भूतपिशाच बाधा तर झाली नसेल. मांत्रिकाला बोलावून पाहू या का?"

"मंत्रतंत्र काय घेऊन बसली आहेस? औषध देवविले पाहिजे वैद्याचे!" रंगनाथ म्हणाला.

"या रोगाला औषध कोण देणार? चांगला मांत्रिक कोणी असेल तर क्षणा-भरात मंत्र टाकून मुलाला शुद्धीवर आणील." रत्ना म्हणाली.

"वैद्याशिवाय या आजाराला इतर कोणती ही चिकित्सा कामाची नाही." रंगनाथ म्हणाला.

दोघां नवराबायकोची बरीच बाचाबाची झाली. रामू काही वेळ ऐकत राहिल्यावर म्हणाला–"मी सांगतो त्या मांत्रिकाकडेच पाहिजे तर मी यायला तयार आहे!"

मी कोणाकडे येत नाही, असे न सांगता त्या वेडातही एका मांत्रिकाकडे यायला तयार आहे हे ऐकून नवराबायकोच्या मनाचे थोडे समाधानच झाले. दोघे मांत्रिकाकडे त्याला घेऊन गेली.

त्यांनी सांगितले ते सर्व ऐकून घेऊन मांत्रिक म्हणाला–"तुमच्या मुलाचा हा आजार बरा होणे तितकेसे कठीण वाटत नाही. मी तुम्हां दोघांना एकेकट्याने एक प्रश्न विचारीन. त्या प्रश्नाचे तुम्ही खरे ते



उत्तर सांगितलेत तर मी एका क्षणात त्याचा आजार बरा करून दाखवितो."

त्याने प्रथम रंगनाथाला निराळे बोला-वून विचारले–"रामू तुझाच मुलगा ना खरं सांग?"

तो प्रश्न ऐकून रंगनाथ चकितच झाला. पण रागावल्याशिवाय म्हणाला–"होय!"

नंतर त्याने रंगनाथाला परत पाठवून त्याच्या बायकोला बोलावून तोच प्रश्न विचारला–"रामू तुझाच मुलगा ना?" ती देखील चकित होऊन म्हणाली–"होय! नाही तर काय?"

नंतर त्याने दोघांना एकत्र बोलावून म्हटले–"तुम्ही दोघांनी बरोबर उत्तर दिले

नाही. एका आठवड्याने विचार करून येऊन पुन्हां याच प्रश्नाचे उत्तर द्या."

एक आठवडा लोटला. दोघे मांत्रिकाकडे आले. त्याने दोघांना निरनिराळे बोलावून पुन्हां तोच प्रश्न विचारला.

या खेपेस रंगनाथाने बराच विचार केल्यासारखे उत्तर दिले–"तो माझ्या बायकोचा मुलगा आहे हो!"

रत्नाने उत्तर दिले–"तो माझाच मुलगा हो!"

या खेपेस मांत्रिक थोडे स्मित करून म्हणाला–"पुन्हां दोघांची उत्तरे बरोबर नाहीत. आणखी खूप विचार करून एका आठवड्यानंतर येऊन बरोबर काय ते उत्तर द्या."

रामूचे वेड दिवसेंदिवस वाढतच गेले. या खेपेस काय उत्तर द्यावे, याचा परस्परांशी विचार करून दोघे काही तरी ठरवून उत्तर द्यायला एका आठवड्याने आले.

मांत्रिकाकडे पोचल्यावर दोघांनी निरनिराळे भेटूनही एकच एक उत्तर दि[illegible] आहे हो!"

या वेळी मांत्रिक मोठ्याने हंसला आणि म्हणाला–"फक्त यात्र वेळी तुम्ही अगदी बरोबर उत्तर दिलेत. इतक्या दिवसांनी तुमच्या मानेवरचे भूत पळाले आणि तुम्ही दोघे परस्परांशी डोके ठिकाणावर ठेवून बोललात. नवराबायकोने परस्परांशी बोलायचे नाही, जे बोलायचे ते भांडण्यासाठीच! परस्परांचा सल्ला घेण्यासाठी नाही तर ते बोलणे म्हणजे परस्परांविरुद्ध ओढाताणच नाही का? आयुष्यभर भांडतच राहणार का? रामूला काही झालेले नाही. त्याने माझ्या सल्ल्यानेच हे सर्व नाटक केले होते. दोघं परस्परांच्या हिताच्या गोष्टी बोला. परस्परांचा सल्ला घ्या. तुमचा मुलगा म्हणजे एक रत्न आहे. तुम्ही आपल्या भांडणामुळे त्याला नको जीव करून सोडले होते."

रंगनाथ आणि रत्नाची चांगलीच कानउघाडणी झाली. त्यांनी भांडायचे सोडले. रामूचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# सत्यकामाची जादू

हीरागढ नावाच्या देशात हरवर्मा नावाचा एक इमानदार व धर्मभीरू व्यापारी रहात असे. थोडा लाभ मिळे त्यावर त्याच्या मनाचे समाधान होई. सांठेबाजी, मिसळधान्य वगैरे गोष्टी त्याला मुळीच आवडत नसत. स्वतःला अशा नीतिनियमांनी बांधून ठेवले असून ही त्याने पुष्कळ ऐश्वर्य संपादन केले. गिऱ्हाइकांचा त्याच्या मालावर व त्याच्यावर फार विश्वास होता. म्हणून त्याच्या दुकानांसमोर गिऱ्हाइकांची नेहमीच गर्दी असे.

वृद्धापकाळी त्याला मरण आले तेव्हां त्याचा एकुलता एक मुलगा शंखवर्मा त्याच्या सर्व संपत्तीचा वारस झाला. शंखवर्माचा स्वभाव बापाच्या अगदी उलटा होता. तो महास्वार्थी, लोभी आणि दुष्ट स्वभावाचा होता. परंतु तो लबाड होता. सर्वांशी गोडगोड बोलून आपले काम करून घेई. तो केव्हां गळा कापील सांगणे कठीण होते. मनातल्या मनात तो कित्येक कट रचून फायद्यावर नजर ठेवी. त्याचे लग्न शेजारच्या राज्यातल्या एका लबाड व्यापाऱ्याच्या मुलीशी झाले होते. ती सुद्धा नवऱ्यासारखीच वस्ताद होती. ती नवऱ्याला त्याच्या लबाडीच्या कामात मदत देत असे."

हीरागढ म्हणजे रत्नांचे आगर होते. जमीन सुपीक होती आणि पाऊस पाणी नियमित वेळेवर होई. प्रजेला कधी कष्ट सहन करावा लागल्याचे आठवत नव्हते.

त्या वर्षी पीक चांगले निघाले. दूरदूरून लोक येऊन जास्त किंमत देऊन धान्य विकत घेऊन जात. खळ्यातच धान्याची खरेदी होऊन गेली. चांगला भाव मिळत होता म्हणून शेतकऱ्यांनी आनंदाने आपला बराचसा माल परदेशी व्यापाऱ्यांना विकून



टाकला. धान्य विकत घेणारे जसे आले तसेच नाहीसे पण झाले.

काही महिने लोटल्यावर दुकानात अन्न-धान्य दिसेनासे झाले. धान्याची तूट होताच राजाने आपली सर्व कोठारे खुली केली. परंतु ते अन्नधान्य असंख्य प्रजेला कसे काय पुरणार? तूट कायम ती कायम.

दुष्काळाने भयंकर रूप धारण केले. उपाशी मरणारांची संख्या वाढू लागली. राजाला काय करावे सुचेना. आपल्या प्रजेचे हाल पाहून राजाच्या डोळ्यांना पाणी येई. परंतु त्या पलीकडे करणे त्याला अशक्य वाटू लागले. अशा परिस्थितीत शंखवर्मा एकदां राजाच्या दर्शनास आला. म्हणाला—"महा-[illegible] माझ्या हातून आपली काय सेवा घडू शकेल, सांगण्याची कृपा करावी."

"आमच्या प्रजेची सेवा अनेक प्रकारे करण्यासारखी आहे. पुन्हा पिके येऊन कापणी होईपर्यंतच काय तो हा प्रश्न आहे. तो सोडवायला काही युक्ती असेल तर सांग!" राजा म्हणाला.

"मी आपला दासानुदास आहे. विचार करायला मला फक्त दोन दिवसांचा अवधी देण्याची कृपा करावी." शंखवर्मा म्हणाला.

तिसऱ्या दिवशी तो पुन्हां महाराजांच्या दर्शनास येऊन म्हणाला—"आपल्या शेजा-रचे राज्य शक्तिगड आहे तेथून आपणांस तांदूळ मागविता येईल. हद्दीविषयी आपले त्यांच्याशी वैर आहे ही गोष्ट खरी असली तरी महाराजांनी विनंती केली तर शक्ति-गडचा राजा आपल्यास नक्कीच मदत करील."

"अशक्य! तो आमच्या कीर्तीप्रतिष्ठेचा प्रश्न आहे. मी शत्रूच्या दारासमोर भीक मागायला कदापी जाणार नाही." राजा म्हणाला.

शंखवर्मा क्षणभरच विचार करून थांबून म्हणाला—"आपण म्हणालात ते बरोबर आहे. मीच मूर्खपणाने बोललो होतो. प्राणापेक्षा प्रतिष्ठा मोठी असते ही [illegible] विसरलो होतो मी, याबद्दल मला क्षमा करा. मी आणखी एक सूचना करावी, म्हणतो. ती आपणांस नक्कीच पसंत पडेल. त्यामुळे आपल्या शत्रूचे नुक-सानसुद्धां आपल्याला करतां येईल."

"अशा गोष्टींना मी नकार कसा काय देईन?" राजा म्हणाला.

"एका दगडाने दोन पक्षी मारतां येतील. शक्तिगड येथे माझे सासरे राहतात त्यांच्या मदतीने मी आपल्या प्रजेला चार पांच महीने पुरेल एवढे अन्नधान्य त्या राजाच्या नकळत आणवितो. त्यासाठी जो थोडा जास्त खर्च होईल त्याच्याकडे आपण दुर्लक्ष करावे." शंखवर्मा म्हणाला.

"चोर बाजार हा प्रामाणिकपणाचा व्यापार नाही; परंतु त्यामुळे आपल्या प्रजेला जर अन्नधान्य मिळणार असेल तर मी त्या गोष्टीस होकार देईन. त्यामुळे शत्रूचे नुकसान होईल हेदेखील खरे आहे. परंतु समज, तुम्ही असा चोरीचा धंदा केलात तर धान्याच्या किमती कितीशा वाढवाव्या लागतील?" राजाने विचारले.

"सामान्य किमतीपेक्षा काही नाही तरी चौपट किंमत द्यावीच लागेल." शंखवर्मा म्हणाला.

"ते तर फारच जास्त झाले नाही का?" राजाने विचारले.



"चोरीने माल आणवायचा म्हणजे जास्त खर्च होणारच महाराज!" शंखवर्मा, महाराज अनुकूल असल्याचे पाहून म्हणाला.

शंखवर्मा रहात असे तो त्याच्या बापाने शेवटीशेवटी बांधलेला एक मोठा वाडाच होता. त्याच्या चारी बाजूला एक मोठे आवरण होते. त्यातच एक कुंड, उद्यान आणि देऊळ होते. देवळाच्या आवाराची भिंत भक्कम होती. देवळाच्या जवळच एक लहानशी आमराई होती.

शंखवर्मा पहिल्याने महाराजांच्या दर्श-नाला गेला होता त्या दिवशी एक व्यक्ती देवालयाच्या प्रदक्षिणेच्या अंगणात बसलेला होता. त्याचे नाव सत्यकाम होते. तो एका



खेडेगावात राहणारा, परंतु हुशार आणि समजूतदार मनुष्य होता. त्याची बायका पोरे दुष्काळाच्या संकटांत सांपडून उपाशी मरण पावली. जी जिवंत राहली ती घर-दार सोडून फिरत त्या दिवशी नेमकी त्या देवालयाच्या धर्मशाळेत येऊन पोचली.

सत्यकाम एका झाडाला टेकून बसला असतां त्याला देवळाच्या चौथऱ्याच्या फटी-तून मुंग्या बाहेर येत असलेल्या दिसल्या. प्रत्येक मुंगीच्या तोंडात एकेक तांदुळाचा दाणा होता. ते पाहून त्याच्या डोक्यात एक नवीन प्रकाश पडल्यासारखे झाले. ते देऊळ त्यांच्या देशातल्या एका श्रीमंत व प्रसिद्ध अशा व्यापाऱ्याचे असल्याचे त्याला

हातात घेतली आणि तिच्या आधारे लंगड्यासारखा चालत चौथऱ्याच्या कोपऱ्यात गेला आणि बांबूने ती जागा वाजवून पाहू लागला. काठीच्या आवाजावरून त्या जागे-खाली तळघर असावे 'व त्यात तांदुळाची पोती दडवून ठेवलेली असावीत असा एक संशय त्याच्या मनात आला. प्रजेला खायला मिळत नाही आणि अन्नाविना कित्येक लोक तडफडून मरत असतां इतके धान्य येथे कसे काय आले?' ही गोष्ट सरकार दरबारात पोचविली पाहिजे.

तो विचार मनांत येताच तो प्रधानाला भेटायला गेला आणि म्हणाला—"प्रधान! शंखवर्माच्या देवळात जे तळघर आहे त्यात पुष्कळ धान्य आहे."

"तुझे डोके ठिकाणावर आहे ना? शंख-वर्माला तू काय सामान्य मनुष्य समजलास? फार मोठी आसामी आहे. त्याचा बाप व तो धर्मभीरु म्हणून प्रसिद्ध आहेत. त्याच्या-विषयी स्वप्नातदेखील असा विचार आणू नकोस. बरं तर जा!" प्रधान म्हणाला.

सत्यकामने कोतवालाकडे जाऊन सांगून पाहिले. परंतु तेथेसुद्धां त्याला त्याच्या प्रयत्नात यश आले नाही. तेव्हां त्याने कष्ट सहन करणाऱ्या प्रजेच्याच नजरेसमोर ही गोष्ट आणण्याचे ठरविले.

दोन दिवस असेच गेले. तिसऱ्या दिवशी संध्याकाळी तो एका वडाच्या झाडाखाली येऊन बसला. अन्नान्न करीत गांवभर फिर-णारे पुष्कळ लोक तेथे आले. जिवंत प्रेतेच होती ती. शंखवर्माच्या विषयींच ती काही तरी बोलत असल्याचे ऐकून सत्यकामाची उत्सुकता वाढली. त्याने त्यांना विचारले—"कोण हा शंखवर्मा? कसा काय आहे तो?"

"देवासारखा पावला आम्हांला. उदार, दयाळू आणि दानशूर! सर्वांना दान करतो तो." एक जण म्हणाला.

"अन्नदान करतो का?" सत्यकामने विचारले.

"नाही, पैसे देतो!" तो म्हणाला.

"पैसे कशासाठी, जाळायला? बाजारात धान्य मिळाले तर ना? पैसे मिळाले तरी काय फायदा? आपल्याला म्हणून तर झाडांचा पाला, कंदमुळे खाऊन आपले मरण पुढे ढकलावे लागत आहे! आपल्याला जिवंत ठेवण्यासाठी तो काही करतो आहे का?" सत्यकामने विचारले.

तो संवाद ऐकायला आणखी काही लोक जमा झाले. सत्यकामने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर प्रत्येक आपापल्या परीने देत गेला.

"तोच नव्हे, आणखी कोण काय करू शक-णार? तो आहे व्यापारी. धान्य असेल त्या-च्याकडे तर तो विकत देईल, होय की नाही?



आपले रक्षण स्वत: राजा करू शकला नाहीतर एक व्यापारी का आपल्याला वांचविणार? देवाची कृपा नाही आपल्यावर. आपलं मरण लिहून ठेवले आहे!" सत्यकाम म्हणाला.

त्या सर्व लोकांचे मत शंखवर्माविषयी चांगले आहे, हे ओळखून त्यांचे मन बदला-यला काहीतरी युक्ती केली पाहिजे, असा विचार सत्यकामच्या मनात आला. तो उरलेल्या लोकांशी बोलताना असे म्हणाला—"मित्र हो! खरेखोटे काय ते मला माहीत नाही. परंतु आज संध्याकाळी एक विचित्र गोष्ट घडली खरी. मी झोपेच्या गुंगीत असतां कोणीतरी येऊन माझ्या कानात सांगितले—'बाबा रे, हा दुष्काळ मनुष्य-



निर्मित दुष्काळ आहे. एका लबाड माणसाने सर्व धान्याचा मोठा सांठा करून ठेवला आहे आणि त्यामुळे दुष्काळाचे संकट ओढवले आहे. त्या दुष्टाला पकडून देण्याची शक्ती मी तुला देतो. ही शिट्टी घे. हिच्या मदतीने तुला दुष्ट लबाड माणसांची गुपिते चवाठ्यावर आणता येतील.' मी दचकून उठून पाहिले तर माझ्या पायाजवळ खरो-खरच एक शिट्टी ठेवलेली दिसली."

"बघू तर दे ती शिट्टी!" असे एकदम सर्व म्हणाले.

सत्यकामने आपल्या खिशातून एक शिट्टी काढून त्यांना दाखविली. सर्वांनी ती फार लक्षपूर्वक पाहिली.

एका जणाने विचारले— "ही शिट्टी धान्याच्या सांठेबाजाला कशी काय धरून देणार बुवा?"

"उद्यां सकाळी तुम्ही सर्व स्वतःच्या डोळ्यांनी पहा ना! परंतु त्या पूर्वी तुम्ही समोरच्या शेतात शक्य तितक्या जास्ती लोकांना जमा करा." सत्यकाम म्हणाला.

ह्या सत्यकामाचा धंदा बाहुल्या करण्याचा होता. तो देवदेवींच्या बाहुल्या छान तयार करीत असे. जादू करण्यात तो फारच पटाईत होता. सीमंतिनी नावाची त्याला एक सहा वर्षांची मुलगी होती. आपल्या बापा-च्या जादूच्या प्रयोगाची तिला फार आवड होती. ती याच दुष्काळात मरण पावली होती. तिची ती शिट्टी होती. ती फुंकल्या-शिवाय वाजे. त्याच्या कुटुंबातली सर्व माणसे एकामागून एक उपासमारीने मेल्या-वर सत्यकामने आपल्या सर्व वस्तू एकेक करून विरक्ती झाल्यामुळे टाकून दिल्या. परंतु ती एक शिट्टी मात्र मुलीची आठवण म्हणून तो स्वतःजवळ एका पिशवीत ठेवीत असे.

ही एक विशेष तऱ्हेची शिट्टी होती. एका रबराच्या नळीच्या एका टोकाला रबराचीच एक पिशवी बसवलेली होती आणि दुसऱ्या टोकाला शिट्टी बसवलेली होती. म्हणून रबराची पिशवी दाबली की रबराच्या पिशवीतला वारा शिट्टीतून जाई आणि शिट्टी वाजे. ही रबराची पिशवी सत्यकामने आपल्या उजव्या खाकेत दिसणार नाही अशी आणि शिट्टी डाव्या बाजूला सदऱ्या-च्या आड राहील अशी अडकवून ठेवली. त्याने तशीच आणखी एक शिट्टी एका काठीच्या टोंकाला लोंबत राहील अशी बांधली. काठी डाव्या हाताने धरून खाकेतली पिशवी दाबली तर काठीला बांधलेली शिट्टी फुंकल्याशिवाय वाजते असा भास होई. पिशवी किती वेळां व कशी दाबायची हे त्याला बरोबर माहीत होते. त्याने त्याच दिवशी रात्री सर्व तयारी करून ठेवली.

दुसऱ्या दिवशी उजाडल्याबरोबर वडा-च्या झाडासमोरच्या शेतात अस्थिपंजर झालेले जिवंत प्रेतांसारखे शेकडो लोक जमले. सत्यकामने आपली दुसरी शिट्टी सर्वांना चांगली पाहून घ्या म्हणून सांगितले. नंतर त्याने ती शिट्टी काठीच्या टोकाला लोंबत राहील अशी बांधली. त्याने डाव्या हातात काठी धरली आणि म्हणाला— "मित्र हो! मला पडलेल्या स्वप्नाची गोष्ट तुम्ही सर्वांनी ऐकलीच असेल. सांठेबाज लोकांनी जिथे कोठे चोरून माल लपविला असेल ती कोठे आहे ही शिट्टी सांगेल. शिट्टी एकदां वाजली तर त्याचा अर्थ 'हो' आणि दोनदां वाजली तर त्याचा अर्थ



'नाही' असा आहे. पाहू या तर ही शिट्टी काय म्हणते?"

"ठीक! कबूल!" सर्व म्हणाले.

"या भागातला सर्वात मोठा व्यापारी आहे, त्याच्या पासूनच सुरवात करू या तर. त्याचे नांव काय बरे?" सत्यकामने विचारले.

"शंखवर्मा!" असं कोणीतरी उत्तर दिले.

सत्यकाम शिट्टीला संबोधन करून म्हणाला—"शिट्टे! शंखवर्मा सांठेबाज आहे का? कृपा करून सांग!"

शिट्टी फक्त एकदांच वाजली. सर्व चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले.

"तू सांगते आहेस त्या शंखवर्माने अन्न-धान्याचाच सांठा केला आहे ना? पुन्हां सांग!" सत्यकाम म्हणाला.

पुन्हां शिट्टी एकदांच वाजली.

"त्याने धान्याचा सांठा गोदामात आणि कोठारांत करून ठेवला आहे का?" सत्य-कामने शिट्टीला पुन्हां विचारले.

शिट्टी दोनदां वाजली.

"शिट्टी 'नाही' म्हणते!" सत्यकाम म्हणाला.

"देवळाच्या खाली तळघरात असला पाहिजे का सांठा तो?" सत्यकामने शिट्टीला विचारले.

शिट्टी एकदांच वाजली.

"तळघरातले धान्य आम्ही बाहेर काढले तर चालेलं का?" सत्यकामने शिट्टीला विचारले.

शिट्टी एकदांच वाजली. लोकांचे रक्त सळसळून आले.

"शिरा तर देवळात!" सर्व ओरडून घोष करू लागले.

[illegible] जिना होता. सत्यकाम आपल्या अनुयायां-सह त्या वाटेने आत गेला तेव्हां तळघरात सहस्त्रावधी तांदळाची पोती एकावर एक रचून ठेवलेली दिसली.

लवकरच ती गोष्ट राजाच्या कानावर गेली. तो आपल्या मंत्र्यासचिवांसह तेथे जातीने आला. त्याने शंखवर्माला कैद करविले. त्याने आपल्या सासऱ्याच्या सहकार्याने धान्य विकत घेऊन तळघरात सांठवून ठेवले आणि त्यामुळे कृत्रिम दुष्काळाने प्रजा संकटात पडल्याचे सिद्ध झाले. हे धान्य चौपट किमतीने विकण्याचा त्याचा विचार होता. शंखवर्मा समाजद्रोही असल्याचा आरोप सिद्ध झाला. राजाने त्याला फांशीची शिक्षा दिली.

सत्यकामच्या चातुर्याची राजाने वाखा-णणी केली आणि त्याला आपला मुख्य सल्लागार म्हणून नेमले. सत्यकामच्या बुद्धि-मत्तेने दुष्काळाचे संकट किंवा उपासमार राज्यात त्यानंतर कधी आली नाही.



# गाढवाची सावली

अरबस्तानात इब्राहीम नावाचा एक गरीब माणूस एक गाढव पाळून ते भाड्याने वापरायला देत असे. त्याच मिळकतीवर त्याचा उदरनिर्वाह चाले. एके दिवशी एका परदेशी प्रवाश्याने ते गाढव भाड्याने घेतले आणि त्यावर बसून प्रवासाला निघाला. इब्राहीम गाढवाच्या पाठोपाठ पायी चालत होता.

ऐन दुपारी सूर्य डोक्यावर आला तेव्हां ऊन वाढले म्हणून थोडी विश्रांती घेण्यासाठी ते एका जागी थांबले. गाढवाच्या सावलीत तो प्रवासी जरा आडवा झाला. इब्राहीमला उन्हांतच बसून रहावे लागले. कारण गाढवाची सावली दोघांना पुरेल एवढी नव्हती.

तो प्रवासी गाढवाच्या सावलीत आडवा झाल्याबरोबर झोपून घोरू लागला. तेव्हां इब्राहीमने आपल्या गाढवाला थोडे दूर नेले आणि तेथे त्याच्या सावलीत झोपला. तोदेखील थोड्याच वेळाने चांगला घोरू लागला.

तिकडे तो प्रवासी थोड्या वेळाने जागा झाला. कारण ऊन कडक होते आणि त्या उन्हांत झोप कशी येणार? त्याने डोळे उघडून पाहिले तेव्हां त्याला इब्राहीम गाढवाच्या साव-लीत घोरत असलेला त्याला दिसला. त्याने गाढवाला दूर नेल्याचे त्याच्या लक्षात आल्याशिवाय राहिले नाही. इब्राहीमला जागे करून तो त्याच्याशी खूप भांडला. तेव्हां इब्राहीम त्याला म्हणाला—"हे पहा, मी गाढव भाड्याने दिले होते, त्याची सावली नव्हती दिली."

दोघांचे भांडण हळूहळू मुष्टीयुद्धापर्यंत येऊन पोचले. त्यांची मारामारी संपली तेव्हां गाढव पाठीवरचे सामान खाली फेकून देऊन पसार झालेले होते.





# अहंकार

नवगांव नावाच्या गावी शिवज्ञानी नावाचा एक पंडित रहात असे. गावकरी त्याच्या विद्वत्तेबद्दल त्याचा फार आदर करीत. त्याच्या घरी नेहमी पंडित जमत आणि त्यांच्यात शास्त्रार्थ होई.

त्याला पार्वती नावाची एक मुलगी होती. ती देखील विदुषीच होती. कानावर काही पडले की लगेच ते तिच्या लक्षात येत असे. शिवज्ञानी आपल्या शिष्यांना जे काही शिकवी पार्वती ते ऐकूनच ग्रहण करी. त्यांच्या घरांत पंडितांचा जो गंभीर विषयांवर शास्त्रार्थ होई त्यांत तिला न कळण्यासारखे काहीच नव्हते.

सर्व विषयांचे गंभीर ज्ञान असूनही शिवज्ञानी सारखा जाडा विद्वान त्याला अल्पज्ञान आहे असेच समजत असे. परंतु पार्वतीला वाटे की तिला कळत नाही किंवा माहीत नाही असे या जगात काही नाही. तिच्याहून तिप्पट वय असणाऱ्या विद्वानांशी कोणत्याही मोठ्या प्रश्नावर चर्चा होत असली तरी ती त्यांच्याशी बोलू लागे. हळूहळू ती पंडितांच्या शास्त्रार्थात भाग घेऊ लागली. हळूहळू तिचा वर चढपणा वाढत गेला.

पार्वतीला लहानपणापासूनच थोडा गर्व होता, परंतु मुलगी अजून लहान आहे, हळूहळू कळू लागल्यावर स्वतः शहाण्यासारखी वागेल असे शिवज्ञानींकडे येणाऱ्यांना वाटे. शिवज्ञानीला देखील वाटे की थोडी मोठी झाली की तिला कोठे कसे बोलायचे हे कळू लागेल. परंतु तिचा अहंकार तिच्या वयाबरोबर वाढतच गेला.

"बाळ! मोठी मंडळी बोलू लागली म्हणजे लहानांनी मधे बोलणे बरोबर दिसत नाही." असे शिवज्ञानीने मुलीला पुष्कळ समजावून पाहिले.

[illegible] बाबा? वय किती मोठे झाले तरी मूर्ख तो मूर्खच नाही का?" पार्वती म्हणे. तिचे पांडित्य इतरांना कळू नये असे बाबांना वाटते आहे, असे देखील तिला वाटे.

पार्वतीला पंधरावे वर्ष लागले. परंतु तिचा गर्व थोडादेखील कमी झाला नाही. शिवज्ञानीला सर्व कळत असूनही मुलीच्या स्वभावात बदल घडवून कसा आणायचा वगैरे गोष्टी ते आपल्या मित्रमंडळींना विचारीत आणि त्यांचा सल्ला घेत. इतक्यात नवरात्रीचा उत्सव सुरू झाला. दरबारात शास्त्रार्थ होणार होता म्हणून शिवज्ञानी पंडिताला शास्त्रार्थात भाग घेण्यासाठी बोलावणे आले.

ते घरी नव्हते तरी त्यांच्या घरी पंडितांची सभा चालूच राहली. त्या सभेत कोणी विचारले नाही तरी पार्वती बोलू लागली.

एके दिवशी पंडितमंडळी पार्वती ऐकत असतां कोणत्यातरी महत्वाच्या विषयावर बोलत बसली होती. जुन्या तलावाच्या काठावर एक मंडप होता त्यावर कोणी काहीतरी लिहून ठेवले होते. कोणाला ते वाचता येईना की कळेना म्हणून प्रत्येकजण मान खाली करून निघून जात होते.

ते ऐकल्याबरोबर पार्वती म्हणाली–"मी वाचून दाखविते ते! किती कठीण असले तरी चालेल. कोणी लिहिले आणि ते मला वाचतां आले नाही तर मी शिवज्ञानी पंडिताची मुलगी नाही."



सौ. गोमती शं. ठाकूर

मंडपात काय लिहिले आहे ते पार्वती वाचणार आहे हे सर्व गांवकऱ्यांना कळले. सर्व गावकरी मंडपात जमले. पार्वतीने येऊन भिंतीला बांधलेला पडदा बाजूला सारला आणि भिंतीवर लिहिलेले वाचले.

"करतां येईल अशांनीच हे मोठ्याने वाचावे. या तलावात दहा फूट खोल चिखल जमलेला आहे. मी फावडे, टोपली घेऊन हा चिखल एकटीने काढते. त्याला तुम्ही सर्व साक्षी रहा."

तिचे वाचणे पुरे झाल्याबरोबर कोणी तरी येऊन तिच्या समोर फावडे व टोपली आणून ठेवली.

हे सर्व कशासाठी?" पार्वतीने चकित होऊन विचारले.

तलावातला चिखल उपस." तेथे जमलेले लोक म्हणाला.

"मी वाचून दाखविते म्हटले. मी काम करून दाखविते असे नव्हते म्हटले." ती म्हणाली.

[illegible] ते वाचून दाखविणाराने लिहिल्यासारखे केले पाहिजे असे लिहिले आहे. म्हणून आमच्या पैकी कोणी मोठ्याने वाचून दाखविले नाही. तू आपली हुशारकी दाखविण्यासाठी मागेपुढे न पाहतां वाचून दाखविलेस. फावडे आणि टोपली घे. आतां हे काम तुला करावेच लागेल." सर्व वडीलधारी मंडळी म्हणाली.

पार्वती निरुपाय होऊन रडू लागली.

सर्व वडीलधाऱ्या मंडळींनी तिची समजूत घालून तिला समजावून सांगितले. म्हणाली— "बुद्धी सर्वांनाच थोडी फार असतेच. परंतु कोणी आपल्या बुद्धीचे प्रदर्शन वेळीअवेळी करणे बरोबर नाही.

शिवज्ञानी पंडित परत आला तोंपर्यंत पार्वतीत पूर्ण बदल झाला होता. तिचा गर्व उतरविण्यासाठी त्याच्या मित्रांनी केलेल्या युक्तीमुळे त्यांच्या मुलीत झालेला बदल पाहून त्याला फार आनंद झाला.



# लांचखाऊ

एका देशात कापूस खूप पिकत असे. परदेशातले लोक पुष्कळ किमत देऊन कापूस विकत घेत. त्यामुळे कापसाचे भाव फार वाढत गेले. तरी देशातल्या गरजा भागविण्या इतका पैसादेखील देशात उरत नसे.

म्हणून राजाने परदेशात जाणाऱ्या कापसावर कर लावून त्याच्यावर नजर ठेवण्यासाठी आणि तो वसूल करण्यासाठी एक विशेष अधिकारी नेमला. तो कापूस पिकविणाऱ्या शेतकऱ्यांकडून लांच घेऊन त्याला पसंत पडेल तो कापूस निर्यात होऊ देई. त्याने सर्व हिशोब मात्र खोटाच ठेवला. हळूहळू त्या अधिकाऱ्याने शेतकऱ्यांकडून जास्त जास्त लांच घ्यायला सुरवात केली. प्रजेला कापूस पिकविण्यासाठी केलेला खर्चदेखील मिळणे अशक्य वाटू लागले. तेव्हां त्यांनी सर्वांनी मिळून शेतकी खात्याचे जे मंत्री होते त्यांच्याकडे आपले गाऱ्हाणे नेले. म्हणाले—"या राज्यातले अधिकारी लबाड आहेत. हा कापसावरचा अधिकारी तर नुसता लांचखाऊ आहे. याला काढून टाकून दुसऱ्या चांगल्या अधिकाऱ्याला नेमावे." अशी विनंती केली.

मंत्र्याने सहानुभूती दाखवीत म्हटले—"तुम्ही सर्वजण प्रत्येकी मला एक एक हजार रुपये द्या. मी त्याला काढून टाकून दुसऱ्याला नेमतो."





# दानशूर

फार पूर्वी कोशल देशात सिद्धेश्वर नावाचा एक उदार दानधर्म करणारा गृहस्थ रहात असे. तो त्याच्याजवळ जे काही आणि जेवढे असे त्यातले तो भुकेल्यांना अन्न देत असे. तो एक थोर दाता आहे हे ऐकून कोशलच्या राजाने विचार केला की अशा लोकांना मदत केली तर त्यात पुण्यच मिळेल. त्याप्रमाणे तो दररोज सिद्धेश्वराकडे शिधा पाठवू लागला.

सिद्धेश्वराची बायको हंसमती सर्व प्रकारे पतीला अनुरूप अशीच होती. तिच्याकडे येणाऱ्याला तिने कधी नाही म्हटले नाही. अशा त्या उदार जोडप्याला कोशल राज्यभर लोक दानशूर म्हणून ओळखत. राजा जो शिधा पाठवी त्याच्यामुळे गोरगरिबांना अन्नदान करणे त्यांना फार सोपे झाले.

एकदां कोशल राजा सकुटुंब तीर्थयात्रेला निघाला आणि काशीला येऊन पोचला. सर्व मंडळी स्नानासाठी गंगेच्या घाटावर जात असतां काही शिपाई "महाराजांची स्वारी येत आहे, बाजूला व्हा!" असे ओरडत लोकांना बाजूला रेटीत येत होते. त्यांनी कोशलच्या राजाला सुद्धा रेटायला मागेपुढे पाहिले नाही.

ते पाहून कोशल राजाच्या शिपायांना राग आला. ते काशी राजाच्या शिपायांना म्हणाले—"कोशल राजा म्हणजे तुम्हांला काय वाटले? इतकी घमेंड कशाला?"

ते काशी राजाला ऐकू आले. त्याने आपला घोडा थांबविला आणि कोशल राजाला नमस्कार करून म्हणाला—"सिद्धेश्वर महाराज राहतात त्या देशाचे आपण अधिपती. ही गोष्ट माहीत नसल्यामुळे माझ्या शिपायांकडून आपणास त्रास झाला. क्षमा करावी."

[illegible] वाटले. 'मी दिलेल्या शिध्यावर अन्नदान करणाऱ्या सिद्धेश्वराकरवी का मला ही कीर्ती मिळावी?' जास्त विचार न करतां त्याने काशीयात्रा लवकरच संपविली आणि कोशल देशात परतला. त्याने सिद्धेश्वराकडे जाणारा शिधा बंद करविला.

परंतु सिद्धेश्वर व त्याची बायको हंसमती दोघांना शिधा बंद झाल्याबद्दल काहीच दुःख किंवा कष्ट वाटल्यासारखे दिसले नाही. सिद्धेश्वराला अपकीर्ती मिळावी म्हणून कोशल राजाने त्याच्या घरी जास्त पाहुण्यांना पाठवायला सुरवात केली.

सिद्धेश्वराला आपले अन्नसत्र चालू राहण्यासाठी त्याच्याजवळ जेवढी जमीन किंवा घर वगैरे होते तेसुद्धां हळूहळू विकावे लागले. सर्व संपत्ती विकून टाकल्यावर सिद्धेश्वर चंदा वसूल करू लागला. त्या दानधर्माबद्दल ज्यांच्या मनात आदरभाव होता त्यांनी थोडे फार धनसहाय्य केले.

परंतु तेसुद्धा क्रमाक्रमाने कमी होत गेले. एके दिवशी सिद्धेश्वराला फार कष्ट सहन करावा लागला. त्या दिवशी जेमतेम पसाभर धान्यच घरात होते आणि सुमारे वीस अतिथी येऊन बसले होते.

तेव्हां हंसमती आपले मंगळसूत्र काढून नवऱ्याला देत म्हणाली—"मनाला लावून घेऊ नका. प्रथम काम उरकून घ्या." अतिथिसत्कार निर्विघ्नपणे पार पडला.



त्या दिवसापासून सिद्धेश्वराकडे दान करायला एक दाणासुद्धा उरला नाही. तेव्हां दोघं नवरा बायको काशीयात्रेला जाण्याचे ठरवून निघाली.

वाटेत दोघं एका धर्मशाळेत उतरली. त्याच धर्मशाळेत आणखी तिघे यात्री उतरले होते. ते बोलता बोलता म्हणाले—" अलीकडे प्रवाश्यांना जेवणाखाणाची फार अडचण होऊ लागली आहे. आम्ही कोशल राजाच्या राजधानीत सिद्धेश्वर स्वामीच्या घरी गेलो होतो. पण ते तेथें नाहीत. त्यांच्याविषयी तुम्हांला काही माहीत आहे का हो?" त्यांनी सिद्धेश्वरालाच विचारले.

दोघां नवराबायकोला ते ऐकून आश्चर्य वाटले.

" तिकडेच आहेत. तुम्ही जाऊन पहा." सिद्धेश्वर त्यांना म्हणाला.

ते तिघे झोपल्यावर हंसमती पतीला म्हणाली—" काय हो, आपण आतांच घरी जाऊ या. हे येतील. त्या आधी त्यांच्या जेवणाखाण्याची काही तरी व्यवस्था नको

बोलल्याचे पाप लागेल."

" जवळ फुटकी कवडीसुद्धां नाही, यांना-काय वाढणार तू?" सिद्धेश्वराने विचारले.

" काही हरकत नाही. आपल्या घरी एक उखळ व जाते आहे आणि इतर सामानपण आहे. ते विकून टाकू या." हंसमती म्हणाली.

दोघं परत आपल्या गांवी निघाली आणि उजाडण्याच्या सुमारास घरी येऊन पोंचली. उखळ विकायला म्हणून जागचे हलविल्याबरोबर त्यांना त्यांच्या पूर्वजांनी पुरून ठेवलेले धन सांपडले. हंडा होता तो. त्यांना आश्चर्यच वाटले.

त्या दिवशी त्यांनी त्या तिघांनाच नव्हे तर गांवभरच्या लोकांना बोलावून एक मोठे जेवण दिले.

ती गोष्ट कोशल राजाला कळली. त्याने दिले नाहीतर देवाने दिले, असे त्याला वाटले. त्याला पश्चात्ताप झाला. त्याने त्यांच्याकडे पूर्वीप्रमाणे पुन्हां शिधा पाठवायला सुरवात केली.






युद्धाचा सातवा दिवस उजाडला. भीष्माने कौरव सैन्य मंडलव्यूह रचून उभे केले. त्यानंतर धृतराष्ट्राचे मुलगे, सहस्रावधी रथ आणि गजसैन्य, यांना भीष्माच्या रक्षणासाठी उभे करण्यात आले.

कौरवांचा व्यूह पाहून धर्मराजाने आपले सैन्य वज्रव्यूह रचून उभे केले. युद्ध आरंभ झाल्याबरोबर योद्धे परस्परांचे व्यूह भंग करू लागले. द्रोण आणि विराट, अश्वत्थामा व शिखंडी, दुर्योधन व धृष्टद्युम्न, नकुलसहदेव व त्यांचे मामा शल्य, विंदानुविंद व इरावंत, अनेक कौरव वीर व अर्जुन, भीम व कृतवर्मा, अभिमन्यू व धर्मराष्ट्राचे मुलगे चित्रसेन, कर्ण आणि दुर्मर्षण, अलंबस व सात्यकी, भूरिश्रवा व धृष्टकेतु आणि स्वतः धर्मराज व श्रुतायू यांचे परस्परांशी युद्ध सुरू झाले.

अर्जुनाशी युद्ध करीत असलेल्या वीरांनी त्याच्यावर शरवृष्टी सुरू केली. अर्जुनाने त्यांना तोंड देण्याच्या हेतूने इंद्रास्त्राचा प्रयोग केला. ते अस्त्र सोडल्याबरोबर त्याच्याशी युद्ध करणारे जखमी होऊन रणांगणावर लोळू लागले. त्याच्या प्रत्येक अमोघ बाणाला शत्रू बळी पडत होते. त्याच्यासमोर टिकाव धरणे अशक्य झाले तेव्हां कौरव वीर भीष्माचार्यांच्या आश्रयाला धावले.

त्यांच्यापैकी एक मुख्य सुशर्मा हा होता. त्याला दुर्योधन म्हणाला—" भीष्माचार्य अर्जुनाशी भयंकर युद्ध करण्यासाठी जात



आहेत. तुम्ही त्यांच्या मदतीला त्यांच्या-बरोबर राहूले पाहिजे. मागे पाऊल घेता कामा नये."

त्याप्रमाणे थोड्याच वेळाने भीष्माचार्य कौरव वीरांना बरोबर घेऊन अर्जुनावर तुटून पडले.

मध्यंतरी विराटाशी युद्ध करीत असतां द्रोणाचार्यांनी प्रथम त्याच्या सारथ्याला आणि घोड्यांना ठार केले. तेव्हां विराट त्याचा मुलगा शंख याच्या रथात बसून आला. आतां दोघे युद्ध करू लागले. तेव्हां द्रोणाचार्यांनी एक मर्मी बाण मारून शंखचा वध केला. विराट पळून गेला.

त्याचप्रमाणे अश्वत्थाम्याने त्याच्याशी युद्ध करीत असलेल्या शिखंडीच्या सारथ्याला व घोड्यांना ठार केले. तेव्हां शिखंडी तलवार हाती घेऊन अश्वत्थाम्याने सोडले-ल्या बाणांचा ध्वंस करीत स्वतःचे रक्षण करू लागला. शेवटी त्याच्या हातातली तलवारच मोडून गेली. त्याने ती मोडकी तलवारच अश्वत्थाम्यावर फेकली आणि स्वरक्षणासाठी समोरून निसटून गेला.

अलंबस आणि सात्यकी यांचे अत्यद्भुत युद्ध झाले. अलंबसने आपल्या राक्षसी पद्धतीने माया पसरवून युद्ध सुरू करतांच सात्यकीने, त्याला अर्जुनाकडून मिळालेले इंद्रास्त्र सोडून अलंबसला जखमी केले. तेव्हां त्याला पळून जावे लागले.

धृष्टद्युम्नाने दुर्योधनाशी युद्ध करीत असतां त्याच्यावर शरवृष्टी करून त्याला जखमी केले आणि त्याच्या घोड्यांना ठार केले. दुर्योधनाने तलवार घेऊन रथातून उडी मारली आणि धृष्टद्युम्नावर धांवला. इतक्यात शकुनीने येऊन दुर्योधनाला आप-ल्या रथात बसवून घेतले आणि त्याला घेऊन पळून गेला.

भीमाशी युद्ध करीत असतां कृतवर्माने त्याला घायाळ केले व स्वतःदेखील जखमी झाला. त्याचे घोडे ठार झाले तेव्हां तो त्याचा मेहुणा वृषक याच्या रथात बसला. ही गोष्ट दुर्योधनाच्या डोळ्यांसमोर घडली. भीमानेदेखील कौरव सैन्याचा पुष्कळ संहार केला.

उलूपी व अर्जुन यांचा मुलगा इरावंत याने त्याच्याशी युद्धाला आलेल्या विंदानु-विंदाना पळून जाईपर्यंत बाणांचा वर्षाव करून बेजार केले आणि त्यांच्या सैन्याची दाणादाण उडविली.

घटोत्कच व भगदत्त यांचे युद्ध विचित्रच होते. भगदत्त एका मोठ्या हत्तीवर चढून पांडव सैन्याला तुडवीत चालून आला. आपले रक्षण करण्यास कोणी नाही असे वाटून पांडव सैन्य पळू लागले. परंतु घटोत्कच एकाएकी अदृश्य झाला आणि त्या पाठोपाठ कौरवांच्या सैन्यात हाहाकार उडून गेला. घटोत्कच पुन्हां प्रगट झाला आणि भगदत्तावर शरवृष्टी करू लागला. भगदत्ताने घटोत्कचाचे बाण भंग करून त्याच्यावर गदाप्रहार सुरू केला. तेव्हां घटोत्कच भगदत्तासमोर उभे राहणे अशक्य वाटून पळून गेला.

नकुल आणि सहदेव यांनी त्यांचे मामा शल्य याच्याशी युद्ध करून त्या वीराला मूर्च्छित केले. शल्याचा सारथी शल्याला दूर घेऊन गेला. नकुल सहदेव यांनी जय मिळाल्याबद्दल जयघोष केला तो ऐकून कौरवसैन्य निराश व हतोत्साह झाले.



तोंपर्यंत मध्याह्न होऊन सूर्य डोक्यावर आला होता.

अभिमन्यू व धृतराष्ट्राच्या मुलांच्यामध्ये झालेल्या युद्धात अभिमन्यूने चित्रसेन, विकर्ण आणि दुर्मर्षण या तिघांचा रथ नष्ट केला. ते पाहून अभिमन्यूवर कौरव वीर धावून आले. तेव्हां अभिमन्यूच्या मदतीला अर्जुन धावून आला. दोघांचे परस्परांशी फार मोठे युद्ध झाले. अर्जुनाच्या हल्लयासमोर कोणाचा टिकाव लागला नाही. सुशर्माचे अनेक नातेवाईक अर्जुनाच्या बाणांना बळी पडले सुशर्मा आपल्या काही निवडलेल्या वीरांना बरोबर घेऊन अर्जुनाशी युद्धाला आला.












अर्जुनाने त्या सर्वांना पळवून लावले आणि भीष्माचार्यांशी युद्ध करण्यासाठी पुढे सरसावला. वाटेत त्याला दुर्योधन, सैंधव आदिकांशी युद्ध करावे लागले.

भीष्माचार्य होते तेथे अर्जुन येऊन पोचला, त्याच वेळी धर्मराज, भीम, नकुल व सहदेव देखील येऊन पोचले. अशा तऱ्हेने पांचही पांडव आणि भीष्माचार्य यांचे एकाच वेळी युद्ध सुरू झाले.

पांचही पांडव युद्धाला आले होते तरी ते भीष्माचार्यांना विचलित करू शकले नाहीत. इतक्यात जयद्रथाने येऊन सर्वांच्या धनुष्याचे स्तंभन केले. म्हणजे त्यांची धनुष्ये वाळूनाशी झाली. दुर्योधनाने धर्मराजाला

आणि नकुल सहदेवांना [illegible] करून पुरेसे करून सोडले. शल्य इत्यादिक कौरव वीरांनी पांडवांवर जोराचा हल्ला करून त्यांना किंकर्तव्यमूढ करून सोडले.

धर्मराज शिखंडीजवळ येऊन म्हणाला– "तू भीष्माचा वध करीन, म्हणाला होतास ना? पहा, आज भीष्माचार्यांनी किती भयंकर युद्ध सुरू केले आहे? तू त्यांना म्याला आहेस असे वाटते आहे. तेव्हां तू दाखव आपला काय पराक्रम तो."

ते ऐकून शिखंडी भीष्माचार्यांशी युद्ध करायला निघाला. वाटेत त्याला शल्याने अडविले आणि त्यावर आग्नेयास्त्र सोडले. परंतु शिखंडी मुळीच म्याला नाही. त्याने वारुणास्त्राचा प्रयोग केला.

मध्यंतरी भीष्माचार्यांनी धर्मराजाचे धनुष्य आणि ध्वज नष्ट करून सिंहगर्जना केली. धर्मराज घाबरून गेला.

भीम गदा घेऊन जयद्रथाच्या अंगावर धावला. त्याच्यावर होणाऱ्या बाणांची पर्वा न करतां भीमाने पुढे जाऊन गदाप्रहार करून जयद्रथाच्या रथाचे घोडे ठार केले. तेव्हां दुर्योधन भीमावर धावला. भीमाने त्याच्यावर देखील हल्ला सुरू केला. भीमाच्या गदाप्रहारासमोर टिकाव लागला नाही तेव्हां दुर्योधनाच्या जवळ होते नव्हते ते सर्व कौरववीर त्याला एकटा सोडून पळून

केले. रथ नष्ट झाल्यावर चित्रसेन स्वतःचा बचाव करून परतला तेव्हां सर्वांनी त्याचे अभिनंदन केले. धृतराष्ट्राचा मुलगा विकर्ण याने चित्रसेनाला आपल्या रथात बसवून घेतले.

काही वेळाने शिखंडी भीष्माचार्यांसमोर येऊन युद्ध करण्यास उभा राहला आणि त्यांना युद्धाला आह्वान केले. परंतु भीष्माचार्यांनी त्याच्याकडे लक्षच दिले नाही.

सूर्यास्ताची वेळ होत आली होती, तेव्हां धृष्टद्युम्न, सात्यकी वगैरेंनीं येऊन कौरव सैन्याचा संहार सुरू केला. त्याच वेळी विंदानुविंदांनी येऊन धृष्टद्युम्नाशी युद्ध सुरू केले. त्यांनी त्याचा रथ नष्ट केल्यावर तो सात्यकीच्या रथात बसला.

त्या दिवसाचे युद्ध संपूर्ण होण्यापूर्वी अर्जुनाने सुशर्मा आदिक कौरव वीरांना पुरेसे करून सोडले. भीमाने दुर्योधन आदिक वीरांना जिंकले. सूर्यास्त होतांच दोन्ही पक्षातील वीर आपापल्या शिबिराकडे निघाले. त्यांनी प्रथम अंगात शिरलेले बाण काढले आणि परस्परांचे औषधपाणी केले. त्यानंतर युद्धाच्या गोष्टी विसरून काही वेळ गायनवादनात मग्न झाले.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोन्ही पक्षातील सैन्यात युद्धाची तयारी सुरू झाली. व्यूह प्रतिव्यूह रचून त्यांनी युद्ध आरंभ झाल्याची



घोषणा केली. त्या दिवशी भीष्माचार्यांनी सुरवातीपासूनच रुद्रावतार घेतला होता. ते पाहून धर्मराजाने आपल्या सर्व प्रमुख वीरांना भीष्माचार्यांशी युद्ध करण्यास पाठविले.

भीष्माचार्यांनी सोमक, सृंजय आणि पांचाल देशाच्या अनेक वीरांचा वध केला. त्यांच्यासमोर उभा राहून युद्ध करू शकणारा एकटा भीम काय तो उरला. तोसुद्धा भीष्माचार्यांसारखाच भयंकर युद्ध करीत होता. त्याने त्यांच्या सारथ्याचा वध केला आणि त्यांचा रथ उलटून पाडला. त्याने भीष्माचार्यांच्या मदतीला आलेल्या सुनाभ नावाच्या धृतराष्ट्राच्या मुलाला ठार केले.



ते पाहून धृतराष्ट्राचे सात पुत्र आदित्य-केतू, बव्हाशी, कुंडधार, महोदर, पंडितक, अपराजित आणि विशालाक्ष भीमावर चालून आले. भीमाने मर्मीबाण सोडून त्या सर्वांचा वध केला. ते पाहून दुर्योधनाचे सर्व धाकटे भाऊ थरथर कांपू लागले. दुर्योधन शोक करीत भीष्माचार्यांकडे जाऊन म्हणाला— "अजोबा! माझ्या सर्व धाकट्या भावांना भीम ठार करीत आहे. निर्भय होऊन युद्धाला जो कोणी समोर आला त्याला त्याने जणुंकाही ठार करण्याची प्रतिज्ञाच केली आहे. तुम्ही आमच्या बाजूने उत्साहाने युद्ध करीत नाही, असे मला वाटू लागले आहे. मी मोठ्या संकटात सांपडलो आहे."

भीष्माचार्यांना त्या गोष्टीचा राग आला. दुर्योधन शोक करीत बसला होता. त्याला संबोधन करून भीष्माचार्य म्हणाले—"मी तुला पूर्वीच सांगितले नव्हते का? तुला हे सर्व माहीत नव्हते का, तुझा जो भाऊ समोर येईल, भीम त्याचा वध सर्वांत प्रथम करील. मला व द्रोणाचार्यांना तू या युद्धात व्यर्थ ओढलेस. आम्ही आपल्या शक्तीची पराकाष्ठा करीत आहो. आतां तूच काय तो पराक्रम दाखवून पांडवांचा वध कर."

मध्यान्हाच्या सुमारास युद्धाला भलताच जोर चढला. भीष्माचार्यांनी जणुंकाही भीष्मअवतारच घेतला होता. त्यांच्याशी युद्धाला धृष्टद्युम्न, सात्यकी, शिखंडी आपापली सैन्ये घेऊन आले. त्याचप्रमाणे विराट व द्रुपद सोमकांना बरोबर घेऊन आले. याशिवाय कैकेय वीर, धृष्टकेतू आणि कुंतिभोज आपापली सैन्ये घेऊन भीष्माचार्यांशी युद्ध करण्यास आले. अर्जुन, उपपांडव आणि चेकितान इतर कौरव वीरांशी युद्ध करीत होते. अभिमन्यू, भीम आणि घटोत्कच आणखी एका बाजूने कौरव सैन्याचा ध्वंस करीत होते.

कौरव वीरदेखील पांडव सैन्याचा संहार करू लागले. द्रोणाचार्यांनी सोमकांचा आणि संजयांचा वध केला. द्रोणाचार्यांच्या हाती रणांगणावर पडणारे पांडववीर आणि










भीमाच्या हाती मरणारे कौरव सैन्य यांच्या आक्रोशाने भूमंडल दुमदुमले.

अशा तऱ्हेने युद्धाला रंग चढू लागला तेव्हां अर्जुनाचा मुलगा इरावंत कौरव सैन्यावर अशी उत्साहाने तुटून पडला.

इरावंताची आई ही नागराज ऐरावत याची मुलगी होती. तिच्या पतीचा गरुत्मन्ताने वध केल्यानंतर ऐरावतने तिला अर्जुनाकडे पाठविले. ती अर्जुनाच्या शौर्य सौंदर्यावर भाळली. तिच्या पोटी अर्जुनाला मुलगा झाला तोच हा इरावंत. इरावंत नागलोकातच लहानाचा मोठा झाला. परंतु इरावंताचा चुलता अश्वसेन हा अर्जुनाचा द्वेष करीत असे. म्हणून त्याने इरावंताला नागलोकातून हद्दपार केले.

तेव्हां अर्जुन इंद्रलोकात होता. ते कळल्यावर इरावंत इंद्रलोकात गेला आणि अर्जुनाला भेटून त्याने आपल्या जन्मापूर्वीची व त्यानंतरची कथा सांगितली. तेव्हां इरावंत हा आपला मुलगा आहे आणि त्या परिस्थितीत त्याच्याकडे आला या गोष्टीचा अर्जुनाला आनंद झाला. म्हणाला— "युद्ध होईल तेव्हां तू आमच्या बाजूने युद्ध केले पाहिजेस!" ती गोष्ट लक्षात ठेवून उत्तम यवन जातीचे घोडे-बरोबर घेऊन इरावंत युद्धाला आला होता.

इरावंत आपले अश्वदल घेऊन कौरव सैन्यावर चालून आल्याबरोबर शकुनी मामांचे गज, गजाक्ष, वृषभ, चर्मवंत, आर्जव आणि शुक नांवाचे सहा भाऊ, शकुनी नको जाऊ असे सांगत असतांही तिकडे दुर्लक्ष करून इरावंताच्या अश्वदलाशी युद्ध करण्यासाठी आले. त्यांनी मारक्री शरवृष्टी चालू केली तेव्हां इरावंत तलवार घेऊन आला आणि एकेक करून त्याने वृषभ नांवाच्या एका भावाला सोडून इतर सर्वांना ठार केले.

ते पाहून दुर्योधनाने त्याच्यावर अर्ष्यशृंग नांवाच्या राक्षसाला युद्ध करण्यासाठी पाठविले. दोघांचे भयंकर द्वंद्वयुद्ध चालू असतां इरावंत बेशुद्ध होऊन पडला. त्या असहाय परिस्थितीत त्या राक्षसाने त्याला छातीत तलवार खुपसून ठार केले. या बातमीने कौरव सैन्यात सर्वत्र आनंदी आनंद पसरला.





# मित्रभेद

[ ६ ]

करटकाने दमनकाला आषाढभूती कसा पळून गेला हे सांगून पुढील कथा सांगायला सुरवात केली :

आषाढभूतीवर पूर्ण विश्वास टाकून देवशर्मा निश्चिन्तपणे कालकृत्य आणि स्नानसंध्यादी उरकून घेण्यास निघून गेला. त्याला जवळच एक दृश्य दिसले. मेंढरांचा एक कळप चरत होता. त्यांतले दोन मेंढे परस्परांशी भांडू लागले. ते दोघे धांवत धांवत येऊन परस्परांच्या डोक्यांना टक्कर देत होते. ते परत मागे जात आणि पुन्हा पळत येऊन जोराने टक्कर देत होते. त्यांची डोकी रक्तबंबाळ होऊन रक्त जमिनीवर सांडू लागले होते. जमिनीवर पडलेले रक्त चाटण्यासाठी एक कोल्हा पळत आला. तेव्हां दोन्ही मेंढे मागे गेले होते.

देवशर्मा त्या कोल्ह्याला पाहून विचार करू लागला, "कोल्हा अक्कलशून्यच! पुन्हा हे मेंढे टक्कर द्यायला येतील तेव्हां तो कोल्हा मध्ये सांपडून नक्कीच मरेल."

त्याने विचार केला, अगदी तसेच दोघे मेंढे जोराने धांवत आले आणि रक्त चाटण्यात गर्क झालेला कोल्हा त्यांच्या डोक्यांच्या मध्ये सांपडून गतप्राण झाला.

त्या मेलेल्या कोल्ह्यासंबंधी विचार करीत देवशर्मा त्याचा शिष्य होता त्या जागी आला. परंतु आषाढभूती तेथे नव्हता. देवशर्माने घाईघाईने स्नान करून परत येऊन पाहिले तर त्याच्या कपड्यांचे गाठोडे तसेच होते. परंतु सोने नव्हते.

"अरे रे, माझे सर्व सोने गेले की!" असा ओरडत देवशर्मा बेशुद्ध होऊन जमिनी-

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र










वर पडला. काही वेळाने शुद्धीवर आल्यावर तो, "ए आषाढभूती! मला फसवून कोठे निघून गेलास रे? बोलत कां नाहीस?" असे म्हणत रडत आषाढभूतीच्या पाव-लांच्या खुणांच्या अनुरोधाने निघाला.

संध्याकाळच्या सुमारास तो एका खेडे-गावात येऊन पोंचला. एक कोष्टी बायको-बरोबर ताडीच्या दुकानात जात होता. त्या कोष्ट्याला तो म्हणाला—"बाबा रे! मी या असमयी संध्याकाळच्या वेळी तुझ्याकडे पाहुणा म्हणून आलो आहे. या गावात माझ्या ओळखीचा कोणी नाही. म्हणून मला आपला पाहुणा म्हणून राहू दे."

म्हणाला—"काय ग, याला आपल्या घरी घेऊन जा आणि जेवायला वाढ. त्याला अंथरूण घालून देऊन हवं नको ते विचारून घे. मी मांस आणि ताडी घेऊन येतो."

त्या कोष्ट्याची बायको वाईट चालीची बाई होती. तिने विचार केला, तिला देवदत्त नांवाच्या तिच्या प्रियकराला भेटा-यला चांगली संधी मिळाली. ती आनंदाने देवशर्माला बरोबर घेऊन घरी निघाली.

घरी पोंचल्यावर तिने एक मोडकी खाट देवशर्माला दाखविली आणि म्हणाली—"माझी, एक मैत्रीण आजच त्यांच्या गावाहून आली आहे. तिला भेटून मी ही आलेच. मी येईपर्यंत जरा लक्ष ठेवा." असे सांगून नवी साडी नेसून आणि चार दागिने घालून निघून गेली.

परंतु वाटेत दुरून तिला तिचा नवरा येत असलेला दिसला त्याच्या हातात ताडीची बाटली होती. ती तशीच घरी परतली. घाईघाईने दागिने काढून घरी नेसायचे लुगडे नेसली. कोष्ट्याने तिला चांगले लुगडे नेसून दागिने घालून जातांना पाहिले होते, तरी जणुंकाही त्याला कळले नाही, असे दाखविले. त्याला त्याच्या बायकोच्या गैरवागणुकीची ऐकून माहिती होती.

घरी आल्यावर तो रागाने बायकोला म्हणाला—"काय ग, ए कुलटे! कोठे ग गेली होतीस?"

"तिकडून आल्यावर मी कोठेदेखील गेले नव्हते. कशाला पितां ही ताडी नी माडी? पिणाऱ्याचे तोंड आणि बुद्धी जागेवर नसते म्हणतात!" ती म्हणाली.

बायकोचे ते उलट बोलणे ऐकून आणि तिने घरी आल्याबरोबर लुगडे बदलले असल्याचे ओळखून कोष्ट्याने एक काठी घेतली आणि तिला वरपासून खालपर्यंत झोडपून काढले व म्हणाला—"तुझ्या वागणुकीविषयी आजपर्यंत नुसते ऐकत होतो, आतां प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल्यावर स्वस्थ कसे बसवणार?" नंतर त्याने बायकोला एका खांबाला बांधून ठेवले आणि झिंगलेल्या स्थितीत गाढ झोपी गेला. कोष्ट्याच्या बायकोची एक मैत्रीण न्हाबीण होती. ती कोष्टीणीला सामील होती. तिने कोष्टी झोपलेला आहे असे घरात येताच ओळखले व कोष्टीणीला म्हणाली—"अग, तुझा तो देवदत्त किती वाट पहात होता"!

कोष्टीण म्हणाली—"पण मी जाणार कशी? पहा ना येऊन मी कशा स्थितीत आहे ती. आणि तो आहे ना घरात!"

"मी तुला सोडते. तुझा नवरा उद्यां तोंडावर ऊन येईपर्यंत उठणार नाही. फार



झाले तर तू मला आपल्या जागी बांधून ठेव. तुझा नवरा रात्री उठला तर मला पाहून तूच आहेस असे समजून गप्प राहील. तू देवदत्ताकडे जाऊन लवकर परत ये." न्हावीण म्हणाली.

कोष्टीणीने आपल्या जागी न्हाबीणीला बांधून ठेवले आणि देवदत्ताकडे निघून गेली.

काही वेळाने कोष्टी शुद्धीवर आला आणि म्हणाला—"अग ए! तोंडाळ नीच पोरी! यापुढे माझ्या मागे घराबाहेर पाऊल टाकणार नाही व उलट उत्तर देणार नाही, असे कबूल केलेस तरच तुला सोडीन."

कोष्टी आपला आवाज ओळखील असे समजून न्हावीण काही बोललीच नाही.

कोष्ट्याने दोनदां विचारलें. पण न्हावीण गप्पच राहिली. तेव्हां मात्र कोष्ट्याच्या अंगाचा भडका उडाला. तो उठला आणि एक चाकू घेऊन त्याने न्हावीणीचे नाक कापून टाकले आणि "आतां आयुष्यभर नकटी होऊन रहा!" असे म्हणत पुन्हां जाऊन झोपला. सोने घालवून बसल्याच्या दुःखाने भूकतहान विसरून तळमळत पडलेला देव-शर्मा हे सर्व नाटक डोळे उघडून पहात होता.

काही वेळाने कोष्टीणीने परत आल्यावर न्हावीणीला विचारले–"काय ग? सर्व ठीक आहे ना? मी गेल्यावर तो दुष्ट उठला होता का?"

"माझं विचारशील तर जवळ येऊन बघ! पण तुझ्या नरकासुर नवऱ्याने उठल्या-बरोबर माझे नाक कापले. आतां पुन्हां उठून माझे कान कापून टाकण्याच्या आत मला सोडून मोकळी कर. घरी निघून जाते." न्हावीण म्हणाली.

न्हावीणीला कोष्टीणीने सोडविले आणि तिच्या हाती स्वतःला खांबाला बांधवून ओरडत म्हणाली– "दुष्ट, नरराक्षसा! माझ्यासारख्या सुशील पतिव्रतेला असे छळणे, तिला विद्रूप करणे तुला शोभते का? अहो दिक्पालक हो! अहो सूर्यचंद्र हो! ऐका, मी पतिव्रता असेन तर माझे कापलेले नाक पूर्वीसारखे जसेच्या तसे करा! ए दुष्ट नीच पुरुषा! जरा येऊन पहा, माझं नाक पुन्हां पहिल्यासारखं झालं आहे की नाही?"

बायको खोटें बोलत असेल तर तिला जिवंत जाळायचे ठरवून कोष्टी उठून तिच्या जवळ जाऊन पाहतो तर तिचे नाक जसेच्या तसे. तो चकितच झाला. तिचे नाक कापले तरी गेले होते का अशी एक शंका त्याच्या मनात आली. परंतु रक्ताने माखलेली सुरी पाहून ती शंकादेखील दूर झाली. त्याने लगेच दोरी सोडून तिला मोकळी केली आणि आनंदाने तिला आलिंगन करून तिची माफी मागितली. नंतर तो तिला खुष करण्याचा यत्न करू लागला.





# १४४. भयंकर मोठी चिमणी

मंटाना (अमेरिका) प्रदेशातील डोंगरातल्या एका टेकडीवर तांबे वितळविण्यासाठी भट्ट्या बांधलेल्या आहेत. या भट्ट्यांचा धूर जाण्यासाठी एक भयंकर मोठी चिमणी बांधलेली आहे. ही जगातली सर्वांत उंच चिमणी आहे. हिची उंची ५८५ फूट आहे. मधूनमधून इन्स्पेक्टरांना पोलादी शिडीने तिच्यावर चढून जावे लागते. वर गेल्यावर जोराचा वारा लागला की चिमणी झुलल्यासारखी वाटते, म्हणे. ही चिमणी विटांनी बांधलेली आहे. या चिमणीतून येणारा धूर फार विषारी असतो.





# अमरवाणी

चिता चिंता द्वयोर्मध्ये
चिंता नाम गरीयसी;
चिता दहति निर्जीवम्,
चिंता प्राणयुतम् वपु:  ॥ १ ॥

[ चितेपेक्षां चिंता जास्त कष्ट देणारी आहे. (कारण) चितेवर निर्जीव देहच जळतो, परंतु चिंता सजीव देहाला जाळते. ]

अजगाम यदा लक्ष्मी:
नारिकेलफलांबुवत्,
निर्जगाम यदा लक्ष्मी:
गजभुक्त कपित्थवत्  ॥ २ ॥

[ संपत्ती येते तेव्हां नारळातल्या पाण्यासारखी येते, परंतु ती जाते तेव्हां हत्तीने गिळलेल्या कवठासारखी गडप होऊन जाते. ]

असारे खलु संसारे
सारम् श्वशुर मंदिरम्
हिमालये हर श्शेते,
हरि: शेते महोदधौ  ॥ ३ ॥

[ या निस्सार संसारात सासुरवाड सर्वांत जास्त सुख देणारे असते. (म्हणूनच तर) शंकराने (पार्वतीचे माहेर) हिमालय पर्वतावर आणि विष्णूने (लक्ष्मीचे माहेर जो) समुद्र त्यांत निवास केला आहे. ]



# यक्ष पर्वत

[ २० ]

[ समरबाहूच्या अनुयायांनी फेकलेल्या भाल्याचा मार लागल्याने वीरपूरचा सेनापती जखमी झाला. डोंगर चढून येणाऱ्या शत्रुसैन्यावर रानटी जातीच्या लोकांनी सोडलेल्या सिंहावाघांनी कित्येकांना ठार केले आणि शत्रुसैन्यात गोंधळ उडवून दिला. स्वर्णाचारी व समरबाहूचे अनुयायी उंटावरून पळून जाण्याच्या प्रयत्नात असतां वीरपूरच्या घोडेस्वारांनी त्यांच्यावर हल्ला केला. पुढे– ]

**स्व**र्णाचारीने तलवार उपसून शत्रूच्या घोडेस्वारांवर साहस करून हल्ला केलेला पाहून समरबाहूच्या अनुयायांचा उत्साह वाढला व त्यांनी आपले उंट चालवून मुसंडी मारली आणि शत्रूवर इतका जोराचा हल्ला केला की शत्रूची फळी फुटली आणि स्वर्णाचारी आपल्या साथी उंटस्वारांसह पलीकडे निघून गेला. अर्थात दोघांची फार मोठी चकमक उडाली. समरबाहूच्या अनुयायांनी शौर्य दाखवून आपल्या तलवारीचे आणि भाल्यांचे पाणी शत्रूला खूप पाजले. घोडेस्वारांनीदेखील आपल्या राजाचा जयजयकार करून उंटवाहनांना बेजार केले. त्या चकमकीत समरबाहूचे काही अनुयायी आणि वीरपूरचे काही घोडेस्वार जखमी होऊन जमिनीवर लोळू



लागले. पूर्वी कधीं उंट पाहिले नसल्याने घोडे बिचकले आणि पळू लागले. ती संधी साधून स्वर्णाचारी उरलेल्या पंधरासोळा साथीदारांसह निसटून पळून गेला आणि जंगलात शिरुन कोठे नाहींसा झाला हे शत्रूला कळलेदेखील नाही.

त्या वेळी वीरपूरचा सेनापती भयंकर चिडला आणि आपल्या घोडेस्वारांवर ओरडून म्हणाला—"आपण इतके जण आहो आणि शत्रू आपली फळी फोडून निघून जावा, या गोष्टीची काही लाज आहे का? घोडदळाचा नायक जिवंत आहे की मेला?"

स्वर्णाचारीं व त्याच्या साथीदारांना थांबविण्याची शिकस्त करुनही यश मिळाले नाही, याबद्दल निराश होऊन किंकर्तव्यविमूढ होऊन उभा राहलेला नायक सेनापतीकडे धावत आला आणि नमस्कार करून म्हणाला—"आम्ही अनेकांना ठार केले आणि कित्येक शत्रू जमिनीवर लोळत पडले आहेत. उरलेले जंगलात पळून गेले."

"ते पळून गेले आहेत हे, तू सांगण्याची गरज नाही. मी काही आंधळा नाही. त्यांचा पाठलाग करायचे सोडून तू येथे उभा काय करतो आहेस?" सेनापतीला भयंकर राग आला होता.

"वीरवर्य! जखमी झालेल्यांची मलमपट्टी करवीत होतो. नंतर आपल्या शूर घोडेस्वारांना घेऊन जाऊन शत्रूवर तुटून पडण्याच्या विचारात होतो." घोडेस्वारांचा नायक म्हणाला.

"हे सर्व काम संपवून चांगलासा मुहूर्त पाहून मग जावे म्हणतो आहेस होय? तू येईपर्यंत ते उंटावरचे पळपुटे तुझी वाट पहात थांबले असतील जणू काही! अंगात एक अंगारखासुद्धां न घालतां उघडे पांघरूण त्या शेंडीवाल्याने वीरपूरच्या घोडेस्वारांना धूळ चारली. ही गोष्ट महाराजांना कळली तर ते तुला आणि मला उभा चिरून खातील, लक्षांत आहे का?" सेनापती म्हणाला.

"अहो, तो नुसता शेंडीवाला नाही. त्याला 'आचार्य महामंत्री' म्हणून त्याचे

त्याचा शौर्यपराक्रम आणि रूपरंग पाहिलात तर तुम्हांला महाभारतातले..."

घोडदळाच्या नायकाचे ते वर्णन चालूच असतां सेनापती मध्येच त्याला म्हणाला—"तुझे ते काव्य आता पुरे कर. पुरे झाली तुझ्या तोंडाची वटवट! तू चौघांपाच जणांना बरोबर घेऊन तो शेंडीवाला आणि त्याचे उंटवाहनावर जाणारे अनुयायी कोणत्या दिशेने गेले आहेत व कोठे ते विश्रांती घ्यायला थांबले आहेत, जाऊन पाहून ये. त्यांना तुम्ही त्यांच्या शोधार्थ आल्याचे कळू देता कामा नये. मी त्यांचा तो डोंगरीं किल्ला सर करून त्यावर वीरपूरचा झेंडा फडकावतो आणि सैन्य घेऊन शत्रूच्या समाचाराला सैन्य घेऊन येतो."

घोडदळाचा नायक नमस्कार करून "जो हुकूम!" म्हणाला आणि चार घोडेस्वारांना बरोबर घेऊन स्वर्णाचारी आपल्या अनुयायांबरोबर जंगलात ज्या दिशेने गेला होता त्या दिशेने चालू लागला.

परंतु स्वर्णाचारी तोंपर्यंत अरण्यात पुष्कळच दूर निघून गेला होता. वाटेल ते करून खड्गवर्मा आणि जीवदत्त आणि त्यांच्या बरोबर त्यांचा मालक समरबाहू सर्वजण कोठे आहेत हे पाहून त्यांना भेटून



परिस्थितीची ओळख करून घेणे आवश्यक आहे असे स्वर्णाचारीला वाटले. अस्वल जातीचे लोक जंगलात कोठे राहतात हे त्याला अंदाजे माहीत होते. म्हणून तो त्याच बाजूला निघाला आणि काही वेळाने एका तळ्याच्या काठी येऊन पोचला.

सर्व त्या तळ्यात उतरले. त्यांनी उंटांना पाणी पाजले आणि चरायला जंगलात सोडले. स्वर्णाचारीने आपल्या दोघां अनुयायांना उंचशा झाडावर चढून वीरपूरच्या पायदळ सैन्यापैकी किंवा घोडेस्वारांपैकी कोणी येत तर नाही, पाहून सावध करायला सांगितले. म्हणाला—"पहिल्या पासूनच सावध राहणे बरे. शत्रू फार मोठा नसेल



तर येथेच त्याला आपल्या तलवारींचे पाणी पाजून नरकलोकांत पाठवू या आणि दूर निघून जाऊं या. तेव्हां तुम्ही डोळ्यात तेल घालून पहात रहा आणि वेळीच आम्हांला सावध करा."

सुमारे अर्धा तासच झाला असेल, झाडां-वर चढलेल्या दोघांपैकी एकाला ते होते त्या बाजूला अस्वल जातीच्या लोकांपैकी दहाबारा जण धावत येत असलेले दिसले. ते इकडेतिकडे न पाहतां सरळ त्याच तलावाच्या दिशेने पळत येत होते. म्हणून एक जण घाई-घाईने झाडावरून खाली उतरून स्वर्णाचारीच्या जवळ आला आणि त्याने जे पांहिले ते त्याला सांगितले.

स्वर्णाचारीने आपल्या सर्व अनुयायांना सावध करून तलावाच्या काठच्या झाडा-झुडपांत आपली चाहूल दिल्याशिवाय लपून बसायला सांगितले व म्हणाला—"आपण शोधायला म्हणून निघालो, पण आपल्या मालकाला कैदी करून घेऊन जाणारे अस्वल जातीचे लोकच समोर येत आहेत असे दिसते."

थोड्याच वेळात अस्वल जातीचे लोक त्या तलावाच्या जवळ येऊन पोचले. त्यां-पैकी एकाला झाडाखाली चरत असलेले उंट दिसले. पायाखालची जमीन सरकल्या-सारखा तो थरथर कापत म्हणाला—"हे वृकेश्वरी माते! तूच वांचव गे अंबे!" त्याने उंटांकडे बोट दाखवीत आपल्या साथी-दारांना सावध केले.

अस्वल जातीचे सर्व लोक जागच्याजागी थबकले. ते इतके घाबरून गेले की त्यांना काय करावे, हेच सुचेना. त्याच वेळी स्वर्णाचारीच्या सूचनेवरून समरबाहूच्या अनुयायांनी त्यांच्यावर हल्ला करून आपल्या भाल्यांनी दोघांना भोसकून खाली पाडले. ते दोघे "मेलो, वृकेश्वरी अंबे!" असे ओरडत खाली पडतांच अस्वल जातीच्या पाच सहा जणांनी आपली हत्यारे खाली जमिनीवर टाकली आणि "वांचवा! क्षमा करा, आम्हांला!" म्हणत लोटांगणच

त्यासारखे घाबरून ओरडत परत फिरले आणि त्या तलावाच्या बाजूला येत असले-ल्या जीवदत्त, खड्गवर्मा, समरबाहू आदि-कांना स्वर्णाचारीचे वर्णन करून त्याच्या-बरोबर आणखी लोक आल्याचे पण सांगितले.

"जंगलात डोंगरी किल्ला बांधत असलेला स्वर्णाचारी आपले काम सोडून इकडे कां यावा? आश्चर्यच आहे! त्या प्रदेशात त्यांच्यावर भयंकर संकट ओढवल्याने त्याला इकडे पळून यावे तर लागले नसेल?" जीवदत्त म्हणाला.

"स्वर्णाचारी स्वामिभक्त आहे! कदा-चित तो मला अस्वल जातीच्या लोकांच्या हातांतून सोडवून आणण्याच्या प्रयत्नात आला नसेल कशावरून?" समरबाहूने विचारले.

त्यांच्या वरील संभाषणाचा अर्थ न कळल्यामुळे गुरुभल्लूकाला वाटू लागले की त्याच्यावर दुसरेच एखादे संकट तर ओढवले नसेल? तो जीवदत्ताच्या पायां पडून म्हणाला—"तुम्ही मला प्राणदान देऊन अभयवचन दिले आहे, हे विसरू नका!"

ते ऐकून जीवदत्ताला हंसूच कोसळले. तो गुरु भल्लूकाच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाला—"गुरु भल्लूका! तुला आमची



किंवा समरबाहूच्या अनुयायांची भीती असण्याचे कारणच नाही. तू अगदी बेफिकीर रहा!"

"साक्षात् वृकेश्वरी अंबाच तुझ्या पाठीशी असतां तुला एवढे भिण्याचे कारणच काय रे?" खड्गवर्मा त्याची थट्टा उडवीत म्हणाला.

सर्व बोलत बोलत तलावाजवळ येऊन पोचले तेव्हां स्वर्णाचारी अस्वल जातीच्या लोकांना समरबाहूला त्यांनी कैद करून नेल्यावर काय काय झाले विचारीत असलेला दिसला. त्याला जीवदत्त, खड्ग-वर्मा, समरबाहू, गुरु भल्लूक आणि अस्वल जातीचे अनेक लोक दुरून येत असलेले



दिसले. त्याला इतका आनंद झाला की तो तत्क्षण त्या दिशेने धावत जाऊन म्हणाला–"समरबाहू महाराज! क्षत्रिय वीर हो! हा सेवक अभिवादन करीत आहे!"

जीवदत्त त्याच्या खांद्यावर हात ठेवून विचारू लागला–"काय रे स्वर्णाचारी! तू आपल्या राजाचा किल्ला त्याच्या नशिबा-वर सोडून वनविहार करायला निघाल्या-सारखा दिसतो आहेस?"

"क्षत्रिय वीर हो! तो किल्ला शत्रूने बळकावला आहे. तो वांचविण्यासाठी मी समरबाहूच्या अनुयायांच्या मदतीने शिक-स्तीचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नात आमच्या ... वीरगती मिळाली!"

स्वर्णाचारी दीर्घश्वास सोडीत म्हणाला.

"सर्वांनाच स्वर्गप्राप्ती झाली नसती आणि थोडेफार जरी या जगात राहले असते तर ते आपल्या भावी राजाला थोडी फार होईना मदत नक्कीच करू शकले असते. वीरगती न मिळाल्याने या मर्त्य-लोकांतच ज्यांना राहावे लागले असे दुर्दैवी कितीजण आहेत?" खड्गवर्माने विचारले.

स्वर्णाचारीने त्याच्याबरोबर तलावापर्यंत आलेल्या समरबाहूच्या अनुयायांकडे एकदां पाहून म्हटले–"माझ्यासह आम्ही सोळा-जण आहो आणि सोळा उंटसुद्धां वांचले आहेत."

स्वर्णाचारीने जंगलांत वाघासिंहांना धरण्यासाठी आणि शिकारीसाठी वीरपूरच्या प्राणिसंग्रहालयाचा अधिकारी आल्यापासून डोंगरी किल्ल्यावर चढून येण्यासाठी शत्रूने केलेले प्रयत्न आणि किल्ल्याच्या बचावा-साठी स्वर्णाचारीने केलेल्या युक्त्या सर्वांचे वर्णन करून सांगितले. शेवटी सर्व प्रयत्न अयशस्वी होऊन त्याला शत्रूची फळी फोडून कसे पळून यावे लागले याचे वर्णनदेखील त्याने सांगितले.

समरबाहूने सर्व वर्णन ऐकून दीर्घश्वास सोडला व म्हणाला–"म्हणजे किल्ल्या-बरोबर आपण कित्येक दिवसांपासून जम-

... झाले म्हणावयाचे. त्या वीरपूरच्या राजाला क्षमा करतां कामा नये, त्याला अद्दल घडेल असे काहीतरी केले पाहिजे. क्षत्रियवीर हो तुम्ही या कामी मला सर्व प्रकारे मदत केली पाहिजे. मी तुमच्या पायां पडून विनंती करीत आहे."

जीवदत्त समरबाहूकडे पाहून काही उत्तर देणार एवढ्यात खड्गवर्मा म्हणाला–"समरबाहू! आतां तू संकटात सापडला आहेस म्हणून आमच्या जवळ शरण मागतो आहेस. तुला अस्वल जातीच्या लोकांच्या हातांतून वांचविण्याचे वचन दिले होते, ते आम्ही पाळले. आतां आम्ही आपल्या कामासाठी विन्ध्य पर्वताच्या दिशेने जातो. तेथे आम्हांला एक दगडाचा रथ हलवायचा आहे. वाटेत कोणावर काही संकट आले तर त्याला होईल तेवढी मदत करावी या उदार बुद्धीने आम्ही करीत आलो. परंतु यापुढे आम्हांला तेदेखील सोडणे भाग आहे."

जीवदत्तने खड्गवर्माच्या खांद्यावर हात ठेवून तसे करणे बरोबर होणार नाही असे खुणावले आणि म्हणाला–"समरबाहू! तू राज्य मिळवून ते घालविले नाहीस! फक्त वीरपूरच्या राजावर सूड उगविण्यासाठी तू युद्ध करणार आहेस. त्यापेक्षां या जंगलात कोठेतरी सोयीची जागा पाहून तेथे शेती-



भाती करून सुखाने पुढले आयुष्य घालविणे जास्त शहाणपणाचे होईल की नाही? तूच विचार कर."

समरबाहूने त्याचे काहीच उत्तर दिले नाही, फक्त मान खाली करून उभा राहिला. स्वर्णाचारी थोडे साहस करून म्हणाला–"एक विनंती करावी म्हणतो, तुमची परवानगी मागतो त्यासाठी. समरबाहू आपल्या नावावरून चंद्रवंशातच जन्मला असावा असे मला वाटते. त्याने एखादे राज्य स्थापन करावे मी त्यांचा मंत्री म्हणून काम करावे असे मला फार फार वाटते. तुमची दोघांची मदत मिळाली तर तो डोंगरी किल्ला वीरपूरच्या राजाच्या हाता-

तून परत मिळवून छोटेसे राज्य स्थापन करता येईल. जवळपासचे रानटी जातीचे लोक खुषीने त्या राज्यात प्रजा म्हणून राहतील. त्यांच्या वस्त्या त्या राज्यात सामील होतील."

जीवदत्त खड्गवर्माकडे पहात म्हणाला–"खड्गवर्मा! एवढी मदत आपण करायला हरकत नाही असे वाटते मला." नंतर समरबाहू व स्वर्णाचारीला म्हणाला–"आपण प्रथम वीरपूरच्या सैनिकांना येथून हाकलून लावले पाहिजे. आपण कमी संख्येने असल्या कारणाने त्यांच्याशी समोरा-समोर युद्ध करणे आपल्याला शक्य नाही. म्हणून काहीतरी युक्तीच काढली पाहिजे. एक उपाय आहे. गुरु भल्लूकाच्या गुहेत ते सर्व शिरतील असा प्रयत्न केला पाहिजे."

"ते कसं काय? ते गुहेत कसे काय शिरतील?" स्वर्णाचारीने विचारले.

"त्यासाठी गुरु भल्लूकाच्या एका दोघां अनुयायांनी वीरपूरच्या सैनिकांजवळ जावे आणि आम्ही सर्व त्या गुहेत लपलो आहो अ[illegible] त्यांना सांगावे. ते आमचा वध करण्यासाठी गुहेत नक्कीच शिरणार. तेव्हां..." असे म्हणून जीवदत्त थांबला आणि गुरु भल्लूकाकडे वळून म्हणाला–"भल्लूका! तुझे शिष्य तुझ्यासाठी जीव देणारे आहेत की पुक्खा झोडणारे आणि गुरुद्रोह करणारे आहेत?"

तो प्रश्न ऐकून गुरु भल्लूक आवेशाने म्हणाला–"माझ्या शिष्यांची गुरु भक्ती तुम्ही स्वतःच्या डोळ्यांनीच पहा. मी आज्ञा केली तर ते विहिरीत उडी टाकतील. येथे दरी नाही की समुद्र नाही. म्हणून माझे शिष्य मी दाखवीन त्या झाडावर चढून खाली उडी मारतील." असे सांगून त्याने एका शिष्याला बोलावून झाडावर चढून खाली डोके करून उडी मारायला सांगितले.

जीवदत्त त्याला अडवणार एवढ्यात तो झाडावर चढलादेखील आणि "गुरु भल्लूक" म्हणून डोके खाली करून उडी मारायला तयार झाला. (पुढे चालू)



# देवाचा कोप

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि पुन्हां स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! देवांची निंदा केली, त्यांच्याकडे दुर्लक्ष केले तर अनेक संकटे ओढवतात. तुझ्या कष्टाचे असेच एखादे कारण तर नाही? देवाविषयी बेफिकीरपणा दाखविल्याने यौधेयश्रृंग नांवाच्या एका शूरवीर पुरुषाला अनेक यातना सहन कराव्या लागल्या होत्या. त्याची गोष्ट मी तुला सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार प्राचीन काळी सिंधप्रांतात अनेक रानटी जातीचे लोक रहात असत. ते जनावरांची शिकार करीत आणि रानातच रहात. शहरी जीवनाचा त्यांना गंधही



नव्हता. यौधेय नांवाच्या अशाच एका रानटी जातीत श्रृंग नांवाचा एक शूर, साहसी आणि हुशार तरुण होता. यौधेय जातीचे लोक त्याच्या शब्दावर आपले सर्वस्व अर्पण करण्यास सर्वदा तयार असत. त्यांना त्याच्या नायकत्वात पुष्कळ फायदादेखील झाला. म्हणूनच त्यांनी त्याला एकमताने आपला नायक निवडले होते.

श्रृंगने आपले तन, मन व धन आपल्या जातीच्या उद्धारासाठी खर्ची घालण्याचे ठरविले. यौधेयांच्या वस्तीपासून थोड्याच अंतरावर मायावी जातीची एक वस्ती होती. ते मंत्र तंत्र करून खूप पैसे मिळवीत. त्यांच्याकडे अपार संपत्ती होती. त्यांना [illegible] व शिल्पकला अवगत होती. परंतु युद्धकलेत ते मागसलेले होते. म्हणून ते किल्ले बांधून त्यात रहात. ते इतर जातीच्या लोकांच्या वाटेस कधीच जात नसत.

श्रृंगने आपल्या जातीच्या लोकांना शस्त्रास्त्र विद्या शिकवून मायावी जातीच्या लोकांच्या किल्ल्यावर हल्ले करायला सुरवात केली. मायावी लोकांनी आपली माया पसरवून आपल्या शत्रूला चकित करून सोडले. परंतु श्रृंगच्या चातुर्यासमोर आणि शौर्यासमोर त्यांचे मंत्रतंत्र आणि माया सर्व निरुपयोगी साबित झाले. श्रृंगने योधेयांचा पूर्णपराभव करून त्यांचे सर्व किल्ले स्वाधीन करून घेतले. त्याने त्यांच्या कारागिरांना आपले गुलाम करून घेतले आणि त्यांच्या मदतीने एक मोठे नगर वसविले. त्याने तेथे आपली राजधानी स्थापित करून एका नव्या राज्याचा पाया घातला.

पिढ्यान् पिढ्या रानटी जीवन घालविणाऱ्या यौधेयांना श्रृंगच्या कृपेने सभ्य जगात वावरण्याची संधी मिळाली. त्यांनी शेतकी आणि गोपालनाचा धंदा, विणकाम, शिल्पकला, गृहनिर्माण इत्यादी कला वर्षासहा महिन्यात शिकून घेतल्या. पुढे त्यांनी श्रृंगला आपला राजा म्हणून निवडले.



श्रृंगला [illegible] आपल्या प्रजे[illegible] उणीव भासत होती. त्याच्या जातीचा सभ्य जगात प्रवेश होऊ लागला होता तरी त्यांचे आचारविचार अजून जसेच्या तसेच होते. त्यांचा अंधविश्वास दूर व्हावा या हेतूने त्याने आपल्या प्रजेला राजवाड्याच्या चहूबाजूला असलेल्या पटांगणात एकत्र बोलाविले. सर्व लोक त्याला देवासारखा थोर मानीत म्हणून सर्व लोकांनी एकत्र जमल्यावर त्याचा जय जयकार केला. तो प्रजेला उद्देश्यून म्हणाला—"प्रजाजन हो! तुम्ही मला हे सांगा की, तुम्ही पहिल्या पेक्षा जास्त आनंदाने आणि समाधानाने रहात आहां, त्याचे कारण काय, या गोष्टीचा विचार तुम्ही कधी केला आहे का?"

"ही सर्व देवाची कृपा आहे." सर्व म्हणाले.

श्रृंगला ते उत्तर आवडले नाही. तो थोडा रागावल्या सारखा होऊन म्हणाला—"यांत देवाची कृपा किंवा अवकृपा कशी काय?" त्यानंतर तो जे काही म्हणाला ते कोणालाच ऐकू आले नाही. कारण विजेच्या कडकडाटासारखा आवाज होऊन धरणीकंप झाला. जमीन जागोजागी दुभंगली. जमिनीला भेगा पडल्या व पृथ्वीच्या गर्भातून माती, पाणी, साप, विंचू व इतर प्राणी बाहेर पडले. राजवाडा



ज्या डोंगराच्या पायथ्याशी होता तो डोंगरच डोलू लागला आणि विजेच्या कडकडाटासारखा आवाज करू लागला. क्षणार्धात त्याच्या शिखराला एक मोठे विवर पडले आणि त्यातून ज्वाळा बाहेर येत असलेल्या दिसल्या. धूर आणि राख सर्वत्र पसरली. श्रृंगची राजवस्त्रे राखेखाली झाकली गेली. एकच गोंधळ उडाला. स्वत:चा जीव वाचविण्यासाठी लोक वाट फुटेल तिकडे पळू लागले. राजधानीतली घरे व इमारती ढासळल्या आणि शेकडो लोक त्यांखाली सांपडून मरण पावले. ज्वालामुखी शांत झाला तेव्हां चारी बाजूला राख दिसत होती.



यौधेयांचा श्रृंगवर जो विश्वास होता तो उडाला. त्यांना वाटू लागले की देवाची निंदा केल्याचाच हा परिणाम आहे. देवाचा कोप झाला की सर्वनाश होणारच.

भूकंप झाल्याची आणि श्रृंगवर प्रजेचा जो विश्वास होता तो उडाल्याची गोष्ट उत्तरेकडील रावळ राजाला कळली. तो ससैन्य श्रृंगच्या राज्यावर चालून आला.

श्रृंगने प्रजेला शत्रूला तोंड देण्यासाठी तयार होण्यास सांगितले. परंतु प्रजेने त्याला ईश्वरद्रोही मानून त्याच्या आज्ञेची पर्वा केली नाही. तेव्हां श्रृंग आपल्या एका घोड्यावर बसून राज्याबाहेर पळून गेला. त्याची सर्व प्रजा त्याच्याविरुद्ध उलटली होती. म्हणून पळून जाण्याव्यतिरिक्त दुसरा उपायच नव्हता. मायावी, यवन वगैरे जातींची नजर चुकवून जाण्यासाठी त्याला पूर्व दिशेलाच पळून जावे लागले. मोठ्या कष्टाने त्याने वाळवंट ओलांडले. लागोपाठ तीन आठवडे पळत राहल्यावर तो इंद्रप्रस्थ राज्यात येऊन पोचला. अर्धपोटी किंवा उपाशीच राहून त्याने इतके दिवस काढले होते. म्हणून तो अगदी दमून भागून गेला होता.

राजधानीत त्याला एक सुंदर उद्यान दिसले. राजकन्या केशिनी त्या उद्यानात विहार करण्यासाठी त्यावेळी आलेली होती. म्हणून शिपायांनी श्रृंगला उद्यानात प्रवेश करू दिला नाही. तेव्हां तो उद्याना-बाहेरच्या एका झाडाच्या सावलीत झोपला.

थोड्या वेळाने राजकन्येची एक दासी सहज काही कारणाने उद्यानाबाहेर आली. तिने श्रृंगला पाहिले व त्याचे सौंदर्य पाहून ती राजकन्येकडे धावत गेली. तिने राज-कन्येला एक सुंदर पुरुष उद्यानाबाहेरच्या झाडाखाली झोपला असल्याचे सांगितले. केशिनीने त्या तरुणाला बोलावून घेतले आणि त्याची ती अवस्था पाहून त्याला खायला फळे व प्यायला थंड गार पेय मागवून दिले. श्रृंगला थोडी हुषारी वाटली. राजकन्येने त्याला तो कोठून व कशासाठी आला असल्याचे विचारले.

केशिनी सुंदर होतीच, त्यात तिने दाखविलेले सौजन्य व सहानुभूती पाहून त्याला थोडे बरे वाटले. तरी अत्यंत निराशेच्या स्वरात तो म्हणाला–"आतां मी एक सामान्य मनुष्य आहे. पूर्वी मी एक पराक्रमी आणि सामर्थ्यवान वीर होतो."

केशिनीने जास्त चवकशी केली नाही ती त्याला राजवाड्यात बोलावून घेऊन गेली आणि त्याच्याशीच विवाह करण्याचा तिचा विचार असल्याचे तिने आपल्या वडिलांना सांगितले.

"तो कोण कोठून आला, वगैरे गोष्टी माहीत नसतां तू त्याच्याशी लग्नाला तयार होणे शोभत नाही. तुला माळ घालायला एकाहून एक थोर व पराक्रमी राजकुमार तयार आहेत." तिच्या वडिलांनी तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

केशिनीने पुन्हां एकदां श्रृंगला भेटून विचारले–"तुम्ही कोणी राजकुमारच होता असे मला वाटत आहे. तुम्ही आपला पूर्व वृत्तांत सर्व सांगू शकलात तर तुमच्याशी विवाह करून द्यायला माझे बाबा तयार आहेत."

श्रृंग थोडा गोंधळल्यासारखा होऊन म्हणाला–"माझ्या दैवाने पाठ फिरविली. म्हणून मी या स्थितीत आहे." असे



सांगून त्याने आपला पूर्ववृत्तांत थोडक्यात सांगितला.

तो यौधेय श्रृंग असल्याचे कळल्यावर केशि-नीला आनंद झाला. कारण तिने त्याच्या शौर्यसाहसाच्या गोष्टी ऐकल्या होत्या. म्हणून ती म्हणाली–"तुम्ही आतां निश्चित व्हा. आपला विवाह झाल्यावर इंद्रप्रस्थाचे राज्य तुम्हांलाच मिळणार आहे. आतां भाग्य अनुकूल झाले आहे असेच समजा."

केशिनीने श्रृंगविषयी सर्व गोष्टी आपल्या वडिलांना जाऊन सांगितल्या. परंतु राजाला त्या गोष्टीचा आनंद झाला नाही. उलट तो या विचारात पडला की या दोघांचा विवाह कसा टाळता येईल आणि श्रृंगला



कसे दूर करता येईल? म्हणून त्याने आपल्या सर्व मंत्र्यांना मंत्रणागृहात जमण्यासाठी निरोप पाठविला.

केशिनी मंत्रणागृहात त्यापूर्वीच पडद्या-आड जाऊन बसली होती.

सुरवातीला राजाने श्रृंगशी केशिनीने विवाह करण्याचा हट्ट धरला असल्याचे सांगून तो राजवाड्यातच अतिथी म्हणून असल्याचे सांगितले व हा प्रश्न कसा सोड-वायाचा, हे विचारले.

तेव्हां प्रधान म्हणाला–"रावळ राजा एक शक्तिशाली राजा आहे. त्याच्याकडे श्रृंगला कैद करून जर आपण पाठविले तर त्याच्याशी कायमची मैत्री होऊ शकेल."

परंतु अतिथीला कैद करणे नीतीविरुद्ध आहे. त्याला राज्याबाहेर पाठविले पाहिजे. कारण रावळला श्रृंग आपल्या राजवाड्यात असल्याचे कळले तर तो नक्कीच स्वारी करील." एक मंत्री म्हणाला.

राजा म्हणाला–"परंतु केशिनी श्रृंगशी विवाह करण्याचा हट्ट धरून बसली आहे ना?"

ते ऐकून एक मंत्री म्हणाला–"महाराज! राजकन्येची इच्छा पुरी व्हायला एक उपाय आहे. आपणच शेजारच्या राजांची मदत घेऊन रावळच्या राज्यावर स्वारी करावी. त्याने अनेक शेजारी राजाना बराच त्रास दिला आहे. तेव्हां त्यांच्या मदतीने रावळचा पराभव करून आपण कीर्तिलाभ करून घ्यावा. म्हणजे एका दगडाने दोन पक्षी मारतां येतील,–रावळचा काटा दूर होईल आणि राजकन्येची इच्छा पूर्ण होण्यास मार्ग मोकळा होईल."

तो सल्ला सर्वांस पसंत पडला.

रावळचा शेवट व्हावा या गोष्टीस सर्व शेजारी राजे तयार झाले. एक मोठे सैन्य एका झेंड्याखाली येऊन उभे राहले. त्यात श्रृंग स्वतः एक सामान्य सैनिक म्हणून भर्ती झाला. त्यात यवन राजा रावळ याच्याशी श्रृंगचे द्वंद्वयुद्ध झाले. त्यात श्रृंग बराच जखमी झाला. परंतु त्याने रावळ राजाचा [illegible] गोष्ट सर्वांस पटवून दिली.

त्यानंतर श्रृंगने आपल्या जातीच्या लोकां-विषयी चवकशी करून पाहिली तेव्हां ते पुन्हां रानटी स्थितीतच राहू लागल्याचे त्याला आढळले. त्यांच्या पैकी काही यवनांच्या राज्यात आणि काही मायावी जातीच्या वस्तीत जाऊन गुलाम झाले असल्याचे ऐकून त्याला फार वाईट वाटले. त्याने पुन्हां आपल्या जातीचा उद्धार कर-ण्यासाठी कंबर बांधली. त्याने सर्व रानटी जातीच्या लोकांना एका छत्राखाली आणले. त्याने एक राजधानी स्थापन करून त्याच्या चहूंकडच्या एका मोठ्या प्रदेशावर आपले राज्य स्थापित केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, देवाची निंदा करणाऱ्या श्रृंगवर देवाचा अनुग्रह पुन्हां कसा काय झाला? त्याला सोडून देऊन पळून गेलेले लोक पुन्हां त्याच्या छत्राखाली कसे काय आले? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून-सुद्धा तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"श्रृंग देवाची निंदा करतो, असा अंधविश्वास त्याच्या जातीच्या लोकांच्या मनात होता. आपल्या प्रजेच्या मनात दृढमूळ झालेला अंधविश्वास दूर करण्यासाठीच श्रृंगने सर्वांना राज-वाड्यासमोरच्या पटांगणांत एकत्र केले होते. परंतु त्याच वेळी ज्वालामुखी फुटला. तो देवाचा कोप आहे असे अंधविश्वास असलेल्या रानटी यौधेयांना वाटले. म्हणून ते त्याच्या विरुद्ध उलटले. परंतु श्रृंगने आपल्या सामर्थ्याने पुन्हां राज्य स्थापन केले तेव्हां यौधेयांना अंधविश्वासाने वाटले की या मुळेच देवांचा कोप नाहीसा झाला असावा."

राजाचे मौन अशातऱ्हेने भंग होताच वेताळ पुन्हां प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



    



# बायकोने दिलेला मंत्र

कोटीनगर नांवाच्या गावी एक लोभी भटजी रहात असत. त्यांचे नाव सोनभट होते. त्यांचा भिक्षुकीचा धंदा छान चाले. तरी देखील सोनभटजी फार लोभी होते. जवळपासच्या पंचक्रोशीत सर्व लोकांकडचे चूडाकर्म, विवाहापासून तों अग्निसंस्कारापर्यंत सर्व संस्कार सोन भटजींच्या हातूनच होत. सोनभटजी दक्षिणा घेण्यात गरीब श्रीमंत हा भेद मानीत नसत. सर्वांकडून भरपूर दक्षिणा घेत. त्यात कोणाची गय करीत नसत.

एकदां त्यांच्या गावात आणि जवळपासच्या प्रदेशांत कोणता तरी स्पर्शजन्य रोग पसरला आणि माणसे माशासारखी मरू लागली. सोनभटजींना तेच सुगीचे दिवस लाभले. अग्निसंस्कार करायला सोनभटाशिवाय कोणी दुसरा भट नव्हता. म्हणून सोनभट सांगतील ती दक्षिणा आणि ते सांगतील त्या तऱ्हेने अग्निसंस्कार होऊ लागले. सोनभटजींनी स्पर्शजन्य रोगाने मरणाऱ्याला गोदानाशिवाय मुक्ती नाही असे सांगितले. लोकांनी नाइलाजाने गोदान करण्याचे कबूल केले आणि भाकड किंवा वांझ जी गाय मिळेल ती विकत घेऊन गोदान केले. अशातऱ्हेने सोनभटजींकडे भाकड गाईंचे एक रेवड, एक फार मोठे गोधन जमा झाले.

आतां या गाईंच्या मोठ्या कळपाच्या चाऱ्या निवाऱ्याची सोनभटजींना फिकीर करावी लागू लागली. एक मोठा गोठा बांधावा लागला. नंतर दररोज त्यांना चरायला न्यावे लागे. त्यात दुष्काळाचे दिवस चालू होते. चारा विकत घ्यायला पायली भरून पैसे मोजावे लागू लागले. सोन भटजींची अर्धीअधिक मिळकत या गोरक्षणात खर्च झाली. परंतु करणार [illegible] पाप लागण्याची भीती होती. स्वतःच्या मुलांना कोणाला गाईंना जंगलात चरायला घेऊन जा म्हणून सांगावे तर त्याची त्यांना संवय नाही. उन्हांत आजारी पडतील अशी भीति वाटली. शेवटी स्वतःच सोनभटजींना गुराख्याचे काम करावे लागले. त्यामुळे त्यांच्या भिक्षुकीच्या धंद्यात व्यत्यय येऊ लागला. भाकड आणि वांझ गाईंना पोसण्यात खर्च होऊ लागला आणि भिक्षुकीच्या धंद्यात होणारी मिळकत पण थांबली. स्वतःची व कुटुंबाची उपासमार होण्याची भीती वाटू लागली.

कोणी गुराखी नेमावा तर त्याचा पगार आणि तीन वेळ त्याला पुरवा खावा लागणार. ती गोष्ट परवडणारी नव्हती. बायकोने त्याला तीन वेळा वाढण्यास साफ नकार दिला. तरी शेवटी गुराखी नेमावाच लागला आणि सोनभटजींनाच सैंपाक करावा लागू लागला. आतां सोनभटजी भिक्षुकी सोडून सैंपाक्याचे व गुराख्याचे काम करू लागले.

परंतु हा सर्व खटाटोप व्यर्थच गेला. वांझ गाईवर जो खर्च झाला तो सर्व पाण्यात गेला. सोनभटजी आपल्या फुटक्या नशिबाला दोष देऊं लागले. "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः" हे आर्ष वचन आठवले. "देवा! मला ही काय बुद्धी दिलीस, गोदान मागण्याची? माझ्या डोक्यावर हा संकटांचा डोंगर कोसळला



आहे." सोनभटजी देवाला दोष देऊ लागले. परंतु त्यांच्या डोक्यात हा विचार आला नाही की, या सर्व संकटांचे मूळ कारण त्यांचा स्वतःचा लोभीपणा होता आणि त्यांनी स्वतः होऊन हे दुखणे विकत घेतले होते.

शेवटी त्यांच्या बायकोला नवऱ्याचे दुःख पाहवले नाही. तिने एक सल्ला दिला आणि नवऱ्याला संकटातून मुक्त केले. ती हुशार होती.

ती नवऱ्याला म्हणाली—"मी सांगते तसे करता का? तुमच्या सर्व हालअपेष्टा एका क्षणात दूर होतील. पुष्कळदां साध्या गोष्टी सुद्धां माणसाला सुचत नाहीत आणि विनाकारण कष्ट सोसावे लागतात. मी सांगते तो उपाय पटला नाही तर दुसरा विचार करा."

सोनभटजींना बुडत्याला आधार मिळाल्यासारखे वाटले. म्हणाले—"तू सांगशील ते करायला मी तयार आहे."

"हे पहा, या वांझ गायी ज्या किमतीला, जो कोणी विकत घेईल त्याला विकून टाका. [illegible] करणार? यांना विकत घेणारे सुद्धा थोडे थोडके लोक नाहीत. या गायी विकून जे पैसे मिळतील त्या पैशांनी चांगल्या दुभत्या चार गायी विकत घ्या. कोणी गोदान करायला आला की सांगा की गाय विकत घ्यायला जी रक्कम खर्च होणार ती रक्कम त्याने तुम्हांला द्यावी व तुम्ही चांगली दुभती गाय घेऊन येऊं शकाल. आपल्याच गायींपैकी एक गाय दर वेळी न्यायची. अशा तऱ्हेने गोदानाच्या नांवे पुष्कळ पैसे मिळतील आणि दुभत्या गाईच्या चाऱ्याची फिकीर राहणार नाही आणि सर्वच प्रश्न सुटतील." बायकोने सल्ला दिला.

तो सल्ला म्हणजे सोनभटजींना गायत्री मंत्रच वाटला. त्यांनी सर्व भाकड आणि वांझ गायी खाटकाला विकून टाकल्या आणि चांगल्या दुभत्या गायी विकत घेऊन भिक्षुकीचा बसलेला धंदा पुन्हां उभा केला.

त्यांचे पुढील आयुष्य सुखाचे गेले.





# देवाहून थोर माणूस

रत्नाकर नावाच्या देशात मणिकंठ नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या कारकोर्दीत राज्याचा विस्तार झाला. म्हणून राजाने दूरवर पसरलेल्या आपल्या राज्याची उत्तम व्यवस्था कशी होऊ शकेल, याविषयीं मंत्र्यांचा सल्ला घेतला. तेव्हां मंत्र्यांनी राज्याचे चार भाग करून प्रत्येकावर एक सुभेदार नेमावा असे सुचविले.

त्याप्रमाणे राजाने राज्याचे चार भाग करून प्रत्येकावर एका इमानदार आणि योग्य सुभेदाराची नेमणूक केली. चारही सुभेदार दर महिन्याच्या शेवटी आपापल्या अधिकारातील प्रजेच्या सुख सोयीसाठी त्यांनी काय काय केले याविषयी एक अहवाल नियमितपणे राजाकडे पाठवीत.

प्रत्येक प्रतिनिधी स्वामिभक्त व प्रजावत्सल होता. परंतु याच कारणास्तव नवीन प्रश्न उभे राहले. प्रत्येकाचा असा प्रयत्न असे की दुसऱ्या प्रदेशांपेक्षा त्यांच्या अधिकारातील प्रदेशाने आर्थिक दृष्टया जास्त प्रगती करावी व त्यांच्या अधिकारातील प्रजा जास्त सुखी आणि समृद्ध व्हावी. प्रजेच्या मनात उत्साह वाढावा म्हणून त्यांनी त्यांच्या मनात प्रादेशिक भक्ती व प्रेम वाढविण्याचा प्रयत्न केला. सर्व राज्यभर एकच भाषा बोलणारी, एकच जातीची किंवा धर्मावलंबी प्रजा होती असे नाही. लोकतंत्र पद्धतीची राजवट त्यांच्यात होती त्या वेळी त्यांची आपसात पुष्कळ भांडणे होत होती. परंतु त्यांचा प्रदेश एक छत्रछायेखाली आल्यापासून त्यांच्यात ऐक्य निर्माण झाले होते. त्यानंतर जेव्हां प्रादेशिक राजप्रतिनिधींचा, म्हणजे सुभेदारांचा अंमल सुरू झाला त्या वेळी प्रादेशिक विचाराचे विष पेरले गेले आणि परस्पर स्पर्धेमुळे प्रादेशिक वैषम्य वाढत गेले.



पुढे एका प्रदेशात ज्या वस्तू जास्त प्रमाणात उत्पन्न होत त्या इतर प्रदेशात पाठविण्याचे राजप्रतिनिधींनी बंद करविले. राज्याच्या उत्तरेकडील प्रदेशात कापूस खूप पिके, परंतु विणकर दक्षिणेकडील प्रदेशात जास्त रहात. पूर्वी जेव्हां राज्याचे भाग पाडलेले नव्हते. तेव्हां उत्तरेकडून कापूस येई आणि विणकराना खूप काम मिळे. परंतु उत्तरेकडच्या राजप्रतिनिधीने दक्षिणेकडील प्रदेशात कापूस पाठवायचे बंद केल्यापासून विणकरांना पुरेसे काम मिळेनासे झाले. उत्तरेकडील राजप्रतिनिधीने आपल्या प्रदेशातील प्रजेला विणकामाचा धंदा शिकून घ्यायला सांगितले. तिकडे दक्षिणेकडील राजप्रतिनिधीने कापूस उत्पन्न व्हावा यासाठी त्याची लागवड करायला आज्ञा काढली. अशातऱ्हेने दोन्ही प्रदेशातील प्रजेला त्यांना ज्या कामाची संवय व माहिती नव्हती ती कामे करावी लागू लागली व कापड कमी दर्जाचे उत्पन्न होऊ लागले.

तीच गोष्ट लोखंडी व पोलादी मालाच्या धंद्याची झाली. पूर्वेकडील भागात कच्चे लोखंड—म्हणजे लोखंड असलेल्या दगडामातीच्या खाणी पुष्कळ होत्या. पश्चिमेकडील प्रदेशात लोखंडी वस्तू तयार करणारे कुशल कारागीर होते. पूर्वेकडील राजप्रतिनिधीने आपल्याकडील माल पश्चिमेकडील प्रदेशात पाठवायला बंदी घातली व लोखंडी व पोलादी माल तयार करण्याचा धंदा शिकून घ्यायला हुकूम काढला. म्हणून पश्चिमेकडील राजप्रतिनिधीला परवडत नसूनही जास्त किंमत देऊन लोखंड असलेली माती मागवावी लागू लागली.

राजाला वरील सर्व गोष्टींचा अहवाल दरमहा मिळत असे. सुरवातीला राजाला वाटू लागले की आपापल्या प्रदेशाच्या उन्नतीसाठी राजप्रतिनिधी खूप प्रयत्न करीत आहेत. त्याचबरोबर त्याला हेदेखील कळत होते की सर्व राज्याची भरभराट व्हायला यामुळे मोठी अडचण उत्पन्न होणार आहे. [illegible] सुधारावी हे त्याला कळेना.

राजप्रतिनिधींची नेमणूक होऊन पांच वर्षे लोटली होती. परंतु देशाची आर्थिक स्थिती अपेक्षेप्रमाणे सुधारण्याऐवजी खालावत गेलेली स्पष्टपणे दिसत होती. देशावर आर्थिक संकट येते की काय अशी भीती वाटू लागली होती.

सर्व गोष्टींची चवकशी करून देशाची आर्थिक स्थिती सुधारण्याचा मार्ग निघावा यासाठी राजाने हुशार व माहितगार व्यापाऱ्यांच्या आणि कारखानदारांच्या बैठकी बोलाविल्या. व्यापाऱ्यांच्या बैठकीत व्यापाराची भरभराट होत असल्याबद्दल व्यापाऱ्यांनी राजाचे अभिनंदन केले. त्याच प्रमाणे कारखानदारांनी उद्योग धंदे प्रगती करीत असल्याबद्दल राजाच्या उत्तम राज्यकारभाराची वाखाणणी केली. व्यापाऱ्यांच्या आणि कारखानदारांच्या सभेत काही बदल करू नये असा निर्णय घेण्यात आला. राजाला या गोष्टीचे आश्चर्य वाटले. ही उन्नती प्रजेच्या हिताची आहे की अहिताची हे कोणी सांगितले नाही.

शेवटी राजाने अर्थशास्त्र आणि राजनिति दोन्हींची माहिती असलेल्या विद्वानांची सभा बोलाविली. या सभेत शशिभूषण नांवाच्या विद्वानाने आपल्या अतुल्य प्रतिभेचा



परिचय देऊन राजाकडून मोठे पारितोषिक संपादन केले.

पारितोषिक वांटते वेळी राजाने शशिभूषण यास विचारले—"पंडितप्रवर! आपणांस मी एका प्रश्नासंबंधी सल्ला विचारावा म्हणतो. आपण नक्कीच समाधानकारक उत्तर देऊ शकाल याची मला खात्री आहे."

शशिभूषण अत्यंत नम्रपणे म्हणाला—"विचारावा महाराज! मी यथाशक्ती उत्तर देण्याचा यत्न करीन."

"या जगाची सृष्टी देवाने केली म्हणून आपण देवाला सर्वश्रेष्ठ मानतो. परंतु देवाहून थोर मनुष्य होऊ शकतो का?" राजाने विचारले.

"कां नाही महाराज? देवाहून थोर मानव आहे!" शशिभूषण म्हणाला.

राजाने आश्चर्यचकित होऊन विचारले– "परंतु ते कसे हे सिद्ध करू शकाल का?"

शशिभूषण नम्रपणे म्हणाला–"मी स्वत:च्या अनुभवाने ते उत्तर देतो. देवाने माझ्या कपाळावर पांडित्य लिहून मला या जगात पाठविले. म्हणून मी उत्तरेकडील प्रदेशात शिक्षक म्हणून काम केले. परंतु मी पूर्वीकडील प्रदेशाचा रहिवाशी असल्या-कारणाने मला नोकरीवरून काढण्यात आले. म्हणून माझी विद्वत्ता निकामी ठरली आणि आतां मी शेतीची कामे करू लागलो आहे. देवाने माझ्या कपाळावर जे लिहिले होते ते माणसाने बदलून दाखविले. आतां आपणच सांगावे की देव थोर की माणूस?"

शशिभूषण म्हणाला त्याचा खोल अर्थ राजाच्या लक्षात आला. राज्याचे चार भाग पाडल्यानंतर राज्याची खरी प्रगती किंवा विकास होण्याऐवजी अवनती झाल्याचे राजाला दिसतच होते. आर्थिक प्रगती [illegible] परंतु प्रजेचे हाल होत आहेत एवढे मात्र प्रत्येकाच्या लक्षात येत होते.

म्हणून राजाने पुन्हां मंत्रिमंडळाची सभा बोलावून राज्याचे भाग पाडल्यानंतर प्रजा सुखी झाली की दु:खी याविषयी विचार करून पुढील व्यवस्थेविषयी मंत्र्यांचा सल्ला विचारला. तेव्हां मंत्रिमंडळाने असा सल्ला दिला की राज्याचे भाग करण्यात काही चुकले नाही, फक्त प्रतिनिधींची नेमणूक करतांना थोडी चूक झाली. जो प्रतिनिधी ज्या प्रदेशाचा निवासी आहे त्याची नेमणूक त्या प्रदेशात न करतां इतर प्रदेशांत करावी. म्हणजे प्रादेशिक भावना बोकाळणार नाही आणि देशाची आर्थिक घडी पुन्हां व्यवस्थित होईल. परस्पर स्पर्धा कमी होईल व सर्व देश आपलाच आहे ही भावना वाढेल."

राजाने त्या सल्लयाप्रमाणे व्यवस्था केली आणि उन्नतीच्या मार्गावर देशाची वाटचाल सुरू झाली.





# सात हंडे

एका गावात एक लहान व्यापारी होता. त्याला मोठा व्यापारी होण्याची फार महत्वाकांक्षा होती. परंतु त्याला ते साधले नाही. कारण पैसे मिळविण्याचा धंदा सर्वांनाच साधतो असे नाही. कारण खऱ्याचे खोटे आणि खोट्याचे खरे करणे हेसुद्धा एक कसबच आहे.

एके दिवशी तो माल विकत घ्यायला शहराच्या पेठेत चालला होता. दुपार झाली, ऊन फार कडक पडले होते. म्हणून तो एका झाडाखाली विश्रांती घेत पडून पैसे कसे मिळवितां येतील या गोष्टीचा विचार करू लागला. इतक्यात त्याला झाडा-वरून कोणी बोलल्याचा भास झाला–"तुला सात हंडे सोने पाहिजे का?"

व्यापाऱ्याने मान वर करून पाहिले. कोणी दिसले नाही. तरी त्याने उत्तर दिले– "तुम्ही कोण मला माहीत नाही. तुम्ही अनुग्रह स्वत: होऊन करतां आहां तर मी नकार कसा देऊ शकेन? मला सात हंडे सोने अवश्य द्यावे."

त्याचे उत्तर झाडावरून आले–"तू घरी जाऊन पहा, सात हंडे भरून सोने तुझ्याच घरात आहे."

व्यापारी विचार करायला देखील थांबला नाही. धावत सरळ घरी गेला. खरोखरच सात हंडे त्याला घरात दिसले. परंतु फक्त सहाच हंडे तोंडापर्यंत सोन्याच्या नाण्यांनी भरले होते, सातवा हंडा अर्धाच होता. व्यापाऱ्याला आश्चर्य व वाईट वाटले की सातवा हंडा अर्धाच भरलेला कां? भरलेले सहा आहेत त्याचा आनंद त्याला झालाच नाही. फक्त सातव्या रिकाम्या हंड्यावरच त्याची नजर खिळून राहिली. तो भरला तरच व आपल्याला बेफिकीर होता येईल असे त्याला वाटले.

त्याने त्यासाठी बायकोच्या अंगावर जेवढे सोने होते ते त्या हंड्यात टाकले. परंतु तेवढ्याने हंडा भरला नाही.

त्याच गावात एक श्रीमंत शेतकरी रहात असे. तो त्याचा बालमित्र होता. म्हणून त्याने त्याच्याकडे जाऊन विनंती केली—"मी संकटांत सांपडलो आहे. मला कर्जाऊ पैसे पाहिजे आहेत." असे सांगून त्याने बालमित्राकडून पैसे कर्जाऊ घेऊन त्याचे सोने विकत घेतले आणि ते त्या हंड्यात टाकले. तरी हंडा भरला नाही.

तेव्हां त्याने अर्धपोटी जेवून काही दिवस काढले. नंतर तो भीक मागू लागला.

एकदां भीक मागायला जात असतां त्याला त्याचा तो बालमित्र भेटला. व्यापारी अगदी अशक्त झाला होता व त्याच्या अंगावरचे कपडे जुने, मळके व फाटके होते. ते पाहून बालमित्राला आश्चर्य वाटले. त्याला आपल्या मित्राची अशी दशा कां व्हावी, कळेना. त्याने त्याला जवळ बोला-[illegible] "कायरे, तू सात [illegible] लोभाला बळी पडलास की काय ?"

व्यापाऱ्याने चकित होऊन त्याला विचारले—"मित्रा! तुला ते कसे काय कळले ?"

"मी त्या हंड्यांच्या लोभाला बळी पडलेल्या कित्येकांना पाहिले आहे! त्यांच्या पैकी प्रत्येक जण भिकेला लागला. तू त्या हंड्यांचा नाद सोड!" त्याच्या बालमित्राने सल्ला दिला.

व्यापारी विचार करायला एक क्षणभरही थांबला नाही. त्या झाडाखाली जाऊन मोठ्याने ओरडून म्हणाला—"देवा! आपले ते सात हंडे परत घे, मला त्यांची गरज नाही."

त्यानंतर त्याने घरी जाऊन पाहिले, सातही हंडे अदृश्य झाले होते. त्याने आपल्या बायकोचे दागिने आणि कर्जाऊ रक्कम घेऊन विकत आणलेले सोनेदेखील सातव्या हंड्याबरोबर अदृश्य झाले. बिचारा व्यर्थ लोभाला बळी पडला.





# आचार्यपद

एके काळी काशी हे विद्येचे आगर होते. तेथे विद्याभ्यासासाठी देशाच्या कानाकोपऱ्यांतून विद्यार्थी येत. देश-भर काशीच्या विद्यापीठाचा फार मान होता. राजा माधववर्मा राज्य करीत असतां निगमशर्मा नावाचे एक थोर पंडित त्या विद्यापीठाचे आचार्य होते. षड्शास्त्रांचा खोल अभ्यास करून त्यांनी त्यांत पारंगत म्हणून प्रसिद्धी मिळविली होती. तरी 'विद्या ददाति विनयम्' या सुभाषिताप्रमाणे ते खरो-खरच स्वभावाने अत्यंत नम्र होते. त्यांना कधीच आपल्या विद्वत्तेचा गर्व झाला नाही.

त्यांच्याकडे आलेल्या शिष्यवर्गात राज-शेखर नांवाचा एक कुशाग्रबुद्धी विद्यार्थी होता. त्याच्या मनात विद्यापिठाचे आचार्य पद मिळविण्याची महत्वाकांक्षा होती. तो फार कमी बोले. परंतु अभ्यासात तो सदा पहिल्या नंबरावर असे.

त्याचा विद्याभ्यास पूर्ण होत आला तसतशी त्याची महत्वाकांक्षा वाढत गेली आणि आचार्यपद संपादन करण्याचा उतावीळपणा त्याच्या मनात वाढला. ते पद मिळविण्यासाठी काय वाटेल ते करावे लागले तरी करण्याचा त्याने मनाशी निश्चयच करून टाकला.

विद्याभ्यास पुरा करून इतर सहपाठी आपापल्या घरी निघून गेले. परंतु राजशेखर देशाटनास निघाला. त्याच्या मनांत इतर विद्या शिकून आपली योग्यता वाढविण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. त्याप्रमाणे बरेच दिवस हिंडत राहून विद्वानांच्या संगतीत राहिल्यावर



त्याला तो जाडा विद्वान झाल्याची खात्री पटली आणि राजदरबारात हिंडून तो शास्त्रार्थ करू लागला. त्याने थोर विद्वानांचा पराभव करून नावलौकिक मिळविला.

आपण आचार्यपद मिळविण्यास योग्य झालो आहो, असे वाटल्यावर तो काशीच्या राजाच्या दरबारात आला आणि राजाला भेटून त्याने दरबारी पंडितांना शास्त्रार्थ करण्यास आव्हान केले.

राजाने आपल्या दरबारातील विद्वानांशी शास्त्रार्थ करण्यास त्याला परवानगी देऊन दरबार बोलाविला. दरबारात त्याने सर्व थोर पंडितांना जिंकले. त्याचा गर्व कळ- पोचला. तो राजा माधववर्मा याला म्हणाला—"महाराज! माझ्या विद्वत्तेची खात्री आपणांस पटली असेल. तेव्हां विद्यापीठाचे आचार्यपद मला देण्याची कृपा करावी."

राजाने निगमशर्मांना बोलाविले आणि राजशेखरने प्रगट केलेली इच्छा त्यांना कळ- विली. निगमशर्मा राजशेखरला म्हणाले— "बाळ! तू सर्व दरबारी पंडितांना जिंकून आचार्यपद मिळावे म्हणून इच्छा दर्शविली आहेस हे ऐकून मला आनंद होत आहे. परंतु मी तुझ्या वाटेवर आडवा उभा आहे. तू शास्त्रार्थ करून माझा कांटा दूर कर आणि हे आचार्यपद सुशोभित कर."

दुसऱ्या दिवशी दरबारात निगमशर्मा आणि राजशेखर दोघांमध्ये शास्त्रार्थ होण्याचे ठरले. सुरवातीला राजशेखर शास्त्रार्थात जिंकणार असेच सर्वांना वाटले. परंतु हळू हळू राजशेखरची तेजस्विता फिक्की पडू लागली. शेवटी निगमशर्माने विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देणे त्याला अशक्य वाटू लागले. दरबारी विद्वानांनी व राजाने निगमशर्माचे अभिनंदन केले. राजशेखरची मान खाली झाली. याच दरबारात त्याने अजिक्यपद मिळविले होते. परंतु निगमशर्मासमोर त्याला हार

निघून गेला.

नंतर तो सरळ हिमालय पर्वतात भ्रमण करीत एका एकांत स्थानी सरस्वतीची आराधना करू लागला. देवीने त्याला सकल विद्या व ज्ञान देऊन 'यशस्वी हो' असा आशीर्वाद दिला.

त्यानंतर राजशेखरच्या स्वभावात अगदी निराळ्या प्रकारचा बदल झाला. तो सरळ काशीला आला आणि निगम- शर्माचे पाय धरून त्यांची क्षमा मागीत म्हणाला—"आचार्य! मी केवळ अज्ञानाने आपली बरोबरी करण्यास निघालो होतो. आतां माझे डोळे उघडले आहेत. मला क्षमा करावी. फुलां फळांच्या भाराने झाडे जशी लवतात तसे विद्वानाने नम्र असावे, हा ज्ञानबोध मला आतां झाला आहे."

"बाळा राजशेखर! महत्वाकांक्षा असल्याशिवाय मनुष्य उन्नती करू शकत नाही. तू विद्याध्ययन करीत असतांना आचार्यपद मिळविण्याची महत्वाकांक्षा मनात बाळगलीस म्हणूनच तू विद्वान झालास. महत्वाकांक्षा असावी, परंतु अहंकार असू नये. तो विद्येचा नाश करतो. विद्या आणि विनय एकत्र निवास करू लागले म्हणजेच खरे यश लाभते."

दुसऱ्या दिवशी निगमशर्मा राजशेखरला घेऊन राजाच्या दर्शनास गेले आणि म्हणाले— "महाराज! आतां वार्धक्यकाळी आपली सेवा करणे मला जड जाईल की काय असे वाटू लागले आहे. वानप्रस्थाश्रमात प्रवेश करावा म्हणतो. महाराजांची अनुज्ञा घ्यायला आलो आहे. परंतु आचार्यपद रिकामे राहणार नाही. त्या पदास सर्व प्रकारे राजशेखर योग्य आहे. त्याला ते पद देण्यात यावे."

राजाने निगमशर्मांची विनंती मान्य करून राजशेखरला आचार्यपदावर नेमले.





# चतुर सोमनाथ

सप्तगडचा राजकुमार स्वर्णकुमार हा राजोद्यानात हिंडत खेळत असतां त्याला भोंवरा चावला. राजाराणीला फार उशिरां मुलगा झाला होता. म्हणून स्वर्णकुमार लाडात वाढलेला होता. त्या वेळी राजकुमाराचे वय फक्त आठ वर्षांचे होते. क्षणभरदेखील तो डोळ्याआड झाला तर आईवडिलांना चैन पडत नसे. त्या दिवशी राजकुमार राजोद्यानात खेळायला गेला होता, तेव्हां काळा भोंवरा त्याला चावला. भोंवरा चावला होता त्या जागी कळा येत होत्या, म्हणून मुलगा कळवळून रडत होता. नोकर त्याला राजवाडयात घेऊन गेले. दरबारी वैद्यांनी औषधपाणी केले आणि थोडया वेळाने राजकुमाराला आराम वाटला. त्या दिवशी रात्री राणीला एक फार वाईट स्वप्न पडले. राणीला एक देव स्वप्नात दिसला. म्हणाला—"राणी! तू आपल्या मुलाविषयी जास्त सावध रहा. त्याला जो भोंवरा चावला तो भोंवरा नाही. त्या रूपात एक शाप मिळालेली दासी आहे. तिने जो चावा घेतला आहे तो विषारी आहे. मुलगा दररोज थोडाथोडा खंगत जाईल. पाहिजे तर दररोज वजन करून पहा. एक एक तोळा वजन दररोज कमी होत जाईल.

"हे देव! त्याला वांचवायला काही औषध किंवा उपाय असेल तर सांगावा!" राणी म्हणाली.

परंतु त्याचे उत्तर देण्यापूर्वीच देव अंतर्धान पावला. राणी दचकून अंथरुणात उठून बसली. तिने राजाला जागा करून तिला पडलेले स्वप्न वर्णन करून सांगितले.

राजा म्हणाला—"राणी! अशा स्वप्नांवर विश्वास ठेवून कसे चालेल? स्वप्न ते स्वप्नच! स्वप्न कधी खरे झाले आहे का, विचार करून सांग."

परंतु रा[illegible]ला ते पट[illegible]ही. तिने दुसऱ्या दिवशी मुलाचे वजन करून पाहिले. त्यानंतर पुन्हां दोन दिवसांनी वजन करून पाहिले. वजन दोन तोळे घटले होते. त्या दिवसापासून राजकुमाराचे वजन दररोज एकएक तोळा कमी होऊं लागले. स्वप्न खरे ठरले. राजा निरुत्तर झाला.

ते कळल्यावर सारा राजवाडाच हादरल्यासारखा झाला. दरबारी आणि प्रजा सर्व काळजी करू लागले. राजा व राणी दोघांची तर झोपच उडाली. अनेक प्रकारची चिकित्सा करून पाहण्यात आली. व्रते व दाने झाली. देवाला नवस सुरू झाले. पूजा आणि अभिषेकांचा सपाटा प्रारंभ झाला. परंतु मुलाला थोडादेखील आराम पडला नाही.

त्या देशाच्या मध्यवर्ती प्रदेशात एक जंगल होते. त्या जंगलात चंडपाणी नामक एक मांत्रिक रहात असे. तो भूतपिशाच बाधा दूर करतो अशी प्रसिद्धी होती. राजदूतांनी जाऊन त्याला राजकुमाराच्या आजाराचे कारण सांगितले व इलाज करायला राजाच्या वतीने विनंती केली. त्याला राजवाडयात आणण्यासाठी विशेष व्यवस्था करण्यात आली.

चंडपाणीने तो शनिवारी मध्यरात्री येऊ शकेल असे सांगून पाठविले. त्याने असाही



निरोप कळविला की, एक हजार लोकांना पंचपक्वान्नाची मेजवानी देण्याची तयारी ठेवण्यात यावी. त्यावेळी राजधानीत शुकशुकाट असावा. एकाही नागरिकाने घरा बाहेर येऊ नये किंवा कोणी घरात दिवा लावू नये.

ठरल्या वेळी चंडपाणी एका पालखीत बसून आला. ती पालखी घेऊन सहा अस्थिरपंजर देह असलेले लोक येत होते. पालखीमागून शेकडो अस्थिरपंजरवत् देह असलेले पायी येत होते. राजवाडयाच्या पटांगणात त्यांना रात्री पंचपक्वान्नांची मेजवानी देण्यात आली. सर्वांनी पोट भरून खाऊन घेतले आणि उजाडेपर्यंत आनंदाने



तेथेच नाचत खेळत राहले. उजाडण्याच्या सुमारास रिकामी पालखी घेऊन परत निघून गेले.

त्यानंतर चंडपाणीने राजवाड्यात प्रवेश करून विचारले–"महाराज कोठे आहेत? मी आलो आहे, असे त्यांना कळवा!"

राजाने परिवारासह सामोरा होऊन चंडपाणीचा यथाप्रकारे स्वागत सत्कार केला आणि म्हणाला–"मी आपल्याच स्वागतासाठी प्रतीक्षा करीत होतो. महात्मन् यावे, आत यावे!"

"तुझा मुलगा कोठे आहे? पहिल्याने मी त्याला पाहणार–तपासणार आहे." चंडपाणी म्हणाला.

चंडपाणीला राजकुमाराच्या खोलीत नेण्यात आले. चंडपाणी तेथील हवेचा वास घेतल्यासारखे करून म्हणाला–"मला वाटले होते तेच खरे निघाले तर. त्या राक्षसिणीने राजकुमाराच्या शरिरात प्रवेश केला आहे. परंतु मी तिला तसा सोडणार नाही. मी मारण होम करणार आहे." नंतर राजाकडे वळून म्हणाला–"तुम्ही त्या पिशाचिनीची कथा ऐकली पाहिजे. ऐका, सांगतो."

चंडपाणी गोष्ट सांगू लागला–"प्राचीन काळी सिद्धवनात एक राक्षसीण रहात असे. तिला ह्रीती नावाची मुलगी होती. त्यावेळी मी त्या जंगलात समाधिस्थ होतो. ह्रीतीने माझी समाधी भंग करण्याचा यत्न केला. मी तिला कितीदां तरी स्वतःचा बचाव करायला सांगितले. परंतु तिने माझी पर्वा केली नाही आणि माझी समाधी भंग करण्याचा प्रयत्न चालू ठेवला. म्हणून मी तिला शाप देऊन मानवाचे डोके असलेली म्हैस केले. तरीदेखील तिने माघार घेतली नाही. तेव्हां मला जास्तच राग आला व मी तिला काळा भोंवरा करून या देशात पळवून लावले. तिचा दुष्टपणा अद्याप कमी झालेला दिसत नाही. तिने राजकुमाराला त्रास द्यायला सुरवात केली आहे. मी तिला शापमुक्त करून पुढे कोणाला त्रास न देण्याबद्दल ताकीद करून निरोप

[illegible]
राला औषध काय आहे, हे विचारतो."

असे सांगून चंडपाणीने होमाग्नी पेटविला आणि त्यांत अनेक सुगंधी द्रव्ये घालायला सुरवात केली. धुराचे लोट यायला सुरवात झाली. नंतर त्याने एक मंत्र म्हटला तेव्हां धुराचा एक खांब होमातून वर येऊन उभा राहला. त्यातून एक काळा भोंवरा उडत वर आला.

चंडपाणीने त्याला विचारले–"काय ग ए, कैदाशिणी! अजून तू आपली दुष्ट बुद्धी सोडलेली दिसत नाहीस? तू या राजकुमारास चावलीस, होय की नाही?"

भोंवरा माणसासारख्या आवाजात म्हणाला–"महात्मन्! क्षमा करा! मी, आपण येऊन माझा उद्धार कराल, या हेतूने या राजकुमाराला चावले. आपले दर्शन घडले. आतां मी याला औषध काय ते सांगते. अग्निगुल्म वृक्षाच्या पाल्याचा रस एक ग्लास भरून दररोज याला प्यायला द्यावा. या मुलाची प्रकृती पहिल्यासारखी होईल. मुलाची तब्येत सुधारल्यावर मला आपले पूर्व रूप देण्याची कृपा करावी."

"मुलाची प्रकृती पहिल्यासारखी चांगली सुधारल्यावर मी तुला शापमुक्त करीन." चंडपाणी म्हणाला. त्यानंतर भोंवरा चंडपाणीच्या पायावर येऊन क्षणभर बसला आणि नंतर तेथून दूर कोठेतरी उडत निघून गेला.





चंडपाणीने दरबारी वैद्यांना बोलावून विचारले–“तुम्हाला अग्निगुल्म वृक्ष माहीत आहे ना?”

“महात्मन् आम्हांला माहीत आहे. आमच्या कडील डोंगराळ प्रदेशात तो मिळतो.” वैद्य म्हणाले.

“ठीक! तरमग भोंवऱ्याने सांगितल्या-प्रमाणे राजकुमाराचा इलाज करावा. तो लवकरच बरा होईल, असा मी आशीर्वाद देतो. आतां मला कधी त्रास देण्यास येऊ नका.” असे सांगून चंडपाणी सर्व पहात असतां अंतर्धान पावला.

अग्निगुल्म वृक्षाचा रस काढून कांचेच्या ग्लासात राजकुमाराला पाजण्यासाठी राज- [illegible] राजकुमाराच्या खोलीत गेले व म्हणाले–“हे औषध प्यावे. आपला आजार चांगला बरा होईल.”

ग्लासातला रस शाईसारखा काळा होता. तो पाहून राजकुमार तोंड वांकडे करीत म्हणाले–“माझ्या डोळ्यासमोरून तो दूर घेऊन जा. मी नाही पिणार तो आणि तो पुन्हां कधी आणूच नका.”

राजकुमाराला काळा रंग मुळीच आवडत नसे. राजा व राणी दोघांनी अनेक प्रकारे त्याची समजूत घालून पाहिली. परंतु त्याने तिकडे दुर्लक्ष केले. कोणाला कळले नाही की राजकुमाराला ते औषध कसे पाजायचे. काहीतरी दुसरे द्रव्य घालून औषधाचा रंग बदलावा म्हणावे तर औषधाचा गुण कमी होईल की काय ही भीती होती.

अशा तऱ्हेने दोन दिवस गेले. त्याचे वजन आणखी दोन तोळे घटले. दोन्ही दिवस दरबारात चर्चा होत राहली की राजकुमाराला ते औषध कसे पाजायचे. तिसऱ्या दिवशी दरबारी जादुगार सोमनाथ म्हणाला–“महाराज! मला एकदां संधी देण्याची कृपा करावी.”

“यात तुझी जादू काय कामाची?” राजाने विचारले.

“महाराज! प्रयत्न करून पाहण्यात काही हरकत आहे का?” सोमनाथने विचारले.

“[illegible] दे तर, [illegible] कर! तुझा प्रयत्न यशस्वी झाला तर तुला तू मागशील ते बक्षिस देईन.” राजा म्हणाला.

“ठीक, मी आतांच प्रयत्न सुरु करतो.” सोमनाथ म्हणाला.

स्वर्णकुमाराला जादुगार फार आवडे. कारण तो निरनिराळ्या अद्‌भुत गोष्टी करून दाखवी. परंतु सोमनाथलादेखील कांचेच्या ग्लासात काळा रस घेऊन येत असलेला पाहून स्वर्णकुमार म्हणाला–“सोमनाथ! तूदेखील तेच औषध आणलेस वाटते? तू ते बाहेर फेकून दे, माझ्यावर तुझे उपकार होतील. यापेक्षां तू एखादी जादू करून कां दाखवीत नाहीस?”

“राजकुमार! मी तुम्हांला त्रास द्यायला आलो आहे, असे का वाटते तुम्हांला? अहो, मी जादूच दाखवायला आलो आहे.” सोमनाथ म्हणाला.

“ही सर्व लबाडी आहे, तुम्ही सर्व मिळून काहीतरी कट केलेला दिसतो आहे. वाटेल ते करून ते काळे औषध माझ्या गळ्याखाली उतरवायासाठी ही खटपट आहे.” राजकुमार असे म्हणत रडू लागला.

“राजकुमार! तुम्हीं गैरसमजूत करून घेता आहां! अहो, तुम्ही समजलात तशी ही शाई नाही. मी हे आताच दाखवून देतो. तुम्ही पहा ग्लास!” असे सांगून सोमनाथाने ग्लास उंच धरून खिशातून एक काळा रुमाल काढला आणि ग्लासावर



टाकला. कोणता तरी मंत्र म्हणत काचेचा ग्लास बाहेरून त्या काळ्या रुमालाला पुसला. त्यानंतर रुमाल काढून पुन्हा खिशात ठेवून दिला. राजकुमाराने चकित होऊन डोळे वटारून पाहिले. ग्लासात शाई नव्हती. सर्व शाई मिठाईसारखी झालेली होती. सोमनाथने ती मिठाई काढून राजकुमाराला खायला दिली. राजकुमाराने ती चाखून पाहिली.

"पाहिलेत राजकुमार! औषध काळे दिसले म्हणून तुम्हांला वाटले होते तसे तोंड फिरविण्यासारखे त्यात काही असेलच अशी समजूत करून घेणे बरोबर नाही. मला वाटते ते औषध गोडच असणार, असे समजून का पिऊन पहात नाही?" सोमनाथने विचारले.

राजकुमार आपली नाखुषी दर्शवीत म्हणाला—"पिईन! पण तू आपल्या हाताने आणून देत गेलास तर!"

दुसऱ्या दिवशी सोमनाथने ते काळे औषध प्यायला दिले. राजकुमार आनंदाने ते प्याला. सर्व लोक चकित झाले. अशा तऱ्हेने एक आठवडाभर औषध प्याल्यानंतर औषधाला गुण पडला. राजाने सोमनाथचा सत्कार करून त्याला राजकीय पोशाख दिला व एक मोठे इनामदेखील दिले.

सोमनाथ घरी गेल्यावर त्याचा तो राजकीय पोशाख व इनाम पाहून बायकोने त्याला विचारले—"ही जादू काय केलीत हो?"

"मी कांचेच्या ग्लासाला बाहेरून दिव्याचे काजळ लावून त्याच्या काठालगतच्या एक इंच भागाचे काजळ पुसून टाकले. त्यानंतर अर्धा ग्लास भरून गोड मिठाई घातली. ज्या जागेचे काजळ पुसले होते तेथे ग्लास धरून राजकुमाराला दाखविला. काजळामुळे ग्लासात शाई भरली आहे असे भासले. ग्लासावर काळा रुमाल टाकून मी त्याने ग्लास पुसून काढला. ग्लास काळा होता, म्हणून काजळ लागलेले दिसले नाही. झाले, कळले का नाही?"

ते ऐकून नवराबायको हसली.



# माधवचे चातुर्य

रंगपूर गावी चोरांचा सुळसुळाट वाढला. एकही घर चोरांच्या त्रासातून सुटले नाही. शेवटी राजाने स्वतः लक्ष घालून चोरांना पकडविले. चोर कैदेत पडले.

गांवकऱ्यांना पुढे काही दिवसांनी कळले की प्रत्येक घरात गावकऱ्यांनी चोरी केली होती, परंतु माधवच्या घरात चोरी केली नव्हती. त्यांना त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले. त्यांनी त्याला त्या गोष्टीचे कारण विचारले—"काय रे माधव! तू असे काय रे केलेस? चोर तुझ्या घराच्या बाजूला सुद्धां नाहीत, हे कसे काय घडले?"

तेव्हां माधव जोराने हसून म्हणाला—"काही नाही हो! तुम्ही सर्व खिडक्या व दारे आतून कडी लावून बंद करून झोपतां. मी सर्व दारे सताड उघडी टाकून झोपत होतो. परंतु त्यामुळे चोरांना शंका वाटली की आत लोक जागे आहेत आणि कोणी चोर माझ्या घराकडे फिरकलादेखील नाही."

गावकरी चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले.





# परदेशी व्यापारी

एका गांवी जंबुनाथ नावाचा एक मनुष्य एका व्यापाऱ्याच्या पेढीवर दिवाण म्हणून काम करीत असे. त्याच्या मालकाचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता. जंबुनाथ हुशार होता व चांगला अनुभवी पण होता. त्याहून जास्त विशेष म्हणजे त्याचा प्रामाणिकपणा. आपण ज्याचे मीठ खातो त्याच्या मिठाला जागले पाहिजे, अशी एक भावना सदा त्याच्या हृदयात वसत असे. मालकाला जेवढा लाभ होईल तेवढा करून देण्याचा तो प्रामाणिकपणाने प्रयत्न करी. ज्या पेठेत स्वस्तात स्वस्त माल मिळे त्या पेठेतून विकत घेऊन तो ज्या पेठेत जास्त किंमत मिळे त्या पेठेत विकण्याची खटपट करी. अशा तऱ्हेने त्याने आपल्या मालकाचा व्यापार वाढवायला खूप मेहनत केली.

पुढे काही वर्षांनी त्याचा वृद्ध मालक परलोकी गेल्यावर त्याचा मुलगा सोमगुप्त मालक झाला. जंबुनाथाने त्याची सेवादेखील इमाने इतबारे केली. परंतु सोमगुप्त स्वभावाने थोडा संशयी आणि चिक्कू होता. त्याने खर्च कमी करून जास्त फायदा मिळविण्यासाठी नोकरांचे पगार कमी केले आणि त्यांच्याकडून जास्त कामे करवून घेऊ लागला. जंबुनाथाचा पगार देखील कमी करण्यात आला. त्याने चूक केली असो किंवा नसो, सोमगुप्त त्याला तोंडाला येई ते बोले. त्याला वाटे कडकपणाने कामे करवून घेणे जास्त सोपे आहे. परंतु जंबुनाथ वृद्ध मालकाची आठवण करून सर्व अपमान सहन करी.

जंबुनाथने दाखविलेले कसब सोमगुप्ताला माहीत नव्हते असे नाही. परंतु त्याला त्या संशयी वृत्तीमुळे वाटे की जंबुनाथने बरेच पैसे गिळंकृत केले असावेत. एकदां त्याने क्षुल्लक कारणावरून जंबु-

[illegible]
धान्य चोरून कोणाला तरी विकले आणि त्याची किंमत उचलली. ती रक्कम तीन दिवसात दुकानात जमा केली नाही तर त्याच्यावर फिर्याद करण्यात येईल, अशी धमकीही त्याला देण्यात आली.

जंबुनाथाला वाईट वाटले. मालकाची अवकृपा व्हायला त्याच्या हातून अशी कोणती मोठी चूक घडली हेच त्याला कळेना. परंतु त्याने सर्व अपमान सहन केला आणि घरी बसून राहिला.

त्या तीन दिवसाच्या अवधीत सोमगुप्ताकडे एक परदेशी व्यापारी आला आणि म्हणाला—"मी समुद्रापलीकडच्या देशाचा व्यापारी आहे, आपल्याकडे माल विकत घ्यायला आलो आहे. माझ्या देशालायक जो माल असेल तो मी विकत घेईन व त्याची किंमत सोन्याच्या रूपात आपण मागाल ती देईन."

सोमगुप्तला परमानंद झाला. सामान्य व्यापार असता तर तो त्याने जंबुनाथावर टाकला असता. परंतु या व्यापारांत फायदाच फायदा आहे, असे सोमगुप्ताला वाटले.

त्याच दिवशी रात्री त्या व्यापाऱ्याने माल विकत घेतला आणि सोन्याचे तुकडे मोजून पिशवीत घालून दिले. परदेशी व्यापारी माल घेऊन निघून गेल्यावर सोमगुप्तला रात्री छान छान स्वप्ने पडली.

परंतु उजाडल्यावर झोप मोडतांच त्याच्या मनात एक शंका आली, त्या



परदेशी व्यापाऱ्याने दिलेले सोने खरे सोने होते की खोटे? खोटे असले तर बुडलो. ती शंका दूर व्हावी म्हणून सोमगुप्त सोन्याचा एक तुकडा घेऊन सोनाराकडे गेला. सोनाराने हातात घेतल्याबरोबर खरे सोने नसल्याचे सांगितले. कारण पितळ आणि सोने वजनावरून हातात घेतल्या-बरोबर कळते. तरी त्याने ते कसून पाहिले व पितळाच्या तुकड्यावर सोन्याचा मुलम्मा असल्याचे सांगितले. सोमगुप्त ते ऐकून जागच्या जागी बेशुद्ध होऊन पडला.

खरोखरी परदेशी व्यापाराचे सोंग करून जंबुनाथाचा मुलगाच सोमगुप्तकडे आला होता. बापाला त्याच्या मालकाने जसे वागवले होते त्याचा मुलाला फार राग आला होता. त्याची चांगली अद्दल त्याला घडावी म्हणून त्याने बापाला कळविल्या-शिवाय हा घाट घातला होता. घरी परत आल्यावर त्याने जंबुनाथाला सर्व सांगून टाकले. जंबुनाथाला ती गोष्ट आवडली नाही व तो मुलाला खूप रागावला.

[illegible] पणाचा मोबदला तुम्हांला काय मिळाला? मालकाचे शिव्याशाप आणि खोटच्या आरो-पावर, कदाचित तुरुंगवास ही भोगावा लागेल."

परंतु जंबुनाथाने त्याला काहीच उत्तर दिले नाही आणि मालकाच्या घरचा मुलाने फसवून आणलेला सर्व माल घेऊन त्याच्या घरी गेला. मालक कपाळाला हात धरून बसला होता. परंतु सर्व माल परत आलेला पाहून त्याला आनंद झाला. जंबुनाथाने मुलाच्या चुकीबद्दल त्याची माफी मागितली. सोमगुप्त म्हणाला—"जंबुनाथ! मी तुम्हांला ओळखले नव्हते! पैशाचा मद माझ्या डोळ्यावर चढला होता. तुमच्यामुळेच आमच्या पेढीची भरभराट झाली होती. तुमच्या-शिवाय आमचा व्यापार चालणे शक्य नाही. यापुढे तुम्हीच सर्व व्यापार पहा, मी चुकूनसुद्धा अधिकार गाजविण्याचा प्रयत्न करणार नाही.





# पोटासाठी

एका गावी लखूजी नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याने मेंढरे पाळली होती. ती विकून त्याने पुष्कळ पैसे मिळविले होते. त्याने एकदा आपल्या मळ्यात विहीर खणण्याचे ठरविले. बरेच दिवस विहीर खणून मोठा मळा करण्याचा विचार मनात राहून गेला होता. परंतु आतां आपल्या विचाराला मूर्तरूप देण्याचे त्याने ठरविले.

परंतु त्याच वेळी देशात दुष्काळाने हाहाकार उडवून दिला. अन्नान्न दशेत लोक आपापली गावे सोडून काम मिळे तेथे जाऊ लागले. लखुजीने विचार केला, स्वस्तात मजूर मिळतील तेव्हां विहीर खणून घ्यावी.

तो विचार मनात येताच त्याने वडा-रांना बोलावून विहीर खणायला सांगितले. त्यांनी मजुरीपण जास्त मागितली नाही. त्यांनी खूप उत्साहाने काम सुरू केले आणि दोन दिवसात दहाबारा फुटावर खणण्याचे काम संपले. परंतु खडक लागला.

लखुजीला आपले पैसे फुकट गेल्याबद्दल फार वाईट वाटले. वडारांनासुद्धां पोटाला मिळणारी मजुरी जाते की काय अशी भीती वाटली. एकदोन महिनेतरी मजुरी मिळाली तर पोट भरणार, नाही तर उपाशी मरावे लागेल.

त्यांना वाटले तसेच झाले. लखुजीने-विहीर खणण्याचे काम थांबविले. परंतु वडारांचा नायक हुशार होता. लखुजीला म्हणाला—"मालक! हा खडक वितळून वर पाणी येईल. खडक काय पातळ थर आहे. खाली खूप पाणी आहे. काम बंद केल्याने आपलेच नुकसान होईल." परंतु लखुजी काही उत्तर दिल्याशिवाय घरी निघून गेले.

वडारांच्या नायकाला रात्री झोप आली नाही. त्याने आपल्या सर्व साथीदारांना

जागे केले व म्हणाला–"मित्र हो! नदी तलावात जेथे पाणी असेल तेथून आणून या विहिरीच्या घशात ओता. पोटासाठी हे करावेच लागणार, सुटका नाही. ही लबाडीच आहे. परंतु नाइलाज."

आपल्या नायकाच्या सूचनेप्रमाणे सर्व मजूर विहिरीच्या खळग्यात पाणी ओतून निघून गेले. तळाला खडक होता म्हणून पाणी झिरपून गेले नाही.

लखुजी संवयीप्रमाणे शेतावर गेला आणि विहिरीत उगाच पैसे टाकल्याचे दुःख करीत विहीर पहायला गेला. त्याला विहिरीत पाणी दिसले आणि वडारांच्या नायकाने सांगितलेली गोष्ट आठवली. तो धावतच वडार उतरले होते तेथे गेला आणि नायकाला म्हणाला–"तुझे म्हणजेच खरं झालं बाबा! विहिरीला पाणी लागले. खडक वितळला. सर्व या कामाला. दहा फूट खोल पाणी होईतो खणले पाहिजे.

"नाही मालक! आम्ही दुसरीकडे काम पाहू लागलो आहो. आपण नाही

पडेल. तेथे वर्षभर काम मिळणार आहे!" नायकाने बतावणी केली.

"ते काही नाही रे! हे काम तुम्हीच पुरे केले पाहिजे. मी नाही दुसऱ्या कोणाकडे जाणार!" लखुजी म्हणाला.

"तरमग मजुरीचे पैसे आगाऊ दिले पाहिजेत, मालक! नाहीतर माझे साथी माझे ऐकणार नाहीत. आपले काम व्हायला पाहिजे असेल तर हाच एक मार्ग आहे." नायक म्हणाला.

आणखी सहाफूट खणण्याची मजुरी आगाऊ घेऊन नायकाने मजुरांना कामाला प्रोत्साहन दिले. मजुरांना सहा फूट खडक खोदला. पण पाण्याचे नाव नाही. जे पाणी ओतले ते उपसून काढावे लागले होते. खडक संपेचना. नायकाने निराश होऊन लखुजीला म्हटले–"नशिबानेच पाठ फिरविली तेथे माणूस काय करणार?"

आणि हे सर्व त्याला पोटासाठी बोलावे आणि करावे लागले.





# महाभारत

महाभारत युद्धाला जास्त जास्त जोर चढू लागला. अर्जुनाला त्याचा मुलगा इरावंत याला वीरगती मिळाल्याचे वृत्त माहीत नव्हते. तो कौरव वीरांचा संहार करण्यात मग्न होता. त्या बाजूने भीष्माचार्य पांडव सैन्याचा धुव्वा उडविण्याच्या प्रयत्नात होते. भीम, धृष्टद्युम्न, सात्यकी आपापला पराक्रम गाजवीत होते. त्या सर्वांची बरोबरी करण्यासाठी द्रोणाचार्य आपल्या शौर्याची शिकस्त करीत होते.

इरावंत धराशायी झाल्याचे वृत्त ऐकून भीमाचा मुलगा घटोत्कच विजेसारखे चमकणारे एक शूल घेऊन आणि राक्षस सैन्य बरोबर घेऊन कौरव सैन्यावर तुटून पडला. कौरवांच्या सैन्याची गाळण उडाली. ते पाहून दुर्योधन स्वतःयुद्ध करण्यास सिद्ध झाला. त्याच्या पाठोपाठ वंगदेशाचा राजा दहा हजार हत्तींचे सैन्य घेऊन आला. ते पाहून घटोत्कच चवताळून आपल्या राक्षस सैन्यासह गजसैन्यावर चालून येऊन गज सैन्याचा संहार करू लागला. गजसैन्याची पीछेहाट चाललेली पाहून दुर्योधनाचा क्रोध जास्त वाढला. त्याने राक्षस सैन्याचा वध करण्यासाठी शिकस्तीचे प्रयत्न सुरू केले. तेव्हां घटोत्कचने स्वतः दुर्योधनाशी द्वंद्वयुद्ध करण्याचे ठरविले.

त्या द्वंद्वयुद्धात घटोत्कच बराच जखमी झाला. त्याच्या डोंगरासारख्या भव्य देहावरून रक्ताचे ओहोळ वाहू लागले. तेव्हां त्याने एक भयंकर शक्ती हातात



घेऊन ती दुर्योधनावर फेंकली. परंतु ऐन वेळी वंगदेशाच्या राजाने आपल्या हत्तीला दुर्योधनाच्या रथासमोर आडवा उभा केला. त्यामुळे तो मदोन्मत्त हत्ती तत्काळ जमिनी-वर आदळून लोळू लागला संधी साधून वंगदेशाच्या राजाने तेथून पाय काढला.

घटोत्कचाचा पराक्रम पाहून भीष्म द्रोणाचार्यांना म्हणाला–"दुर्योधनावर फार मोठे संकट आल्यासारखे दिसत आहे. घटोत्कचाचा वध करणे कोणाला शक्य होईलसे वाटत नाही. म्हणून सर्वांनी दुर्योधनाच्या रक्षणासाठी धावले पाहिजे."

ते ऐकून द्रोण, सोमदत्त, बाल्हिक, सैंधव, कृपाचार्य, भूरिश्रवा, शल्य, बृहद्बल, अश्वत्थामा, विकर्ण, चित्रसेन, विविंशती इत्यादी अनेक महारथी आपापले रथ घेऊन दुर्योधनाच्या मदतीला धांवले. त्यांनी, घटोत्कचासमोरून दुर्योधनाला पाठ फिरवून पळत असलेला पाहिले. त्यांनी घटोत्कचाला अडविले आणि दुर्योधनाचे रक्षण केले. त्या युद्धात घटोत्कचाने शत्रुसैन्याच्या अनेक वीरांना ठार केले. पांडवांकडील वीर घटोत्कचाच्या मदतीला धावले. कौरव सैन्यांतील वीरांची कवचे भंग झाली, असंख्य वीर घायाळ होऊन लोळू लागले आणि अनेकांचे सारथी ठार झाले. तेव्हां कौरव वीरांची पीछेहाट सुरू झाली.

तरी घटोत्कच थांबला नाही. पुन्हां तो दुर्योधनावर चालून गेला. तेव्हां कौरव वीर पुन्हां परतले. परंतु घटोत्कचाचा धीर थोडादेखील खचला नाही. तो एकटा सर्वांशी युद्ध करीत राहला.

युधिष्ठिराला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां भीमाला बोलवून तो म्हणाला–"भीमा! तुझा मुलगा फार मोठा पराक्रम गाजवीत आहे. भीष्माचार्य पांचालांचे निर्मूलन करण्याच्या प्रयत्नात आहेत. त्यांच्या रक्षणार्थ अर्जुन गुंतलेला आहे."

ते ऐकून भीमाने विचार केला की अर्जुनाच्या मदतीला जाण्यापेक्षां घटोत्कचा-च्या मदतीलाच जाणे जास्त आवश्यक आहे. [illegible] घेऊन पोचला. त्याच्या बरोबर अभिमन्यू, उपपांडव, नील, सत्यधृती, सौचित्री, श्रेणीमंत, वसुदास इत्यादी वीरदेखील निघाले. दोन्ही बाजूच्या वीरांचे परस्परांशी भयंकर युद्ध झाले. त्या युद्धांत पांडवांचाच जय होणार हे स्पष्ट दिसत होते.

तेव्हां दुर्योधनाने चिडून जाऊन भीमावर हल्ला केला. त्या युद्धात भीम बेशुद्ध होऊन रथात पडला. इतक्यात घटोत्कच अभिमन्यू इत्यादी पांडव वीरांनी येऊन दुर्योधनाला घेरले. दुर्योधनावर आलेले संकट पाहून द्रोणाचार्य काही कौरव वीरांना घेऊन त्याच्या मदतीला धावले. या वेळच्या युद्धात घटोत्कचाने आपली राक्षसी माया पसरवून शत्रूला आश्चर्य चकित करून सोडले. घटोत्कचाच्या हल्ल्यासमोर कौरव सैन्याची पांगापांग होऊ लागली.

त्यावेळी दुर्योधन भीष्माचार्यांकडे धावला व म्हणाला–"आजोबा! पांडवांचा विश्वास जसा कृष्णावर आहे तसाच विश्वास आपणांवर टाकून आम्ही हे युद्ध आरंभिले होते. घटोत्कच व भीम दोघांनी मिळून मला खाली पहायला लावले. काय वाटेल ते करून या राक्षसाचा कांटा दूर करा."

तेव्हां भीष्माचार्य दुर्योधनाला म्हणाले–"बाबा रे! तू युधिष्ठिर किंवा भीम किंवा



नकुल व सहदेव यांपैकी कोणाशी, युद्ध करीत रहा. एका राजाने दुसऱ्या राजाशी युद्ध करावे. राक्षसाशी युद्ध करण्यास आम्ही सर्व आहोच. त्याच्याशी युद्धाला तू भगदत्ताला पाठव. तो इंद्रासारखा शूर आहे." नंतर भीष्माचार्य भगदत्ताला म्हणाले–"तू अनेक राक्षसांशी युद्ध केले आहेस. म्हणून तूच घटोत्कचाशी युद्ध करावे, हे योग्य होईल."

भीष्माचार्यांची आज्ञा होताच भगदत्त सुप्रतीक नावाच्या आपल्या एका भयंकर हत्तीवर युद्धाला निघाला. भगदत्ताने सुप्रतीकला भीमाच्या रथाकडे वळविले. ते पाहून कैकेय, उपपांडव, अभिमन्यू,



दशर्ण राजा क्षत्रदेव, चदिराजा चित्रकेतू इत्यादिकांनी त्या हत्तीवर बाणांचा मारा सुरू केला. परंतु सप्रतीक त्या हल्लयाची पर्वा केल्याशिवाय पांडव सैन्याला तुडवीत किंवा सोंडेत घेऊन दूर फेकीत पुढे निघाला. ते पाहून घटोत्कचाने भगदत्तावर हल्ला केला. भगदत्ताने भीमाच्या सारथ्याला जखमी केले. तो बेशुद्ध होऊन रथात पडला. इतक्यात अर्जुन व भीम घटोत्कचाच्या जवळ आले. भगदत्त पांडव वीरांना बाजूला सारीत सरळ युधिष्ठिर होता तेथे आला आणि त्याच्याशी त्याने युद्ध सुरू केले.

त्याच वेळी इरावंताच्या मरणाची गोष्ट भीमार्जुनांना कळली. अर्जुन युद्धोत्साहाने कृष्णाला म्हणाला—"कृष्णा! माझा रथ कौरव सैन्याच्या मध्यभागी घेऊन चल."

अर्जुन कौरव सैन्याच्या मध्यभागी पोचताच घोर युद्धाला प्रारंभ झाला. त्या लढाईत भीमाने व्यूढोरस्क, कुंडली, अनाधृष्टी, कुंडभेदी, वैराट, दीर्घनेत्र, दीर्घबाहू, सुबाहू आणि कनकध्वज नांवाच्या वीरांना आणि धृतराष्ट्राच्या मुलांना ठार केले. भीम वध करीत असतां द्रोणाचार्यांनी त्याच्यावर शरवृष्टी केली. परंतु ते त्याला अडवू शकले नाहीत. इतक्यात संध्याकाळचा काळोख सर्वत्र पसरला आणि दोन्ही बाजूचे योद्धे आपापल्या शिबिरात निघून गेले.

त्यानंतर दुर्योधन, शकुनी व दुःशासन यांनी कर्णाचा सल्ला घेतला. दुर्योधन कर्णाला म्हणाला—"कां कोणास ठाऊक, भीष्म, द्रोण आणि शल्य यांच्या सारख्या थोर वीरासमोरही पांडवांनी माघार घेतली नाही. उलट त्यांनी आपल्या सैन्याचाच संहार सुरू केला आहे. प्रत्येक दिवशी आपले सैन्य झपाट्याने कमी होत चालले आहे. आतां पांडवांना कसे जिंकायचे हेच मला कळेनासे झाले आहे."

तेव्हां कर्ण म्हणाला—"भीष्माचार्यांनी शस्त्रसंन्यास घेतला तर मी एकटा सोमकांसह पांडवांचा वध करीन. भीष्माचार्यांना माझा पराक्रम कसा आहे तो कळायला हवा. [illegible] म्हणून ते पांडवांचा वध कदापी करणार नाहीत. तेव्हां तू भीष्माचार्यांच्या शिबिरात जा. तिकडे त्यांनी शस्त्रसंन्यास घेतला तर इकडे पांडवांचा वध झालाच समज."

त्यानंतर दुर्योधन आपल्या सर्व भावंडांना आणि इतर नातेवाईकांना बरोबर घेऊन भीष्माचार्यांच्या शिबिरात गेला आणि म्हणाला—"आजोबा! तुम्ही माझ्यावर रागावलां आहां की माझे दुर्दैव आहे, हे मला माहीत नाही, परंतु एवढे वाटते की तुम्ही पांडवांचा बचाव कसा होईल याचाच प्रयत्न करीत आहां. तसे असेल तर तुम्ही शस्त्रसंन्यास घेऊन कर्णाला सेनापतित्व द्यावे. तो पांडवांचा कांटा नक्कीच काढील."

ते शब्द भीष्माचार्यांच्या काळजाला झोंबले. त्यांचे डोळे शंकराच्या तिसऱ्या डोळ्यासारखे अग्निवृष्टी करून त्रिलोक भस्म करतात की काय असे वाटू लागले. तरी ते स्वतःला सावरून म्हणाले—"दुर्योधना! माझ्या शौर्य पराक्रमात तुला कोठे उणीव दिसून आली? मी शत्रुसैन्याचा जो संहार केला तो काय तू पाहिला नाहीस? अर्जुनाचे शौर्य तुला माहीत नाही का? गंधर्व तुला मुसक्या बांधून घेऊन गेले तेव्हां तुला कोणी सोडवून आणले? त्यावेळीं कर्णाचा



पराक्रम कोठे गेला होता? तुझ्या भावंडांबरोबर त्याला पळून कां जावे लागले? उत्तर गोग्रहणसमयी एकट्या अर्जुनाने सर्वांना पळवून लावले तेव्हां कौरव सैन्याच्या मदतीला तोच होता ना? तू हे वैर विना कारण विकत घेतले आहेस. आतां तुच आपल्या शत्रूचा समाचार घे. शत्रू हारला तर आम्हांला अपार आनंदच होईल. आतां माझ्या शौर्याची व कर्तव्याची गोष्ट विचारलीस तर मी एवढेच सांगू शकेन की मी शिखंडी सोडून सर्व सोमकांचा आणि पांचालांचा वध करीन, नाही तर देहत्याग करीन. या पलीकडे मी काही करू शकणार नाही. मी उद्यां जे युद्ध करीन ते तू पहात



रहा! आतां शिबिरात जाऊन स्वस्थ झोप!"

ते ऐकून दुर्योधनाच्या मनाचे समाधान झाले. दुसऱ्या दिवशी उजाडताच आपल्या बाजूच्या सर्व राजांना बोलावून तो म्हणाला–"आज भीष्माचार्य भयंकर युद्ध करणार आहेत." त्यानंतर दुःशासनाला बोलावून म्हणाला–'आज आपल्याला विजयश्री माळ घालणार. आजोबांच्या रक्षणार्थ शकुनीमामा, शल्य, कृपाचार्य, द्रोण आणि विविंशती यांच्या मदतीची गरज आहे."

नवव्या दिवशीचा युद्धाला प्रारंभ झाला. भीष्माचार्यांनी सर्वतोभद्र नांवाचा व्यूह [illegible] पांडवांनी प्रतिव्यूह रचला. युद्ध प्रारंभ होताच अभिमन्यूला युद्धोत्साह चढला. त्याने सर्व कौरव सैन्य आणि सैंधव, कृपाचार्य, द्रोण, अश्वत्थामा, यांसारख्या थोर वीरांना विचलित केले. तेव्हां दुर्योधनाने अभिमन्यूशी युद्धाला अलंबस नांवाच्या राक्षसाला पाठविले.

त्या दोघांचे युद्ध खरोखरीच पाहण्यासारखेच होते. अलंबसाची अभिमन्यूसमोर डाळ शिजली नाही. तेव्हां त्याने राक्षसी माया पसरवून युद्धाला सुरवात केली, परंतु त्यांतही त्याला यश मिळाले नाही. शेवटी माघार घेऊन पळून गेला. अभिमन्यू कौरव सैन्याचा संहार करीत पुढे निघाला.

तेव्हां भीष्माचार्यांनी त्याला अडविले. त्याच वेळी अर्जुनदेखील मुलाच्या मदतीला धावला. भीष्माचार्यांबरोबर अनेक कौरव वीर होते. त्याचप्रमाणे अर्जुनाबरोबरही अनेक वीर होते. दोघांचे ते युद्ध म्हणजे प्रलयकाळ येऊन ठेपला की काय असे वाटू लागले.

दुसऱ्या बाजूने भगदत्त आणि श्रुतायूने आपल्या गजसैन्यासह भीमावर हल्ला केला. भीमाने गदा घेऊन रथातून उडी मारली आणि त्याला घेरून उभे असलेल्या हत्तींना आणि त्यांवर बसून आलेल्या वीरांना

सहार सुरू केला. भीमासमोर गजसैन्याची धूळदाण उडाली आणि ते पळून गेले.

त्या दिवशी भीमाने भयंकर युद्ध केले. पांडवांच्या सैन्यातले सहस्रावधी सैनिक देखील रणांगणार पडले आणि अनेक सैनिक पळून गेले. इतक्यात सूर्यास्त झाला आणि युद्ध संपल्याने सर्व आपापल्या शिबिरात निघून गेले.

आज भीष्माचार्यांचा भीष्मावतार पाहून पांडवदेखील कचरले. युधिष्ठिराच्या मनात विरक्ती उत्पन्न झाली आणि तो कृष्णाजवळ येऊन म्हणाला–"कृष्णा! आतां तूच सांग, आपली हार मानून स्वस्थ बसण्याशिवाय काही उपाय आहे का?"

परंतु कृष्ण त्याच्या मनाचे सांत्वन करीत म्हणाला–"तू इतकी काळजी करीत बसण्यात काही अर्थ आहे का? भीष्माचार्यांचा वध करण्यात अर्जुन असमर्थ ठरला तर मी स्वतः त्यांचा वध करीन. भीष्माचार्यांना वीरगती मिळाली तर तुला सोडून विजयश्री कोणाला माळ घालील? तुझा [illegible] अर्जुनाने मनापासून ठरविले तर भीष्माचार्यांचा वध करणे त्याला अशक्य नाही. ते त्याचे कर्तव्य देखील आहे."

ते ऐकून युधिष्ठिर म्हणाला–"भीष्माचार्य आमचे हितैषी आहेत. आमच्या विरुद्ध युद्ध करीत असले तरी आम्हांला विजय मिळावा, हीच इच्छा मनापासून ते करीत आहेत. तेव्हां त्यांचाच सल्ला आपण घेऊं या. त्यांचा वध कसा होणार हे तेच जास्त चांगले सांगू शकतील. अशा थोरपुरुषाचा वध आपल्याला करावा लागावा, ही केवढी लज्जास्पद गोष्ट आहे? हा काय क्षत्रिय धर्म झाला? या धर्माचे पालन करण्यात पापच पाप आहे, पुण्याचा लवलेशही नाही."

कृष्णाला युधिष्ठिराचे बोलणे आवडले नाही. तरी म्हणाला–"भीष्माचार्यांचा वध कसा होईल, हे त्यांच्या तोंडूनच आपल्याला कळू शकेल. म्हणून आपण त्यांनाच जाऊन भेटू या."





# मित्रभेद

[ ७ ]

कोष्ट्याच्या बायकोची सर्व लबाडी देवशर्माने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली होती. त्याने सहज विचार केला–'स्त्रियांची जात किती धूर्त असते! त्यांच्या हुशारीसमोर बृहस्पती आणि शुक्राचार्यंनादेखील मान खाली करावी लागेल.'

तिकडे न्हाविण आपले कापलेले नाक हातात घेऊन घरी पोचली आणि आपल्या नाकाचे काय करायचे आणि आपली चूक कशी लपवायची या विचारात असता उजाडण्याची वेळ झाली.

इतक्यात न्हावी रात्रभर राजवाड्यात सेवेसाठी राहून उजाडण्याच्या सुमारास घरी आला आणि बाहेरूनच बायकोला म्हणाला–"अग ए! माझी धोपटी आणून दे. गावात हजामती करायला चार घरी जायचे आहे." न्हाविण जातीचीच वस्ताद होती. आतां नाक कापले गेल्याने ती जास्त सतर्क झाली होती. म्हणून तिने न्हाव्याच्या धोपटीतला फक्त एक वस्तरा काढून न्हाव्यासमोर फेकला. म्हणून न्हाव्याला राग आला. त्याने धोपटी मागितली होती, पण बायकोने फक्त एक वस्तराच पुढे केला होता. तो स्वभावाने तापटच होता. त्याने रागाने तो वस्तरा जोराने न्हाविणीकडे फेकला. लगेच आतून न्हाविण ओरडू लागली–"देवा रे देवा! वांचवा मला, या दुष्ट राक्षसाने माझं नाकच कापले."

आरडाओरडा झाला. राजाचे शिपाई धावले. त्यांनी न्हाव्याला खूप बडविले आणि त्याला अटक करून साक्षीसाठी न्हाव्याच्या बायकोला कापलेले नाक हातात



घेऊन बरोबर चलायला सांगितले. शिपा-यांनी न्हाव्याला न्यायाधिशासमोर हजर केले. न्यायाधिशाने चवकशी करून न्हावीणी-च्या तोंडी सर्व गोष्टी कळल्यावर न्हाव्याला विचारले–"तू असला भयंकर अपराध करायला कसा काय धजलास?"

न्हावी मूर्खच होता. काय बोलणार? त्याला बायकोची बतावणी कळलीच नव्हती. न्यायाधिशाने त्या देशाच्या कायद्याप्रमाणे स्त्रीजातीविरुद्ध केलेल्या त्या भयंकर अप-राधाबद्दल न्हाव्याला फांशीची शिक्षा सुनावली.

राजाचे शिपाई न्हाव्याला वध:स्थानाकडे घेऊन निघाले. देवशर्माला ते सर्व वृत्त कळले आणि न्हाव्याला वध:स्थानाकडे घेऊन जात असतां त्याने पाहिले. तो न्यायाधिशाकडे धावत जाऊन म्हणाला– "आपण या निरपराध न्हाव्याला विना-कारण भयंकर शिक्षा करीत आहां. मी खरी घडलेली गोष्ट जशी पाहिली तशी सांगतो. काही चूक नसता कोल्ह्याने, मी स्वत: आणि न्हाव्याच्या बायकोने, निर-निराळ्या प्रकारे कष्ट भोगले आहेत."

"ते कसे काय?" न्यायाधिशाने देव-शर्माला विचारले.

देवशर्माने न्यायाधिशाला मेंढ्यांच्या झुंजीत मेलेल्या कोल्ह्याची गोष्ट, स्वत: तो सोने कसे घालवून बसला ती आषाढभूतीची गोष्ट आणि दारुड्या कोष्ट्याची गोष्ट सांगितली.

न्यायाधिशाने, देवशर्माने सांगितलेले सर्व वृत्त ऐकले. तो तर चकितच झाला आणि त्याने न्हाव्याला माफ करून त्याच्या बायकोला तिच्या सर्व अपराधांबद्दल, तिला जन्मभर आठवण राहील अशी शिक्षा केली. त्याने तिचे कान कापवून तिला विद्रूप करून परत घरी पाठविले.

कोल्हा आणि न्हावी या दोघांना जी शिक्षा झाली ती पाहून देवशर्माला त्याचे सोने गेल्याबद्दल तेवढेसे दु:ख वाटले नाही. तो आपल्या मठात परतला आणि शंकराच्या [illegible]

म्हणाला– "महादेवा! तुझ्या कृपेने आम्हां तिघांपैकी मलाच कमीत कमी शिक्षा झाली आहे. रक्ताची तहान भागविण्याच्या प्रयत्नात कोल्हा स्वत:चा जीवच घालवून बसला. न्हावीण आपले नाक व कान घालवून बसली आणि माझे गेले ते फक्त सोने. यापुढे मला त्या सोन्याचा मोह उरला नाही..."

दमनकच्या तोंडी देवशर्माची गोष्ट ऐकून करटकाने विचारले–"बरे तर आपण काय करावे, म्हणतोस?"

दमनक म्हणाला–"आपला राजा चुकीच्या वाटेने चालला आहे. त्याला सरळ मार्गावर आणले पाहिजे. आपल्या राजाला कोणी चांगला सल्लागार मंत्री उरला नाही. साधे गवत खाणाऱ्या बैलाची दोस्ती करून आणि त्याच्या सल्ल्याप्रमाणे वागून शेवटी आपल्या राजाला गवतावर भूक भागवावी लागेल, नाहीतर उपाशी रहावे लागेल. त्याला या वाटेवरून पाऊल मागे घ्यायला सांगणे आपले कर्तव्य आहे."

"आपल्या सारख्या दुर्बळ प्राण्यांना ते कसे काय शक्य होईल?" करटकाने विचारले.

"शक्तीने जे जमत नाही ते युक्तीने जमते. विषारी सांपाला ठार करण्याकरितां



कावळ्याने सोन्याच्या हाराचा उपयोग नव्हता का केला?" दमनकाने विचारले.

"तो कसा काय?" करटकाने विचारले.

दमनकाने ती गोष्ट सांगितली:

## सांपाला ठार करणाऱ्या कावळ्याची गोष्ट

एका गावी एक मोठे वडाचे झाड होते. त्यावर कावळ्यांचे एक जोडपे रहात असे. एक सांप त्यांची अंडी व पिले खात असे. त्या झाडावर राहणाऱ्या कावळ्यांना त्या जोडप्याची कीव वाटत असे. परंतु ते झाड सोडून जाण्याची त्यांची इच्छा नव्हती.

सांप नित्य झाडावर चढून येई आणि कावळ्याची अंडी व पिले खाऊन जाई. शेवटी

मादीला राहवले नाही. ती कावळ्याला म्हणाली–"आपले एक देखील पिल्लू आज-पर्यंत जगले नाही. पुढे जिवंत राहील याची काय शाश्वती? म्हणून आपण हे झाड सोडून दुसऱ्या झाडावर घरटे बांधू या."

ते ऐकून कावळा म्हणाला–"अग! आपण कित्येक वर्षे झाली. याच झाडाच्या आश्रयाला राहलो. म्हणून हे झाड सोडून जावेसे मला नाही वाटत. मूठभर गवत आणि चूळभर पाणी पिणारे हरीण इतर ठिकाणी राहून जगू शकेल. परंतु ते जंगलातले जिवाला वाटणारे सर्व धोके सहन करण्यास तयार असते. हरणासारखे बेअक्कल जनावर देखील आपले घर सोडून जात नाही, तरमग आपल्यासारख्या अक्कल असलेल्या प्राण्याने घर सोडून कां जावे? मी काही तरी युक्ती करून त्या दुष्ट सांपाचा कांटा कायमचा काढतो.

"तो भयंकर विषारी साप आहे, त्याला तू कसा काय ठार करणार?" मादीने विचारले.

"मी [illegible] दुसऱ्या कोणाकडून करवून घेईन. राजनीति, धर्मशास्त्र वगैरेत विद्वान असा माझा एक मित्र आहे. त्याचा सल्ला घेऊन मी त्या सांपाला वाटेला लावतो." कावळा म्हणाला. असे सांगून कावळा निघून गेला आणि त्याचा एक मित्र कोल्हा होता त्याला भेटून त्याने त्या-च्यावर आलेल्या प्रसंगाची गोष्ट सांगितली व त्याचा सल्ला विचारला. म्हणाला–"मित्रा! त्या सांपाचा कांटा दूर करून आपल्या पिलांना वांचविण्याला काही युक्ती सांग."

ते ऐकून कोल्हा म्हणाला–"मी एक छान युक्ती सांगतो. तुझ्यावरचे संकट टळलेच म्हणून समज. वाईट काम करणा-ऱ्यांचा शेवट नदीच्या काठावरच्या झाडा-सारखा आपोआप होतो. मागे एका बगळ्याच्या मनाचे समाधान, सर्व मासे खाऊन झाल्यावरही झाले नाही तेव्हां त्याचा शेवट एका खेकडाच्या हाती कसा झाला, तुला माहीत नाही का?"

"तो कसा काय?" कावळ्याने विचारले.



# १४५. इंग्का देवालय

दक्षिण पेरू प्रांतात अँडीस पर्वतावरील प्रदेशात इंग्का जातीचे रेड इंडियन रहात असत. स्पॅनिश लोकांनी त्यांचा पराभव केला, तेव्हां ते रेड इंडियन जंगलात पळून गेले. या चित्रात या इंग्का जातीच्या लोकांचे देवालय आहे.





# अमरवाणी

विद्वानेव विजानाति विद्वज्जन परिश्रमम्,
न हि वंन्ध्या विजानाति गुर्वीम् प्रसववेदनाम् ॥ १ ॥

[ विद्वानाला (कोण कोणते आणि कशाप्रकारचे) कष्ट सहन करायला लागतात हे विद्वानालाच कळते. प्रसववेदना कशी असते हे वन्ध्या स्त्रीला कळणे कसं काय शक्य होईल ? ]

विद्या नाम नरस्य रूपमधिकम् प्रच्छन्नगुप्तम् धनम्,
विद्या भोगकरी यशस्सुखकरी, विद्या गुरूणाम् गुरुः,
विद्या बंधजनो विदेशगमने, विद्या परा देवता,
विद्या राजसु पूज्यते न हि धनम् विद्याविहीनः पशुः ॥ २ ॥

[ विद्या पुरुषाचे भूषण (सौंदर्य वाढवणारी) आहे, ते एक गुप्त धनच आहे, ती भोग, यश व सुख देणारी आहे, ती गुरुंची गुरु आहे, ती परदेशात बंधुसम आहे, ती एक महादेवता आहे, राजा तिचा आदर करतो, धनाचा नव्हे, वास्तव विद्याविहीन मनुष्य पशुतुल्य होय ! ]

वित्तम्, बन्धु, वयः, कर्म, विद्या भवति पंचमम्,
एतानि मान्य स्थानानि तुरीयो यद्यदुत्तरम् ॥ ३ ॥

[ धन, बंधु, वय, कर्म आणि विद्या या पाच गोष्टी क्रमाने एकापेक्षा दुसरी अधिक आदर करण्यायोग्य आहे. ]



# यक्ष पर्वत

## [ २१ ]

[ डोंगरी किल्ल्याजवळ वीरपुरच्या घोडेस्वारांसमोर माघार घेऊन स्वर्णाचारी काही उंटस्वारांसह जंगलात पळून गेला. तेथे त्याची भेट खड्गवर्मा, जीवदत्त आणि समरबाहूशी झाली. गुरु भल्लूकाने आपल्या एका शिष्याकरवी त्याची गुरुभक्ती दर्शविण्यासाठी त्याला एका उंच झाडावरून उडी टाकायला आज्ञा केली व तो तयार झाला. पुढे– ]

**गु**रु भल्लूकाच्या शिष्याने झाडावरून उडी मारली. परंतु तेवढ्यात जीवदत्तने पुढे धावत जाऊन खाली पडण्यापूर्वी त्याला आठदहा फुटावर आपल्या कुबडीच्या सहाय्याने आधार देऊन वरच्यावर धरले आणि त्याला अलगद जमिनीवर उतरविले.

भल्लूक तरुणाला मुळीच लागले नाही. परंतु जमिनीवर आदळून जीव न गेल्या-मुळे त्याला आपल्या गुरुभक्तीची परीक्षा देण्यास संधी मिळाली नाही याचे फार दुःख झाले. तो म्हणाला–"वीरवर्य! जमिनीवर आदळण्यापूर्वी धरून आपण मला वांचविले खरे, परंतु स्वर्गप्राप्तीची सहजी चालून आलेली संधी मी घालवून बसलो, त्याचे वाईट वाटते."

तो म्हणाला ते ऐकून जीवदत्त स्मित करीत म्हणाला–"अरे! तू जमिनीवर आदळून स्वर्गात गेला असतास की नरकात



नकळे? परंतु तू गुरूची आज्ञा म्हणजे देवाची इच्छा आहे, हे मानतोस एवढे मात्र नक्कीच सिद्ध झाले. मी तुला वांचविले ते तुझ्या हातून तुझ्या गुरूची आणि समरबाहूची जास्त सेवा घडू शकेल यासाठी.

तेवढ्यात तेथे गुरु भल्लूक, समरबाहू आणि खड्गवर्मा येऊन पोचले. गुरु भल्लूक मोठ्या अभिमानाने आणि आनंदाने खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना म्हणाला— वीरवर्य! आपण सर्वांनी माझ्या शिष्यांची गुरुभक्ती स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली आहे. आतां आपण तिचा ज्या तऱ्हेने उपयोग करून घ्यावयाचा असेल त्या तऱ्हेने करून घ्यावा. समरबाहू या जंगली प्रदेशाचा राजा आणि स्वर्णचारी मंत्री होतील तर माझ्या भुयारी किल्लयात वृकेश्वरी देवीची पूजा निर्विघ्नपणे होऊ शकेल. याहून जास्त आणखी काय पाहिजे?"

"भल्लूक! त्या देवीच्या पूजेमुळे निरपराध प्राण्यांच्या व माणसांच्या जिवाला धोका येणार नाही, अशी व्यवस्था ठेवण्याची जबाबदारी समरबाहूची आहे." जीवदत्तने दोघांना ही गोष्ट कळेल अशा शब्दात सांगितली आणि गुरु भल्लूकाच्या शिष्यांकडे पाहून म्हणाला—"या झाडावरून उडी मारणाऱ्या बरोबर तुमच्यापैकी आणखी एकाने एका कामाची जबाबदारी घ्यायला पुढे यावे. मी तुम्हां दोघांवर जी जबाबदारी टाकीन ती पुरी करून परत आले पाहिजे."

गुरु भल्लूकाने आपल्या शिष्यांपैकी एकाला बोलावून उडी मारणाऱ्या शिष्या शेजारी उभे राहण्यास सांगितले. जीवदत्तने एकदां दोघांकडे पाहिले व म्हणाला—"तुम्ही ते काम करीत असतां तुमचा जीव गेला तरी आम्ही कोठे आहो ही गोष्ट कोणाला कळतां कामा नये. एक चकार शब्ददेखील तुमच्या तोंडातून बाहेर पडता कामा नये. समोरच्या जंगलात वीरपूरचे घोडेस्वार कोठे तरी असणार. तुम्ही त्यांना कळू दिल्याशिवाय की तुम्ही एक नाटक करतां आहां, असावधपणामुळे त्यांच्या हातांत कैद झाल्याचे सोंग करा. तुम्ही दोघे त्या घोडेस्वारांना भेटा व त्यांच्याशी त्यांचा पूर्णविश्वास तुमच्यावर बसेल अशा तऱ्हेने वागा व बोला. त्यांच्या कानावर सहजी ही गोष्ट घाला की डोंगरी किल्लयातून पळून गेलेले लोक तुमच्या भुयारातल्या किल्लयात लपून बसले आहेत. समजले?"

"यात न समजण्यासारखे काय आहे? हे काम आमच्या गुरुवर्यांचेच नसून आमच्या राजाचे सुद्धा आहे. आम्ही घोडेस्वारांना भेटून त्यांना तुम्ही सांगितल्याप्रमाणे सांगून आपले काम पुरे पार पाडू. तुम्ही अगदी निश्चिंत रहा!" गुरु भल्लूकाचे शिष्य म्हणाले.

"तरमग निघा, उशीर करू नका." जीवदत्त त्यांना म्हणाला.

दोघां अस्वल जातीच्या शिष्यांनी आपल्या गुरूला साष्टांग नमस्कार केला. गुरु भल्लूकाने त्यांच्या डोक्यावर हात ठेवून जरा निश्चयी स्वरात म्हटले—"ते घोडेस्वार शत्रू आहेत. तुम्हांला हेर समजून त्यांनी किती त्रास दिला तरी आपले गुपित बाहेर पडू देऊ नका. कदाचित ते तुमचा छळ करतील जीव घेतील तरी तोंडावाटे चकार शब्द निघता कामा नये. लक्षात ठेवा."

गुरु भल्लूकाच्या दोघां शिष्यांनी मान वांकवून म्हटले—"गुरुवर्य! आपली आज्ञा



म्हणजे वृकेश्वरीची आज्ञा आहे, हे आम्हांला कळते!" असे सांगून दोघे निघाले.

दोघे बराच वेळ जंगलात, घोडेस्वार कोठे दिसतात का पहात, हिंडले. दुपार उलटल्यावर एका झाडाखाली त्यांना घोडेस्वार विश्रांती घेत असलेले दिसले. त्यांच्या हालचालीवरून ते कोणाच्या तरी शोधार्थ हिंडून आता दमून गेलेले दिसत होते.

घोडेस्वारांना झाडांच्या आड पाहून अस्वल जातीच्या दोघां शिष्यांनी पुढे काय करायचे याविषयी आपसात थोडा विचार केला आणि मोठ्याने एकदम ओरडू लागले—"गुरु भल्लूक! आपण कोठे आहां? आम्ही दोघे येथे आहो."



ते ऐकून झाडाखाली विश्रांती घेत बसलेले घोडेस्वार दचकून तो आवाज ऐकू आला तिकडे पाहू लागले. त्यांच्या नायकाने तलवार उपसली आणि आपल्या अनुयायांना म्हणाला—"आम्ही पूर्वी अस्वल जातीच्या लोकांविषयी ऐकले होते, तेच हे लोक असावेत. आपल्याला हा नवा धोका आहे. चला, पाहूया, ते किती जण आहेत? परंतु सावध रहा. सावधपणेच पुढे पाऊल टाकले पाहिजे."

घोडेस्वारांना येत असलेले पाहून अस्वल जातीचे दोघे शिष्य आपल्या हातातल्या तलवारी खाली जमिनीवर ठेवून हात जोडून म्हणाले—"स्वार हो! आमचा जीव घेऊ नका. आम्ही तुमच्याजवळ शरण मागत आहो. आमच्या गुरूला कोणी तरी शत्रूने धरले असावे. आतां आम्ही जिवंत राहून तरी कोणासाठी जगणार?"

घोडेस्वारांचा सरदार चकित होऊन म्हणाला—"तुमच्या गुरूला शत्रूने धरले आहे का? कोण आहे तो शत्रू?"

भल्लूकाच्या शिष्यांपैकी एक जण म्हणाला—"मालक! आज उजाडताच उंटावर बसून अचानक काही लोक आले आणि आमच्या भुयारातल्या किल्ल्यात शिरले. त्यावेळी आम्ही वृकेश्वरी देवीच्या पूजेत गर्क होतो. म्हणून आम्ही त्यांच्याशी दोन हात करायला जाऊ शकलो नाही. त्या दुष्टांनी आमच्यापैकी काही जणांना ठार केले. त्यांच्या हातांतून स्वतःला वांचवून आमचे गुरू आणि आम्ही भुयारातल्या किल्ल्यातून बाहेर आलो आणि जंगलात दबा धरून बसलो आहो. परंतु आमचे गुरु कोठें दिसत नाहीत. आम्ही त्यांच्या शोधार्थ हिंडतो आहों."

भल्लूक जातीच्या लोकांच्या तोंडी ते सर्व ऐकल्यावर वीरपूरच्या नायकाला वाटले की डोंगरी किल्ल्यातून उंटावर पळून आलेले आपलेच शत्रू असावेत. त्याने आपल्या अनुयायांना डोंगरी किल्ल्याच्या दिशेने जाऊन सेनापतीला ती बातमी देण्यासाठी जायला सांगितले. म्हणाला—"तुम्ही सेनापतींना जाऊन सांगा की, आपला शत्रू इकडील प्रदेशात एका भुयारी किल्ल्यात शिरून लपून बसला आहे. ते सैन्य घेऊन आले तर त्या भुयारी किल्ल्यात शिरून शत्रूला कैद करतां येईल."

दोघे घोडेस्वार डोंगरी किल्ल्याच्या दिशेने निघाले. त्यानंतर घोडेस्वारांचा नायक भल्लूकाच्या शिष्यांना म्हणाला—"तुम्ही आमच्या शत्रूची लपून बसण्याची जागा दाखवून आम्हांला जी मदत केली आहे त्याबद्दल आमचे सेनापती आल्यावर तुम्हांला इनाम मिळेल."

इनामाचे नाव ऐकतांच दोघे शिष्य त्यांना इनामाचा मोह नसल्याचे दर्शवीत म्हणाले—"आम्ही वृकेश्वरीदेवीचे उपासक आहो. आम्हांला इनामाची गरज नाही. आमचे गुरुवर्य जिवंत सांपडले की पुरे. तरमग आम्हांला निरोप द्या. आम्ही आमच्या गुरूच्या शोधार्थ निघतो." असे म्हणत दोघे तेथून निघाले.

लगेच घोडेस्वारांचा नायक घोड्यावरून खाली उतरला आणि दोघांपैकी एका शिष्याचा हात धरून म्हणाला—"कोठे निघालात? थांबा! तुमचा तो भुयारी किल्ला कोठे आहे, हे आम्हांला कसे कळणार? तुम्हीच तो दाखविला पाहिजे. लक्षात असू द्या."



"मालक तो भुयारी किल्ला तर अगदी जवळ आहे. तेथपर्यंत जाणारा रस्ता आम्ही दाखवून देतो. त्या किल्ल्यात आमचे गुरु उंटावरून आलेल्या लोकांच्या हाती कैदेत पडले असतील तर त्यांना सोडविण्याची जबाबदारी तुम्हांला घ्यावी लागेल." एक शिष्य म्हणाला.

"त्या किल्ल्यावर अधिकार झाल्यानंतर राजभक्त कोण आणि राजद्रोही कोण हे आमचे सेनापतीच ठरवितील. आपण सर्व त्या भुयाराच्या किल्ल्याकडे जाऊ या. तोपर्यंत तुम्ही या झाडाखालीच थांबा." घोडदलाचा नायक म्हणाला.



तिकडे दोघां घोडेस्वारांनी वीरपूरच्या सेनापतीला उंटावरून पळून गेलेले शत्रू भुयाराच्या तुरुंगात लपून बसले असल्याचे सांगितले, तेव्हां त्याला फार आनंद झाला. म्हणाला–"याचा अर्थ असा की ते सर्व राजद्रोही एकाच जागी लपून बसले आहेत! त्या सर्वांना कैद करून वीरपूरला घेऊन गेले पाहिजे. राजधानीभर त्यांची धिंड काढून शेवटी त्यांना फांशीची शिक्षा केली पाहिजे. पुढे असा राजद्रोह करणाऱ्यांना चांगला वचक बसेल."

त्यानंतर वीरपूरचा सेनापती काही घोडेस्वारांना व सैनिकांना बरोबर घेऊन घोडदलाचा नायक होता त्या दिशेने चालू लागला. खड्गवर्मा व जीवदत्त यांचा अंदाज खरा ठरला. भल्लूकच्या शिष्यांच्या थापांवर विश्वास करून वीरपुरचे सैनिक भुयाराच्या किल्ल्यावर हल्ला करणार. त्याप्रमाणे घडतांच दोघे वीर गुरु भल्लूकाला, समरबाहूला आणि गुरु भल्लूकाच्या सर्व शिष्यांना बरोबर घेऊन भुयाराच्या किल्याकडे निघाले.

थोड्या वेळाने सेनापती घोडदलाच्या नायकाला भेटला. त्याने गुरु भल्लूकाच्या शिष्यांकडे बोट दाखवून सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या आणि उत्साहाने म्हणाला–"सेनापती! ते सर्व राजद्रोही आतां आपल्या जाळ्यात सांपडलेच."

सेनापतीने भल्लूकाच्या शिष्यांना आपली तलवार दाखवून विचारले–"ए अस्वल जातीच्या मूर्खांनो! तुम्ही खरे बोलतां आहां की खोटे? तुमच्या गुरूची यांत काही लबाडी दिसते आहे!"

भल्लूकाचे शिष्य तलवार पाहून थोडेदेखील न घाबरतां म्हणाले–"मालक! आम्ही वृकेश्वरी देवीचे स्मरण करून बोलतो आहो, आम्ही म्हणालो त्यांत काही खोटे नाही, सर्व खरे आहे. उंटस्वारांचा वध करून आपण भुयाराच्या किल्ल्यावर अधिकार करावा आणि तो किल्ला आमच्या गुरुवर्यांना परत देण्याची कृपा करावी."

"अरे होय! परंतु आत लपलेल्यांना पहिल्याने बाहेर तर काढ दे. त्यानंतर तो किल्ला कोणाला द्यायचा या गोष्टीचा विचार करतां येईल." सेनापती म्हणाला. नंतर तो आपल्या सैनिकांना म्हणाला–"तुम्ही सर्व काही गडबड गोंधळ केल्याशिवाय गुपचुप किल्ल्यात शिरा. ए भल्लूकांनो! तुम्ही दोघे व्हा पुढे आणि आम्हांला वाट दाखवा! यात काही लबाडी लुच्चेगिरी केल्याचे आढळले तर जागच्या जागी तुम्हाला उभे चिरून काढू!"

भल्लूकाचे शिष्य वाट दाखवायला पुढे निघाले. त्यांच्या पाठीमागून सेनापती व सैनिक भुयाराच्या किल्ल्यापर्यंत येऊन पोचले. त्यावेळी त्या किल्ल्याच्या दारांत माणसाचे एक पिल्लूदेखील नव्हते. चारी बाजूला उंच झाडे, टेकड्या आणि झुडपे होती आणि सर्व जागा अगदी शांत होती.

सेनापती सर्वांत प्रथम घोड्यावरून खाली उतरला. त्याने भुयाराच्या दाराजवळ येऊन आंत वाकून पाहिले आणि मोठ्याने हांक मारीत म्हणाला–"भुयारात लपून बसलेल्या माझ्या शत्रूंनो! वर मी, म्हणजे वीरपूरचा सेनापती मोठे सैन्य घेऊन आलो आहे. दोन तीन मिनिटात तुम्ही सर्व आपापली हत्यारे भुयारात टाकून निमूटपणे बाहेर या आणि माझ्याजवळ शरण मागा. नाही तर मी आत येऊन तुमची सर्वांची डोकी उडवीन!"



परंतु भुयारातून सेनापतीला त्याच्या आवाजाच्या प्रतिध्वनी खेरीज काहीच ऐकू आले नाही. तो दोन तीन मिनिटे उत्तराची वाट पहात थांबला. नंतर दातओठ चावीत आपल्या सर्व घोड्यांना झाडाखालीच सोडून येण्यास त्याने घोडेस्वारांना आज्ञा केली. घोड्यांवर पाहऱ्यासाठी दोघां घोडेस्वारांना नेमण्यात आले. सर्व एकत्र जमल्यावर सेनापतीने भल्लूक शिष्यांना आज्ञा केली–"अरे व्हा पुढे! तुम्हांला आतल्या सर्व वाटा माहीत आहेत. म्हणून वाट दाखवीत चला पुढे!"

भल्लूकाचे शिष्य निमूटपणे चालू लागले त्यांच्या पाठोपाठ सेनापती व त्याचे सैनिक आत उतरले ते दृष्टोआड झाल्यावर अस्वल जातीचे चौघे जण अचानक झाडीतून बाहेर आले. त्यांनी दोघां घोडेस्वारांवर भाल्यांचा हल्ला सुरु केला. नंतर असहाय स्थितीत तडफडत असतां त्यांना अस्वल जातीच्या लोकांनी खांद्यावर उचलून झाडीत दूर नेऊन फेकून दिले.

त्याच वेळी जीवदत्त समरबाहू आणि गुरु भल्लूकाला घेऊन तेथे आला. म्हणाला–"भल्लूक! तुझ्या शिष्यांनी विनाकारण त्या दोघांना घायाळ करून झाडीत फेकून दिले. फक्त त्यांना जिवंत स्थितीत मुस्क्या बांधून दूर ठेवले असते तरी पुरले असते.

गुरु भल्लूक त्याचे उत्तर काय देणार? अपराध्यासारखा खाली मान करून उभा राहला. समरबाहू घोड्याकडे पाहून उत्साहाने म्हणाला–"जीवदत्त! माझ्या अनुयायांना स्वारीला उंटाबरोबर आतां घोडेदेखील मिळणार म्हणावयाचे!"

[illegible] चालू नकोस, शत्रूचे निमूलन झाले आहे समरबाहू! आतां आपल्यासमोर एक मोठा प्रश्न आहे. वीरपूरच्या सेनापतीला कसे जिवंत कैद करावयाचे? भुयारांत राहणाऱ्यांना भीती दाखवायला एक उपाय करतां येण्यासारखा आहे. तू आपल्या अनुयायांना वाळक्या काटक्या जमवून त्यांचा जाळ भुयाराच्या दारावर केला पाहिजे."

अस्वल जातीचे लोक व समरबाहूचे अनुयायी जवळपासच्या काटक्या गोळा करून घेऊन आले आणि आतां भुयाराच्यादारासमोर त्या पेटविणार इतक्यात जीवदत्तने एकदां भुयारात वांकून पाहिले व ओरडून म्हणाला–"ए वीरपूरच्या सेनापती! तू व तुझे सैनिक आपापली हत्यारे भुयारात टाकून निमूटपणे बाहेर या. असे केले नाहीत तर राजा समरबाहू याचे सैनिक आणि रानटी तरुण भुयारात उतरून तुमची कत्तल करतील!" (क्रमशः)





# पुरुषद्वेष

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू हे जे कष्ट सहन करीत आहेस ते पाहून विश्वमित्रासारखा तूसुद्धा पत्नीने दाखविलेल्या पुरुषद्वेषाचे परिणाम भोगतो आहेस की काय, अशी शंका मला वाटले आहे. मी तुला त्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी श्रीपुरम् या गावी विश्वमित्र नावाचा एक श्रीमंत तरुण रहात असे. तो उदार स्वभावाचा आणि थोर मनाचा होता. तो वयाने लहान असतांच त्याच्या नातेवाइकांनी, घरात दुसरे कोणी मोठे नाहीत असा विचार करून. त्याच्या शिक्षणाची

## वेताळाच्या गोष्टी



व्यवस्था केली आणि एका सुंदर मुलीशी त्याचे लग्न करून दिले आणि आपली जबाबदारी पार पाडून ते मोकळे झाले.

विश्वमित्रची बायको मित्रविंदा दिसायला फार सुंदर होती, परंतु पतीशी तिचा व्यवहार एका जबाबदार गृहिणीसारखा नसे. ती नवऱ्याशी थोडी फटकळपणानेच वागे. नवरा जवळकाही विचारायला आला की साप किंवा विंचू जवळ आल्यासारखी ती ओरडे आणि वागे. तिच्या या वागणुकीमुळे त्याला वाटे की त्याच्याशी तिचे लग्न तिच्या आईवडिलांनी तिच्या इच्छेविरुद्ध करून दिल्यामुळे ती तशी वागत असेल. परंतु तिच्या बोलण्यावरून [illegible] मनातली ती शंकादेखील दूर झाला. तिची ती विचित्र वागणूक फक्त नवऱ्याबरोबरच होती असे नसून सर्व पुरुषजातीविषयी तिच्या मनात एक क्रोध व घृणा असल्याचे त्याला कळून आले.

"पुरुष म्हणजे शुद्ध पिशाच्च व भुते असतात. म्हणून कोणत्याही अक्कल असलेल्या बाईने लग्न म्हणून करू नये! मला लग्नच करायचे नाही, असे किती सांगितले. पण माझे ऐकतो कोण?" ती म्हणाली.

ते ऐकून विश्वमित्राच्या मनात आशेचा अंकुर रुजला. सर्व पुरुष नरपशू नसतात हे स्वतःच्या प्रेमळ वागणुकीने बायकोला पटवून देऊन तिच्या मनाची खात्री झाली तर कदाचित तिचा स्वभाव बदलेल असे त्याला वाटले. संसारात पडून मुलेबाळे झाल्यावर काही तरी अनुकूल बदल नक्कीच होईल असे वाटून त्याने प्रेमळ वागणुकीने संसार थाटायचे ठरविले.

परंतु त्याच्या पदरी निराशाच आली. त्याच्या दांपत्यप्रेमाचा तिच्या मनावर यत्किंचित ही परिणाम झाला नाही. मध्यंतरी तिला दिवस गेल्याचे कळल्यावर त्याला वाटले की ती आई झाल्यावर तरी तिच्या स्वभावात नक्कीच बदल होईल.

देवाच्या कृपेने मित्रविंदाला दोन जुळ्या मुली झाल्या. परंतु तिच्या मनातला पुरुष-



विषयी द्वेषभाव कमी होण्या[illegible] वाढला. कारण प्रथम नवऱ्याशी जुळवून घेणे तिला अशक्य होते आणि आता तर आणखी दोन मुली गळ्यात येऊन पडल्या होत्या.

अर्थातच विश्वमित्रच्या मनात जो आशेचा एक अंकुर रुजला होता तोदेखील करपून गेला. म्हणून तो एकदा बायकोला किंवा शेजारपाजारच्या कोणाला काही सांगितल्याशिवाय अरण्यवास करण्यास निघून गेला.

रानात त्याला शतवृद्ध नावाचा एक अत्यंत वृद्ध असा एक सिद्धयोगी भेटला. तो विश्वमित्रला म्हणाला—"बाबारे! तुला तसे घाईचे काही काम नसले तर एक घडीभर थांब. मला कामरूप सिद्धी प्राप्त आहे, मी तुला ती शिकवून देईन. त्याबद्दल तू एक उपकार माझ्यावर केले पाहिजेस. माझ्या या देहाला मृत्यूनंतर अग्नी दे आणि तू आपल्या वाटेने निघून जा."

विश्वमित्र त्या गोष्टीस कबूल झाला. त्या सिद्ध पुरुषाने विश्वमित्रला कामरूप सिद्धी शिकवून दिली आणि देहत्याग केला. विश्वमित्रने त्या सिद्धाचा अग्निसंस्कार केला. तो चितेसमोर उभा असता त्याला एक गोष्ट सुचली. तो लगेच मागे फिरला आणि सरळ श्रीपुर येथे परत आला.

तो आपल्या गावी पोचला त्यावेळी मध्यरात्र उलटून गेली होती. त्याने कामरूप विद्येचा उपयोग करून स्त्रीरूप धारण केले आणि त्याच्या घरासमोर रहात



      





असलेल्या देवदत्त नांवाच्या एका तरुण माणसाच्या दारावर थाप मारली.

देवदत्त एकाएकी झोप मोडल्याने अर्धवट झोपेतच उठून आला आणि दार उघडल्या-बरोबर त्याला अप्सरेसारखी एक सुंदर स्त्री दिसली. तिला पाहिल्यावर त्याची झोप उडाली आणि तो चांगला जागा होऊन आश्चर्याने त्या स्त्रीकडे पाहू लागला.

"माझे नाव सुमित्रा. मी फार दूर प्रदेशात राहणारी आहे. मी आपल्या आई-वडिलांबरोबर या प्रदेशात यायला निघाले होते. वाटेत चोरांनी आम्हांला लुटले. मी कसाबसा आपला जीव वांचविला आणि चोरांची नजर चुकवून पाय काढला. मला तुमचेच गाव जवळ दिसले. मला आजची रात्र तुमच्याकडे उतरायला सोय करून देऊ शकाल का?" असे स्त्रीरूपांत असलेल्या विश्वमित्राने देवदत्तला विचारले.

"रहा ना, मला हरकत नाही. उद्यां-तरी तू कोणाकडे जाणार? मी तुझ्या बरोबर लग्न करून घेतो. आपण दोघे या घरात संसार थाटू या." देवदत्त म्हणाला.

सुमित्रा त्या गोष्टीस कबूल झाली. दुसऱ्या दिवशी दोघांचा शास्त्रोक्त विधीने विवाह झाला. हळूहळू मित्रविंदा आणि सुमित्रा या दोघांचा परस्परांशी स्नेह वाढत गेला. सुमित्रेला मित्रविंदाच्या मुली फार आवडत. ती त्यांचे सर्व लाड पुरवी आणि त्यांना प्रेमाने खेळवी. त्या जुळ्या मुलींना स्वतःच्या आईपेक्षा सुमित्राच फार जवळची वाटू लागली.

सुमित्रा नेहमी आपल्या नवऱ्याच्या गोष्टी सांगे आणि तिला मुलांची फार आवड असल्याचे पण सांगे. मित्रविंदाला ते ऐकून फार आश्चर्य वाटे. हळूहळू मित्र-विंदाच्या स्वभावात बदल होऊ लागल्याचे सुमित्राला दिसू लागले. तिला तिच्या मुली आवडू लागल्या. त्यांच्याबरोबर बोलण्यात व खेळण्यात तिला आनंद वाटू लागला.

एके दिवशी ती सुमित्राला म्हणाली—"ताई! तुमचे आयुष्य कसे सुखाचे, वसंत ऋतूतल्या बहरून आलेल्या लतेसारखे आहे, आणि माझे शिशिर ऋतूतल्या पाने गळून पडलेल्या कोरड्या बाभळीसारखे आहे!"

त्याच्या बायकोच्या स्वभावात पूर्ण बदल होत गेलेला स्त्रीरूपात असलेल्या विश्व-मित्रच्या लक्षात आल्याशिवाय राहिला नाही. त्याने कामरूप विद्येचा पुन्हां प्रयोग करून आपले पुरुषरूप धारण केले आणि मित्रविंदाला म्हणाला—"तू आपल्या वागणु-कीने माझ्या मनात स्त्रीजातीविषयी एक राग उत्पन्न केला होतास. ती माझी गैर-समजूत असेल कदाचित! परंतु तुझी तशीच वागणूक होती खरी!"

मित्रविंदाच्या डोळ्यात आनंदाश्रू आले व पतीचे पाय धरून ती म्हणाली. सर्वच बायका अशा असतात असे कां वाटले तुम्हांला? माझ्यामुळे तुम्ही अरण्यवास करण्याऐवजी आणखी एखाद्या स्त्रीशी लग्न कां करून घेतले नाहीत? तुम्हांला इतके कष्ट पडले नसते!"

"आणखी एखादीशी लग्न करायचे असते तर मी जंगलात गेलोच नसतो. मी जंगलात गेलो त्याला कारण तू नव्हतीस, मी तुझ्यात कांही बदल करून दाखवू शकलो नाही, या गोष्टीचे मला अपरंपार दुःख वाटत होते. मी तुला पत्नी मानून तुझ्याशी लग्न केले होते. तुझ्या वागण्याकडे



पाहून मी ते केले नव्हते." विश्वमित्र म्हणाला.

तेव्हांपासून दोघांचे परस्परांवर प्रेम वाढत गेले आणि दोघांचा संसार सुखाचा झाला. आपल्याहून जास्त सुखी दुसरी कोणती गृहिणी असणार असे मानून मित्र-विंदा संसारसुख उपभोगू लागली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"एकाहून एक सुंदर रूपे घेणे शक्य असून विश्वमित्राने एका स्त्रीचेच रूप कां घ्यावे? घेतले तर आपल्याच घरा-शेजारी राहण्याचा हेतू त्याच्या मनात काय होता? पुरुषांत नवीन असा कोणताही गुण दिसल्याशिवाय मित्रविंदाने पुरुषजातीचा

द्वेष करण्याचे कसें काय सोडले? या सर्व प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर, तुला परिणाम माहीत आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"स्त्री व पुरुषजीवनात सुखदुखाचे सहभागी असतात. त्यांचे परस्परांवर प्रेम वाढण्याचे किंवा न वाढण्याचे कारण त्यांचेच जीवन आहे. परस्परांशी व्यवहारात काही उणीव राहली नाही तर स्त्रीच्या मनात पुरुषद्वेष, किंवा पुरुषाच्या मनात स्त्रीजातीविषयी द्वेष उत्पन्न होण्याचे कारणच उरत नाही. मित्रविंदाच्या मनात केवळ पुरुषद्वेष होता असे म्हणणे चुकीचे होईल. तिच्या मनात स्त्रीजातीविषयी सुद्धा द्वेष होता. म्हणूनच तिला लग्न करायचे नव्हते. स्त्रीला दांपत्य-जीवन घालविण्यात साहजिक सुख वाटते आणि मातृत्व हे तिला प्राकृतिक असते या गोष्टी तिला आवडत नसत. विश्व-मित्राने तिच्या मनात स्त्रीद्वेष आहे [illegible] कळल्याने तिला स्त्री समजून सुखी करण्याचा जो प्रयत्न केला त्यामुळेच तो अयशस्वी झाला. स्त्रीच्या मनात खरोखरच पुरुषद्वेष असतो का हे कळावे म्हणूनच त्याने स्त्रीरूप घेतले होते. स्त्रीजीवनात आनंद असतो हे तिला कळल्यानंतर बायको-बरोबर संसारसुखाचा लाभ घेता येईल असा विचार करून त्याने स्वतःच्या घरा-शेजारीच राहण्याचे ठरविले. स्त्रीच्या मनात नवऱ्याविषयी किंवा मुलांविषयी द्वेष भाव नसतो हे त्याला कळले. मित्रविंदाच्या मनात बदल झाला तोदेखील स्त्रीविषयी तिच्या मनात जो द्वेष खोलवर रुजला होता तो दूर झाल्यानंतरच झाला. सुमित्राचेजीवन पाहून तिच्या मनातला स्त्रीद्वेष दूर झाला होता. स्त्रीजातीचा द्वेष दूर होताच पुरुषजाती-विषयी असलेला द्वेषदेखील नाहीसा झाला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ पुन्हा प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# सन्मित्र

एका श्रीमंत व्यापाऱ्याला एकुलता एक मुलगा होता. त्याच्या भोवती उडाणटप्पू खुशाल चेंडू मुलांचा नेहमी घोळका असे. बापाने मुलाला पुष्कळ समजावून सांगितले की बाळ, अशा मुलांच्या संगतीत आपला वेळ फुकट घालवू नकोस. परंतु त्याचा त्याच्या लबाड मित्रांवरच जास्त विश्वास होता. म्हणून त्याने बापाच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले.

मुलावर आपल्या उपदेशाचा काहीच परिणाम होत नाही हे पाहून बाप एकदा त्याला म्हणाला–"बाळ! व्यापारासाठी आपल्याला परदेशात जावे लागणार आहे. आपल्याकडे जे दागदागिने आहेत ते आपण कोणाकडे तरी सुरक्षित ठेवून दिले पाहिजेत." मुलाने लगेच आपल्या एका मित्राचे नाव सुचविले. बापाने एकापेटीत सर्व दागिने ठेवून मुलाच्या हाती ती त्याच्या मित्राकडे पाठवून दिली. नंतर दोघे परदेशात व्यापारासाठी निघून गेले.

काही दिवसांनी दोघे परदेशात व्यापाराची कामे उरकून परत आले. बापाने मुलाला सांगितले, मित्राकडे जाऊन दागिन्यांची पेटी घेऊन ये. मुलगा रागाने घरी परत येऊन म्हणाला–"बाबा! माझा मित्र म्हणाला–"पेटीत सर्व दगड होते."

बाप म्हणाला–"ते त्याला पेटी उघडल्यावरच ना कळले?" नंतर पुढे म्हणाला–"मी माझ्या एका मित्राकडे दागिने पेटीत घालून ठेवले आहेत. तू ती पेटी घेऊन ये."

मुलाने पेटी आणून दिली. बापाने पेटी उघडली. त्यातदेखील दगडच होते.

मुलाला आश्चर्य वाटले. तेव्हा बाप म्हणाला–"तुझ्या मित्राने पेटी उघडून पाहिली व माझ्या मित्राने पाहिली नाही. हाच फरक मित्रामित्रात असतो." तुला हा बोध व्हावा म्हणून मी हे सर्व नाटक केले होते. दागिने दुसरीकडे तिजोरीत सुरक्षित आहेत.







# श्रमाचे वजन

गणू या जगात एकटा होता. तो गावातल्या लोकांकडे जे मिळेल ते काम करून ते देत त्यावर आपला उदरनिर्वाह चालवी. त्याचे लग्नाचे वय झाले. आपण लग्न करून एक गृहस्थ व्हावे असे त्याला वाटू लागले. त्याच्या गंगाराम मामाला एक मुलगी होती. तिच्याशी आपले लग्न झाले तर बरं होईल, असा विचार करून तो आपल्या मामाकडे गेला म्हणाला– "मामा! मला जांवई करून घेता का?"

"घर नाही की दार नाही चार पैसे मिळवायची लायकी नाही आणि म्हणे लग्न करून देता का? तू शंभर रुपये आणून दाखव, मी तुझे लग्न करून देतो." त्याचा मामा म्हणाला.

"शंभर रुपयेच ना? डोंगरापलीकडच्या गावी पुष्कळ कामे मिळतात. मी तिकडे जाऊन एका वर्षाच्या आत शंभर रुपये घेऊन येतो. परंतु तोपर्यंत तुम्ही थांबलं पाहिजे आणि माझ्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले पाहिजे." गणू म्हणाला.

"कबूल, एका वर्षभरात शंभर रुपये मिळवून आणून दाखव!" मामा म्हणाला.

गणू त्याच दिवशी निघाला आणि डोंगरापलीकडच्या गावी आला. त्या गावात खरोखरच पुष्कळ कामे मिळत. शंभर रुपये एका वर्षात मिळविणे तेवढे कठीण नव्हते.

गणू एका श्रीमंत माणसाच्या घरी जाऊन म्हणाला–"काय हो, मी शेजारच्या गावचा एक मजूर आहे, काम करून चार पैसे मिळवायला आलो आहे. तुमच्या आवारात झोपडे बांधून रहावे म्हणतो." त्या श्रीमंताने त्याला होकार दिला.

गणू त्याच दिवसापासून त्या श्रीमंताच्या आवारात झोपडे बांधून राहू लागला. तो दररोज जे पैसे मिळत ते एका मडक्यात साठवू लागला. एक चांदीचा रुपया मिळण्याइतके पैसे जमा झाले की लगेच एक रुपया घेऊन तो त्या मडक्यात टाकी. दररोज रात्री तो एकदा मडक्यात किती रुपये जमले हे उचलून पाही. आणखी किती रुपये जमवावे लागतील हिशोब करी. त्याला तोच एक विरंगुळा झाला होता.

एक वर्ष पुरे व्हायला झाले आणि मडक्यात शंभर रुपये जमले. तो सावकाराला जाऊन भेटला आणि म्हणाला– "काका! मी आपल्या गावी परत जायचा विचार करतो आहे. निरोप घ्यायला आलो आहे."



सावकाराने विचारले–"किती रुपये जमविलेस रे तू? आमच्या गावी येणारे लोक कधी रिकाम्या हाताने गेलेले मी पाहिले नाहीत!'

गणू आपल्या गाठोड्यातले मडके बाहेर काढून दाखवीत म्हणाला–"जास्त नाहीत, बरोबर शंभर रुपये आहेत."

मडक्यात शंभर रुपये असल्याचे ऐकून त्या श्रीमंताच्या मनात एक दुष्ट विचार आला. तो गणूला म्हणाला–"काय रे, गावात नवखा म्हणून रहायला जागा दिली तर आमच्या घरातले हे मडके उचलून घेऊन पळण्याचा विचार करतो आहेस का? चल राजाकडे, तुला तुरुंगात पाठवितो."

त्या श्रीमंताने केलेली फिर्याद ऐकून राजाने गणूला विचारले–"काय रे तू हे पैसे स्वत: मिळविलेस की चोरलेस?"

गणू म्हणाला–"महाराज! डोंगरापलीकडच्या गावचा राहणारा आहे मी. मजुरी करून मी शंभर रुपये मिळविले आहेत हे. काम करून पैसे मिळवायला आलो होतो चोरी करायला नव्हतो आलो. मी स्वत:चा घाम गाळून मिळविले आहेत हे पैसे. बरोबर शंभर रुपये आहेत हे."

"खोटे! हे सर्व खोटे आहे. मी बायकोचे दागिने करण्यासाठी या मडक्यात शंभर रुपये जमा केले होते. मी बोलताना केव्हां तरी या लबाडाजवळ ती गोष्ट सांगितली

    


होती. परंतु हा चोरी करील, याची स्वप्नात-देखील कल्पना केली नव्हती मी!"

राजाला काय करावे कळेना. दोघांचे म्हणणे खरे वाटत होते त्याला. ते ओळखून मंत्री म्हणाला–"महाराज! ते मडके येथेच ठेवून घ्यावे उद्याच्या सभेत आपण काय तो निर्णय द्यावा."

त्या दिवशी रात्री मंत्र्याने अगदी तशीच दोन मडकी मागवून एकात शंभर रुपयांहून दोन तीन रुपये कमी आणि एकात दोन तीन रुपये जास्त ठेवले आणि गणूने आणलेल्या मडक्या शेजारी ती दोन्ही मडकी ठेवविली.

दुसऱ्या दिवशी ठरल्या वेळी सभेत मंत्र्याने एका टेबलावर तिन्ही मडकी आणून ठेवली आणि त्या श्रीमंताला आल्याबरोबर विचारले–"काय हो यातले तुमचे मडके कोणते हे सांगाल का जरा!"

"सर्व मडकी एकाच सारखी आहेत. कशी ओळखता येतील?" तो श्रीमंत म्हणाला.

परंतु गणूने पुढे येऊन तिन्ही मडकी एकेक करून उचलून पाहिली आणि आपले मडके हातात घेऊन म्हणाला–"महाराज! हे आहे माझे मडके. या मडक्यात बरोबर शंभर रुपये आहेत. इतर मडक्यात दोन कमी तरी आहेत किंवा जास्त तरी आहेत."

त्याने दाखविलेल्या मडक्यातले रुपये काढून मोजून पाहिले तर बरोबर शंभर निघाले. गणू निर्दोष असल्याचे राजाला कळले. श्रमाचे वजन श्रम करणारालाच कळते. बसल्या जागी पैसे मिळविणारास कसे कळणार? राजाने त्या श्रीमंताला दोनशे रुपये दंड करून ते रुपये गणूला देवविले. गणू ते रुपये आणि स्वतःच्या मेहनतीचे शंभर रुपये असे तीनशे रुपये घेऊन आपल्या गावी गेला. त्याने ते आपल्या मामाला दिले. त्याचा मामा चकितच झाला. वचन दिल्याप्रमाणे त्याला त्याच्या मुलीशी गणूचे लग्न करून द्यावे लागले.

गणूचा संसार सुखाचा झाला.



# धाकट्या भावाचा वांटा

धर्मपुरी येथे धर्मात्मा नावाचा एक राजा राज्य करीत असे. तो गोरगरिबांना आणि विद्वानांना अन्नवस्त्र देऊन होईल ती मदत करी. तो म्हणे, माझी प्रजा म्हणजे माझीच धाकटी भावंडे आहेत. माझ्याजवळ जे काही आहे हे माझ्या या भावंडांचेच आहे."

ते ऐकून एका माणसाने राजवाड्यात जाऊन म्हटले–"मी महाराजांचा धाकटा भाऊ आहे. महाराजांना भेटायचे आहे."

राजाने त्याला दरबारात बोलावून विचारले–"काय पाहिजे आपल्याला?"

"मी आपली प्रजा, आपला एक धाकटा भाऊ आहे. आपल्या संपत्तीतला माझा वांटा जेवढा असेल तेवढा देवविण्याची व्यवस्था करावी." तो माणूस म्हणाला.

राजा आपल्या हिशेब तपासनीसास बोलावून म्हणाला–"जरा पहा तर आपल्या खजिन्यात एकंदर किती रुपये आहेत आणि आपल्या राज्यातली लोकसंख्या किती आहे? प्रत्येकाला त्याचा वांटा द्यायचे झाले तर त्याला काय मिळेल, हेदेखील सांगा."

त्या अधिकाऱ्याने गणित करून प्रत्येकाला अर्धी पै मिळू शकेल असे सांगितले.

परंतु राजा म्हणाला–"काही हरकत नाही, माझ्या या भावाला त्याच्या वांट्याच्या अर्ध्या पैऐवजी एक पै देऊन टाका."



























# पुडीवर दानपत्र

एकदा गोवळकोंडयाचा नवाब शिकारीला गेला असतां एका हरणाचा पाठलाग करीत दाट अरण्यात पोचला. त्याचे सर्व अनुयायी मागे राहून गेले.

दुपारची वेळ होती. ऊन कडक पडले होते. नवाबाला फार तहान लागली. परंतु जवळपास कोठे पाणी दिसेना. सुदैवाने त्याला आकाशात एका जागी पुष्कळ पक्षी उडत असलेले दिसले. त्यावरून जवळपास नक्कीच पाणी मिळेल या आशेने नवाब त्या दिशेला निघाला. लवकरच त्याला एक देऊळ दिसले. देवळाजवळ नक्कीच तलाव किंवा विहीर असणार असे वाटून त्याने देवाचे आभार मानले. म्हणाला–"अल्ला! तुझी मेहेर नजर असल्यावर कोणी पाण्यावांचून कधी मरेल का?"

देवळाशेजारी एक मोठे वडाचे झाड होते. थंडगार सावलीत त्याने घोडयाला बांधून ठेवले. जवळच नारळाच्या पाण्या-सारखे गोड पाणी असलेले एक कुंड होते. नवाबाने हात पाय धुवून पाणी पिऊन घेतले. नंतर घोडयाला पाणी पाजून झाडा-खाली विश्रांती घेत पडला.

त्याची झोप मोडली तेव्हां संध्याकाळ होऊन गेली होती. तो उठून उभा राहिला. किती काळोख पडला? एवढी का झोप मला लागली होती, असा विचार करीत त्याने कुंडावर जाऊन हातपाय धुवून घेतले आणि पाणी पिऊन पुन्हां झाडाखाली येऊन बसला. त्याने नमाज प्रार्थना केली आणि आज उपाशीच झोपावे लागणार, असा विचार करीत असता दूर त्याला एक दिवा दिसला. तो दिवा हळूहळू जवळ येत आहे असेदेखील त्याला वाटले. तो विचार त्याच्या मनात येताच त्याला थोडी भीतिदेखील वाटली. परंतु तो डोळे मिटून स्वस्थ पडून राहला.

मधूनमधून पाहणेदेखील चालू होतेच.

थोडया वेळाने त्या देवळाचा पुजारी तेथे आला. नवाब एकटा उपाशी पडला आहे हे कळल्यावर पुजाऱ्याने देवळातून थोडेसे सातूचे पीठ, गूळ आणि पाणी घालून नवाबाला खायला आणून दिले.

नवाबाला देव पावल्यासारखे झाले.

दुसऱ्या दिवशी पुजाऱ्याचा निरोप घेऊन निघतांना नवाबाने त्याला कागदावर एक दानपत्र लिहून दिले. त्यात पुजाऱ्याला जमीन दान केल्याचा उल्लेख होता. नंतर नवाब निघून गेला.

ती गोष्ट त्या जमिनीला लागून असलेल्या जमिनींच्या मालकाला कळली. ती जमीन गिळता आली तर गिळावी हा हेतू त्याच्या मनात पुष्कळ दिवसांपासून होता. परंतु ती जमीन एका भटाला फुकटात मिळालेली त्याला बघविली नाही. तो त्या पुजाऱ्याकडे गेला आणि नवाबाने लिहून दिलेले दानपत्र त्याच्याकडे मागितले. पुजाऱ्याने नकार दिला.

"माझ्या तोंडचा घास तू ओढून घेणार होय? पाहतो तुला तो कसा पचतो ते!" असे म्हणत त्याने त्या पुजाऱ्याला नोकरां-करवी एका झाडाला बांधवून खूप बडवून काढले. तेव्हां पुजाऱ्याने दानपत्र मागवून त्या दुष्ट माणसाला दिले.



त्या दुष्टाने त्या दानपत्राचे फाडून तुकडे केले आणि पुजाऱ्याला देऊन म्हणाला–"तूच हे खाऊन गिळून टाक, नाही तर तुला या कागदाच्या तुकडयांबरोबर कच्चा जाळून टाकीन."

अगदी नाइलाज झाल्यामुळे पुजाऱ्याने चघळून ते सर्व तुकडे गिळले.

पुढे काही दिवसांनी नवाब पुन्हा त्या वाटेने जात असता त्या देवळाजवळ आला. देवळाजवळच एक झोपडे दिसले. त्यातून पुजाऱ्याची मुले बाहेर येऊन उभी राहली. मुलांची हाडे बाहेर निघाली होती आणि अंगावरचे सर्व कपडे फाटलेले होते.

त्यांना पाहून नबाबाला आश्चर्य वाटले. त्याने दिलेल्या भूमीवर यांचा उदरनिर्वाह कां चालू नये! त्यांना त्या जमिनीवरची प्राप्ती पुरत नाही की काय?

तितक्यात लाकडे आणायला गेलेला पुजारी घरी परत आला. नबाब आला असल्याचे कळल्यावर तो त्याला जाऊन भेटला आणि देवळात जाऊन त्याने सातूचे पीठ कालवून खायला आणून दिले.

नबाबाने सातूचे पीठ खाल्ले आणि त्याची वाखाणणी करीत म्हणाला—"एक कागद घेऊन या, आणखी जमीन दान म्हणून लिहून देतो."

पुजारी म्हणाला—"सरकार! एक विनंती करावी म्हणतो. कागदावर आपण जे इनाम लिहून देणार आहां ते मला नको आहे."

"तरमग ताम्रपत्रावर लिहून देतो." नबाब म्हणाला.

"सरकार! तेदेखील नको मला. ते चावून खाणेतर जास्तच कठीण! ते पुरी- [illegible] सरकार!" पुजारी म्हणाला.

"अहो भटजी! वेडबीड लागले आहे का तुम्हांला? इनामाचे दानपत्र खाणार का आहांत तुम्ही!" नबाबाने विचारले.

"होय सरकार! खावेच लागणार!" पुजारी म्हणाला.

"तुम्ही वेड्यासारखं बोलता आहां. तुम्ही मी लिहून दिलेले दानपत्र मामलेदाराला दाखविलेत तर तो तुम्हांला ती जमीन देईल. म्हणजे मी लिहून दिलेली जमीन अद्याप तुम्हांला मिळाली नाही तर? होय ना?" नबाबाने विचारले.

पुजाऱ्याने घडलेले सर्व वृत्त सांगितले.

ते सर्व कळल्यावर नबाबाला भयंकर संताप आला. त्याने त्या दुष्ट माणसाला बोलावून नोकरांकरवी त्याला फटके देवविले. नंतर मामलेदाराला बोलावून दानपत्रात लिहून दिलेली जमीन पुजाऱ्याला देवविली. त्यानंतर पुजाऱ्याचे पुढील आयुष्य आनंदाने गेले.





# श्री हनुमान प्रसन्न

एका लहानशा खेडेगावात एक गरीब कुटुंब रहात असे. ते कातड्यांच्या बाहुल्याचा नाच पडद्यावर दाखवून त्यावर आपला उदरनिर्वाह चालवी. तोच त्यांचा धंदा होता. त्या कुटुंबात दोन जोडपी होती. दोघं म्हातारी आणि चार मुलेपण होती. दहादहा दिवस एकेका जागी राहून ते खेळ करीत. त्यावर सर्वांची पोटे भरत.

एकदां ते कुटुंब आपले सर्व सामान पोत्यात भरून आणि कातड्यांच्या बाहुल्या बांधून घेऊन निघाले आणि एका गावाच्या वेशीवर पोचले. तोंपर्यंत छान काळोख पडला होता. म्हणून जवळच एका वडाच्या झाडाखाली आसऱ्याला सोयीची जागा पाहून त्यांनी तेथेच मुक्काम करण्याचे ठरविले. जवळच एक स्वच्छ पाण्याचे तळेपण होते. त्यांनी खाऊन पिऊन घेतले आणि पथारी टाकून झाडाखालीच सर्व झोपले.

मध्यरात्र उलटून गेल्यावर एकाएकी त्यांची झोप मोडली. बरीचशी गर्दी येत असलेली दिसली. दूर बरीच घरे दिसली आणि घरात दिव्यांचा उजेडपण दिसत होता. लोकांची गर्दी त्या बाजूनेच येत होती.

गर्दीतल्या लोकांनी पुढे येऊन खेळ दाखवायला आग्रह केला आणि मध्यरात्रीच्या वेळी खेळ दाखविणे किती कठीण आहे, असे सांगितले. परंतु गर्दीतले लोक हट्टालाच पेटले. तेव्हां नाइलाज होऊन ते म्हणाले—

"अहो मांडव घालावा लागणार, दिवे लावावे लागणार, पडदे बांधावे लागणार, हे सर्व या मध्यरात्रीच्या वेळी कसे जमणार हो? शक्य नाही हो!"

"ते सर्व करून देण्याची जबाबदारी आमची. आज रात्री खेळ झालाच पाहिजे." जमलेले लोक म्हणाले.

झाले, जमलेल्या लोकांनी म्हटल्याप्रमाणे थोडयाच वेळात सर्व तयारी करून दिली. पंडाल उभा राहला आणि पुतळयांचा खेळ सुरू झाला. म्हातारीने प्रेक्षकांसमोर एक पंचा अंथरून ठेवला, म्हणजे ज्याला जेवढे पैसे देणे शक्य होईल तेवढे त्याला त्यात टाकता येतील.

पुतळयांचा नाच दाखविणारांपैकी एक दोघे जण गाऊ लागले व डफ वाजवू लागले. एक दोघे मोठमोठयाने ओरडत व निरनिराळे आवाज काढीत पडद्यावर पुतळयांचा नाच दाखवू लागले. लंकेत रावणाच्या दरबाराचे दृश्य होते. राक्षस ओरडत होते आणि राक्षसिणी नाचत होत्या. प्रेक्षक टाळया वाजवून खेळ दाखविणारांचा उत्साह वाढवीत होते.

त्यानंतर पडद्यावर लंकिणी आली. तिचा वध करण्यासाठी मारुती प्रगटला. पडद्या पाठीमागे लंकिणी व हनुमानाचे युद्ध सुरू झाल्यामुळे आरडाओरडा ऐकू येऊ लागला तर समोर प्रेक्षकांची गर्दी एकाएकी नाहीशी [illegible] पडद्याआडून सर्व मैदान मोकळे झालेले पाहिले. परंतु तिने अंथरले-ल्या पंचावर खूप पैसे पडलेले होते. तिने खेळ बंद करविला.

तेव्हां खेळ खेळणारे पडद्याच्या समोर येऊन पाहतात तर दूरवर जी घरे व दिवे लावलेले दिसत होते आणि ज्या लोकांनी खेळ दाखवायला सांगितले होते सर्वच अदृश्य झाले होते. तेव्हां त्यांना कळले की ते लोक म्हणजे भुते होती. मारुती पडद्यावर येताच ती पळून गेली. काय वाटेल ते होवो, पडद्यावर मारुती दिसत राहला पाहिजे असा विचार करून त्यांनी त्याच्या पुतळीची छाया पडद्यावर राहू दिली.

ते काही असो, त्यांची मेहनत फुकट गेली नाही. त्यांना खूप पैसे, बसायला आणलेल्या चटाया आणि दिवे वगैरे वस्तू फुकटात मिळाल्या भुतांपासून त्यांना मारुतीने प्रसन्न होऊन वांचविले आणि खूप मिळकत करून दिली.





# डोळे उघडले

एका गावी शंकरराव नावाचा एक फार खादाड मनुष्य होता. घरात एखादे चांगले पक्वान्न झालें असले तर तो एकटा 'ओ' येईपर्यंत खाई. घरातल्या इतर कोणाला खाऊ देत नसे, स्वतःच्या बायकोला किंवा मुलांनादेखील त्या पक्वान्नाला तो हात लावू देत नसे. पक्वान्नांची गोष्ट सोडूनच द्या, त्यांना दोन वेळचे पोटभर जेवायला देखील मिळत नसे. त्याला मात्र दिवसभर काही तरी चघळायला लागे. तो नेहमी काही तरी बाजारातून आणी आणि एकटा खाई. त्याच्या लहान मुलाने विचारलेच की 'बाबा! काय खाता आहां?' तर तो सांगे, "औषध आहे रे बाळ!"

शंकररावांच्या शेजारी रघुनाथराव नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. त्यालासुद्धा बायको व दोन मुले होती. त्याच्या घरात तसला पंक्ती प्रपंच नव्हता.

एकदा रघुनाथरावांचा मुलगा शंकररावांच्या घरी गेला. त्या वेळी शंकरराव वऱ्हांडयात संत्रे खात बसले होते आणि त्यांची दोन्ही मुले बापाच्या तोंडाकडे पहात आशा लावून बसली होती.

शंकररावांनी रघुनाथरावांच्या मुलाला आलेला पाहिले आणि खिसकावून विचारले–"काय रे काय काम आहे?"

तो म्हणाला–"चंदूला आणि सखूला खेळायला बोलवायला आलो आहे."

शंकरराव दोघां मुलांना म्हणाले–"जा रे, खेळायला, तो तुम्हांला बोलवायला आला आहे."

दोघं मुलं निघून गेली. रघुनाथरावांच्या मुलाने शंकररावाच्या मुलाला विचारले–"काय रे चंदू, तुझे बाबा संत्रं खात बसले होते आणि तुम्हांला कां नाही दिलं रे?"

"ते तसंच करतात रे!" दोघं म्हणाली.

श्री स. मु. जोशी

रघुनाथरावांचा मुलगा लगेच उठून म्हणाला—"तुम्ही दोघं बसा येथेच, हा मी आलोच!" असे सांगून तो रंगराव कुलकर्णी नावाच्या वैद्यबुवांकडे धावत गेला.

रघुनाथरावांचा मुलगा वैद्याकडे गेला तेव्हां ते घरातच होते. मुलाने वैद्यबुवांना नमस्कार केला आणि म्हणाला—"वैद्यबुवा! आमचे शेजारी शंकरराव आहेत ना? अहो ते फार आजारी आहेत! परंतु त्यांनी तुमच्याकडे निरोप नाही पाठविला, कारण तुम्ही आलात म्हणजे फी मागाल आणि औषधाचे पैसे पण द्यावे लागतील. तेव्हां काय वाटेल ते करून त्यांना वांचवा!"

रंगराव फार चांगले वैद्य होते. कोणी आजारी पडल्याचे त्यांना कळले की ते [illegible] धावत. पैसा मिळो की न मिळो, रोग्याची सेवा करून त्याला वांचविणे, हे आपले कर्तव्य आहे, असे ते मानीत. म्हणून ते औषधांची पिशवी घेऊन शंकररावांच्या घरी जणुकाही धावतच आले.

वैद्यबुवा आले तेव्हां शंकरराव व्हरांड्यात खुर्चीवर बसलेले होते. वैद्यबुवांना एकाएकी आलेले पाहून चकित झाले आणि उठून पुढे येऊन विचारू लागले—"कसं काय वैद्यबुवा! कशाला आलात?"

रंगराव स्मित करून म्हणाले—"असं काय? तुमची तब्येत बरी नाही, म्हणून कळले!"

"माझी तब्येत? उत्तम आहे! समोरच तर उभा आहे!" शंकरराव म्हणाले.

[illegible] नाही. मी एक पैसादेखील घेणार नाही तुमच्याकडून!" वैद्यबुवा म्हणाले.

शंकररावांना आतां मात्र फारच आश्चर्य वाटले. म्हणाले—"अहो पण माझी प्रकृती उत्तम आहे. कोणी सांगितले की माझी प्रकृती बिघडली आहे म्हणून? आणि समजा बिघडली तर तुमच्याकडून औषध घ्यायला छाती होईल का कोणाची? एवढे पैसे कोठून आणायचे? परंतु ते सोडा, मला काही झालं असलं तर ना? कोणी सांगितलं तुम्हांला बरं नाही म्हणून?"

आतां मात्र रंगरावांना राग आला. म्हणाले—"तो रघुनाथरावांचा कारटा आला होता बोलवायला!"

शंकररावांनादेखील राग आला. त्यांनी लगेच जाऊन त्याला बोलावून आणले. त्याच्याबरोबर शंकररावांची मुलेपण आली.

रंगरावांनी डोळे वटारून रघुनाथरावांच्या मुलाला विचारले—"काय रे, तूच ना म्हणालास की हे आजारी आहेत म्हणून? हे तर चांगले हिंडत फिरत आहेत!"

रघुनाथरावांचा मुलगा थोडादेखील घाबरला नाही. शांतपणे म्हणाला—"ते संत्रं खात बसले होते. मुलांना काही देत नव्हते. आमचे बाबा आम्हांला काही दिल्याशिवाय एकट्याने काहीच खात नाहीत. परंतु ते आजारी पडले म्हणजे मात्र पथ्य खात ते आम्हांला काही देत नाहीत."





"म्हणजे, मी आपल्या मुलांना खायला दिलं नाही यावरून मी आजारी आहे असं वाटलं होय तुला? आजारी पडलो असतो तर स्वतः वैद्यबुवांना नसते बोलाविले का?" शंकररावांनी चिडक्या स्वरात विचारले.

"मला वाटलं, तुम्ही आजारी आहां आणि जास्त खर्च होईल म्हणून औषध घेत नसाल. त्याला वाटलं की वैद्यबुवा पैसे घेतल्याशिवाय औषध देतात, हे कदाचित्त तुम्हांला माहीत नसेल. म्हणून तो वैद्यबुवांकडे धावला, बाबा!" शंकररावांचा मुलगा म्हणाला.

ते ऐकून शंकरराव जास्तच तापले. त्यांनी रघुनाथरावांच्या मुलाला विचारले— "तुला कोणी रे सांगितलं की मी पैसे जास्त खर्च होतील म्हणून वैद्यबुवांना बोलावीत नाही?"

"तसं नव्हे हो, आमचे बाबा आजारी पडले म्हणजे काही पथ्य म्हणून फळं वगैरे खातात. ते तेव्हां आम्हांला देत नाहीत. ते तेव्हां सांगतात, "बाळांनो! मनुष्य किती [illegible] खायला दिल्याशिवाय कधी स्वतः खाईल का? पण मी फुटक्या नशिबाचा. आज मला तुम्हांला काही दिल्याशिवाय एकट्याने खावं लागते आहे. म्हणून मला वाटलं की तुम्ही आजारी पडलां असाल!" रघुनाथरावांचा मुलगा म्हणाला.

ते ऐकून शंकररावांचे डोळे उघडले. स्वतःला सावरून रघुनाथरावांच्या मुलाची पाठ थोपटीत रंगरावांना म्हणाले—"रंगराव, याचे म्हणणे बरोबर आहे, मला बरेच दिवसांपासून बरं नाही. बरं झालं, हा मुलगा आपल्या घरी येऊन आपल्याला बोलावून घेऊन आला."

त्या दिवशी रात्री शंकररावांनी रंगरावांच्या आणि रघुनाथरावांच्या घरच्या सर्व मंडळींना बोलावून छान मेजवानी दिली. शंकररावांच्या मुलांना जणुंकाही आयुष्यात पहिल्याने गोड धोड खायला मिळाले. त्या पुढे त्यांना कधी बापाच्या तोंडाकडे पहात बसावे लागले नाही.



# अकलेचा कांदा

एका गावी एक कमी समजूत असलेला मनुष्य होता. त्याला सर्व 'अकलेचा कांदा' म्हणून हाक मारीत. त्याला वाटे, आपल्याला थोडी अक्कल मिळेल का पहावे.

एके दिवशी त्याने एका कोळ्याला विचारले—"काय रे, अक्कल कशी काय मिळेल?"

तो म्हणाला—"तू दररोज माशाचा मेंदू शिजवून खात जा."

तो वेडा एका रुपयाला माशाचे एक डोके याप्रमाणे दररोज विकत घेऊ लागला. कोळी डोक्याशिवायचा मासा एका रुपयाला विकून आणखी एक रुपया मिळवू लागला. असाच एक महिना गेल्यावर तो वेडा कोळ्याला म्हणाला—"काय रे, संबंध मासा एका रुपयाला विकतोस, मग फक्त डोक्याची किंमत तू एक रुपया कां घेतोस?"

तो कोळी स्मित करून म्हणाला—"कळलं की नाही, तुला अक्कल आली म्हणून तर तुला ही गोष्ट कळली?" ते ऐकून 'अकलेचा कांदा' मनाचे समाधान झाल्यासारखा निघून गेला.





# चोर सांपडला

सुबल हा एका गावी एका सुखवस्तू कुटुंबात लहानाचा मोठा झाला होता. तो शेजारच्या शहरात आपल्या इंद्रलाल नावाच्या मामाकडे राहून विद्याभ्यास करीत असे. इंद्रलालला जादूच्या गमती पुष्कळ करता येत होत्या.

सुबल दर सुट्टीत आपल्या गावी येत असे. एकदां उन्हाळयाच्या सुट्टीत तो आपल्या गावी आला. गावात त्याला त्या दिवशी लोक आनंदात असल्यासारखे दिसले.

"आज गावात असे काय आहे बुवा? सणबीण तर काहीच नाही. पण लोकांची एवढी धांवपळ कशासाठी बरे चालू आहे?" त्याने सुशील नावाच्या त्याच्या मित्राला विचारले.

"अरे, तुला माहीत नाही का? आपल्या गावी एक थोर महापुरुष आले आहेत. साक्षात् देवाचा अवतारच समज! आपण मागावी ती वस्तू ते तत्काळ दाखवितात. ते पाण्यावर चालतात, विस्तवावर चालतात आणखी आकाशात सुद्धां उडतात म्हणे!" सुशील उत्साहाने वर्णन करून सांगत होता.

परंतु सुबलला ते सर्व खरे वाटले नाही. त्याने आपल्या मित्राला विचारले—"तू स्वतः हे सर्व पाहिलेस का?"

"मी नाही पाहिले बुवा! पण लोक सांगतात खरे! मोठमोठे चमत्कार करून दाखवितात ते!" सुशील म्हणाला.

"कोणता चमत्कार रे?" सुबलने उत्सुकतेने विचारले.

"ते खडावा घालून चालतात. त्या खडावांना खुंटचा नाहीत की पटचा नाहीत. पाय ठेवला की खडावा पायांना चिकटतात. आहे की नाही गंमत!" सुशील म्हणाला.

सुबलच्या मनात लगेच जाऊन त्या थोर महापुरुषाचे दर्शन घेण्याची उत्सुकता वाढली. परंतु तो दमून गेला होता. म्हणून प्रथम तो सरळ घरी गेला. रात्री जेवायला बसला असतां त्याने आईला विचारले—"काय ग आई! गावांत कोणी बुवा आले आहेत म्हणे! तू कधी त्यांच्या दर्शनाला गेली होतीस का?"

सुबलच्या आईने दोन्ही हात जोडून श्रद्धाभक्तीपूर्वक कपाळाजवळ नेऊन नमस्कार करीत म्हटले—"अरे तू घटानंद बुवांच्या विषयी ऐकले नाहीस का? त्यांच्या विरुद्ध शहाण्या माणसाने एक शब्ददेखील बोलू नये. ते कोणी सामान्य साधू किंवा बुवा नाहीत. खरोखरच थोर महापुरुष आहेत."

"त्यांनी असं काय ग करून दाखविले की सर्व त्यांना थोर महापुरुष मानू लागले?" सुबलने विचारले.

"बाळ! इतर लोक काय म्हणतात, ते काही मला माहीत नाही. परंतु त्या थोर महापुरुषाच्या हाताला गुण आहे बघ! ते औषध काय देतात? अमृत आहे ते 'अमृत'! त्यांनी मंत्रवलेले तीर्थ दिले की ते प्याल्याबरोबर नकुलच्या मुलाचा ताप घटकेत उतरला. शंकरच्या मुलीला एक महिना झाला, जुलाब होत होते. बुवांनी मंत्रवलेले पाणी दिल्यावर दुसऱ्या दिवशी उजाडण्याच्या सुमारास जुलाब थांबले. हे सर्व थट्टेत उडविण्यासारखे आहे का?" आई म्हणाली.



"ते खडावा घालून चालतात त्या खडावांना खुंटचा नाहीत की पटचा नाहीत, तरी खडावा पायांना चिकटलेल्या असतात म्हणे. आई, तू पाहिलेस का ग?" सुबलने आईला विचारले.

"ते आपल्या गावच्या सर्व लोकांनी पाहिले आहे. कोणी कोणी तर त्यांना पाण्यावर आणि विस्तवावर चालताना पाहिले आहे. उद्यां तू त्यांच्या चरणावर डोके ठेवून त्यांचा आशीर्वाद घेऊन ये." सुबलची आई म्हणाली.

सुबलने ती रात्र अंथरुणावर तळमळतच काढली. त्याला भेटायला त्याची मित्रमंडळी आली. सुशील, विष्णू, नटवर आणि इतर



मित्रमंडळींनाबरोबर घेऊन तो गांवाच्या वेशीवरच्या त्या वडाखालच्या रिकाम्या पडक्या घरात आला.

झाडाखाली एका धुनीसमोर हरणाच्या कातड्यावर बुवा समाधिस्थ बसलेले होते. अंगाने उंच आणि आडवे होते, रंग काळसरच होता. त्यांच्या केसांना बैराग्यांसारख्या जटा होत्या आणि त्यांची दाढी बेंबीपर्यंत लांब पसरलेली होती. त्यांचे दोघे दाढी-वाले शिष्य त्यांच्यासाठी चिलीम भरून देत होते. गुरुजींना मधून मधून गांजाचा दम घ्यायची संवय होती.

थोड्या वेळाने डोळे मिटूनच, परंतु उच्चस्वराने त्यांनी "हरहर! बम्, बम्! शंभो!" म्हटले. नंतर हळूहळू डोळे उघडून मुलांकडे पाहून स्मित हास्यमुखाने जवळ यायला खुणावले. भीतभीत मुलं त्यांच्या-जवळ आली.

"अरे मुलांनो! असे भितां कां? ही घ्या फळे. देवाचा प्रसाद आहे." बुवांनी असे म्हणत फळांकडे बोट दाखविले.

सुबल स्वभावाने तसा भितरा नव्हताच. तरी तेथल्या वातावरणाची थोडी दहशत त्याला वाटल्याशिवाय राहली नाही. तो भीतभीत पुढे सरकत बुवांच्या जवळ गेला. त्याच्या पाठीमागून इतर मुलेसुद्धां जवळ गेली. बुवांनी सर्वांना प्रेमाने जवळ बोला-वून फळे व मिठाई दिली आणि म्हणाले– "तुम्ही पुन्हां संध्याकाळी या बरं का! तुम्हांला फळे व मिठाया मिळतील."

मुलांनी बुवांना नमस्कार केला आणि बाहेर आले. सुबल थोडा संशयीवृत्तीचाच मुलगा होता. तरी त्याचा बुवांवर थोडा विश्वास बसला. त्याचबरोबर त्यांचे चमत्कार पाहण्याची इच्छा त्याच्या मनात वाढली.

त्या दिवशी संध्याकाळी मुलं बुवांच्या दर्शनाला आली तेव्हां त्यांना तेथे मोठी गर्दी दिसली. बुवांसाठी फळफळावळ, मिठाया, तांदूळ, फुले व हार घेऊन आलेल्या लोकांची गर्दी होती ती.

हळूहळू सध्याकाळ झाली. बुवांच्या पुजेची वेळ झाली. बुवा 'हरहर शंभो!' म्हणत उठून उभे राहले. तेवढ्यात बुवांचे दोन पट्टशिष्य त्यांच्या जवळ येऊन उभे राहले.

"हात पाय धुवायला पाणी आणले का गंगेचे?" बुवांनी आपल्या शिष्यांना विचारले.

"गंगाजळ आणून तयार ठेवले आहे गुरुवर्य! आपण येऊन हात पाय धुवून घ्यावेत!" एक शिष्य म्हणाला.

बुवा एका पाटावर येऊन बसले. एक शिष्य गंगेचे पाणी पायावर घालू लागला. दुसरा शिष्य खुंट्या पट्टी शिवायच्या खडावा घेऊन आला. त्याने त्या बुवांच्या-समोर आणून ठेवल्या. बुवा त्यांवर उभे राहून क्षणभर डोळे मिटून उभे राहले. काही तरी मंत्र म्हटला, चार पावले चालल्यावर पुन्हा आपल्या जागेवर येऊन बसले.

"घटानंद महाराज की जय!" असा जमलेल्या लोकांनी जयजयकार केला.

ते सर्व पाहून सुबलला आश्चर्यच वाटले. आहे खरा चमत्का . अद्‌भुत मंत्रशक्ती प्राप्त असल्याशिवाय कधी हे शक्य होईल का? बुवांनी सर्वांसमक्षच पाय धुतले होते तेव्हां पायाला डिंकबिंक लावला असेल असा संशय येण्याचे कारण नव्हते. कोणती तरी यौगिक क्रियाच ही असली पाहिजे. त्याचे मामा त्याहून जास्त चकित करून





सोडणाऱ्या गोष्टी करून दाखवीत. परंतु ती सर्व जादू नसून फक्त हातचलाखी आहे असे ते सांगत. सुबलला त्यातल्या बऱ्याच गोष्टी चांगल्या माहीत होत्या. परंतु त्याच्या मामांना हे अद्‌भुत करून दाखविता येईल का? सुबलच्या मनात शंका होती.

सुबलने घरी आल्याबरोबर आपल्या मामाला बुवांच्या अद्‌भुत दिव्य शक्तींचे वर्णन लिहून कळविले. अशा थोर पुरुषाच्या दर्शनाने जन्म सार्थक झाल्याचे पण त्याने लिहिले होते. सुबलच्या मामांनी ते पत्र लक्षपूर्वक वाचले व एक चिट्ठी लिहून आपल्या एका मित्राकडे पाठविली.

दुसऱ्या दिवशी रविवार होता. जादुगार इंद्रलाल स्वत: आपल्या तिघां मित्रांना बरोबर घेऊन सुबलच्या घरी आला. त्याचे तिघे मित्र उंच बांध्याचे आणि कमावलेल्या शरिराचे होते.

मामाला असा अचानक आलेला पाहून सुबलला आश्चर्य वाटले. पण मामा त्याला म्हणाला–"तुझे पत्र वाचल्यावर त्या बुवांना भेटण्यासाठी घाईघाईने आलो रे!" सुबलला आनंद झाला की त्याचे पत्र फुकट गेले नाही.

"तुमचे हे बुवा आणखी कित्येक जादूचे प्रयोग दाखविणार आहेत!" इंद्रलाल बरोबर आलेल्या तिघांपैकी एक जण म्हणाला.

"तुम्हांला कसं काय कळले?" सुबलने विचारले.

"आम्ही जे ऐकले आहे, त्यावरून घटानंद महाराज आणखी कित्येक अविश्वसनीय प्रयोग करून दाखविणार आहेत. मुनीराम आणि प्रसाद दोघांनी त्या बुवांवर कडक नजर ठेवली पाहिजे. नाहीतर ते आपल्याला ओळखतील व अंतर्धान पावतील. लक्षांत ठेवा, विसरू नका!" आणखी एकजण म्हणाला.

ते दोघे भिकाऱ्यांचा वेष करून लगेच तेथून निघाले. तिसरा मागे राहिला. तो सुबलला म्हणाला–"बुवांची, पूजा केव्हा सुरू होते रे?"

"आता फार उशीर नाही, वेळ झालीच आहे. ते खडावा घालून चालतात ते पहायचे असेल तर निघालेच पाहिजे. मी दाखवितो तुम्हांला जायची वाट." सुबल उत्सुकतेने म्हणाला.

सर्वजण एकदमच निघाले. वडाच्या झाडाजवळ पोंचल्यावर इंद्रलालबरोबर आलेल्या माणसाने आपल्या खिशातून एक लहानसा फोटो काढून पाहिला आणि थोडा वेळ घटानंद महाराजांकडे लक्षपूर्वक पाहिले. नंतर म्हणाला–"इंद्रलाल! आपला अंदाज बरोबर निघाला बरं का?"

भिकाऱ्यांचा वेष करून गेलेले दोघेजण बुवांच्या इतर शिष्यांबरोबर मागच्या बाजूला जाऊन उभे राहले होते.

बुवांनी हातपाय धुतले आणि पट्टी शिवायच्या खडावांवर पाय ठेवले आणि चालू लागले. सुबलने आपल्या मामाचा हात धरून खुणावले व म्हणाला–"लवकर पहा, मामा! आहे ना आश्चर्य करण्यासारखे!"

"पहा, सुबल तूसुद्धां लक्ष लावून पहा, खडावा पायाला गोंद लावल्यासारख्या चिकटल्या आहेत. ही जुनी मंत्रविद्या आहे. खडावांना वार्निशच्या ऐवजी बाभळीचा



डिंक लावून ठेवतात. खडावा वार्निश लावल्यासारख्या दिसत आहेत की नाहीत, पहा! तो डिंक चांगल्या जातीचा असावा आणि सावधपणे लावला गेला आहे. ओले पाय बाभळीच्या डिंकाला सहजच चिकटतात." इंद्रलाल म्हणाला.

बुवांची मंत्रविद्या ती काय सुबलला आतां चांगली कळली.

त्यानंतर इंद्रलालने सुबलला समजावून सांगितले की हा घटानंद बैरागी अट्टल चोर व दरोडेखोर आहे. माझ्याबरोबर आलेला मित्र एक पोलीस इंस्पेक्टर आहे. आतां तो काय काय करतो ते सर्व मुकाट्याने पहात रहा."

इतक्यात शिट्टी वाजली. गर्दीतून भिकाऱ्याच्या वेषात उभे राहलेले दोघे आडदांड शिपाई हातकड्या घेऊन बुवांच्या समोर येऊन उभे राहले. त्यांचा ऑफीसर दोन्ही हातात दोन पिस्तुले घेऊन उभा होता. दरडावून बुवांना म्हणाला–"जीव हवा असेल तर हात वर करून गप्प उभा रहा." जमलेल्या गर्दीत गोंधळ उडून गेला. दूर पळून जाऊन लोक ते विचित्र दृश्य पाहू लागले.

"रंगराव, खेळ समाप्त! तुझा अवतार संपला!" असे म्हणत पोलीस इंस्पेक्टर पुढे आला आणि बुवांची दाढी त्याने ओढताच ती हातात आली. बुवांचे रूपच पालटले.

त्यानंतर तेथे जमलेल्या लोकांना उद्देशून इन्स्पेक्टर म्हणाला–"मित्र हो! तुम्हांला आणखी एक खेळ बघायला मिळाला आहे! बुवांचा अवतार पालटला आहे. यांच्या पूर्वजन्माची गोष्ट ऐका. हा रंगराव नांवाचा एक अट्टल दरोडेखोर आहे. हा आपल्या दोघां साथीदारांसह तुरुंगातून पळून गेला

पट्टशिष्य म्हणून रहात आहेत."

रंगराव आपल्या पिशवीत हात घालू लागतांच इन्स्पेक्टर दरडावून म्हणाला–"खबरदार! तू काही हालचाल केलीस तर! तुझी पिस्तुले आहेत तेथेच राहू देत! नाहीतर माझी गोळी तुझ्या डोक्यातून आरपार निघून जाईल. शहाण्या माणसासारखे दोन्ही हात मुकाट्याने पुढे कर आणि हातकड्या घालून घे!" असे म्हणत इन्स्पेक्टराने रंगरावच्या हातात हातकड्या घातल्या.

घटानंदांच्या पिशवीतून लहान पिस्तुले, गोळ्या वगैरे वस्तू निघाल्या. त्याचबरोबर ताप, पडसे, जुलाब वगैरेच्या औषधांच्या बाटल्या निघाल्या.

"अस्सं! म्हणजे हे मंत्रवलेले पाणी आहे वाटते? हेच रोग्यांना देऊन त्यांचे आजार हे बुवा बरे करीत असत म्हणायचे! घरी जाऊन आईला हे सर्व सांगितले पाहिजे." असे म्हणत सुबल आपल्या घरी पळत निघून गेला.



# निंदा की स्तुती

एकदा एका राजाकडे शेजारच्या देशातून तिघी बहिणी आल्या. एक उत्तम गात असे, दुसरी छान वाजवीत असे तर तिसरी उत्तम नृत्य करीत असे. तिघांनी आपापली कला दाखविली. परंतु राजाने त्यांची प्रशंसा केली नाही की त्यांना पारितोषिक दिले नाही. तरी त्याने त्यांना आपल्या अतिथिगृहात राहण्याचा फार आग्रह केला. त्यांनी होकार दिला. अतिथिगृहात राजाने नेमलेले हेर होते.

अतिथिगृहात पोचताच तिघी बहिणींनी राजाची आपापल्या कल्पनेप्रमाणे निंदा केली. एक म्हणाली–"हा राजा म्हणजे नुसता जळते लाकूड आहे!" दुसरी म्हणाली–"नाही, कांट्यांची मोळी आहे!" तिसरी म्हणाली–"ते काही नाही, दगड आहे!"

हेरांकडून राजाला ते सर्व कळले. राजाने त्यांना दरबारात बोलवून विचारले–"काल अतिथिगृहात माझ्याविषयी काय काय बोललात ते पुन्हां सांगाल का?"

पहिली म्हणाली–"महाराज! मी आपणाला जळते लाकूड म्हटले. जळत्या लाकडांवरच संपाक होतो व थंड झाल्यावर जेवतां येते. तात्पर्य आपल्याबरोबर बोलतांना घाई करतां कामा नये."

दुसरी म्हणाली–"महाराज! मला हे कबूल नव्हते! म्हणून मी आपणांला कांट्यांची मोळी म्हटले. म्हणजे आपण फणसासारखे आहां. कांटेरी कवचाआड गोड हृदय आहे आपलं! माणसाने धीर राखून वागलं पाहिजे!"

"महाराज! हेदेखील मला बरोबर वाटत नाही. फणस थोडा वेळ चांगला राहतो. नंतर कुजून जातो. परंतु खडीसाखर फार दिवस टिकते. दिसायला दगड असली तरी गोड असते ती. म्हणून मी आपणांला दगड म्हटले." तिसरी म्हणाली.

राजाने त्यांचे प्रसंगावधान व हुशारी पाहून तिघींना बक्षिस दिले.





# धारा नगरीचे पंडित

**धा**रा नगरीचा राजा भोज हा विद्वानांचा व कवींचा आदर करी. कालीदास वगैरे कवि कविता म्हणून राजाकडून मोठमोठी पारितोषिके मिळवीत. हे सर्व कांति कवि नांवाच्या एका कवीला कळले. त्याला कालीदासाचा हेवा वाटू लागला व त्याची मान खाली करण्याचे ठरवून तो धारा नगरीला आला.

धारा नगरीच्या वेशीवर पोचताच त्याला एक मुलगी भेटली. कांतिकवीने तिला विचारले–"कोणाची ग मुलगी तू ?"

ती म्हणाली–

हरहर स्मरते नित्यम्, बहु जीव प्रपालकः ।<br>
अरण्य वसते नित्यम्, तस्याहम् कुलबालिका ॥

(**अर्थात्** नित्य अरण्यात राहून 'हर हर'चे नित्य स्मरण करीत, म्हणजे हाकीत रहात अनेक गुरांचे पालन करणाऱ्या शेतकऱ्यांच्या जातीची मी मुलगी आहे.")

कांतिकवी ते उत्तर ऐकून चकितच झाला. थोडा पुढे गेल्यावर त्याला काही बायका पाणी भरत असलेल्या दिसल्या. एकीला त्याने विचारले–"कोण ग मुली तू ?"

ती म्हणाली–

चतुर्मुखो न च ब्रह्मा, वृषारूढो न शंकरः ।<br>
अकाले वर्षते मेघः, तस्याहम् कुलबालिका ॥

(अर्थात् "चार तोंडे आहेत, पण ब्रह्मदेव नाही. बैलावर बसतो, पण शंकर नाही. अकाली वृष्टी करतो, पण मेघ नव्हे. त्याची म्हणजे, चार तोंडे असलेल्या कातड्याच्या पिशवीत पाणी भरून ते बैलावर घरोघरी भरणाऱ्या पाणक्याची मुलगी आहे मी.")

ते उत्तर ऐकून कांतिकवी जास्तच चकित झाला. थोडा पुढे गेला आणि आणखी एका स्त्रीला त्याने विचारले–"तू कोणाची मुलगी ग ?"

ती म्हणाली–

...न पांचाली, द्विजिह्वा न च सर्पिणी ।<br>
वानरी न च कृष्णास्या, तस्याहम् कुलबालिका ॥

(तात्पर्य–ती लेखकाची मुलगी आहे. लेखक पांच बोटांनी धरून बोरूच्या दुभंगलेल्या जिभेला शाईत बुडवून तिचे तोंड काळे करून लिहितो. बोरू धरायला पांच बोटे लागतात, परंतु ती पांचाळी म्हणजे द्रौपदी नव्हे. दुभंगलेली जीभ असून साप नव्हे व तोंड शाईत बुडवून काळे झाले असून वानरी नव्हे." अशा बोरूने लिहिणाऱ्या लेखकाची मी मुलगी आहे.")

कांतिकवी ते उत्तर ऐकून खूष झाला. त्याचे औत्सुक्य वाढले. त्याने आणखी एका स्त्रीला विचारले–"कोण ग मुली तू ?"

तेव्हां ती म्हणाली–

नित्यम् जुहोति द्रव्याणि, चौर्यकारी दिनेदिने ।<br>
शत्रुम् मित्रम् न जानाति, तस्याहम् कुल कन्यका ॥

(अर्थात्–नित्य पदार्थांचा होम करीत राहून दररोज चोरी करीत असतां शत्रु किंवा मित्र न ओळखणाऱ्याची–म्हणजे सोनाराची मी मुलगी आहे.")

कांतिकवी आतां मात्र फारच चकित झाला. त्याने आणखी एका मुलीला विचारले–"तू कोणाची ग मुलगी ?")

तिने पण गमतीदार उत्तर दिले–

बाहुरस्ति, शिरो नास्ति, न सत्यम् गुलिकादश<br>
तस्योत्पत्ति करो यस्तु, तस्याहम् कुलबालिका ॥



(अर्थात् "हात असूनही डोके नाही की हातांना दहा बोटे नाहीत असा सदरा शिवणाराची, शिंप्याची मुलगी आहे मी.")

ते सर्व ऐकून कांतिकवी विचार करीत पुढे निघाला की 'या धारानगरीत खालच्या जातीत जन्मलेल्या बायकांना संस्कृत येते आणि त्या कवितेत इतके चातुर्यपूर्ण उत्तर कसे काय देतात? स्त्रियांमध्ये एवढे चातुर्य आहे तर पुरुषांचे विचारायलाच नको. त्यांतल्या पंडितांत कालिदास हा तर फारच मोठा पंडित असणार.' असा विचार करीत थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला आणखी एक स्त्री दिसली. तिला त्याने विचारले–"कोणाची ग मुलगी तू ?"

ती म्हणाली–

निर्जीवो जीवितो वापि श्वासोच्छ्वास विशेषतः
कुटंब कलहो नास्ति, तस्याहम् कुलबालिका ।।

(अर्थात् "निर्जीव असून जिवंत प्राण्यासारखा श्वासोच्छ्वास घेतो. आपसांत कौटुंबिक भांडण नाही. अशा जातीच्या लोहाराची मुलगी आहे मी." लोहाराचा भाता श्वासोच्छ्वास करतो, परंतु त्याला जीव नसतो. त्याचा भाता परस्परांला भेटतो, पण भांडण करीत नाही.)

ते उत्तर ऐकून कांतिकवीचा स्वतःच्या कानांवर विश्वास होईना. तो चकित होऊन पुढे निघाला. त्याला आणखी एक स्त्री भेटली. तिला त्याने विचारले–"कोण ग तू? कोणाची मुलगी?"

ती म्हणाली–

द्विराजा नगरी एका, नित्यं युद्धं च जायते ।
तदुत्पत्ति करो यस्तु तस्याहम् कुलबालिका ।।

(अर्थात्, एकाच नगराचे दोन राजा आहेत, दोघांचे नित्य कलह होतात. ते उत्पन्न करणाऱ्या जातीची कन्या आहे मी. [illegible] म्हणजे कापूस त्याचे बी काढणारे यंत्र. दोन राजा म्हणजे दोन जाड रूळ. ते परस्परांशी घासले जातात. ते यंत्र करणारा, म्हणजे सुतार त्याची मुलगी.)

इतक्यात आणखी एक स्त्री तिकडे आली. तिला पुन्हां कवीने विचारले–"तू कोणाची मुलगी ग?"

ती म्हणाली–

चक्रैकम् न रथी सूर्यो, भूमौ तिष्ठति सारथिः ।
अगस्त्यतात निर्माण स्तस्याहम् कुलबालिका ।।

(अर्थात् एकच चक्र आहे, पण रथी सूर्य नाही. सारथी पृथ्वीवर बसतो. अगस्त्याच्या मुलाची सृष्टी करतो त्याची मुलगी आहे मी. म्हणजे कुंभाराची मुलगी. अगस्त्य ऋषी मडक्यात जन्मले सूर्याच्या रथाला एकच चाक असते असे सांगतात.)

धारानगरीतल्या लहान थोर जातीच्या मुलींचे चातुर्य पाहून कांतिकवि चकित झाला. त्याने कालिदासाची मान खाली करण्याचा विचार मनांतून काढून टाकला आणि परत आपल्या गावी निघून गेला.





# महाभारत

दहा दिवस युद्ध केल्यावर भीष्माचार्य शरपंजरावर पडले. ते शिखंडीबरोबर युद्ध करणार नाहीत हे कळल्यावर अर्जुनाने शिखंडीलाच पुढे करून पाठीमागून शरवृष्टी केली. अशातऱ्हेने भीष्माचार्यांचा देह शरपंजरावर पहुडला

भीष्माचार्य रणांगणावर पडले खरे, परंतु त्यांना इच्छामृत्यूचे वरदान असल्यामुळे ते गतप्राण झाले नाहीत. त्यांचा देह अंगात शिरलेल्या बाणांवर अडकून राहला. त्यावेळी त्यांना भयंकर तहान लागली होती. अर्जुनाने पृथ्वीला एक बाण मारून पाताळ गंगेचे पाणी फवाऱ्यासारखे बाहेर आणले ते पिऊन उत्तरायण येईपर्यंत भीष्माचार्य शरपंजरी पडून राहले.

भीष्माचार्यांच्या पाठीमागून कौरव सैन्याचे सेनापतित्व द्रोणाचार्यांना देण्यात आले. त्यांनी पांच दिवस युद्ध केले. त्यांनी चक्रव्यूहाची रचना केली. त्यात अभिमन्यूने प्रवेश केला. त्याच्यावर अनेक महारथींनी एकदम हल्ला करून त्याला ठार केले. त्यावेळी अर्जुन इतरत्र युद्ध करीत होता अभिमन्यूच्या पाठोपाठ इतर पांडववीर चक्रव्यूहात शिरले, परंतु जयद्रथाने त्या सर्वांना अडविले. म्हणून कोणी अभिमन्यूच्या मदतीला येऊ शकला नाही

ते कळल्यावर अर्जुनाने प्रतिज्ञा केला की दुसऱ्या दिवशी सूर्यास्ताच्या आत जयद्रथाचा वध करीन आणि त्याप्रमाणे त्याने वध केला देखील. त्यानंतर द्रोणाचार्य आणि धृष्टद्युम्न



यांचे युद्ध होत होते. त्यावेळी धर्मराजाच्या तोंडी "अश्वत्थामा हतः । नरो वा कुंजरो वा", म्हणजे अश्वत्थामा वारला, परंतु तो मनुष्य होता की हत्ती हे माहीत नाही. असे ऐकून द्रोणाचार्यांनी शस्त्रसंन्यास घेतला. तेव्हां धृष्टद्युम्नने त्यांचा वध केला.

द्रोणाचार्यांच्या मृत्यूनंतर कर्णाकडे कौरवांच्या सैन्याचे सेनापतित्व आले. कर्णाने त्याचे सारथ्य शल्याने केले पाहिजे असे दुर्योधनाला सांगितले. शल्याने दुर्योधनाच्या विनंतीवरून ते मान्य केले. कर्णाने दोन दिवस युद्ध केले. ते दोन्ही दिवस शल्य कर्णाला त्याच्या पापकर्माची आठवण करून देऊन टोचण्या देत राहला. त्यामुळे कर्णाचा युद्धोत्साह भंग होत गेला. दुसऱ्या दिवशी तो युद्ध करीत असता त्याच्या रथाचे चाक जमिनीत रुतले. कर्ण ते वर काढीत असतां अर्जुनाने त्याला मर्मी बाण मारून त्याचा वध केला.

कर्णानंतर शल्य कौरव सैन्याचा सेनापति झाला. तो त्याच दिवशी युधिष्ठिराशी युद्ध करीत असतां धराशायी झाला. अठराव्या दिवशी युद्ध संपले. या युद्धात अठरा अक्षौहिणी सैन्य ठार झाले. दुर्योधनाशिवाय त्याच्या भावंडांपैकी कोणी जिवंत राहला नाही. भीमाने दुःशासनाचा वध केला आणि सर्वांसमक्ष तो त्याचे रक्त प्याला.

या युद्धात दोन्ही बाजूचे सहस्रावधी योद्धे धरातीर्थी पडले. पांडवांच्या बाजूचे पच पांडव, उपपांडव, युयुत्सु, सात्यकी, धृष्टद्युम्न आणि शिखंडी वांचले.

युयुत्सु हा धृतराष्ट्राचा मुलगा होता. म्हणून युद्ध संपतांच तो हस्तिनापूरला गेला.

कौरवांच्या बाजूचे अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा आणि दुर्योधन वांचले. युद्धाच्या अगदी शेवटी कृपाचार्य, अश्वत्थामा आणि कृतवर्मा दुर्योधनाचा शोध काढीत खूप हिंडले, परंतु तो कोठे दिसला नाही. तो आपल्या खांद्यावर आपली गदा टाकून एका सरोवराच्या काठी गेला. कृतवर्मा, कृपाचार्य व अश्वत्थामा तिघे जिवंत असल्याचे त्याला माहीत नव्हते. तलावाच्या काठी उदास मनाने बसलेल्या दुर्योधनाजवळ संजय आला. दुर्योधन आपल्या पराभवाविषयी आणि त्याच्या बाजूच्या थोर वीरांच्या वधाविषयी शोक करीत बसला असतां त्याला समोर संजय दिसला. तो त्याला म्हणाला—"आपल्यापैकी तुझ्याशिवाय आणखी कोणी वांचला नाही का? बाबांना जाऊन सांग की मी या तलावात लपून बसलो आहे." असे सांगून त्याने तलावात प्रवेश केला.

संजय दुर्योधनाला भेटून परत येत असतां त्याला वाटेत कृतवर्मा, कृपाचार्य आणि अश्वत्थामा भेटले. त्यांनी त्याला विचारले—"तू दुर्योधनाला कोठे पाहिलेस का?"

संजयने त्यांना तो तलाव दाखविला आणि म्हणाला—"दुर्योधन श्वास रोखून त्या तलावात लपून बसला आहे."

अश्वत्थामा जोराने रडू लागला आणि म्हणाला—"अरेरे, त्याला आम्ही जिवंत आहो, हे माहीत नाही वाटते? आम्ही चौघे मिळून पांडवांचा पराभव करू शकलो नसतो का?" त्यानंतर ते तिघे पांडवांशी युद्ध करण्यास निघाले. परंतु युद्धभूमीवर पोचेतों काळोख पडू लागला होता. कौरवांच्या शिबिरातून स्त्रियांना नोकर हस्तिनापूरला घेऊन जात होते.



युद्ध संपताच पांडव कृष्णाला बरोबर घेऊन दुर्योधनाचा शोध करू लागले. दुर्योधनाचा वध करण्याचा त्यांचा विचार होता. शेवटी तो तलावांत लपला असल्याचे त्यांना कळले. ते सर्व तेथे आले.

युधिष्ठिर दुर्योधनाला म्हणाला—"तुझा वंशनाश झाला आहे. आतां तू स्वतःचा जीव वांचविण्यासाठी या तलावांत लपून बसला आहेस का? बाहेर ये आणि आमच्याशी शूरासारखा युद्ध कर. तुला ही कापुरुषता शोभत नाही. आमचा पराभव झाल्याशिवाय तुझा अधिकार कायम कसा होईल? ये युद्ध करून आमचा पराभव कर."



"मला राज्य नको. तूच आतां त्याचा उपभोग कर." दुर्योधन म्हणाला.

"मला तुझ्या हातचे दान म्हणून राज्य नको आहे. याशिवाय दान करायला तुझ्या हातात राज्य आहे तरी कोठे? आमचा पराभव करून खुशाल राज्य कर. नाहीतर आमच्या हातून आपली हार मान्य कर." युधिष्ठिर म्हणाला.

पांडवांची ती कटु वाक्ये ऐकून दुर्योधन चिडला आणि तलावाबाहेर आला. तेव्हां त्याचे भीमाशी गदायुद्ध झाले. त्या युद्धात भीमाने दुर्योधनाच्या मांडीवर गदाप्रहार करून त्याला खाली पाडले. दुर्योधन जमिनीवर आदळला, परंतु अद्याप मेला नव्हता. त्याच वेळी कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा तेथें आले. दुर्योधनाला त्या स्थितीत पाहून त्यांना फार वाईट वाटले. अश्वत्थाम्याने दुर्योधनासमोर एक घोर प्रतिज्ञा केली. म्हणाला–"आज रात्रीच्या आत मी सर्व पांडवांचा आणि पांचालांचा वध करीन. ते ऐकून प्रसन्न होऊन दुर्योधनाने अश्वत्थाम्याला आपला सेनापती म्हणून नेमले.

त्यानंतर तिघे तेथून निघून गेले आणि पांडवांच्या शिबिराजवळ एका गुप्तस्थानी लपून बसले. तेथें एक जंगल होते. तेथे एक सहस्र फांद्या असलेला एक विशाल वटवृक्ष होता. त्याच्या खाली तिघे विश्रांतीसाठी राहिले. अश्वत्थाम्याने त्या रात्री अन्यायाने, सर्व झोपी गेले असतां शत्रूचा वध करण्याचे ठरविले. त्याने त्यासाठी कृपाचार्य व कृतवर्मा दोघांचे मन वळविले. त्याने त्या दोघांना पांडवांच्या शिबिराच्या दारावर उभे केले आणि स्वत: हातात तलवार घेऊन तो पांडवांच्या शिबिरात शिरला. पहिल्याने त्याने धृष्टद्युम्नाचा वध केला. जी गडबड झाली त्यामुळे काही लोक जागे झाले आणि अश्वत्थाम्याला मारायला धावले. परंतु अश्वत्थाम्याने सर्वांना ठार केले. त्यानंतर त्याने सर्व उपपांडवांचा वध केला. तोपर्यंत शिबिरात जागा जाग झाली. काही लोक अश्वत्थाम्याशी युद्ध करून ठार झाले. जे बाहेर पळून जाण्याच्या खटपटीत होते त्यांना कृपाचार्य व कृतवर्मा दोघांनी ठार केले. त्यानंतर तिघांनी शिबिराला आग लावली. नंतर ती बातमी सांगायला ते दुर्योधनाकडे तलावावर गेले.

त्या दिवशी रात्री पांडव शिबिरात नव्हते. असते तर कदाचित अश्वत्थाम्याच्या हाती ठार झाले असते किंवा अश्वत्थाम्याच्या हातून झालेला तो घोर प्रसंग थांबवू शकले असते.

कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा जेव्हां तलावाच्या काठी आले. तेव्हां दुर्योधन आपल्या शेवटच्या घटकेची वाट पहात पडला होता. त्याला सर्व उपपांडवांचा वध ऐकून अत्यंत आनंद वाटला. त्या आनंदातच त्याचा जीव गेला.

युद्धात पूर्ण विजय मिळाला असून ही अश्वत्थाम्याच्या कपटाने त्याच्या हाती उपपांडवांचा व इतर नातेवाइकांचा वध झाल्याचे वर्तमान ऐकून पांडव व द्रौपदी शोक करू लागले. भीमाला भयंकर राग आला व तो अश्वत्थामाचा वध करण्यासाठी निघाला. तेव्हां द्रौपदी त्याला म्हणाली– "अश्वत्थाम्याच्या कपाळावर मणी आहे. त्याचा वध करून मला तो मणी आणून द्या. तेव्हां कोठे माझ्या मनाचे समाधान होईल."



तेव्हां भीम धनुष्यबाण घेऊन रथात बसून निघाला. ते पाहून कृष्णाने भीमाच्या मदतीला अर्जुनालादेखील बरोबर पाठविले. कृष्णाबरोबर युधिष्ठिर व अर्जुनदेखील आणखी एका रथात बसून निघाले. ते लवकरच भीमाला भेटले. परंतु भीमाला परतवणे त्यांना शक्य झाले नाही.

ते गंगेकाठी पोचले तेव्हां व्यास मुनी अनेक ऋषी मुनींबरोबर त्यांना दिसले. अश्वत्थामा ऋषींच्या घोळक्यात सर्वांगाला भस्म लावून आणि वल्कलवस्त्रे धारण करून उभा होता. त्याला पाहतांच भीमाने सिंहगर्जना केली अश्वत्थामा भीमाला व त्याच्या पाठीमागून कृष्ण, युधिष्ठिर व



अर्जुन तिघांना येत असलेला पाहून चकित झाला. तो किंकर्तव्यविमूढ स्थितीत जागच्या जागी उभा होता. तेव्हां त्याने आपल्या वडिलांकडून शिकून घेतलेल्या ब्रह्मशिरो-नायकास्त्राचे आवाहन केले. त्याचा प्रयोग करीत म्हणाला–"आतां पृथ्वी अपांडव होवो!" तेव्हां कृष्णाने सुचविल्यावरून अर्जुनाने त्याच अस्त्राचा प्रयोग केला. दोन्ही अस्त्रांचे परस्परांशी भयंकर द्वंद्व झाले.

तेव्हां व्यास व नारद समोर आले. त्यांनी दोघांना समजावून सांगितले की दोघांनी आपापले अस्त्र परत घ्यावे. अर्जुनाने आपले अस्त्र परत घेतले. परंतु अश्वत्थाम्याला ते परत घेता आले नाही. तो अत्यंत दीन होऊन व्यास मुनींना म्हणाला–"महात्मन्! मी भीमाला भिऊन या अस्त्राचा प्रयोग केला होता. ते परत घेणे मला शक्य नाही. पांडवांचे निर्मूलन झाल्यावरच हे शांत होईल."

ते ऐकून कृष्ण म्हणाला–"ठीक आहे. यावेळी पांडवांचा अंश उत्तरेच्या पोटात आहे. त्याच्यावर तू त्या अस्त्राचा प्रयोग कर."

शेवटी ऋषींनी मध्यस्थी करून असा समेट केला की, अश्वत्थाम्याने आपल्या कपाळावरचा मणी अर्जुनाला द्यावा आणि अर्जुनाने अश्वत्थाम्याच्या वधाचा हट्ट धरू नये. त्याप्रमाणे अश्वत्थाम्याने आपल्या कपाळावरचा मणी काढून अर्जुनाला दिला आणि स्वतः जंगलात तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला. भीमाने तो मणी द्रौपदीला नेऊन दिला आणि शोक न करण्यास तिला सांगितले. द्रौपदीने तो मणी स्वतः न घेतां युधिष्ठिराला मस्तकावर धारण करण्या-साठी दिला.

तिकडे हस्तिनापूरला आपले शंभरच्या शंभर पुत्र मृत्युमुखी पडल्याचे वृत्त ऐकून धृतराष्ट्र शोक करू लागला. संजयाने त्याचे सांत्वन करण्याचा यत्न करून पाहिला. म्हणाला–"तुझे शंभर पुत्रच नव्हे, अठरा

अक्षौहिणी वीरसुद्धां रणांगणी पडले व त्यांना स्वर्गप्राप्ती झाली आहे. जगातले क्षत्रिय राजे जवळजवळ सर्वच नष्ट झाले आहेत. त्यांचा अग्निसंस्कार तूच करविला पाहिजेस!"

धृतराष्ट्रानंतर गांधारी, कुंती आणि अंतःपुरातील इतर स्त्रिया रडतरडत युद्ध भूमीवर आल्या. ते कळल्यावर पांडव, कृष्ण, सात्यकी आणि युयुत्सूलाबरोबर घेऊन तेथे आले.

युधिष्ठिराने धृतराष्ट्राला नमस्कार केला आणि त्याला भेटायला आलेल्या सर्व लोकांचा परिचय करून घेतला. धृतराष्ट्र आतल्या आत कुढत होता. सर्वांत प्रथम तो युधिष्ठिराला भेटला आणि त्यानंतर तो भीमाला भेटण्यासाठी थोडा पुढे सरकला. कृष्णाने चटकन भीमाला थोडे मागे ओढले आणि भीमाची एक मूर्ती पुढे केली. धृतराष्ट्राने त्या मूर्तीला कडकडून आलिंगन केले. तत्क्षण त्या मूर्तीचा चक्काचूर झाला. त्या मूर्तीच्या जागी स्वतः भीम असता तर [illegible] गतप्राण झाला असता. धृतराष्ट्राच्या अंगात एक हजार हत्तींचे बळ होते. म्हणून धृतराष्ट्र त्या लोखंडी मूर्तीचा चक्काचूर करू शकला. परंतु दम लागून खाली जमिनीवर पडला. त्याच्या नाकातोंडातून रक्त वाहू लागले. नंतर शोक करण्याचे सोंग करीत म्हणाला—"भीमा! काय रे झाले तुला!"

कृष्ण स्मित करून म्हणाला—"राजा! भीमाला काही एक झाले नाही. ती तर भीमाची एक मूर्त होती. तू त्या मूर्तीचा चक्काचूर केलास!" ती मूर्त दुर्योधनाने गदायुद्धाचा अभ्यास करण्यासाठी तयार करविली होती.

त्यानंतर कृष्णाने धृतराष्ट्राचे सांत्वन केले. धृतराष्ट्र म्हणाला—"तुझे म्हणणे बरोबर आहे. आतां पांडवच माझे पुत्र! त्यांच्याशिवाय या जगात माझा असा कोण आहे?" असे म्हणत त्याने पंच पांडवांना जवळ बोलावून त्यांच्या पाठीवर प्रेमाने हात फिरविला.





# मित्रभेद

[ ८ ]

कोल्ह्याने कावळ्याला बगळा आणि खेकडा यांची गोष्ट सांगितली ती अशी :-

**बगळा आणि खेकड्याची गोष्ट**

एका तलावाच्या काठी एक म्हातारा बगळा रहात असे. म्हणून जास्त मेहनत केल्याशिवाय मासे खायला कसे मिळतील यासाठी तो निरनिराळे उपाय करीत असे. तो काठावर एकाद्या तपस्व्यासारखा एका पायावर उभा राहून अगदी जवळ आलेले मासेदेखील खात नसे.

माशांच्याबरोबर त्या तलावात एक खेकडासुद्धा रहात असे. त्याने जवळ जाऊन बगळ्याला विचारले—"मामा! आज तुम्ही खाणेपिणे सोडल्यासारखे दिसते आहे? व्रतवीत आहे का?"

बगळा म्हणाला—"नाही रे! आयुष्यभर मासे खाऊन मी चैन केली. आतां माशांशी माझी मैत्री जमली आहे. मी त्यांना खायचे सोडले आहे. तुम्हांला माहीत नाही का, तुमच्यावर आभाळाएवढे संकट कोसळणार आहे. म्हातारपणी मला ते पहावे लागणार, त्याचे मला फार वाईट वाटते आहे."

"कोणते हो संकट ते, मामा?" खेकड्याने विचारले.

"आज काही कोळ्यांना बोलतांना मी ऐकले. ते म्हणत होते, 'हा मोठा तलाव आहे. यात अनेक मासे आहेत. रविवारी संध्याकाळपर्यंत बाकी चारही तलावात मासे धरायचे काम संपवून सोमवारी उजाडतांच या तलावाकडे वळू या. आपली सर्व नवी-



कोरी जाळी घेऊन येऊ या. त्यात मासेच काय, पाण्यातले इतर प्राणीदेखील धरतां येतील ? म्हणजे एका आठवड्यात सर्व मासे आणि इतर प्राणी सर्वांचा फडशा उडणार. आज सोमवार आहे. ते माझ्या तोंडचा घास ओढून नेत आहेत." बगळा म्हणाला.

बगळ्याचे ते चातुर्यपूर्ण बोलणे ऐकून सर्व मासे व इतर जलचरप्राणी थरथर कांपू लागले. स्वत:चे वय आणि दर्जाप्रमाणे बगळ्याला काका, मामा, दादा, मित्र, गुरु वगैरे नांवांनी संबोधन करून ते म्हणाले– "बरे झाले. तुम्ही वेळीच आम्हांला धोक्याची सूचना दिलीत. आतां या संकटातून वांचायला उपाय पण तुम्हीच सांगा!"

"अरे वेड्यांनो! मी तुमच्याचसारखा अंडज आहे, आणि मनुष्य पिंडज असतो. त्याच्यासमोर माझी बुद्धिमत्ता पासंगाला सुद्धां टिकणार नाही. तरी तुम्ही सर्व सहकार द्याल तर मी प्रयत्न करून पाहीन. येथून थोड्या अंतरावर एक देऊळ आहे. त्यात कमळे नेहमी फुललेली असतात. त्यात मासे धरायला कोणाला परवानगी नाही. तेथे तुमच्या जिवाला कोणत्याही प्रकारचा धोका नाही. तुम्हांला सर्वांना मी थोडे थोडे करून आपल्या पाठीवर वाहून घेऊन जाईन त्या तलावात." बगळा म्हणाला.

ते ऐकून मासे आनंदाने उड्या मारू लागले. सर्वांनी बगळ्याच्या औदार्याविषयी आपली कृतज्ञता दर्शविली. बगळ्याला मनातल्या मनात आनंद झाला. आतां जास्त मेहनत केल्याशिवाय मासे खायला मिळणार असे त्याला वाटले. त्याने आनंदाने माशांच्यावर 'उपकार' करण्याचे मान्य केले.

त्या दिवसापासून बगळा दररोज थोडे थोडे मासे आपल्या पाठीवर उचलून घेऊन देवळाच्या तलावात' नेऊन टाकू लागला. ती एक खडकाळ जागा होती डोंगरावर. तो पोटभर मासे खाऊन त्यांची हाडे तेथेच टाकून देऊ लागला. दिवसेदिवस त्याच्या आनंदाला पारावर उरला नाही. तो दररोज येऊन 'देवळाच्या तलावांत' पोचले-

त्या माशांचे 'निरोप' पोचते करी. हेतू हा की त्यांच्या मनांत दुसरी काही शंका उत्पन्न होऊ नये.

मध्यंतरी खेकड्याला सुद्धा स्वत:च्या जिवाची काळजी वाटू लागली. कोळी येण्याचा दिवस जवळ आला. तो बगळ्याला म्हणाला–"मामा! मलासुद्धां नेतां का!"

दररोज मासे खाऊन बगळ्याचे मन विटले होतेच. त्याने जास्त विचार न करतां खेकड्याला पाठीवर बसवून घेतले आणि टेकडीच्या टोकाला त्या खडकाळ जागी तो उतरणार, तेवढ्यात खेकड्याची नजर त्यावर पडली. त्याने विचारले–"मामा! तो देवळाचा तलाव कोठे आहे हो?"

बगळा गालातल्या गालात हसत म्हणाला–"खुळ्या! ती खडकाळ जागा नाही का दिसत. तेथे माझ्या पाठीवर बसून आलेल्या सर्व माशांना सद्‌गती मिळाली आहे."

खेकड्याने खाली पाहिले. त्या खडकाळ जागी माशांची हाडे होती. त्याने मनात विचार केला, 'या जगात लबाड लोक आपल्या स्वार्थासाठी मित्र असूनही शत्रूसारखे वागतात आणि शत्रू असूनही मित्रत्वाचे सोंग करून गळा कापतात. मित्रत्वाचे नाते जोडून गळा कापणाऱ्यांशी मैत्री करण्यापेक्षा सापाशी मैत्री करण्यात काय



हरकत आहे. या बगळ्याने सर्व मासे खाऊन टाकले आहेत. मी या गोष्टीबद्दल सूड उगवलाच पाहिजे. मी याला सोडणार नाही!

बगळा त्या खडकाळ जागी उतरू लागताच खेकडा हळूहळू बगळ्याच्या गळ्यापर्यंत जाऊन पोचला आणि जोराने चावला. बगळा निरुपाय होऊन ओरडू लागला. परंतु खेकड्याने त्याला सोडले नाही आणि तत्क्षण जीव जाऊन जमिनीवर आदळला.

त्यानंतर खेकडा बगळ्याचे तोंड कुरतडून तोडून ओढीत आपल्या तलावापर्यंत घेऊन गेला. त्याला परतायला फार दिवस लागले. तो आल्यावर सर्व माशांनी त्याला

विचारले–"काय रे! तो बगळा आलाच नाही आणि तो कोळीसुद्धां आला नाही की रे!"

खेकड्याने बगळ्याचे तोंड त्यांना दाखविले आणि म्हणाला–"तो स्वतः त्याला सद्गती मिळाल्याची गोष्ट सांगायला आला आहे!" नंतर त्याने बगळ्याच्या लबाडीमुळे त्याच्या मित्र माशांचा कसा जीव गेला हे सांगून देवाने वेळेवर बुद्धी देऊन त्याला सावध केल्याबद्दल देवाचे आभार मानायला सर्वांना सांगितले. म्हणाला–"कोळी येणार आणि सर्व मासे धरणार वगैरे त्या बगळ्याची लबाडी होती."

कोल्ह्याच्या तोंडी ते सर्व ऐकून कावळा म्हणाला–"मित्रा! तरमग सांग, त्या सांपाचा शेपट कसा करायचा?"

कोल्हा म्हणाला–"काही नाही रे तू राणी आंघोळ करते त्या तलावाच्या किंवा नदीकाठी जा. श्रीमंत लोक आंघोळ करण्यापूर्वी दागिने काढून ठेवतात. तू एक रत्नहार उचलून घेऊन जा आणि त्या सांपाच्या बिळात टाक. त्या दागिन्याचा मालक येऊन बीळ खणून त्या सापाला ठार करील."

कावळ्याने घरी जाऊन ती युक्ती आपल्या बायकोला सांगितली. दोघे उडत उडत राजधानीतल्या तलावावर राणी आंघोळ करीत होती तेथे गेले. राणीने आपले दागिने काठावर काढून ठेवले आणि आंघोळीला पाण्यात उतरली. कावळीने राणीच्या दागिन्यातला रत्नहार उचलून घेतला आणि ज्या झाडावर त्यांचे घरटे होते त्या बाजूला उडत जाऊ लागली. ते पाहून राजवाड्यातले नोकर कावळीच्या पाठोपाठ धावू लागले.

कावळीने सापाच्या बिळात तो रत्नहार टाकला. आणि ती झाडावर बसून गंमत पाहू लागली. राजवाड्यातल्या नोकरांनी रत्नहारासाठी सांपाचे बीळ खणले. साप रागाने बाहेर आला. सर्वांनी आपल्या काठ्यांनी त्याला ठार केले आणि रत्नहार घेऊन राजवाड्याच्या दिशेने निघून गेले. अशा तऱ्हेने कावळ्यांवरचे संकट टळले.



# १४६. अमेरिकेतील रशियन देवालय

अलास्का उत्तर अमेरिकेत आहे. त्याचा काही प्रदेश पूर्वी रशियात होता. सिटका नामक प्रदेशात रशियन संशोधकांनी हे चर्च प्रार्थनेसाठी बांधले आणि तेथेच अलास्काची राजधानी स्थापन केली. हे चर्च १८०४ मध्ये बांधण्यात आले. १८६७ मध्ये अमेरिकेने रशियाच्या झारकडून अलास्का विकत घेतला. हा अलास्का अमेरिकेचे ४९ वे राज्य झाले.





# अमरवाणी

पिबन्ति नद्यः स्स्वयमेव नांभः,
खादन्ति न स्वादु फलानि वृक्षाः,
पयोधरा स्सस्य मर्दति नैव
परोपकाराय सतां विभूतयः ॥ १ ॥

[ नद्या स्वतः पाणी पीत नाहीत. वृक्ष गोड फळे खात नाहीत. ढग (स्वतः पाणी घालून वाढलेली) पिके खात नाहीत. थोर पुरुष आपली मिळकत अशीच परोपकारासाठी खर्च करतात.]

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थ कोटिभिः
परोपकारः पुण्याय, पापाय परपीडनम् ॥ २ ॥

[ कोट्यवधी ग्रंथांत सांगितलेल्या गोष्टी मी अर्ध्या श्लोकात सांगतो,–"परोपकार हा पुण्यासाठी होतो आणि परपीडन हे पापासाठी होते".]

आत्मार्थं जीवलोकेस्मिन् को न जीवति मानवः?
परं परोपकार्थं यो जीवति स जीवति ॥ ३ ॥

[ या जीवसृष्टीत स्वतःसाठी कोण जगत नाही? परंतु परोपकार्थ जो जगतो त्याचे जगणेच खरे जगणे होय! ]





[ २२ ]

[गुरु भल्लूकाच्या शिष्यांनी मारलेल्या थापांवर विश्वास करून वीरपूरचा सेनापती आपल्या सैनिकांसह भुयाराच्या किल्लयात शिरला. ती संधी साधून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी भुयाराच्या दारावर विस्तव पेटवून वीरपूरच्या सेनापतीला व सैनिकांना बाहेर निघण्याची वाटच बंद केली आणि मुकाट्याने शरण येण्यास त्यांना आज्ञा केली. पुढे–]

भुयारातल्या किल्लयात शत्रूला हुडकत हिंडत असलेल्या वीरपूरच्या सेनापतीला बाहेरून जीवदत्ताची आरोळी ऐकू आली. त्याला प्रथम आश्चर्यच वाटले. परंतु आत पसरत चाललेल्या धुरामुळे तो घाबरून गेला. त्याने भुयारातल्या कित्येक खोल्या हुडकून पाहिल्या, परंतु शत्रूचा एक देखील मनुष्य दिसला नाही. दोन तीन मेलेले लांडगे, अस्वलांची इकडे तिकडे पडलेली कातडी आणि काही भाले मात्र त्याला दिसले.

तेव्हां सेनापतीने आपल्या सैनिकांना जवळ बोलाविले व म्हणाला–"आपल्याला जंगलात अस्वल जातीचे ते दुष्ट लोक भेटले होते ना, त्यांना धरून माझ्यासमोर आणून उभे करा. त्यांनी आम्हांला फसविले आणि या लांडग्यांच्या बिळात आणले."



सैनिकांनी गुरु भल्लूकाच्या शिष्यांना धरून आपल्या सेनापतीच्या समोर आणून उभे केले. सेनापती तलवार उपसून त्यांना धमकी देत म्हणाला—"चोरांनो! तुम्ही आम्हांला फसविलेत त्याबद्दल मी आतां तुमची चामडी लोळवितो पहा!"

परंतु त्या धमकीने भल्लूकाचे शिष्य थोडेदेखील भ्याले नाहीत म्हणाले—"आम्ही आपल्या गुरूचा हुकूम पाळला. आतां आम्हांला मरण आले तरी ते आम्ही आनंदाने स्वीकारू." नंतर भुयाराच्या दाराकडे तोंड फिरवून म्हणाले—"ते पाहिलेत का? दोघे क्षत्रिय वीर तुम्हांला पुन्हां एकदा शरण यायला सागत आहेत. त्यांना निमूटपणे शरण [illegible]

रातच जिवंत समाधी मिळेल. डुकरे तडफडून मरतात तशी. तुमच्या बरोबर आमचा जीव गेला तरी त्याची आम्हांला फिकीर नाही.

भल्लूकाचे शिष्य म्हणाले ते दोघे क्षत्रिय वीर कोण, त्यांचा समरबाहूशी संबंध कसा काय हे विचारून घ्यावे असे सेनापतीला वाटले. परंतु ते प्रश्न विचारून मनाचे समाधान करून घ्यायला वेळ कोठे उरला होता. वरून धुराचे लोट आत येत होते. त्या स्थितीत काय करावे व काय बोलावे हेच सुचत नव्हते. सैनिक स्वतःचा जीव वांचविण्यासाठी परस्परांना बाजूला ढकलून बाहेर जाण्याची खटपट करू लागले.

तो फार मोठ्या संकटात सांपडला आहे, हे सेनापतीला कळले. आतां जीव वांचवायला त्या क्षत्रिय युवकांनी म्हटल्याप्रमाणे शरण जाण्याशिवाय दुसरा मार्ग नाही हे ओळखून त्याने आपली तलवार जमिनीवर टाकली व आपल्या सर्व सैनिकांना आपली हत्यारे जमिनीवर ठेवायला सांगितले. नंतर भुयाराच्या दाराकडे तोंड करून मोठ्याने ओरडून म्हणाला—"वर उभे असलेल्या क्षत्रिय वीर हो! वीरपूरचा मी सेनापती आपल्या सैनिकांसह आपणांस शरण आलो आहे. तिकडे जो जाळ आहे तो विझविण्याची कृपा करावी."




[illegible] वर्मा आणि जीवदत्त यांना भुयाराच्या दारापाशी ऐकूं आले. त्यांनी अस्वल जातीच्या लोकांना जळत असलेली लाकडे दूर ओढून दाराची वाट मोकळी करायला सांगितले. त्याप्रमाणे अस्वल जातीच्या लोकांनी जाळ विझविल्यावर खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी भुयाराच्या आंत वांकून पाहिले. त्यांना त्या अंधुक उजेडात उभा असलेला वीरपूरचा सेनापती आणि त्याचे सैनिक दिसले.

"खड्गवर्मा! सेनापती म्हणाला त्यात काही लबाडी दिसत नाही. त्यांना वर यायला सांगू या का?" जीवदत्तने विचारले.

खड्गवर्मा उत्तर देण्यापूर्वी मध्येच गुरु भल्लूक जीवदत्ताला म्हणाला—"मालक! राजा आणि त्याचे सेवक बोलतात त्या सर्व गोष्टी विश्वास करण्यासारख्याच असतात असे नाही. प्रथम माझ्या शिष्यांना वर यायला सांगावे. त्यांच्या कडून आतली खरी परिस्थिती काय ती कळेल."

"लबाडाला लबाडच ओळखू शकतो!" असे म्हणत जीवदत्त थोडा हसला आणि पुन्हां म्हणाला—"बरं बाबा भल्लूका! तू प्रथम आपल्या शिष्यांना वर यायला सांग!" जीवदत्त म्हणाला.



गुरु भल्लूक हातातला भाला वर उंच करून म्हणाला—"वृकेश्वरी मातेचा जय! ए शिष्यांनो! पहिल्याने तुम्ही दोघे वर या! तोंपर्यंत त्या राजाच्या सेवकांना ते आहेत तेथेच उभे रहायला सांगा!" असे म्हणत तो एकदां समरबाहूकडे सहेतुक पाहून म्हणाला—"ही डोंगरी किल्ल्याच्या महाराजांची आज्ञा आहे!"

आपल्या गुरूची आज्ञा ऐकतांच भल्लूकाचे दोघे शिष्य पायऱ्या चढून भुयाराच्या वर आले.

खाली वीरपूरचा सेनापती मनातल्या मनात भ्याला होता. एका राजाचा, दोघां क्षत्रियांना आणि क्रूर अस्वल



जातीच्या लोकांचा तो कैदी झाला होता आणि त्यांच्या पैकी एकाच्यादेखील मना-विरुद्ध काही झाले तर आपला जीव जाणार हे ओळखून तो जास्तच भ्याला होता.

भल्लूकाच्या शिष्यांनी भुयारात घडलेल्या सर्व गोष्टी आणि वीरपूरच्या सर्व सैनिकांनी शस्त्रास्त्रे खाली टाकल्याचे सांगितले. तेव्हां खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी वीर-पूरच्या सेनापतीला आणि सैनिकांना भुयाराबाहेर यायला सांगितले. त्या आधी त्यांनी आपल्या सर्व अनुयायांना शस्त्रास्त्रे घेऊन वेळप्रसंग येईल तसे सावधपणे वागण्यास सांगून ठेवले होते.

बरोबर खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना नमस्कार केला. परंतु जीवदत्तने त्याला समरबाहूकडे बोट दाखवून म्हटले—"हे आहेत या प्रदेशाचे महाराज! हे चंद्रवंशी आहेत, यांचे नाव समरबाहू. यांनीच तुम्हांला जिंकले आहे. तुम्ही यांना शरण आले पाहिजे!"

वीरपूरच्या सेनापतीने खाली वांकून समरबाहूला नमस्कार केला. त्याच्या पाठी-मागून इतर सैनिकांनी बाहेर आल्यावर समरबाहूला नमस्कार केला. समरबाहूने त्या सर्वांना बाहेरच्या मैदानात एकत्र जमायला सांगितले आणि स्वर्णाचारीला म्हणाला—"महामंत्री! या शत्रूला कोणती शिक्षा द्यावी म्हणता?"

स्वर्णाचारीने विचार करून खड्गवर्मा आणि जीवदत्त यांच्याजवळ जाऊन हळू बोलून त्यांचा सल्ला घेतला आणि नंतर समरबाहूला म्हणाला—"या सर्वांना कोणती शिक्षा द्यायची हे वीरपूरचे महाराज आपल्याबरोबर पुढे कसे वागतात यावर अवलंबून राहील. पहिल्याने या सर्वांना आपल्या डोंगरी किल्ल्यातल्या तुरुंगात नेऊन ठेवू या."

"उत्तम! छान! चांगला सल्ला आहे!" समरबाहू म्हणाला. थोड्या वेळात एका

वागण्यात व बोलण्यात जो बदल झाला तो पाहून खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना आश्चर्य वाटले.

खड्गवर्माला बोलल्याशिवाय राहवले नाही. फक्त जीवदत्तलाच ऐकू जाईल इतक्या बारीक आवाजात म्हणाला—"जीवदत्त! पाहिलेस, त्याच्या बोलण्यात व वागण्यात एकदम भारदस्तपणा आला, नाही का?"

"आपण एका लुटेऱ्याला राजा करीत आहो, हे थोडे विचित्रच वाटते आहे. आपल्या शक्तिसामर्थ्याची कल्पना आतां-पर्यंत वीरपूरच्या राजाला चांगलीच झाली असेल व तो फार सावधगिरीनेच आपणांशी बोलेल किंवा वागेल. या प्रदेशातल्या जंगली जातीचे सर्व लोक त्याच्याविरुद्ध आहेतच. तेव्हां समरबाहूचे राज्य बरेच दिवस टिकणार असे वाटते आहे." जीवदत्त म्हणाला.

इतका वेळ दूर उभे असलेले समर-बाहू व स्वर्णाचारी दोघे खड्गवर्मा व जीवदत्त उभे होते तेथे येऊन म्हणाले—"क्षत्रियवीर हो! तुम्ही दोघे परस्परांशी एकांतात काही तरी बोलत होता. तुमचा सल्ला असेल तर आपण किल्ल्यावर जाऊं या."



"राजाज्ञेविरुद्ध बोलण्याची प्राज्ञा कोणाची असणार? चला निघू या." जीव-दत्त म्हणाला.

समरबाहूचे अनुयायी उंटांवर किंवा घोड्यांवर बसून काही पुढे निघाले आणि काही मागे चालू लागले. वीरपूरच्या सैनिकांना कैदी म्हणून मध्ये चालण्यास सांगण्यात आले. काही उंटांना आणि काही घोड्यांना वर कोणी बसले नाहीत म्हणून पाठीमागून त्यांचे लगाम धरून काही लोक चालवीत नेऊ लागले. समरबाहू, खड्गवर्मा व जीवदत्त सर्वांत पुढे जात होते.

सर्वजण डोंगरी किल्ल्याच्या पायथ्या-जवळ येऊन पोंचले असतील तेथे झाडां-



खाली एका उंच जागेवर एक म्हातारा बसलेला होता. त्याच्या चारी बाजूला बरेच लोक उभे होते. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना ते दृश्य दिसले.

"समरबाहू! हे लोक कोण रे? आणि येथे कसे काय? स्वतः वीरपूरचा राजा तुला राजमुकुट घालण्यासाठी व तुझा राज्याभिषेक करून देण्यासाठी आला आहे की काय?" जीवदत्त आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

समरबाहू काही बोलणार इतक्यात तो म्हातारा आपल्या उच्च आसनावरून उठून खाली आला आणि दोघां नोकरांसह खड्गवर्मा आणि जीवदत्त उभे होते त्या बाजूला जणुकाही त्यांच्या स्वागतासाठी सामोरा आला. [illegible] दोघे घोड्यावरून उतरून पायी चालू लागले.

तो म्हातारा त्या दोघांबद्दल आपला आदर दर्शवीत थोडा वाकून नमस्कार करून म्हणाला—"मी वीरपूरच्या राजाचा मंत्री आहे. आमच्या हेरांकडून आम्हांला जे कळले त्यात काही चूक नसेल तर आपण दोघे शूर व पराक्रमी खड्गवर्मा आणि जीवदत्त आहांत असे मी समजतो."

खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी त्या वृद्ध मंत्र्याला नमस्कार केला व म्हणाले—"महामंत्री! कित्येक दिवस आम्ही अरण्यात हिंडतो आहो. म्हणून आपणांस आपल्या हेरांतर्फे आमच्याविषयी पुष्कळ माहिती मिळाली असेल यात शंका नाही. परंतु आपण इतके कष्ट कां घेतलेत हे मात्र कळले नाही." असे म्हणत पाठीमागून समरबाहू घोड्यावरून उतरून येत होता त्याच्याकडे आणि स्वर्णाचारीकडे बोट दाखवून जीवदत्त म्हणाला—"हे आहेत ह्या डोंगरी किल्ल्याचे महाराज समरबाहू आणि हे आहेत त्यांचे मंत्री स्वर्णाचारी!"

राजा आणि मंत्री या शब्दांचा उल्लेख ऐकतांच म्हाताऱ्याच्या कपाळाला आठ्या पडल्या, परंतु स्वतःला सावरीत स्मित करण्याचा आव आणून तो म्हणाला—"या महाराजांनी आमच्या सेनापतींना व त्यांच्या



बरोबरच्या सैनिकांना [illegible] युद्धात जिंकून कैद केले हे आम्हांला या पूर्वीच आमच्या हेरांकरवी कळले. स्वतःच्या शक्तीने या महाराजांनी हा प्रदेश जिंकून या प्रदेशाचे महाराज होण्यास हे योग्य आहेत हे सिद्ध केले आहे. ही गोष्ट मी आपल्यातर्फे सांगत नसून आमच्या महाराजांच्या वतीने सांगीत आहे. परंतु मी आलो तो तुम्हां दोघांना भेटण्यासाठी......एकांतात भेटायचे बोलायचे आहे मला."

जीवदत्त, समरबाहूला आणि स्वर्णाचारीला म्हणाला—"वीरपूरच्या महामंत्र्यांनी म्हटले ते तुम्ही ऐकलेत ना? आतां या डोंगरी किल्ल्याच्या सभोवतालच्या प्रदेशावर कसा राज्यकारभार चालू ठेवावयाचा याविषयीं विचार करा. आतां वीरपूरच्या सेनापतीला व त्याच्या बरोबरच्या सैनिकांना मुक्त करण्यास माझ्या मते तुम्हांला हरकत असण्याचे कारण नाही."

समरबाहूने एकदां स्वर्णाचारीकडे पाहिले आणि होकारार्थी मान हलविली. स्वर्णाचारी वीरपूरच्या मंत्र्याला म्हणाला—"महामंत्री! आपले महाराज आमच्यावर पुन्हा स्वारी करणार नाहीत याची हमी कोण देणार?"

"तशा तऱ्हेची स्वारी या पुढे कधी होणार नाही अशी हमी देण्यास मला



आमच्या महाराजानी मुद्दाम सांगून पाठविले आहे. आमचे महाराज एकदां दिलेला शब्द कधी मोडीत नाहीत अशी त्यांची प्रसिद्धी आहे." वीरपूरचा मंत्री म्हणाला.

ते उत्तर ऐकून समरबाहूच्या मनाचे समाधान झाले. त्याची आज्ञा होतांच समरबाहूच्या अनुयायांनी वीरपूरच्या सेनापतीला आणि सैनिकांना बंदीमुक्त केले. ते स्वतंत्र झाल्याबद्दल आनंद दर्शवीत आपल्या मंत्र्याकडे आले आणि त्यांनी त्यांना नमस्कार केला. त्यांच्या पैकी काही जणांनी समरबाहू आणि स्वर्णाचारी दोघांजवळ कृतज्ञता व्यक्त केली. इतका सहजी तो राजा झाला याबद्दल

समरबाहूला इतका आनंद झाला होता की तो त्या आनंदाच्या भरात वीरपूरच्या सैनिकांना म्हणाला–"आज तुम्ही सर्व माझे पाहुणे झालां आहां. उद्यां उजाडतांच तुम्ही आपल्या राजधानीस पाहिजे तर जा."

त्यानंतर समरबाहूचे अनुयायी, अस्वल जातीचे लोक आणि वीरपूरचे सैनिक परस्परांशी गप्पा गोष्टी करीत झाडाखाली परस्पर मित्रत्वाच्या नात्याने बसले किंवा हिंडू फिरू लागले. वीरपूरच्या मंत्र्याने त्या सर्व गोष्टीत विशेष उत्साह दर्शविला नाही. तो खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांबरोबर थोडा दूर गेला आणि म्हणाला–"मी तुमच्याविषयी आपल्या दूतांकरवी जे ऐकले त्यापेक्षा पुष्कळ जास्त मला एका यक्षाकडून काल रात्री कळले.

"यक्ष? कोण यक्ष तो?" असे म्हणत जीवदत्त आश्चर्यचकित होऊन खड्गवर्माला म्हणाला–"हा यक्ष पद्मावतीला म्हणजे पद्मपूरच्या राजकन्येला पळवून नेणारा यक्ष तर नसेल ना?"

खड्गवर्मादेखील आश्चर्यचकित होऊन विचारात पडल्यासारखा दिसला. वीरपूरचा मंत्री त्यांच्या मनातली शंका दूर करण्याचा काही एक प्रयत्न न करतां आपल्याच नादात पुढे चालत होता. तो समोरच्या एका लहानशा उंचवटयावर उभा राहून खालच्या बाजूला असलेल्या नदीकडे बोट दाखवीत म्हणाला–"नदीत ती नाव दिसत आहे ना, तिच्याकडे जरा लक्षपूर्वक पहा."

त्यांनी दोघांनी त्याप्रमाणे तिकडे उत्सुकतेने पाहिले. ती नाव त्यांनी पद्मपूरला ऐकल्याप्रमाणे आणि अरण्यपूरला पाहिल्याप्रमाणे दगडाच्या रथासारखी होती. जीवदत्तने अत्यंत उत्साहाने आपल्या हातांतली कुबडी वर उचलून धरली आणि नदी तीराकडे निघतांना म्हणाला–"इतक्या दिवसांनंतर तो दुष्ट यक्ष आमच्याशी समोरासमोर दोन हात करायला तयार होऊन आला आहेसा दिसते! छान, चांगली संधी मिळाली, म्हणावयाची!" (चालू)



# वाऱ्याबरोबर वाहणारा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू तर एक एकांडा शिलेदार दिसतो आहेस! इतरांच्या मदतीशिवाय अशक्य अशा कामाची जबाबदारी तू शिरावर घेतली आहेस. लोक नीलदत्तासारखे वारा येईल तशी पाठ देतात. तुला त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी विजयपुर येथे सोमनाथ नावाचा एक नौकानयन शास्त्रात प्रवीण असा व्यापारी रहात असे. तो परदेशाशी व्यापार करून कोटयाधीश झाला. त्याचा नीलदत्त नावाचा एकुलता एक मुलगा

## वेताळाच्या गोष्टी



वयात आल्यावर सोमनाथने आपल्या गलबतात खूप माल भरला आणि समुद्रात प्रवासाला निघाला. वाटेत एकाएकी फार मोठे तुफान आले आणि त्याची सर्व गलबते बुडून गेली. लक्षावधी रुपयांच्या मालासह सोमनाथाला जलसमाधी मिळाली.

दोन वर्षे लोटली तरी सोमनाथ परतला नाही. त्याच्या बायकोने त्या दुःखाने जे अंथरूण धरले त्यातच तिने कायमचे डोळे मिटले. सोमनाथच्या मित्रांनी खोटे हिशोब दाखवून सोमनाथची इस्टेट गिळंकृत केली. नीलदत्तला आनंदात मजा करीत आयुष्य कसे घालविणे एवढेच माहीत होते. म्हणून त्याने बापाच्या इस्टेटीची विल्हेवाट लावली असता तिकडे लक्ष दिले नाही. शेवटी त्याला देशोधडीला लागावे लागले.

परंतु सोमनाथचा एक बालमित्र नवकुबेर याने त्याला थोडा हातभार दिला व त्याला आपल्याच घरी ठेवून घेतले.

नवकुबेर हा त्या देशाच्या राजाचा एक मित्र होता. एकदां तो नीलदत्तला आपल्याबरोबर राजवाड्यात घेऊन गेला असतां राजकन्या लावण्यवतीने त्याला पाहिले. त्याच्या रूपावर ती भाळली व त्याच्या सारख्याशी आपले लग्न झाले तर आपला जन्म सार्थक होईल असे तिला वाटले. तो एका काळी फार श्रीमंत होता व काही कारणाने आपले सर्वस्व घालवून बसला असल्याचे आणि आतां नवकुबेराने त्याला स्वतःच्या मुलासारखे आपल्या जवळ ठेवून घेतल्याचे ऐकल्यावर तिने त्याच्याशीच लग्न करण्याचे मनाशी ठरवून घेतले.

नीलदत्ताला तरी स्वतःच्या स्थितीचा कंटाळाच आला होता. नवकुबेराच्या घरी तो किती दिवस जरी राहाला तरी त्याच्या स्थितीत काही सुधार होण्याची शक्यता नाही हे त्याला चांगले माहीत होते. स्वतंत्रपणे काही उद्योगधंदा करण्यास मार्गच नव्हता. आणखी कोणाच्या आश्रयास राहून आयुष्य घालविण्यास ही त्याला तसा कोणी मित्र किंवा हितैषी दिसेना. म्हणून एक दिवशी रात्री तो नवकुबेराच्या घरून थोडेसे धन आणि काही दागदागिने घेऊन कोणाला काही कळविल्याशिवाय पळून गेला. ते दागिने विकून जे पैसे जमतील ते घेऊन उद्योग धंदा करण्याचा त्याचा विचार होता.

परंतु त्याच्या दुर्दैवाने त्याला राजधानीतल्या शिपायांनी नेमके घेरले. तो कोण आणि त्याच्या जवळच्या गाठोड्यात सापडलेल्या वस्तू त्याच्या जवळ कशा आल्या आणि मध्यरात्र उलटल्यावर त्या घेऊन तो कोठे व कशासाठी निघाला होता वगैरे गोष्टी नीलदत्त काहीच सांगू शकला नाही, तेव्हां संशयावरून त्याला चोर समजून शिपायांनी कैद केले आणि दुसऱ्या दिवशी त्याला राजासमोर उभे केले.

गाठोड्यातले सर्व दागिने नवकुबेराचे आहेत हे बाहेर पडले. नीलदत्त हा नवकुबेराच्या आश्रयाला होता ही गोष्टदेखील राजाला माहीत होती. अशा विश्वासघातकी चोराला चांगली शिक्षा करण्याचा विचार राजाच्या मनात आला. परंतु नवकुबेराने मध्यस्थी करून राजाकडून हद्दपारीची शिक्षा करवून सोडविले.

नवकुबेराने, नीलदत्त त्याच्या घरातून जे काही चोरून घेऊन गेला होता ते सर्व त्याला देऊन टाकले आणि म्हणाला—



"मुला! तू कोठेही रहा, परंतु सुखासमाधानाने रहा."

राजकन्येला नीलदत्तने चोरी केल्याची गोष्ट कळली. त्याबद्दल ती रागावली नाही. उलट त्याला हद्दपारीची शिक्षा मिळाली याबद्दल तिला वाईट वाटले.

नीलदत्त विजयपुराहून निघाला तो अवंतीपूरला आला आणि तेथे काही दिवस चैनीत राहिला. त्याच्याजवळ होते नव्हते ते सर्व पैसे खर्च होऊन गेले. त्यानंतर तो चोरीचा धंदा करू लागला आणि त्यात त्याने चांगलेच प्राविण्य संपादन केले आणि अट्टल चोर म्हणून प्रसिद्धीस आला.



चौर्यकलेत प्राविण्य संपादन केल्यावर विजयपुर नगरात तो एके दिवशी द्वारावर जे पाहरेकरी होते त्यांच्या डोळ्यात धूळ फेकून राजधानीत शिरला. त्यानंतर त्याने एकामागून एक अनेक चोऱ्या यशस्वीपणे केल्या. असाच काही काळ लोटला. त्याला राजकन्येला भेटावेसे वाटले. म्हणून तो एके दिवशी रात्री चोरासारखा राजवाड्यात शिरला. राजकन्येच्या शोधार्थ तो एका-मागून एका खोलीत जात असता त्याला पाहरेकऱ्यांनी धरले.

दुसऱ्या दिवशी राजाने चवकशी करून नीलदत्तने हद्दपारीची शिक्षा झाली असूनही त्याविरुद्ध पुन्हां विजयपुरीत प्रवेश केल्या-बद्दल आणि चोरी करण्यासाठी राजवाड्यात प्रवेश केल्याबद्दल जन्मठेप कारागृहाची शिक्षा ठोठावली. नीलदत्तने राजधानीत शिरून चोरीचा धंदा चालू केल्याची गोष्ट राजाला माहीत नव्हती. ते माहीत असते तर राजाने त्याला फांशीची शिक्षा केली असती.

लावण्यवतीने नीलदत्तला शिक्षा झाल्याचे ऐकले. ती गुप्तपणे त्याला जाऊन भेटली. म्हणाली–"मी तुला काही तरी करून सोडविते. देशाबाहेर जातोस का?"

नीलदत्त म्हणाला–"राजकुमारी! कोठे तरी राहून आपले आयुष्य घालविणे शक्य नाही. मला कोणतेही काम येत नाही. मला तुरुंगवासच जास्त सुखाचा वाटतो."

राजकन्येने तुरुंगाच्या अधिकाऱ्याच्या मुठी भरल्या आणि नियमितपणे येऊन नीलदत्तला भेटू लागली आणि त्याच्यासाठी सर्व सुखसोयींची तिने व्यवस्था करून दिली. दोघांचे परस्परांवर प्रेम वाढतच गेले.

एक वर्ष लोटले.

अवंतीपूरच्या रामसिह राजाची पट्टराणी दिवंगत झाली. त्याने लावण्यवतीच्या रूप-लावण्याविषयी ऐकले होते. म्हणून त्याने तिच्याशी लग्न करून तिला आपली पट्ट-राणी करून घ्यायचे ठरविले. त्याचा [illegible]दूत विजयपुरीच्या [illegible] येऊन भेटला व म्हणाला–"अवंतीपूरच्या महा-राजांच्या मनात आपल्या राजकन्येशी विवाह करावा असे आहे. आपण नकार दिलात तर आपल्या राज्यावर स्वारी करण्याचे आमच्या महाराजांनी ठरविले आहे."

अवंतीपूरचा राजा शूर व पराकमी होता. त्याच्याशी युद्ध करून जय मिळविणे विजयपुरीच्या राजाला अशक्यच होते. म्हणून त्याने राजकन्या लावण्यवती आणि अवंतीपूरचा राजा रामसिह यांचा विवाह करून देण्यास होकार दिला.

ती बातमी ऐकून लावण्यवतीला तिच्या डोक्यावर आकाशातून एकाएकी वीज पडल्यासारखे झाले. रामसिहासारख्या थेरड्याशी लग्न करून घेण्यापेक्षा मरण आलेले पत्करले असे तिला वाटू लागले. त्या दिवशी रात्री ती नीलदत्तला तुरुंगातच भेटली आणि घडलेली गोष्ट सांगून म्हणाली–"चल आपण दूर कोठे तरी पळून जाऊन सुखाने संसार करू या. तुला काही हरकत आहे का?"

नीलदत्त त्या गोष्टीस कबूल झाला. त्या दिवशी रात्रीच दोघं विजयपुरी सोडून पळून गेली.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"राजा! लावण्यवती अविचाराने नीलदत्त-



बरोबर पळून जाऊन आपला ऐश आराम व चैन सुख घालवून दूर कोठे तरी रहायला कशी काय तयार झाली? त्याला काही काम येत नाही, एक निकाम्या आहे, हे माहीत असून ती त्याच्या बरोबर कशी काय पळून गेली? पळून जाण्याऐवजी तुरुंगच जास्त सुखाचा आहे असे मानणारा नीलदत्त तरी पळून जायला कसा काय तयार झाला? तिच्या हौशी तो कसा काय पुन्या करायला तयार झाला? दोघे प्रेमाने आंधळे झाले होते असेच म्हणावयाचे काय? या सर्व शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर

शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"नीलदत्ताने त्याला काही एक करतां येत नाही असे सांगितले होते तरी राजकन्येने ती हुशार असल्यामुळे त्या गोष्टीवर विश्वास करण्याचे कारण नव्हते. तो निकाम्या असता तर त्याला हद्दपारीची शिक्षा झाली असती पुन्हां हिंमत करून तो विजयपुरीत आला असता का? आला असता तरी राजवाड्यात नक्कीच शिरला नसता. तो अट्टल चोर होता तर सरळ खजिना लुटण्याचा त्याने प्रयत्न केला असता, राजवाड्यात अंतपुरात शिरला नसता. नीलदत्तने त्याला तुरुंगवासच जास्त सुखाचा आहे असे म्हणाला होता ते तिला गुप्तपणे भेटायला सोयीचे होईल याच हेतूने होते हे तिने सहजी ओळखले होते. त्याच्यावर तिचे अप्रतिम प्रेम होते तेव्हां एका थेरड्याशी लग्न करून आयुष्याचे मातेरे करून घेण्यापेक्षा एका तरुण व सुंदर माणसाशी लग्न क[illegible] तिला जास्त आवडले असल्यास नव[illegible] नाही. सामान्य माणसाचे जीवित हे राजवाड्यातल्या जीवितापेक्षां चांगले असते की वाईट हेदेखील तिला माहीत नसल्यामुळे तिला त्या सामान्य जीवनाचे भय वाटत नव्हते. नीलदत्तने राजकन्येच्या सानिध्याचा लाभ होईल असा विचार करून त्याने तुरुंगवासच त्याला पसंत असल्याचे सांगितले होते, मग तिच्याबरोबर कोठेही जाण्यास त्याला हरकत असण्याचे कारणच काय? तो तिचे रक्षण कसे करील व त्याच्याबरोबर तिचा संसार सुखाचा होईल की नाही हा प्रश्नच तिच्यासमोर नव्हता. कारण तो अट्टल चोर होता. तो मनात येईल ते करून दाखवील, ही तिला खात्री होती. तो धंदा या देशात नाही तर इतर कोणत्याही देशात उत्तम तऱ्हेने तो करू शकेल. हे तिला माहीत होते."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# लोभी व गरीब

एका गावी एक सावकार रहात असे. तो व्याजाने गरजू लोकांना कर्ज देई. त्याने त्या धंद्यात लक्षावधी रुपये मिळविले होते. परंतु त्याचा चिक्कूपणा मात्र सुटला नाही. तो अर्धं पोटी राही आणि दररोज तिजोरीत पैसे सांठवून एकदां अवश्य उघडून पाही की किती वाढले.

एके दिवशी त्याच्याकडे एक गरीब मनुष्य आला. त्याने मागे कधी कर्जाऊ रक्कम घेतली होती ती परत करीत म्हणाला–"मालक! आपणांला परत करायच्या रकमेहून मी थोडी जास्तच रक्कम देत आहे. फक्त एकदां तुमच्या तिजोरीत किती पैसे आहेत डोळ्यांनी पाहू द्याल का?"

"काय हरकत आहे पहायला? पाहिले म्हणून काय जाते? थोडे जास्तच पैसे देतो आहे, कशाला सोडा?" असा विचार करून सावकाराने तिजोरीतले धन त्याला दाखवायचे कबूल केले.

त्या गरिबाने सावकाराच्या तिजोरीतले धन डोळे भरून पाहिले व म्हणाला–"होय हो! मी आतां तुमच्यासारखाच सावकार झालो म्हणावयाचा!

"ते कसं काय?" सावकाराने विचारले.

"तुम्ही तरी ते धन डोळ्यांनी पाहण्याव्यतिरिक्त काय करतां? मी सुद्धां ते पाहिले. खाणेपिणे, कापडलत्ता वगैरे बाबतीत मीच तुमच्याहून बरा!" असे म्हणत तो गरीब मनुष्य तेथून निघून गेला.





# मेणबत्तीवर आरोप

उग्रगुप्त महाराजांची राजधानी मिलनगड हे एक अत्यंत सुंदर नगर होते. उंच व सुंदर इमारती आणि वाडे, स्वच्छ व मोठे रस्ते, मनोहर सरोवरे आणि उद्याने त्या नगराची शोभा वाढवीत होती. प्रजा सुखी व संपन्न होती. उग्रगुप्ताने शेजारच्या राज्यांशी सख्य ठेवले असल्याने युद्ध लढायांचा प्रश्न उद्भवत नव्हता. पाऊस पाणी चांगले होते म्हणून पिके चांगली येत. म्हणून दुष्काळाची भीतीबाधा कधी उद्भवली नाही.

मिलनगडला त्या दिवशी दिवाळी होती. रात्री गांवभर सर्वत्र घरात, उद्यानात, रस्त्यात जिकडे पहावे तिकडे दिव्यांचा झगझगाट होता. तोरणे व पताकांनी सर्व राजधानी सजलेली होती.

राजवाड्यातल्या प्रत्येक गवाक्षखिडकीत, दारात, गॅलरीत दिव्यांच्या रांगा खुलून दिसत होत्या. आकाशात नक्षत्रे चमकतात तसे दिवे राजवाड्याची शोभा वाढवीत होते. रंग महालात मोठमोठे गवई व वाद्यवादक जमले होते व गायनाची मैफिल चालू होती. स्वतः राजाला गायनाची फार आवड होती. त्याला इंद्रजाल सहित अनेक कला अवगत होत्या. रंगमहालात सर्व दरबारी आणि प्रमुख नागरिक जमले होते.

एकाएकी एक मोठी किंकाळी ऐकू आली. तोच आवाज पुन्हां एकदा ऐकू येताच नोकरांचाकरांपासून तर स्वतः महाराज उग्रगुप्तापर्यंत सर्व लोक आवाजाच्या दिशेने धावले. ती किंकाळी कोणाची होती हे कळल्यावर तर भीतीने सर्वांच्या अंगाला शहारेच आले. उग्रगुप्ताचा एकुलता एक मुलगा राजकुमार नारायण रहात असे त्या महालातून तो [illegible] एका कोपऱ्यात डाव्या हाताने उजवा हात धरून 'ओय ओय' करून रडत होता. त्याचे वय सात वर्षांचे असेल. गोड मुलगा होता, सर्वांचा जीव की प्राण. त्याची दाई शेजारी किंकर्तव्य विमूढ स्थितीत उभी होती. तिचा चेहरा पांढरा फट्ट पडला होता.

उग्रगुप्तने दाईला विचारले—"काय झाले तरी काय?"

परंतु राणीने चटदिशी मुलाला कडेवर उचलून घेतले व त्याला शांत करण्याचा प्रयत्न करू लागली.

दाई घाबऱ्या आवाजात म्हणाली—"युवराजांनी बोट भाजून घेतलं!"

"तू काय करीत होतीस? मुलावर लक्ष नको होतं का ठेवायला?" राजाने दरडावून विचारले.

"होय सरकार! मी त्यांच्या बरोबरच होते. ते खिडकीतून गावातल्या दिवाळीचे दिवे पहात होते. मी पाठीमागे उभी होते. तेवढ्यात ते मला म्हणाले—'दाई, पहा कसं नक्षत्रासारखं चकाकते आहे की नाही ग!' आणि त्यांनी सरळ वत्तीवरच बोट धरले. मेणबत्ती खिडकीतच तर लावली होती. मी त्यांचा हात मागे ओढण्याच्या आत बोट भाजले. युवराज धावत या कोपऱ्यात जाऊन उभे राहले आणि तेव्हांपासून थरथर कांपत आहेत. मी झालं ते सांगितलं. क्षमा करावी महाराज!" दाई म्हणाली.



वैद्याने येऊन भाजलेल्या बोटाला औषध लावले. राणी त्याला उचलून खिडकीजवळ जाऊन उभी राहली आणि त्याला दूर दूरचे दिवे आणि आकाश कंदील दाखवून त्याने सर्व विसरावे म्हणून प्रयत्न करू लागली. त्याच्या बोटाच्या कळा थोड्या थांबल्या, परंतु तो भाजल्याची गोष्ट विसरला नाही.

"पहिल्याने त्या खिडकीतल्या त्या भिकार मेणबत्त्या काढा पाहू! नाही तर मी

श्री ए. सी. सरकार, जादुगार



खिडकीजवळ नाही जाणार!" युवराज म्हणाले.

"आतां तुझे बोट भाजणार नाही बाळा! आतां तू आपले बोट त्या ज्योतीला लावणारच नाही मुळी!" राणी त्याची समजूत घालीत म्हणाली.

"नाही आई! मी यापुढे मेणबत्तीकडे ढुंकूनसुद्धा पाहणार नाही. सर्व मेणबत्त्या काढून फेकून द्या. राजवाड्यात एकदेखील मेणबत्ती दिसतां कामा नये!" युवराज हट्ट करीत म्हणाले.

"बाळ! मेणबत्त्या नसल्या तर दिव्यांचा उजेड कसा राहील? दिवे नसले तर काळोख नाही का होणार? अन् तू खिडकीत का बसून राहणार?" उग्रगुप्त मुलाला म्हणाला.

"मला ते काही कळत नाही. माझ्याजवळ मेणबत्ती येतां कामा नये! ती माझ्या दृष्टीस पडतां कामा नये!" असे म्हणत युवराज नारायण समोर दिसेल ते उचलून फेकू लागला आणि त्या आदळ आपटीत कित्येक वस्तू फुटल्या.

प्रधानमंत्री उग्रगुप्ताजवळ जाऊन म्हणाले—"एकाएकी झालेल्या या अपघाताने युवराज घाबरले आहेत. त्यांचा मेणबत्तीची दहशत बसलेली दिसते आहे. आतांच मेणबत्तीची ही भीती त्यांच्या मनातून काढून टाकली नाही तर याचा दुष्परिणाम आयुष्यभर भोगावा लागेल. तेव्हां जळत्या मेणबत्तीची त्यांच्या मनात जी भीती उत्पन्न झाली आहे ती काढून टाकविली पाहिजे. ते कसे साधेल, काही तरी विचार करून पहावा!"

उग्रगुप्तने बराच विचार करून पाहिला, परंतु काय करावे, त्याला सुचले नाही.

"आपणांस इंद्रजाल विद्या माहीत आहे तिचा नाही का काही तरी उपयोग होणार, महाराज?" राममोहन नावाच्या एका दरबाऱ्याने सूचना केली.

"चांगली युक्ती सुचविलीत? जादू करून पाहूं या तर!" उग्रगुप्त महाराज म्हणाले.



राजाने काही वेळ विचार केला व नंतर मुलाजवळ जाऊन म्हणाला—"तू म्हणालास ते अगदी बरोबर आहे बघ! राजवाड्यातल्या सर्व मेणबत्त्या बाहेर काढल्या पाहिजेत. फक्त राजवाड्यातूनच कां? आपल्या सर्व राज्याबाहेर त्यांना काढले पाहिजे. त्या फार दुष्ट आहेत. त्यांनी आमच्या बाळाचे बोट भाजले. काय बरोबर आहे की नाही, प्रधान?" असे डोळे मिचकावून उग्रगुप्त म्हणाला.

"होय महाराज! आपल्या राज्यात एक मेणबत्तीदेखील राहता कामा नये. फार वाईट आहेत त्या." राजाची सूचना कळताच मंत्र्याने या शब्दात दुजोरा दिला.

ते संभाषण ऐकल्यावर राजकुमाराचा राग थोडा उतरल्यासारखा झाला, मनाचे समाधान झाले.

राजा मुलाला मांडीवर घेऊन म्हणाला—"हे पहा, बाळा! मी राजा आहे ना, राजाने कोणालादेखील त्याच्या अपराधाची सर्व चवकशी केल्याशिवाय शिक्षा करता कामा नये. म्हणून मेणबत्त्यांवरच्या आरोपाची चवकशी झाली पाहिजे. त्यांच्यात काही चांगले गुण आहेत का हेदेखील पाहू या. त्यांनी तुझी थोडी फार करमणूक केली तर त्यांच्यावर थोडी कींव करता येईल, बरोबर आहे की नाही?"



परंतु युवराजाने काहीच उत्तर दिले नाही. गप्प बसून राहला.

राजाने आपल्या खजिन्यातून एक जाडजूड मेणबत्ती मागविली. तिच्या दुसऱ्या टोकाला तासून वात बाहेर काढविली, आतां दोन्ही टोकाला पेटविण्यालायक मेणबत्ती तयार झाली. त्यानंतर राजाने सारख्या उंचीचे दोन काचेचे ग्लास आणविले आणि मेणबत्तीच्या मध्य भागी एक सुई आरपार खुपसून त्या सुईची दोन्ही टोके काचेच्या ग्लासांवर ठेवून मेणबत्ती आडवी दोन्ही ग्लासांच्या मध्ये राहील असे केले. नंतर त्याने बसलेल्या मुलांच्या पुठ्ठ्याच्या दोन आकृत्या कापून मेणबत्ती-

च्या दोन्ही बाजूला बसू शकतील अशा तऱ्हेने छान रंगवून त्या दोन टांचण्यांनी खोचून मेणबत्तीची दोन्ही टोके दिसणार नाहीत अशा तऱ्हेने मेणबत्तीत दोन्ही टोकांना खुपसून बसविल्या. परंतु मेणबत्तीच्या दोन्ही बाजूला वाती पेटविल्या तरी त्या बाहुल्या जळणार नाहीत इतक्या अंतरावर त्या काळजीपूर्वक बसवाव्या लागल्या. नंतर त्याने दोन्ही बाजूच्या वाती पेटविल्या आणि मुलाला म्हणाला—"आतां गंमत पहा बरं का! सांग, तुला गंमत वाटते की नाही!"

अद्भुत! डोळ्यावर विश्वास होणार नाही, अशा त्या बाहुल्या 'सी-सॉ' सारख्या पाळीपाळीने खालीवर होऊ लागल्या. मेण-बत्तीच्या दोन्ही टोकांना वाती जळू लागल्या-वर मेण वितळून एकेक थेंब दोन्ही टोकाला खाली गळू लागले ते दृश्य खरोखरच पाहण्यासारखे अद्भुत अविश्वसनीय जादू केल्यासारखे वाटत होते, बाहुल्या आपोआप खालीवर होत होत्या.

युवराज आनंदाने टाळ्या वाजवून ओरडू लागले—"गंमत, जादू!" जवळ येऊन त्या मेणबत्तीला हळूच हात लावून पुन्हां टाळ्या वाजवू लागले.

"बरं मग सांग, काय करूं या आतां? फेकून देऊं या का सर्व मेणबत्त्या?" राजाने विचारले.

"तसं नव्हे हो बाबा! सर्व वस्तूंतच काही चांगलं काही वाईट असतं, नाही का? आता या पुढे मी मेणबत्तीच्या ज्योतीला बोट नाही लावणार. हळूच मागे धरीन." युवराज म्हणाले.

"बरं तर मी मेणबत्तीवरच्या आरोपा-विषयी आपला न्याय निवाडा सांगतो. त्यांना निर्दोषी जाहीर करण्यात येत आहे. या पुढे त्यांना सर्व घरात जळत राहून काळोखाला पळवून लावण्याचे काम करायला पूर्ण परवानगी आहे."

तो निवाडा ऐकून सर्वांबरोबर युवराज नारायणाने सुद्धां टाळ्या वाजवून आपला दुजोरा दिला.





# भुकेचे औषध

एकदा एका देशात दुष्काळ पडला. राजाने आपल्या मंत्र्यांना, दरबाऱ्यांना आणि प्रमुख नागरिकांना बोलावून एक सभा केली व म्हणाला—"आपल्या देशात दुष्काळाने तांडव नृत्य सुरू केले आहे. दररोज कित्येक लोक मरत आहेत. भूकच लागू नये असे काहीतरी औषध वैद्यांकडून तयार करविले पाहिजे."

आतां कोणता प्रसंग कोणावर कसा येतो कोणास ठाऊक असा विचार करून सर्व लोक परस्परांकडे पाहू लागले.

वयोवृद्ध मंत्री सुबुद्धी एकटे म्हणाले—"महाराज! आपल्या देशात दुष्काळ पडतोच. खरे पाहतां आपल्या देशात पाऊ-सच कमी. थोडा पाऊस जरी वेळेवर पडला तर देशात कधी दुष्काळ पडाव-याचाच नाहीं. शिवाय जेव्हां पाऊस पडतो तेव्हां लहान मोठ्या ओहोळांबरोबर जमि-नीतला सुपीक भाग तेवढा वाहून जातो. म्हणून जमिनीचे जागोजागीं रक्षण व्हावे यासाठी बांध बांधविले पाहिजेत. दुष्का-ळाची हकालपट्टी, कायमची करावयाची. झाल्यास पाटाच्या किंवा कालव्याच्या पाण्याची कायम व्यवस्था करावी लागेल, म्हणजे धनधान्याने देश सस्यश्यामल होऊन कोठारे भरून जातील. औषधाने का भूक भागणार आहे."

"कां भागणार नाही, मी पाहतो." असे म्हणत राजा मंत्र्यावरच आग पाखडू लागला.

राजाने मंत्र्याला तसे उत्तर देऊन गप्प केले. नंतर इतर लोक राजाला म्हणाले—"आपण म्हणालात ती गोष्ट खरोखरच अत्यद्भुत आहे."

सर्व वैद्य किंकर्तव्यविमूढ होऊन पर-स्परांकडे पाहू लागले. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला—"महाराजांनी क्षमा करावी. भूक

श्री नृ. ना. दामले

लागूच नये यासाठी औषध कोणत्याही वैद्यकीय ग्रंथात नाही!"

"म्हणजे तुम्हांला ते तयार करणे शक्य नाही, हेच ना? मंत्री, या सर्व नकली वैद्यांना धरून तुरुंगात टाका." राजा संतापून जाऊन म्हणाला.

एक वृद्ध मनुष्य पुढे येऊन म्हणाला–"या सर्व वैद्यांना सोडा. एका आठवड्याच्या आत मी आपण म्हटल्याप्रमाणे औषध तयार करून आणतो."

"वैद्य म्हणावे तर अशा माणसाला!" असे म्हणत राजाने सर्व वैद्यांना सोडायला सांगितले.

त्यानंतर काही दिवसांनी तो वृद्ध मनुष्य महाराजांना येऊन भेटला आणि ताडफळा- [illegible] म्हणाला–"प्रत्येक माणसाला एक गुंजभर त्यातले औषध खायला दिले तर त्याला आयुष्यभरात कधी भूक लागणेच शक्य नाही."

राजाने ते औषध घेतले आणि त्या वृद्ध माणसाचा सत्कार करून ते औषध आपल्या नागरिकांना वाटले. राजासमोर कोणी ते औषध घेतले नाही. म्हणून त्यांना नेहमी सारखीच भूक लागत राहली. तरी गावात ही बातमी पसरली की कोणाला भूक लागत नाहीशी झाली आहे.

वृद्ध मंत्री राजाजवळ येऊन म्हणाला–"महाराज! नागरिकांनी आणि प्रजेने काम करायचे सोडले आहे. त्यांना आता [illegible] नृत्य गाणे आणि तमाशात गुंग झाले आहेत. कोण लहान कोण थोर याचा विचार कोणाच्याही मनात राहला नाही."

"सर्वात मोठा असा भुकेचा प्रश्न सुटला म्हणावयाचा!" राजा म्हणाला.

आणखी दोन दिवसांनी मंत्री राजाला येऊन भेटला व म्हणाला–"सर्वांनी आपले पिढिजात धंदे सोडले आहेत. कोष्टी कापड विणीत नाहीत. न्हाव्यांनी दाढी हजामत करण्याचे काम सोडले आहे. म्हणून नागरिक दाढी मिशा वाढवून रानटी जनावरांसारखे हिंडत आहेत. एकही गरजेची वस्तू मिळत नाहीशी झाली आहे. अन्न धान्यच नव्हेतर सर्वच वस्तू अदृश्य झाल्या आहेत. सोने ओतल्यावरच एखादी वस्तू दृष्टीस पडते."

राजा ते ऐकून काही एक बोलला नाही. गप्प बसून राहला.

आणखी एक दिवशी मंत्री राजाला भेटून म्हणाला–"प्रजेने बंड पुकारले आहे आणि सर्वत्र अराजकता पसरत आहे!"

राजाला राग आला. "प्रजा इतकी कृतघ्न का झाली आहे? सैन्य तयार ठेवायला सेनापतींना निरोप पाठवा!" राजा म्हणाला.

"आतां आपल्याजवळ सैन्य कोठे आहे, महाराज? कित्येक सैनिक नोकरी सोडून निघून गेले आहेत!" मंत्री म्हणाला.

इतक्यात सेनापती घाबऱ्या घुबऱ्या स्वागत येऊन म्हणाला–"महाराज! आपल्या शत्रू





चंडप्रचंड सैन्य घेऊन आपल्या राजधानीवर चालून आला आहे व त्याने राजधानीला वेढा दिला आहे."

"तरमग आतां काय करायचे?" राजाने विचारले.

"शत्रूला शरण जाण्या व्यतिरिक्त दुसरा काही उपाय दिसत नाही, महाराज!" सेनापती म्हणाला.

तो असे सांगत असतांच शत्रूचे सैनिक आले. त्यांचा नायक राजाजवळ येऊन म्हणाला—"आपले राज्य आम्ही स्वाधीन करून घेतले आहे. तुम्ही व्यर्थ विरोध करून आपला जीव धोक्यांत घालण्याचा प्रयत्न करू नका."

"आतां विरोध कोठून करणार मी? ह्या भुकेच्या औषधाने माझे डोके ताळ्यावर आले आहे. मी तुमचा बंदी व्हायला तयार आहे." राजा म्हणाला.

इतक्यात पोलादी कांब फिरवीत तो वृद्ध वैद्य येऊन म्हणाला—"भुकेचे औषध हे सर्व [illegible] होते ते कोणी ऐकले का?"

"तेच मी आतां भोगतो आहे!" राजा म्हणाला.

"आतां तरी आपले डोळे चांगले उघडले, हे आपले नशीबच मानले पाहिजे." असे म्हणत वैद्याने आपला वेष टाकून दिला आणि आपल्या खऱ्या वेषात प्रगट होऊन मंत्री म्हणाला—"महाराजांनी क्षमा करावी! पैसे झाडाला लागत नाही की मंत्राने झाडाला आंबे लागत नाहीत. औषधाने भूक मरत नाही. आपल्या हातून काही योजनेप्रमाणे काम व्हावे या हेतूने मी हे सर्व नाटक रचले होते. शत्रुसैनिक म्हणून आले ते आपल्या सैन्यातले लोकच होते. आपल्याला बंदी कोण करणार? देशाचे धन सत्कार्यासाठी प्रजेच्या हितासाठी खर्च व्हावे यासाठी योजना करू या, म्हणजे देश शस्यश्यामल होऊन सर्वत्र सुख व शांती नांदू लागेल!"





# तीन पैशांचे पुण्य

एका गावी सुब्बुशेट नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याला पैसा म्हणजे जीव की प्राण वाटे. त्याच्या बायकोला नवऱ्याच्या चिक्कूपणाचा तिटकारा होता. परंतु नवऱ्याचा स्वभाव ओळखून ती शक्यतों-वर संभाळूनच खर्च करी. तरी तिला कधी धार्मिक कार्य करायचे असले म्हणजे ती हट्ट करून आवश्यक तेवढा खर्च करी.

उपभोगायला पुष्कळ पैसा असूनही सुब्बुशेटला मूलबाळ नव्हते. ती त्यांच्या आयुष्यात फार मोठी उणीव होती. मीनाक्षीने कित्येक देवीदेवतांचे नवस केले आणि त्यांना सांकडे घातले. तिने पुष्कळ दानधर्म करण्याचे कबूल केले. परंतु तिला यश मिळाले नाही. शेवटी अगदी कंटाळा आल्यावर तिने नवऱ्याला एका वर्षात व्यापारात जो फायदा होईल त्यातल्या रुपयाला एक पैसा याप्रमाणे देवाधर्माला देईन असा देवाजवळ नवस केला.

सुदैवाने नवसाला देव पावला व तिला दिवस राहले आणि एक सुंदर मुलगा झाला. तिने मुलगा झाल्यावर मागितलेल्या नवसाची गोष्ट नवऱ्याला सांगितली. सुब्बु-शेट दचकून तिला म्हणाला—"तुझं डोकं तर फिरलं नाही? मिळकतीतला रुपयाला एक पैसा म्हणजे काही नाही तरी दोनतीन हजार रुपये तरी नक्कीच होतील! पुन्हां असल्या गोष्टी करीत जाऊ नकोस!"

मीनाक्षी कंबरेवर हात ठेवून म्हणाली—"तुम्ही या बाबतीत तरी काही बोलता कामा नये. हा देवाशी झालेला व्यवहार आहे. मुलाच्या जीवाला काही झालं तर माझं प्रेतच तुमच्या दृष्टीस पडेल, सांगून ठेवते!"

सुब्बुशेट काही एक बोलला नाही, होकार देऊन गप्प बसला. देव फार क्रोधी असतो

श्री र. श्री. हेगडे



असं त्याने ऐकलं होतं. त्याचं भय वाटत होतं त्याला. विचार करून बायकोला म्हणाला–"तू मागितलेला नवस मी या खेपेस मानतो. परंतु सांगून ठेवतो असले नवसबिवस मागत जाऊ नकोस बुवा!"

"मला नाही वाटतं कळत!" मीनाक्षी म्हणाली.

काही दिवसांनी सुब्बुशेट बायकोला व मुलाला घेऊन देवाला निघाला. मीनाक्षीने नवसाची रक्कम देण्यासाठी म्हणून आपले ठेवणीतले पैसे घेऊन आली होती. रुपयाला पैसा याप्रमाणे हिशोब सांगून सुब्बुशेट बरोबर एक हजार रुपये घेऊन आला होता.

नये." मीनाक्षी नवऱ्याला सावध करीत म्हणाली.

वाटखर्चासाठी आणखी एक हजार रुपये घेऊन सुब्बुशेट प्रवासाला निघाला होता. घराला कुलूप लावताना सुब्बुशेटला एक बैरागी उभा असलेला दिसला.

"प्रवासाला निघण्याच्या ऐन वेळी काही शुभ व्हावे तर त्या ऐवजी हा काळतोंड्या बैरागी समोर उभा!" सुब्बुशेटने या शब्दात त्या बैराग्यावर तोंडसुख घेतले.

बैरागी म्हणाला–"शेटजी! तीर्थदर्शनाला निघण्यापूर्वी दानधर्म करावा असं आहे. रात्रभर उपाशी आहे. काय असेल ते वाढा."

"गप्प रहा! तुझ्या या उपदेशाचीच जणुकाही वाट पहात होतो मी! तुझं ते तीन पैशांचं पुण्य मी गाठीला बांधायला तयार नाही. हजारो रुपये खर्च करून देवाकडून डोंगरा एवढे पुण्य मिळवायला निघालो आहे." सुब्बुशेट म्हणाला.

सुब्बुशेट म्हणाला ते ऐकून मीनाक्षीला वाईट वाटले. समोर नवरा चालला होता. त्याला दिसणार नाही अशा तऱ्हेने तिने पिशवीतून दोन लाडू काढून त्या भिकाऱ्याला दिले आणि कमरेला खोचून ठेवलेले तीन पैसे काढून तेदेखील त्याला दिले.



वेळी तिकडे गेली. बायकोवर संतापून तो म्हणाला–"सर्व पैसे येथेच खर्च करून टाकलेस तर परत येतांना भीक मागावी लागेल, लक्षात असू दे."

"जाऊ द्या हो! बिचारा तो केव्हांपासून उपाशी वाट पहात होता! त्याला खायला काही नाहीतर निदान तीन पैसे तरी त्याच्या हातावर ठेवले." मीनाक्षी म्हणाली.

तीर्थक्षेत्रात पोचल्याबरोबर सुब्बुशेटने उतरायला धर्मशाळेत एक चांगलीशी खोली पाहून ठरविली. कारण जवळ चार पैसे होते आणि बायकोच्या अंगावर दागिने पण होते. म्हणून सर्व वस्तू नीट संभाळून ठेवल्या आणि आंघोळ केल्यावर बदलायला आवश्यक कपडे घेऊन दोघं स्नानाला निघाली. कुंडात स्नान वगैरे उरकून देवळात गेल्यावर सुब्बुशेट मीनाक्षीच्या हातात एक हजार रुपये देत म्हणाला–"माझ्याजवळ आणखी एक हजार आहेत. एक हजार देवाच्या पेटीत टाक बाकी हजार परत प्रवासाला हवेत."

"ब...रं!" म्हणाली मीनाक्षी.

देवाच्या पेटीत टाकतांना इतर वस्तूंबरोबर नवऱ्याने दिलेले एक हजार रुपये मीनाक्षीने पेटीत टाकले. ती गोष्ट लक्षात राहली नाही आणि जणुकाही त्यालाच पुण्य



मिळावे म्हणून सुब्बुशेटने जवळचे एक हजार रुपयेसुद्धा पेटीत टाकले. दोघं बाहेर आल्यावर सुब्बुशेट बायकोला म्हणाला–"पैसे संभाळून ठेव बरं का! सगळे चोर आहेत इथे!"

"स्वत: जवळ पैसे ठेवून मला संभाळून राहायला सांगता आहां का?" चकित होऊन मीनाक्षीने विचारले.

सुब्बुशेटच्या लक्षात लगेच आले, चूक झाली. सुब्बुशेट देवळाच्या अधिकाऱ्याकडे झालेली चूक सांगून हजार रुपये परत मिळतात का पाहून प्रयत्न करायला गेला. परंतु काही एक उपयोग झाला नाही.

मीनाक्षी त्याला म्हणाली–"तुम्हीच केली असेल चूक. देवाच्या वांट्यातले पैसे

चुकीचा हिशोब झाल्याने काही पैसे राहून गेले असतील कदाचित!" सुब्बुशेट थोबाडीत बसल्यासारखा गप्प राहला.

त्या दोघांजवळ सर्व मिळून जे पैसे उरले होते ते एक दिवसाच्या खर्चा इतके सुद्धां नव्हते. वाटेत उपास काढीत, शक्य झाले तेथे भीक मागत, नानाप्रकारचे कष्ट व अपमान सहन करीत दोघं घरी पोंचली. पुष्कळ दिवसांनी तीर्थयात्रा संपवून सुब्बुशेट सकुटुंब परतले, तेव्हां शेजारपाजारचे लोक भेटायला आले. आश्चर्य म्हणजे, ते निघाले तेव्हां जो बैरागी दारात भेटला होता तो देखील तेथे होता. तोसमोर येऊन सुब्बुशेटला म्हणाला:–"शेटसाहेब तीर्थयात्रा सुखरूप पार पडली ना!"

सुब्बुशेट चिडून जाऊन म्हणाला–"पडली खूप सुखरूप पार पडली! सारी वाट भीक मागत परत यावे लागलं! झालं का समाधान तुझ्या मनाचं?"

"तुम्ही निघताना म्हटलेले तेच ना? बरं येतो!" असे म्हणत बैरागी तेथून निघून गेला.

बैरागी जागला खरा!" एक बाई म्हणाली.

"तसं कां म्हणता बाई?" सुब्बुशेटने तिला विचारले.

"कां विचारतां? तुम्ही गेलात त्या दिवसापासून तो बैरागी तुमच्या घरासमोर कुश्यासारखा राखण करीत बसला होता. परवां रात्री तुमच्या घरात चोरी करायला चोर आले होते. बैराग्याने त्यांना पाहिले आणि ओरडला. चार लोक जमा झालेले पाहून चोर पळून गेले. त्या बैराग्याला तुम्ही काय काय बोललात, जणुंकाही त्यानेच चोरी केली होती तुमच्या घरात!" ती बाई म्हणाली.

"तीन पैशाचं पुण्यच कामाला आलं तर! आमचं सर्वस्व वाचलं?" बायको सुब्बुशेटकडे पहात म्हणाली.

सुब्बुशेटला आपल्या अविवेकपूर्ण बोलण्याबद्दल पश्चात्ताप झाला. त्या दिवसापासून दानधर्म करण्यात सुब्बुशेटने कुचराई दर्शविली नाही.



# गुरूच्या विद्या गुरूस फळली

एका गरीब शेतकऱ्याकडे एक दुभती गाय होती. तिला पाहिल्यापासून त्या गावच्या पुरोहिताच्या डोळ्यात ती गाय भरली होती. त्याच सुमारास त्या शेतकऱ्याचा बाप मेला. अग्निसंस्कारापासून सर्व अंत्यसंस्कार त्या पुरोहिताच्या सांगण्याबरहुकूम करण्यात आले. पुरोहित त्या शेतकऱ्याला म्हणाला–"बाबा रे! तुझा बाप स्वर्गलोकी जायला हवा असेल तर वैतरणी पार करावी लागेल. त्या नदीत भयंकर मोठमोठ्या मगरी सुसरी आहेत. ती नदी पार केल्याशिवाय स्वर्गप्राप्ती अशक्य आहे. पण एक उपाय आहे. तू ब्राह्मणाला दुभती गाय दान कर. तिचे शेपुट धरून तुझे बाबा वैतरणी पार करू शकतील."

शेतकऱ्याने आपली दुभती गाय दान करून पुरोहिताच्या घरी आणून बांधली. परंतु बापाच्या मृत्यूपेक्षा, हे गोदान त्याला अवघड वाटले. चारपांच दिवस गाय दान केल्याचे अपार दुःख त्याला झाले. शेवटी तो पुरोहिताच्या घरी जाऊन म्हणाला–"गुरुजी! एक शंका विचारू का?" भटजी म्हणाले–"विचार ना!" शेतकऱ्याने विचारले–आतापर्यंत आमचे बाबा वैतरणी पार गेले असतील का?"

"अरे ते केव्हांच पैलतिरी गेले!" पुरोहित म्हणाले.

"त्यांना पुन्हा परत तर नाही ना फिरविणार?" शेतकऱ्याने विचारले.

"एकदां वैतरणी पार झाली की परत यायचे नावच नको काढायला!" पुरोहित म्हणाले.

"तर मग मी आपली गाय परत घेऊन जातो!" सांगून शेतकरी गाईला घेऊन निघाला.







# लग्नाशिवाय हुंडा

**स**खाराम नावाच्या एका माणसाला एक मुलगा होता. त्याचे नाव शंकर होते. मुलगा मोठा होऊ लागला तसतसें आपला मुलगा फुकट कुचकामाचा आहे असे सखारामाला वाटू लागले. म्हणून सांगितलेले काम मुलानें करीत जावे असे वळण सखारामाने मुलाला लावले. म्हणून तो एक निव्वळ बोळू निघाला. त्याला एक गोष्ट मात्र उत्तम येत असे व तो ती स्वतः शिकला होता. गावातल्या तलावात डुंबताना तो बुडी मारून बराच वेळ दम धरून पाण्यात राही. त्याची त्याला चांगलीच संवय झाली होती.

मुलाचे लग्न करून दिल्यावर त्याला अक्कल येईल असे सखारामाला वाटले. मुलाला आई नव्हती. सून आली म्हणजे जेवणाखाणाची पण सोय होईल हा विचार-देखील मनात होता. परंतु गावात या दुषखुळचाला मुलगी कोण देणार?

तेव्हां शेजारच्या गावी एक चांगली मुलगी आहे, हे ऐकून सखारामाने ते स्थळ पाहण्याचा विचार केला. सखारामाने मुलगी पहायला जाते वेळी मुलाला कसे वागायचे हे समजावून सांगितले. म्हणाला— "जाताना प्रथम दाराबाहेर वहाणा काढून ठेव आणि तू खुर्चीवर बस. कळलं का?" असं पुन्हां पुन्हां विचारले.

शंकरने बाप जे जे म्हणाला ते ध्यान-पूर्वक ऐकल्यासारखे डोके हलवून सांगितले. नंतर बापाने सांगितले ते तो मनातल्या मनात घोकत राहला. त्याच मनःस्थितीत तो गाडीत बसला. परंतु वाटेत तोंडपाठ केलेल्या गोष्टी एकदम उलटचा झाल्या. कारण त्याने समजल्याशिवायच त्या गोष्टी पाठ केल्या होत्या.

त्याने त्या गावी पोचल्यावर मुलीच्या घराच्या दाराबाहेर वहाणा न ठेवतां त्या खुर्चीवर [illegible] आणि [illegible]बाहेर जाऊन बसला.

मुलाचे रूप आणि वागणे पाहूनच मुलीच्या बापाने त्याची किंमत केली. मुलीला दाखविण्याचा विचारच त्याने मनांतून काढून टाकला आणि म्हणाला— "या नंदीबैलाला मी आपली मुलगी देणार नाही!" असे सांगून त्याने दोघां बापलेकांना बाहेरच्या बाहेर निरोप दिला.

घरी येतांच सखाराम शंकरला रागावून म्हणाला—"आतां तुझे लग्न या जन्मात होत नाही. एखादा माथेफिरू कोणी असेल त्याने तुला मुलगी दिली तर देईल" असें सांगत कपाळ दोन्ही हातात धरून बसून राहला.

त्याला मुलगी देणारा कोणी माथेफिरू मिळतो का पाहण्यासाठी शंकरने घराबाहेर जाण्याचे ठरविले. तो त्या रात्रीच घरा-बाहेर पडला आणि पाय नेतील तिकडे चालू लागला. तीन दिवस चालत राहल्या-वर चवथ्या दिवशी काळोख पडण्याच्या सुमारास तो एका डोंगराळ प्रदेशात येऊन पोचला. त्याला एका गुहेतून एक विचित्र आवाज ऐकू आला. एक राक्षस त्या गुहेत झोपला होता. त्याच्या घोरण्याचा आवाज त्याला ऐकू आला होता.



शंकर त्या गुहेत शिरला. त्याच्या केसांना व शेंडीला माती व चिखल लागला होता तो शंकरने पाहिला. 'मला मुलगी देणारा माथेफिरू मी येणार आहे हे कळतांच धावरून जाऊन येथे लपून बसलेला दिसतो आहे तर!' असा विचार करून शंकरने त्याची शेंडी धरून जोरजोराने त्याचे डोके हलविले.

राक्षस एक मोठी जांभई घेत उठला व मोठ्या घोगऱ्या आवाजात म्हणाला— "कोणी रे मला उठविले ते?"

"मुलीला बायचे सोडून येथे काय करीत होतास रे माथेफिरू माणसा? ताबडतोब हुंडा देऊन मुलीशी माझे लग्न करून दे!" असे

श्री श. ना. कुलकर्णी

म्हणत शंकरने राक्षसाचा कान जोराने पिळला.

अर्थातच राक्षसाला भयंकर राग आला. त्या रागात शंकरला त्याने फाडून कच्चा खाऊन टाकले असते. परंतु मध्यंतरी आंतल्या गुहेतून राक्षसाची बायको आली. तिने शंकर म्हणाला ते ऐकले होते म्हणून ती बाहेर आली. कारण तिला एक मुलगी होती. ती सुटलेल्या अंगाची होती, त्यामुळे किती प्रयत्न केला तरी तिचे लग्न होत नव्हते.

म्हणून बाहेर येताच राक्षसीण रागाने नवऱ्याला म्हणाली–"तू कसा काय रे झोपा काढतो आहेस? जांवई आला तर त्याचा आदर सत्कार काहीतरी करायला हवा की नाही?"

"[illegible]" असे म्हणत शंकरने गुहेत एकदां नजर फिरविली.

"ती आतांच बाहेर वनविहाराला गेली आहे. आणखी एक प्रहरभर तरी येईलसे वाटत नाही. दमून आला असशील. एक झोप होईल तुझी!" राक्षसीण म्हणाली.

शंकरने राक्षसिणीने दिलेली फळे खाऊन दूध पिऊन घेतले आणि गुहेच्या आतल्या बाजूस जनावरांच्या कातड्या वरच आडवा झाला.

शंकर बराच हृष्टपुष्ट होता. त्याला खाऊन टाकावे असे राक्षसाला वाटले. परंतु शंकर झोंपला होता त्या गुहेच्या वाटेवर राक्षसीण बसलेली होती.



राक्ष[illegible] परतली. तिने आल्यावर जो आरडा ओरडा झाला तेवढ्याने शंकरची झोप मोडली. तो मायलेकींचे संभाषण ऐकू लागला.

"इतक्या दिवसांनी तुला तुझा नवरा हुडकत आला ग बाई!" आई म्हणाली.

"कोठे आहे? कोठे आहे तो?" म्हणत मुलगी शंकर झोपला होता त्या गुहेत पाहू लागली. अर्धवट डोळे उघडून शंकरने राक्षसिणीच्या मुलीला पाहिले व दचकला. आईबापांपेक्षा भयंकर रूप होते तिचे.

राक्षसकुमारी शंकरला पाहून म्हणाली– "लोण्यासारखा दिसतो आहे ग!"

"म्हणजे तू त्याला खाऊन का टाकणार? तेवढे मात्र करू नकोरा ग बाई! याला सोडून तुझ्याशी लग्न करायला कोण येईल?" असे सांगून आईने मुलीला जपून बोलायला व वागायला सुचविले.

"मला सांगितलेस ते ठीक, मान्य! परंतु बाबांचं काय? मनुष्य हाती लागला तर त्याला खायला सोडतील का?" मुलगी म्हणाली.

"म्हणूनच तर मी बाहेर गेले नाही आणि पाहारा देत बसले आहे. मी काही वेळ जरा फिरून येते. मी परत येईपर्यंत तू पाहारा दे." असे सांगून राक्षसीण बाहेर निघून गेली.

राक्षसकुमारी शंकरकडे पहात असतांना तिच्या मनात त्याला धरून खाण्याची इच्छा वाढत गेली. गुहेतच त्याला मारून खाल्ले



तर आई तिला जिवंत सोडणार नाही ही भीती तिला वाटत होती. म्हणून राक्षसकुमारी शंकरला जागे करून म्हणाली–"लग्नाची सर्व तयारी झाली आहे, चल बाहेर जाऊ या."

सर्व संभाषण शंकर ऐकतच होता. तिची लबाडी त्याने ओळखली.

"ते काही नाही, हुंड्याची रक्कम समोर ठेवल्याशिवाय लग्नाची गोष्ट काढू नकोस!" शंकर म्हणाला.

राक्षसकुमारी गुहेत गेली आणि एका कातडयाच्या पिशवीत हिरे, माणके आणि सोने घेऊन आली. तिने ती पिशवी शंकरला दिली व म्हणाली–"चल आता!"

शंकरने कातडयाच्या पिशवीचे तोंड बंद केले आणि पिशवी खाकेत ठेवून राक्षसकुमारीच्या पाठीमागून बाहेर निघाला.

गुहेबाहेर आल्याबरोबर तो राक्षसकुमारीला म्हणाला–"स्नान केल्याशिवाय कसं काय? पहिल्याने स्नान केले पाहिजे."

[illegible] बोलावून घेऊन गेली. त्याने पिशवीसह तलावात बुडी मारली आणि तलावाच्या तळाला जाऊन बसला.

राक्षसकुमारीने बराच वेळ वाट पाहिली, परंतु तो बाहेर आला नाही. तिला पाण्याची फार भीती वाटे. उद्यां त्याचे प्रेत पाण्याबाहेर फुगून वर येईल तेव्हां त्याला खाता येईल असा विचार करून ती आपल्या गुहेत निघून गेली.

नंतर शंकरने पाण्यावर डोके काढून राक्षसकुमारी तेथे नसल्याची खात्री करून घेतली आणि पिशवी घेऊन तलावाबाहेर आला आणि सरळ घरी आला.

जवळ पैसे खूप होते म्हणून शंकरला चांगले स्थळ लाभले. शंकर किती मूर्ख असला तरी त्याचा मुलगा तसाच मूर्ख निघणार नाही, असा विचार करून सखारामाने मनाचे समाधान करून घेतले. शंकरने देखील काही दिवसांनी तो निव्वळ मूर्ख नसल्याचे दाखवून दिले.





# सांपडला तो चोरच!

एका चोराने एका शेतकऱ्याच्या आवारातून एक बकरी चोरून आपल्या घरी आणली. बकरी पाहून चोराची बायको म्हणाली–"तीन चार दिवसांनी आठवडयाचा बाजार आहे, तोंपर्यंत हिचे मिळेल तेवढे दूध काढून पिऊन घेऊ या."

बाजाराच्या दिवशी चोर पहाटे काळोख असतांनाच उठला आणि बकरीला घेऊन बाजाराच्या वाटेने चालू लागला. अजून चांगले उजाडले नव्हते. चोर ज्या वाटेने जात होता त्या वाटेवर एका झाडाखाली एक मनुष्य झोपलेला होता. त्याच्या बोचक्यात काहीतरी बांधून ठेवले असल्याची शंका चोराला वाटली. चोराने आपली चाहूल लागू दिल्याशिवाय बोचके सोडले तर त्यात एक सोन्याची अंगठी सांपडली.

चोराने बकरीला तेथेच सोडले आणि प्रथम कोठेतरी जाऊन ती अंगठी विकून टाकण्याचे त्याने ठरविले. ती अंगठी आपल्या गावातल्या जव्हेऱ्याकडे विकली तर त्याला कदाचित् संशय येईल, असा विचार करून तो शेजारच्या गावच्या जव्हेऱ्याकडे गेला.

जव्हेऱ्याने ती पाहिल्याबरोबर त्याला त्याने अगदी तशीच अंगठी तयार करून गांवच्या जमीनदाराला विकल्याचे आठविले. त्याने लगेच जमीनदाराला ती गोष्ट कळविली आणि अंगठीची किंमत

श्री पद्माकर, र. रणदिवे

ठरविण्यासाठी चोराला बोलण्यात गुंतवून ठेवले. जमीनदाराने आपल्या नोकरांना जव्हेऱ्याच्या दुकानात पाठविले. त्यांनी चोर जें काही म्हणाला तिकडे दुर्लक्ष केले आणि त्याला खूप बडवून काढले.

मध्यंतरी झाडाखाली जो मनुष्य झोपला होता जागा झाला आणि त्याच्या बोचक्यातली अंगठी नाहीशी झाल्याचे त्याला आढळून आले. अंगठी मिळाली या आनंदात तो देहभान विसरून घोरत पडला होता. परंतु अंगठी नाहीशी झाल्याचे कळल्यावर मात्र रडू लागला.

तेवढ्यात त्याला जवळच बकरी ओरडत असल्याचा आवाज ऐकू आला. जवळपास कोणी मनुष्य त्याला दिसला नाही. म्हणून [illegible] ऱ्या बाजाराला निघाला. तिला विकले तर चार पैसे हाती लागतील असे त्याला वाटले. तो त्या बकरीला घेऊन एका शेतकऱ्याच्या घरासमोरून जात असतां त्या शेतकऱ्याने बकरीला पाहून व ती आपलीच असल्याचे ओळखले. याशिवाय स्वत:च्या घरा शेजारी पोंचतांच बकरी जोराने ओरडू लागली. शेतकऱ्याने चोराला पकडले. ती बकरी त्याचीच हे शेजाऱ्यांना माहीतच होते. म्हणून सर्वांनी मिळून त्या माणसाला खूप बडवून काढले.

म्हणून एका चोराने चोरी केली आणि त्याची शिक्षा दुसऱ्या चोराला भोगावी लागली.



# पराचा कावळा

एका देशाचा युवराज तरुण होता. त्याला कोणत्याही गोष्टीचा संशय आला की तो आपल्या मंत्र्याला विचारीत असे. एकदां त्याने आपल्या मंत्र्याला संभाषणाच्या संदर्भात विचारले–"तुम्ही आमच्या बाबांच्या जवळ प्रत्येक गोष्ट एकांतात बोलतां ते का ?"

"ते मी नंतर सांगेन !" मंत्री म्हणाला.

दुसऱ्या दिवशी दोघे कोठे तरी जात असतां मंत्री युवराजाला म्हणाला–"आज आपल्या शिपायांनी आपल्या शेजारच्या ब्रह्मदत्त राजाच्या दोघां हेरांना कैद केले." ती गोष्ट तो मुद्दामच इतक्या मोठ्याने म्हणाला होता की पाठीमागून येणाऱ्या नोकरांना ते ऐकू जावे.

नोकरांनी त्या दिवशी रात्री आपल्या घरी गेल्यावर आपापल्या बायकांना त्यांना वाटले तसे थोडे फार तिखटमीठ लावून ब्रह्मदत्ताच्या हेरांना पकडले असल्याचे वर्णन करून सांगितले. एकाने राजवाड्यात शत्रूचे हेर पकडले गेल्याचे सांगितले तर आणखी एकाने राजा व मंत्री दोघांचे या विषयी बरेच बोलणे झाल्याचे सांगितले. आणखी एकाने ब्रह्मदत्ताचे सैन्य राजधानीच्या सरहद्दीपर्यंत चालून आल्याचे सांगितले. आतां युद्ध होणार हेदेखील आणखी एकाने सांगायला कमी केले नाही.

दुसऱ्या दिवशी गांवभर युद्ध सुरू होणार आणि सैन्य कूच करीत आहे, अशा अफवा पसरल्या. गावात गोंधळ उडून गेला. प्रजेने साठेबाजी सुरू केली. व्यापाऱ्यांनी किमती वाढविल्या. शेवटी राजाने दवंडी पिटवून युद्धाच्या अफवा खोट्या असल्याचे जाहीर केल्यानंतरच पुन्हां राज्यात स्थिरस्थावर झाले.

मंत्री युवराजाला म्हणाले–"पाहिलेत का युवराज, एका लहानशा गोष्टीचा केवढा ग़वगवा झाला तो !"





# प्राप्तंच लाभते

रामपूर नावाच्या गावी गोपाळशास्त्री नावाचे एक शास्त्रीबुवा आपल्या घराच्या ओसरीत काही मुलांना शिकवीत होते. एकदां ते शिकवीत असतां कोणत्या तरी संदर्भात म्हणाले—"आपण एक तांब्या घेऊन विहिरीवर गेलो काय किंवा नदीवर गेलो काय तेवढा तांब्या भरूनच पाणी मिळणार. तेच आपल्याला प्राप्त असते. आपण सोन्याच्या पर्वताजवळ गेलो काय की स्मशानात गेलो काय आपल्याला जे प्राप्त असते तेवढेच लाभते!"

शास्त्रीबुवांच्या शिष्यांच्या डोक्यात त्या उपदेशांचा कितपत प्रकाश पडला कोण जाणे, परंतु त्याच वेळी शास्त्रीबुवांच्या घरासमोरून जाणाऱ्या शिवू नावाच्या माणसाला मात्र त्याचा चांगला बोध झाला.

शिवू हा त्या गावच्या पुजाऱ्याचा मुलगा होता. गावकऱ्यांना किंवा गावातल्या मुलांना शिवू म्हणजे फुकटात मिळालेले करमणुकीचे एक साधन होते. पंचवीस वर्षांचा झाला असूनही त्याला अद्याप थोडादेखील व्यवहार कळत नव्हता की काही काम करता येत होते. त्याच्या बापाने त्याला कितीदां सांगितले असेल—"अरे माझ्याबरोबर देवळात येऊन बसत जा. पूजा करता आली तर चार पैसे मिळतील." परंतु शिवूने बापाने सांगितलेले कधी लक्ष देऊन ऐकले नाही की केले नाही. घरात त्याला कोणी घरातल्या माणूस मानीत नसे.

कोठेतरी निघून जाण्याच्या विचाराने निघाला असतां शिवूला गोपाळ शास्त्र्यांच्या घरासमोर पोचताच काही मार्ग सांपडल्यासारखे वाटले. सोन्याचा डोंगर कोठे आहे बरं? खरोखरी आहे की नाही हेच मुळात माहीत नाही, परंतु गावाच्या उत्तरेला स्मशान आहे, एवढे मात्र त्याला नक्की माहीत होते.

त्या दिवशी रात्री शिवू पोटभर खाऊन पिऊन स्मशानाच्या बाजूला गेला. काळोखांत त्याला निरनिराळ्या आकृती व थडगी मात्र दिसत होती. दोन प्रेते जळत असलेली पण त्याला दिसली. स्मशानाच्या मध्यभागी एक मंडप होता. त्याच्या नशिबात काय प्राप्त आहे हे पाहण्यासाठी तो त्या मंडपात गेला. काय करावे या विचारात तो क्षणभर डोळे मिटून बसून राहिला. तसा विचार करीत बसला असता त्याला झोप केव्हां लागली, हे त्याचे त्यालाच कळले नाही.



झोपेत शिवूला त्याचे कपडे धरून कोणी तरी धरीत असल्यासारखे आणि त्याला कोणीतरी गडबडा लोळवीत असल्यासारखे वाटले. परंतु तो स्वभावाचा झोपाळू असल्या कारणाने त्याने डोळे उघडून पाहिले नाही. तो रात्रभर तसाच झोपून होता आणि अंगावर ऊन आले तेव्हां त्याची झोप मोडली. तो उठून बसला आणि आश्चर्य म्हणजे त्याला समोर दोन सोन्याच्या कड्या पडलेल्या दिसल्या. तेच त्याला प्राप्त आहे असे समजून त्याने त्या उचलून नेऊन बापाला दिल्या. त्या पाहून पुजारी चकितच झाला.

तेवढे सोने खर्च होईपर्यंत शिवू नेहमीसारखा गावभर भटकत राहिला. त्यानंतर तो पुन्हां स्मशानात जाऊन झोपून राहिला. झोपेत त्याला कोणीतरी कोठेतरी कांटे पडलेल्या वाटेने चितेच्या जाळा—मधून घेऊन जात असल्याचा भास झाला. तरी त्याने तिकडे दुर्लक्ष केले आणि जागा झाला नाही. उजाडल्यावर पाहतो तों समोर सोन्याच्या दोन कड्या दिसल्या. तो आनंदाने त्या उचलून घेऊन घरी गेला.

ती गोष्ट गावभर पसरली आणि गोपाळ शास्त्र्यांनासुद्धां कळली. शिवूला मिळत असलेल्या सोन्याच्या मुळाशी त्यांचाच उपदेश असल्याचे देखील त्यांना कळले.

श्री कृ. नि. अवे

आपला उपदेश ऐकून कोणी इतका फायदा मिळवू शकेल या गोष्टीची त्यांना कल्पना देखील नव्हती.

मनुष्य विद्वान असला, साऱ्या जगाला त्याच्या ज्ञानाचा उपयोग होत असला तरी त्याला स्वतःला त्याच्या ज्ञानाचा उपयोग होत नसतो. म्हणूनच लोकां सांगे ब्रह्मज्ञान, पण आपण कोरडा पाषाण ही म्हण जगात रूढ झाली. शास्त्रीबुवा या म्हणीस अपवाद होते असे नाही.

त्यांनी शिवूला बोलावून विचारले– "बाळा! तुला ही न्यायाची गोष्ट दिसते का? मी म्हणालो ते ऐकून तू एकट्याने सोने घेणे बरोबर आहे का?"

"बरोबर नाही! मी तुमचा वांटा तुम्हांला देतो!" असे सांगून शिवू निघाला.

"ते काही नको रे! स्मशानात तू झोपतोस ती जागा एकदां मला दाखवून दे!" गोपाळ शास्त्री म्हणाले.

शिवूने त्यांना स्मशानांत नेऊन तो झोपत असे ती जागा दाखवून दिली. [illegible] झोपले. झोपेत त्यांना त्यांचे कपडे कोणी तरी ओढीत असल्याचा भास झाला. ते लगेच उठून बसले. एकदम कोठून तरी राख उडत आली आणि त्यांच्या डोळ्यात पडली. त्यांना सकाळ होईपर्यंत झोपच लागली नाही. उजाडल्यावर पाहिले तर समोर सोन्याच्या कड्या नव्हत्या की काही एक नव्हते.

तरी ते दुसऱ्या दिवशी रात्री पुन्हां स्मशानात जाऊन झोपले. झोपेत त्यांना कोणीतरी कोठे तरी काट्याकुट्यातून चितेच्या ज्वाळातून घेऊन जात असल्याचा भास झाला. ते घाबरले आणि त्यांनी डोळे उघडून पाहिले. शुद्धीवर आले तेव्हां ते खरोखरच एका चितेवर उभे होते. त्याच-वेळी शरीर जळू लागल्यासारखे त्यांना वाटले. त्यांनी मागे पाहिले नाही की पुढे पाहिले नाही, धांवत सुटले. काटे बोचत होते, ओरबडलेल्या जागी रक्त येत होते. कसेबसे घरी पोचले. त्यांच्या नशिबी तेच प्राप्त होते!





# महाभारत

युद्ध समाप्त झाल्यानंतर पांडवांनी गंगा-तीरावर जाऊन आपल्या सर्व मृत नातेवाइकांचा अंत्यविधी उरकून तिलोदक आदि संस्कार केले व एक महिनाभर शोकवस्त्रे परिधान करून धृतराष्ट्राबरोबर, विदुराबरोबर व स्त्रियांबरोबर राजधानी-बाहेर पर्णशाला बांधून त्यात निवास केला.

त्यानंतर धर्मराजाच्या दर्शनास व्यास-मुनींबरोबर अनेक ऋषीमुनी, त्यांचा शिष्य-वर्ग वगैरे मंडळी आली. धर्मराजाने प्रसं-गानुसार त्या सर्वांचा अतिथिसत्कार केला आणि त्यांना यथोचित आसने बसायला देऊन स्वतः एका जागी बसला.

नंतर तो सर्वांना संबोधन करून म्हणाला–"कृष्णाने आणि भीमार्जुनांनी मला या युद्धात विजय मिळवून दिला. परंतु मला तो विजय असा वाटतच नाही. मी आपल्याच ज्ञाती बांधवांचा वध केला. अभि-मन्यू आणि द्रौपदीचे पुत्र आम्हांला कायमचे सोडून गेले. या शिवाय महादानी शूर व वीर असा कर्ण आमचा सर्वांचा मोठा भाऊ होता हे तिलोदकाच्या वेळी आम्हांला आम-च्या मातेकडून कळले. अशा शूर महारथ्याचा वध कां व्हावा हेच मला कळत नाही!"

ते ऐकून नारदाने कर्णाला मिळालेल्या शापाची गोष्ट सांगितली.

कर्ण द्रोणाचार्यांजवळ विद्याध्ययन करीत असतां अर्जुनाचे धनुर्विद्येत प्राविण्य पाहून त्याचा फार हेवा करीत असे. त्याचप्रमाणे त्याला धर्मराजाची नीतिमत्ता, भीमाचे



बाहुबळ आणि नकुल सहदेवांचे सौजन्य आणि त्यानंतर कृष्णार्जुनांमधील सख्य हे सर्व पाहून त्याला हेवा वाटत असे. म्हणून त्याने दुर्योधनाशी मैत्री केली.

द्रोणाचे शिष्यत्व ग्रहण केल्यावर एके-दिवशी कर्ण द्रोणाचार्यांना म्हणाला–"गुरु-वर्य! आपण आपल्या शिष्यवर्गात मानीत नाही. युद्धात अर्जुनाला काहीतरी करून जिंकावे अशी माझ्या मनात फार फार इच्छा आहे. तेव्हां मला ब्रह्मास्त्राचा प्रयोग व त्याचा उपसंहार दोन्ही गोष्टी शिकवून देण्याची कृपा करावी."

अर्जुन हा द्रोणाचा पट्टशिष्य! म्हणून द्रोणाचार्य कर्णाला म्हणाले–"तू सूतपुत्र [illegible]! ब्राह्मण आणि क्षत्रिय यांशिवाय इतरांस ब्रह्मास्त्र देऊ नये असे आहे!"

ते ऐकून कर्ण महेंद्रपर्वतानजीक परशु-राम तपश्चर्या करीत असत तेथे गेला आणि त्यांना साष्टांग प्रणाम करून म्हणाला–"हे महात्मन! मी भृगुवंशी आहे. मला आपण आपला शिष्य करून घ्यावे. परशुरामाने त्या गोष्टीस होकार दिला. परशुरामाने कर्णाला अनेक शस्त्रा-स्त्रांचा प्रयोग आणि त्यांचा उपसंहार या गोष्टी शिकवून दिल्या. कर्णाने त्या प्रदे-शातल्या यक्ष, गंधर्वादिकांस आपल्या अस्त्र विद्येत मिळविलेल्या प्राविण्याने चकित केले. एकदा कर्ण आपल्या गुरूच्या आश्रमा-शेजारी धनुष्यबाण घेऊन समुद्रकिनाऱ्यावर फिरत होता. त्याला एक गाय दिसली. त्याने त्या गाईला बाण मारून ठार केले. ती गाय एका ब्राह्मणाची होमधेनू होती हे कळले. त्याने लगेच त्या ब्राह्मणाजवळ जाऊन क्षमा मागितली. परंतु त्या ब्राह्म-णाचा राग शांत झाला नाही. त्याने त्याला शाप दिला की युद्धात त्याच्या रथाचे चाक जमिनीत रुतेल आणि शत्रूचा बाण लागून त्याचा गाईचा जीव गेला तसा वध होईल.

कर्णाने परशुरामाला आपल्या निरंतर सेवेने आणि युद्धविद्येत दर्शविलेल्या पांडि-



त्याने खुश केले आणि धनुर्वेदांत प्राविण्य दर्शविले. ते पाहून परशुरामाने कर्णाला ब्रह्मास्त्र शिकवून दिले. गुरुशिष्यांचा परस्पर स्नेह वाढत गेला.

एकदां परशुराम कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून विश्रांती घेत असता त्याला झोप लागली. तेवढ्यात एक किडा कर्णाच्या मांडीला कुरतुडू लागला. गुरूची झोप मोडू नये यासाठी कर्ण मनाचा धीर करून जागचा थोडादेखील हालला नाही. त्याच्या मांडीचे रक्त वाहूं लागले.

परशुरामाची झोप मोडली तेव्हां त्याला रक्त दिसले. त्याने कर्णाच्या पायाला किडयाने पोखरून काढलेले स्वतःच्या [illegible] पाहिले. त्याला आश्चर्य वाटले व त्याने विचारले–"काय रे! ब्राह्मणात इतकी सहनशक्ती कोठून असणार? तू खरे सांग, कोण आहेस तू?"

खरे बोलला नाही तर परशुराम शाप देतील या भीतीने कर्णाने तो सूतकुळात जन्मल्याचे सांगितले. तेव्हां परशुरामाने त्याला शाप दिला की त्याला स्वयंस्फूर्तीने ब्रह्मास्त्राचा प्रयोग करतां येणार नाही.

इतके शाप असून ही कर्ण एक शूर योद्धा म्हणून प्रसिद्ध झाला. कलिंगदेशाचा राजा चित्रांगद याने आपल्या मुलीचे स्वयंवर रचले त्यावेळी दुर्योधनाने राजकन्येला पळवून नेले. तेव्हां उपस्थित सर्व राजे त्याच्याशी युद्धाला आले. कर्णाने दुर्योधनाला त्या युद्धात जय मिळवून दिला.

आणखी एकदां कर्णाने अजेय अशा जरासंधाला जिंकून त्याच्या जवळून मालिनी नावाचे एक मोठे नगर भेट म्हणून मिळविले. त्याचा हा सर्व पराक्रम पाहून इंद्राने अर्जुनाच्या रक्षणासाठी कर्णाची कवचकुंडले मागून घेतली. या सर्व कारणांमुळे कर्णाचा पराभव झाला.

नारदाच्या तोंडी कर्णाविषयी या सर्व गोष्टी कळल्यावर धर्मराज युद्धांत ज्यांचा ज्यांचा वध झाला त्या सर्वांचे स्मरण करून म्हणाला–"मुलांकरिता आईवडील



[illegible] आपला मुलगा मोठा होऊन सुख देईल या हेतूनेच नाही का नऊ महिने त्याचा पिंड आपल्या पोटात पोशीत? कोणताही भोग भोगायला न मिळाल्याने अशा किती माता दुःखी झाल्या? त्यांची मुले तर सुखोपभोग झाल्याशिवायच मरण पावली. हा काय क्षत्रियधर्म झाला? मला असले हे राज्यच नको. अर्जुना, तूच या राज्याचा सुखोपभोग घे! मी तीर्थयात्रा आणि जपतप करीत राहतो!"

ते ऐकून अर्जुनाला थोडा अपमान वाटला. तो धर्मराजाला म्हणाला–"दादा! आपण आपले राज्य परत मिळविण्यासाठी क्षत्रियधर्माचे पालन केले. राज्य आल्यानंतर आपण ते भिक्षा मागून मिळाल्यासारखे दुःखी होणे आपणांस शोभत नाही. भिक्षाच मागायची होती तर इतका नरसंहार घडविण्याची गरजच नव्हती. लोक तुला हसणार नाहीत का? दारिद्र्य स्वतः होऊन मागून घेऊ नये असे नहुष सांगे. सर्व धर्मांचे मूळ धनच तर आहे! म्हणून तू राज्याचा स्वीकार कर! अश्वमेध यज्ञ करून सर्व पापांचे क्षालन कर!"

भीम अर्जुनाला दुजोरा देत म्हणाला–"राजधर्माला दोष देण्यात काय अर्थ आहे? शत्रूचा नाश करण्यात दया किंवा दाक्षिण्य



कोठून येणार? आणि त्यात हिंसा तरी कशी काय? मनाचा निश्चय करून दुर्योधनादिकांचा आपण जो वध केला तो शेवटी भिक्षा मागत फिरण्यासाठीच का? ही गोष्ट आम्हांला यापूर्वी कळली असती तर आम्ही शस्त्र हातात धरले असते का? इतक्या लोकांचा वध केला असता का? आम्ही भीक मागून पोटाची खळगी भरली असती. विहीर खणून त्या पाण्याला हात लावणार नाही असे म्हणण्यासारखेच तू बोलतो आहेस. मागे तुझ्या शब्दाखातर आम्ही शक्ती असूनही गप्प बसलो हीच आमची चूक! या सर्व गप्पा आतां बंद कर आणि राज्य करू लाग!"



नकुल सहदेवांनी सुद्धा त्याच सुरात आपला सूर मिळवून धर्मराजाला राज्य करायला सांगितले.

नंतर द्रौपदी म्हणाली–

"तुमच्या धाकट्या बंधूंनी तुम्हांला सांगितले तसे करा! त्यांनी वनवासात जे असह्य कष्ट सहन केले ते याचसाठी का? आपण लवकरच दुर्योधनाचा पराभव करून आपले राज्य परत मिळवू असे तुम्हीच सांगून त्यांच्या मनाचे समाधान नव्हतेत का केलेत? तेव्हां असे बोललात आणि आतां असे, म्हणून त्यांचे मन आज लहान होते आहे. पूर्वी तुम्ही युद्ध करूनच आपल्या साम्राज्याचा विस्तार केलात नाही का? राज्य [illegible] उपाय आहे का? तुम्ही असे बोलत राहिलात तर लोक म्हणतील की 'धर्मराजाची मतीच भ्रष्ट झाली!' राज्याचा उपयोग करण्यात काही एक चूक नाही. अंबरीष आणि मांधातासारख्या थोरपुरुषांनीदेखील राज्य केलेच होते."

नंतर कित्येक ऋषीमुनींनी धर्मराजाला उपदेश केले. व्यास मुनी त्याला म्हणाले– "कोणी आपला वध करण्यास आला व तो वेदवेदांग पारंगत असला तरी त्याचा वध करण्यास हरकत नाही. त्यामुळे ब्रह्महत्येचे पाप लागणार नाही."

धाकट्या भावंडांव्यतिरिक्त देवतुल्य अशा व्यास महर्षींनी आणि कृष्णानेदेखील आपले विचार सांगितल्यावर धर्मराजाने आपल्या विचारांविरुद्ध आणि शंकांविरुद्ध राज्य करण्याचे ठरविले.

धर्मराजासाठी रथ तैयार करविण्यात आला. त्या रथाला सोळा पांढरे स्वच्छ बैल जोडण्यात आले. रथाचे पांढरे खांब सजविण्यात आले. भीमाने सारथ्य करण्याचे ठरवून लगाम हाती धरला. अर्जुनाने पांढरे शुभ्र छत्र आपल्या मोठ्या भावावर धरले. नकुल सहदेव चवऱ्या हलवू लागले. धर्मराजाच्या रथामागून युयुत्सूचा रथ चालू लागला. त्याच्या माग कृष्ण व सात्यकी





[illegible] या मिरवणुकीच्या अगदी पुढे एकेका पालखीत गांधारी व धृतराष्ट्र, कौरवांच्या स्त्रिया, कुंती, द्रौपदी निरनिराळ्या वाहनांत विदुराबरोबर निघाल्या. सर्वां पाठीमागून चतुरंग सैन्य चालू लागले. भाट व चारण राजाचा स्तुतिपाठ करीत असतां धर्मराजाने हस्तिनापुरात प्रवेश केला. सर्व नगर सजविण्यात आले होते. जिकडे पहावे तिकडे शुभ्र तोरणे व पताका दिसत होत्या.

धर्मराजाने थाटामाटाने नगरात प्रवेश केला त्यावेळी सहस्रावधी स्त्रीपुरुष रस्त्याच्या दुतर्फा आपल्या राजाच्या स्वागतासाठी उभे होते. मंत्र्यांनी व प्रमुख नागरिकांनी सामोरे येऊन म्हटले–"हे राजेन्द्रा! आज आमचे महद्भाग्य की तू आपल्या शत्रूला जिंकून धर्म व नीतीप्रमाणे पुन्हां राज्य मिळविलेस." ब्राह्मणांनी धर्मराजाला आशीर्वाद दिला.

धर्मराजाने राजवाड्यात प्रवेश केला. धौम्य ऋषींना आणि धृतराष्ट्राला प्रणाम केला आणि देवपूजा केली. तेवढ्यात एकदम गडबड उडून गेली. दुर्योधनाचा चार्वाक नावाचा एक मित्र धर्मराजाजवळ गेला आणि म्हणाला–"तू आपल्या सर्व ज्ञाती बांधवांचा वध करून आता राज्य उपभोगायला आला आहेस का?"

ते ऐकून धर्मराज लज्जित झाला आणि ब्राह्मणांकडे वळून म्हणाला–"माझ्यावर कृपा करून माझी निंदा करू नका."

तेव्हां ब्राह्मण म्हणाले–"या चार्वाकाचे म्हणणे आहे ते आमचे नाही. हा दुर्योधनाचा मित्र आहे. म्हणून तो असे बोलतो आहे. तुझे किंवा तुझ्या धाकट्या बंधूंचे काही एक अशुभ होणार नाही." असे म्हणत सर्वांनी मिळून त्या चार्वाकाचा वध केला. धर्मराजाच्या मनाला शांती मिळावी यासाठी कृष्णाने त्याच्या पूर्वजन्माची गोष्ट चातुर्याने सांगितली. म्हणाला–"हा चार्वाक पूर्वजन्मी एक राक्षस होता. त्याने बदरीवनात तपःश्चर्या केली. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन

त्याला ब्राह्मणांशिवाय इतरांच्या हाती तो अवध्य असल्याचा वर दिला होता."

त्यानंतर धर्मराजाचा विधिपूर्वक राज्याभिषेक झाला. धौम्य मुनींनी एक वेदिका तयार केली. त्या वेदिकेवर व्याघ्रचर्म अंथरण्यात आले. त्यावर धर्मराज व द्रौपदीला बसविण्यात आले. धौम्य मुनींनी अग्नि जागवून धर्मराजाच्या हातून होम करविला. त्यानंतर कृष्णाने एक शंख घेऊन धर्मराजावर अभिषेक केला आणि 'सर्व जगाचा राजा चक्रवर्ती हो !' असा आशीर्वाद दिला. त्या गोष्टीस धृतराष्ट्र आणि प्रजेने दुजोरा दिला. मंगलवाद्ये वाजू लागली. धर्मराजाने नजराणे व भेटी स्वीकारल्या आणि ब्राह्मणांना दान केले.

तो प्रजेला संबोधन करीत म्हणाला—"प्रजाजन हो, नागरिक हो ! महाराज धृतराष्ट्रच आम्हांला थोर व पूज्य आहेत. आमचे जे कोणी हितैषी असतील त्यांनी सर्वांनी त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून तिचे पालन करावे. आम्ही जिवंत आहों ते

सर्वांचे प्रभू धनी तेच आहेत !"

त्यानंतर धर्मराजाने भीमाला युवराज आणि विदुराला मंत्री म्हणून जाहीर केले. संजय राजकोशाचा प्रधान व सल्लागार म्हणून नेमला गेला. नकुलाची नेमणूक नोकराचाकरांचे पगार ठरविण्यासाठी, अर्जुनाची राज्याच्या रक्षणार्थ, धौम्य ऋषींची देवब्राह्मणांची कामे पाहण्यासाठी झाली. सहदेवाची नेमणूक सर्वदा धर्मराजाच्या बरोबर राहण्यासाठी झाली.

त्यानंतर युद्धांत मरण पावलेल्या सर्वांचे श्राद्धसंस्कार करण्यात आले. धृतराष्ट्राने त्याच्या मुलांचे, धर्मराजाने द्रोणाचार्यांचे, कर्णाचे, धृष्टद्युम्नाचे, घटोत्कचाचे व अभिमन्यूचे अशी निरनिराळी श्राद्धे केली. मृतव्यक्तींच्या स्मरणार्थ धर्मशाळा, तलाव आदी बनविण्यात आले.

नंतर प्रजेच्या सर्व सुखाची काळजी वाहून धर्मराजाने राज्यकारभार सुरु केला.





# मित्रभेद

[ ९ ]

दमनकनं करटकाला सापाला ठार करणाऱ्या कावळ्यांची गोष्ट सांगितली व म्हणाला—"म्हणून मित्रा, बुद्धी वा युक्तिबळ हे सर्वांत मोठे बळ आहे. एका अहंकारी सिंहाला एका लहानग्या सशाने फक्त आपल्या चातुर्याने कसे मृत्युमुखी लोटले ही गोष्ट तुला माहीतच असेल."

"ते कसे काय बुवा ?" करटकाने विचारले. दमनकाने ती गोष्ट सांगितली.

### जीव घेणारे प्रतिबिंब

एकदा अरण्यात भासुरक नावाचा एक सिंह रहात असे. त्याच्याशी अगर वैर करून जगण्याची हिंमत एकाही जंगली जनावरात नव्हती. परंतु त्याला आपल्या शक्तीचा इतका मद चढला होता की तो जंगलातल्या निरापद प्राण्यांना जेव्हां वाटेल तेव्हां विनाकारण ठार करीत असे.

एके दिवशी जंगलात राहणारी हरणे, बकरे, म्हशी, ससे आणि इतर रानटी जनावरे सिंहाला जाऊन भेटली व जोहार करून म्हणाली—"हे राजाधिराज ! यापुढे आपण नजरेस येईल त्या प्राण्याला ठार करणे बरोबर नाही. आपणांस पोट भरायला दररोज एक जनावर नक्कीच पुरेल. असे असून इतक्या प्राण्यांचा वध करणे बरोबर नाही. आपण आपसात बोलून काही गोष्टी सलोख्याने ठरवू या आणि त्याप्रमाणे वागू या. आजपासून आम्ही दररोज पाळीपाळीने एकेका प्राण्याला आपणाकडे पाठवीत जाऊ. आपणांस जागचे हालण्याची सुद्धां गरज नाही. आपण या गोष्टीस कबूल झाल्यास

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



आपला आहार आपल्या गुहेत चालून येईल, राजा आपल्या प्रजेचे पालन कसे करतो, आपणांस माहीत आहेच. माणसे गाई गुरांचे पालन करतात ते त्यांच्या दुधासाठी. त्यांना पाहिजे असेल तेवढे काढून घेऊन बाकीचे वासरांना सोडतात. गाईचे फक्त दूधकाढून भागते का? तिच्या चाऱ्याची व्यवस्था सुद्धां करावीच लागते. झाडाला खत पाणी दिले तर त्याला गोड फळे, लागतात. लहानात लहान बी असले तरी त्याला चांगली जमीन, खत आणि पाणी मिळाले तर त्याचा एक मोठा वृक्ष तयार होतो. प्रजेचे असेच आहे. राजाने प्रजेचे पितृवत् पालन केले तर राजाला अमर्याद लाभ होतो."

ऐकून सिंह म्हणाला—"तुम्ही म्हणालात ते सर्व मला मान्य आहे. परंतु जर कधी कोणी प्राणी आला नाही तर मी तुम्हां सर्वांना ठार करीन." आणा शपथा झाल्या आणि सर्व जनावरे आपापल्या घरी गेली.

त्या दिवसापासून सर्व प्राणी त्या जंगलात निश्चितपणे हिंडू फिरू लागले. त्यांनी पाळ्या लावल्या व दररोज ऐन दुपारी कोणत्यातरी जातीचा एक प्राणी सिंहाकडे जाऊ लागला. एकदां एका सशाची पाळी आली. ससा विचार करू लागला. त्या सिंहाला कसे ठार करता येईल हाच एक विचार त्याच्या मनात घोळू लागला.

सिंहाच्या जेवणाची वेळ टळत चालली होती आणि ससा अद्याप विचारच करीत होता—"युक्तीसमोर शक्तीला मान तुकवावीच लागेल. निश्चयाचे बळ असल्यावर या जगात असाध्य असे काय आहे? गोड बोलणाराला अशक्य आहे का काही?"

असा विचार करीत ससा एका विहिरीजवळ येऊन पोचला. त्याने आत वाकून पाहिले तेव्हां त्याला खोल पाण्यात स्वतःचे प्रतिबिंब दिसले. तो एक क्षणभरच विचार करायला थांबला. सांपडला एक उपाय! त्याला खूप राग येईल असे करून या विहिरीत पाडून ठार करावयाचे."

असा विचार करून ससा मुद्दाम थोडा उशीर करून सिंहाकडे गेला. वेळेवर खायला न मिळाल्याने सिंहाला फार भूक लागली होती. त्यामुळे तो फारच संतापलेला होता. तो मनात म्हणाला—"उद्यां सर्व जनावरांचा फडशा उडवतो."

तेवढ्यात ससा समोर येऊन अत्यंत नम्रपणे सिंहाला वंदन करून उभा राहला.

ससा हा एवढासा जीव आणि त्यात उशिरां आलेला. सिंहाचा क्षुधाग्नी पेटलेला होता. तो दरडावून सशाला म्हणाला—"माझ्या एका घासाएवढादेखील तू नाहीस, आणि इतका उशीर करून कां आला आहेस रे? आज तुला एका घासात गिळतो आणि उद्या जंगलातल्या सर्व जनावरांचा समाचार घेतो."

सशाने सिंहाला साष्टांग नमस्कार केला व म्हणाला—"महाराजाधिराज! आज माझ्या हातून अगर इतर एकाही जनावराच्या हातून ही चूक घडली नाही. मी उशिरां येण्याचे व आपणांस पोटभर खाणे न मिळू शकण्याचे तसेंच एक कारण झाले. आज आपला आहार व्हायला माझी पाळी आहे. फक्त एका सशाने आपले पोट भरणार नाही या गोष्टीचा विचार करून माझ्या ज्ञाती बांधवांनी पांच सशांना पाठविले होते. आम्ही पांचही जण आपणांकडे येत



असतां जमिनीतल्या एका खड्यातून एक मोठा सिंह बाहेर आला आणि आम्हांला दरडावून विचारू लागला—"तुम्ही सर्व कोठे रे निघालात? तुमची इहलोकाची यात्रा आतां संपली. तेव्हां आपल्या देवाचे स्मरण करून तयार व्हा."

आम्ही हात जोडून त्या सिंहाला म्हणालो—"आम्ही वचन दिल्याप्रमाणे दुपारी महाराजांकडे जात आहो."

"तो म्हणाला, मला या निरर्थक गप्पा नको आहेत. या सर्व अरण्याचा राजा मी आहे. कोणी चोर असेल तो भासुरक. त्याला घेऊन या माझ्यासमोर. कोण राजा अन् कोण प्रजा मी पाहतो."

"त्यानं असं सांगितल्यावर मी सरळ आपल्याकडे आलो आणि जे घडले ते सांगितले. मला यायला वेळ लागला तो याच करणामुळे. मी कदाचित परत येणार नाही असे वाटल्यावरून त्याने इतर सशांना तेथेच ठेवून घेतले आहे. म्हणून मी आपणास एकटाच एका घासापुरता दिसत आहे."

ते ऐकून सिंह म्हणाला—"मित्रा! तरमग तो माझा शत्रू सिंह कोण मला दाखव. मी तुमच्यावरचा आणि इतर सर्व जनावरा-वरचा माझा राग त्या एकट्यावर काढून त्याला आत्तांच्या आत्तां ठार करतो. वेळेवरच शत्रूचा नाश केला नाहीतर तो आपल्या नाशास कारण होऊ शकतो."

तेव्हां ससा म्हणाला—"महाराज! शत्रूचे बळ ओळखल्याशिवाय आपण त्याच्याशी युद्धाला जाणे धोक्याचे नाही का?"

"या व्यर्थ शंकाकुशंका काढीत बसू नकोस! तू प्रथम तो सिंह कोठे आहे, मला दाखव! त्याला मी ठार करतो." सिंह आणखी जास्त चिडून जाऊन म्हणाला.

ससा सिंहाला विहिरीजवळ घेऊन जाऊन म्हणाला—"याच किल्ल्यात तो सिंह राहतो. नंतर विहिरीत डोकावून पहात म्हणाला—"आपणाला येत असलेले पाहून स्वारी आत पळपुट्यासारखी लपून बसली आहे." आपण पुढे यावे मी दाखवितो तो कोठे आहे ते."

बुद्धिभ्रष्ट झालेल्या सिंहाने विहिरीत वाकून पाहिले. तो आपलेच प्रतिबिंब पाहून व तो दुसरा सिंह असेल असे समजून जोराने गरजला. त्या गर्जनेचा प्रतिध्वनि आणखी जास्त मोठ्याने कितीदां तरी झाला. तो सिंह आपल्याला आह्वान करीत आहे, असे समजून मूर्ख भासुरक स्वतःचे देहभान विसरून गेला आणि रागाच्या भरातच त्याने त्या खोल विहिरीत उडी मारली.

सशाला अर्थातच परमानंद झाला. त्या पापी व दुष्ट सिंहाचा शेवट झाला म्हणून इतर जनावरांनी त्या सशाची पाठ थोपटली त्यापुढे सर्व जनावरे निश्चित होऊन त्या जंगलात हिंडूफिरूं लागली.



# १४७. न्यूक्लिअर सबमरीन "स्केट"

हल्ली अणुशक्तीने चालणारी सबमरीने (पाणबुड्या) कित्येक देशांत आहेत. 'स्केट' नावाचे एक अद्‌भुत सबमरीन अणुशक्तीने चालते. हे अमेरिकेत तयार झाले आहे. अणुशक्तीने चालणारी सबमरीने पाण्याच्या आत खोल राहून पुष्कळ दूरवर जातात. तरी त्यांच्यासमोर इंधनाचा प्रश्न असा रहात नाही.

'स्केट'च्या सहाय्याने एक अत्यंत अद्‌भुत कार्य घडले आहे. ते उत्तर ध्रुवापर्यंतच्या बर्फाखालून प्रवास करीत १७ मार्च १९५९ या रोजी बरोबर उत्तर ध्रुवाजवळ बर्फाखालून वर आले. तेथे बर्फाचा थर किती जाड आहे ही गोष्ट अजून रहस्यच आहे.

उत्तर ध्रुवापर्यंत पोचायला 'स्केट'ने ४ हजार मैलांवर प्रवास केला. एकूण १०६ जणांनी या प्रवासात भाग घेतला.





# अमरवाणी

आजन्म न श्शठच मशिक्षितो यः  
तस्या प्रमाणं बचनम् जनस्य;  
पराति संधान मधीयते यैः  
विधेति ते संतु किलाप्तवाचः ॥ १ ॥

[जन्मल्यापासून ज्याला लबाडी माहीत नाही, अशा माणसाच्या बोलण्यावर लोक विश्वास करीत नाहीत; परंतु इतरांना फसविण्यात जो पटाईत असतो तो त्यांना जवळचा आत्मीय वाटतो.]

अर्थातुराणाम् न गुरुर्नबंधुः  
कामातुराणाम् न भयं न लज्जा;  
विद्यातुराणाम् न सुखं न निद्रा,  
क्षुधातुराणाम् न रुचिर्न वेला ॥ २ ॥

[धनलालसा ज्याला असते त्याला थोर नाही की बंधू नातेवाईक नाही; कामातुरांना कोणाचे भय नसते की कोणाची लाजलज्जा नसते; विद्येचा छंद ज्यांना असतो त्यांना सुख किंवा निद्रा मिळणे अशक्य; भूक लागली की आवड निवड आणि काळ नि वेळ कुठला ?]

यत्रास्ति लक्ष्मी विनयो न तत्र,  
अभ्यागतो यत्र न तत्र लक्ष्मीः;  
उभौ च तौ यत्र न तत्र विद्या,  
नैकत्र सर्वो गुण संन्निपातः ॥ ३ ॥

[ज्या जागी ऐश्वर्य असते तेथे विनय नसतो. जेथे पाहुणे मंडळींची येजा पुष्कळ असते, तेथे ऐश्वर्य नसते; दोन्ही असतात तेथे विद्या नसते; (आणि हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की) हे सर्व सद्गुण कधी एकत्र नसतात.]



# यक्ष पर्वत

[२३]

[खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी वीरपूरच्या सेनापतीला ससैन्य भुयारातून शरण येण्यास भाग पाडले. सर्वजण डोंगरी किल्लचाच्या पायथ्याशी आले. त्यांना वीरपूरचा मंत्री भेटला. त्याने समरबाहू डोंगरी किल्लयाचा राजा असल्याचे मान्य केले आणि खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांना बरोबर घेऊन नदी किनाऱ्यावर आला. पुढे—]

खड्गवर्मा आणि जीवदत्त नदी किनाऱ्याजवळ वीरपूरच्या मंत्र्याबरोबर आले तेव्हां त्यांना रथाच्या आकृतीची नाव ते होते त्या जागेकडे येत असलेली दिसली. दोघांनी त्या नावेकडे लक्षपूर्वक पाहिले तेव्हां त्यांना ती रथाकृतीची लाकडाचीच नाव असल्याचे स्पष्ट दिसले.

जीवदत्त वीरपूरच्या मंत्र्याकडे वळून त्याला म्हणाला—"मंत्री! तुम्हांला एका यक्षाकडून आमच्या विषयी सर्व गोष्टी कळल्याचे तुम्ही म्हणाला होतां. त्याला तुम्ही याच नावेत भेटलां होतां का ?"

वीरपूरचा मंत्री क्षणभरच काय उत्तर द्यावे याचा विचार करीत थांबल्यावर म्हणाला—"क्षत्रिय वीरहो! मी काही लपवालपवी करीत नाही, जे आहे ते सर्व सांगतो. ऐका काल दोन प्रहर रात्र उलटली असेल एक यक्ष आकाशमार्गे रथात आला



आणि, राजवाड्याच्या गच्चीवर आपल्या सखींबरोबर वीरपूरची राजकन्या वसंतकुमारी खेळत होती तिला उचलून रथात बसवून पळून गेला. राजवाड्याच्या गच्चीवर त्याच्या जवळचे एक ताडपत्र पडले त्यावरून त्याच्या विषयीची सर्व माहिती आम्हांला मिळाली. त्यावरूनच त्याने मागे पद्मसेन महाराजांची राजकन्या पद्मावतीला पळवून नेल्याचेदेखील कळले.

मंत्री म्हणाला ते ऐकून जीवदत्ताला इतका राग आला की आतांच्या आतां जाऊन त्या यक्षाच्या नरडीचा घोट घ्यावा असे त्याला वाटू लागले. म्हणाला–"तो दुष्ट यक्ष पद्मावतीशी मी लग्न करण्यासाठी तिला घेऊन जात आहे असे अरण्यपूर येथे देखिल खोटे बोलला होता. तोच आतां राजकन्या वसंतकुमारीलादेखील पळवून घेऊन गेला आहे म्हणावयाचा!"

वीरपूरचा मंत्री किनाऱ्याकडे येत असलेल्या रथाकृती नावेकडे पहात म्हणाला–"जीवदत्ता! त्या पद्मावतीसारखीच वसंतकुमारी आमच्या महाराजांची एकुलती एक कन्या आहे. त्या यक्षाने सोडलेल्या ताडपत्रावरून तुम्ही विंध्य पर्वतात कोठे तरी जो दगडाचा रथ आहे तो जागचा हलविण्यासाठी जात आहां हे कळले. खरं आहे ना ते?"

खड्गवर्माने आपली तलवार उपसली आणि किनाऱ्याकडे येत असलेल्या नावेकडे पहात म्हणाला–"मंत्री! तुमच्या प्रश्नाचे उत्तर एकच एक आहे! तुम्ही म्हणालात त्या दगडाच्या रथाला हलवायला नाही, त्याचे तुकडेतुकडे करून त्या दुष्ट यक्षाचे रक्त आमच्या या शस्त्रांना पाजायला आम्ही जात आहो. आम्ही त्याला जिवंत किंवा मृतावस्थेत धरून पद्मावतीला व राजकन्या वसंतकुमारीला सोडवून आणले नाही तर आम्ही क्षत्रियच नाही!"

त्याच वेळी जीवदत्ताला त्या नावेविषयीं एक संशय आला. ही नाव नदीत या जागी आहे, हे वीरपूरच्या मंत्र्याला कसे काय कळले? नावेत आहे ती राजकन्यांना पळवून नेणारा यक्षच असेल का? की या सर्व बाबतीत वीरपूरच्या राजाचा आम्हांला कैद करण्याच्या हेतूने केलेला एखादा कट तर नसेल?"

असा विचार करून जीवदत्त वीरपूरच्या मंत्र्याला म्हणाला–"मंत्री! मला एका गोष्टीचा संशय वाटतो आहे. ही रथाकृती नाव नदीत या जागी आहे हे आपणांला कसे काय कळले?"

त्याने सांगितलेल्या गोष्टीवर जीवदत्त आणि खड्गवीर दोघांचा विश्वास बसत नसलेला पाहून वीरपूरच्या मंत्र्याने आपल्या कपड्यातून एक लांबटसे ताडपत्र काढले आणि ते जीवदत्तला देण्यापूर्वी म्हणाला–"जीवदत्त! यक्षाने त्या दिवशी रात्री सोडलेले हे ताडपत्र वाचून पहा. यात इतर सर्व माहितीबरोबर नदीत या जागी नाव आहे, असेदेखील लिहिलेले आहे! पहा, पाहिजे तर!"

जीवदत्त ताडपत्रावर लिहिलेले सर्व सुरवातीपासून शेवटपर्यंत वाचून झाल्यावर म्हणाला–"मंत्री! तुम्ही सांगितलेल्या कोणत्याही गोष्टीबद्दल माझ्या मनांत आतां संशय उरला नाही. ही गोष्ट खरी आहे की तुमच्या बोलण्यावर आमचा विश्वास बसत नव्हता. आम्हांला वाटत होते की आपल्या महाराजांचे स्वामिभक्त सेवक असल्याने महाराजांवर आलेला प्रसंग टळावा या साठी आम्हांला कैद करण्याचा आपण घाट रचला असावा. परंतु आता ती शंका मनांत रहायला कारण उरले नाही. आम्ही दोन्ही ताडपत्रांवरील अक्षरांचे वळण पडताळून पाहिले आहे. पद्मपूरला त्या यक्षाने सोडलेल्या ताडपत्रावर जे लिहिले आहे त्यांतले आणि यातले अक्षराचे वळण जवळ जवळ सारखेच आहे."

खड्गवर्मा ताडपत्रावर जे काही लिहिलेले होते ते दोनतीनदा भरभर वाचून म्हणाला–"मंत्री महाशय! हे ताडपत्र आमच्याजवळ राहले तर तुम्हांला काही हरकत





आहे का? विन्ध्य पर्वतावरच्या त्या यक्ष प्रदेशात पोचल्यावर त्या लबाड यक्षाला धरण्यासाठी याचा कदाचित उपयोग होईल!"

वीरपूरचा मंत्री होकारार्थी मान हलवून नदीकडे पहात म्हणाला—"ती पहा नाव किनाऱ्याला येऊन लागली. तो नाववाला त्याचा मित्र असल्याचे यक्षाने लिहिले आहे. तो कसा काय आहे हे सांगणे कठीण आहे. म्हणून तुम्ही फार सावधगिरी बाळगायला हवी. आमच्या राजकन्येला सोडवून आणणाऱ्याशी तिचे लग्न करून देऊन आपले अर्धे राज्य देण्याचे आमच्या महाराजांनी जाहीर केले आहे.

ते ऐकून जीवदत्त थोडा हसून म्हणाला—"आम्ही फार दिवसांपूर्वी पद्मसेन महाराजांची कन्या पद्मावतीला आम्ही थोर वीर असल्याचे पटवून देण्यासाठी विन्ध्य पर्वतावरचा दगडी रथ हालवून दाखविण्याचे वचन देऊन निघालो. राज्यप्राप्ती, राजकन्येशी विवाह वगैरे गोष्टींचा विचार करावयाचा झाल्यास त्या दुष्ट यक्षाचा नाश झाल्यावर! इतर गोष्टींचा विचार त्यापूर्वी न करण्याचे आम्ही ठरविले आहे."

त्याच वेळी नाव किनाऱ्याला लागली. नावेच्या पुढल्या बाजूला यक्षासारखे पंख असलेल्या आणि अलंकार व वस्त्रे धारण करून आलेल्या एका व्यक्तीने खड्गवर्मा व जीवदत्त होते त्या बाजूला हात पुढे केले. खड्गवर्मा व जीवदत्त दोघे वीरपूरच्या मंत्र्यासह पुढे गेले.

त्या यक्षाने सर्वांना एका क्षणातच निरखून पाहून आणि ओळखून काहीच न कळल्यासारखे विचारले—"विंध्य पर्वतातील दगडी रथ हालवून दाखविण्याची प्रतिज्ञा करून निघालेले वीर तुमच्यापैकी कोण?"

खग्गवर्मा व जीवदत्त दोघांनी काही बोलल्याशिवाय हात वर करून सूचित केले. यक्ष चेष्टेच्या स्वरात म्हणाला—"तरमग तुम्ही निर्भयपणे माझ्या नावेत यायला हरकत नाही. माझा यक्ष मणिरंजित घेऊन जातो. त्याने ज्या पद्मावतीशी आणि वसंतकुमारीशी लग्न करण्याचे ठरविले आहे त्या तेथेच आहेत."

खड्गवर्मा व जीवदत्त दोघे पाणी किनाऱ्याला लागले होते तेथूनच उडी मारून एकदम नावेत पोचले. जीवदत्तने यक्षाला विचारले—"असहाय अशा राजकन्यांना रात्री पळवून नेणाऱ्या यक्ष मणिरंजिताचा मित्र आहेस नाही का तू? तुझं नाव काय?"

"माझे नाव मणिभूषण. माझा मित्र मणिरंजित याच्याविषयी तुम्हांला काहीच माहिती नाही असे दिसते आहे. शौर्य पराक्रमात त्याची बरोबरी करू शकेल असा या जगात कोणी नाही. मंत्रतंत्र विद्येत त्याचा हात धरू शकणारा कोणी नाही. तुम्ही त्याच्याशी वैर विकत घेऊन उगाच आपला जीव धोक्यात कां घालतां? परत जाऊन आपल्या घरी सुखा समाधानाने रहा."

मणिभूषणचे बोलणे चालूच होते, जीवदत्तने चटदिशी आपल्या कुबडीचे टोक मणिभूषणच्या दंडाला लावले. त्याबरोबर तो विजेचा धक्का लागल्यासारखा उडी मारून दचकून मागे सरकला आणि थरथर कापू लागला. घाबऱ्या स्वरात त्याने



विचारले—"मंत्रदंड आहे का तो? म्हणजे तुझ्या अंगात एवढी मंत्रशक्ती आहे वाटते?"

तो प्रश्न ऐकून जीवदत्ताने स्मित करून आपली कुबडी खड्गवर्माच्या हातात दिली व मंत्र म्हटल्यासारखा थोडा पुटपुटला आणि बोटाने यक्षाच्या खांद्याला स्पर्शमात्र केला. यक्ष "मेलो!" अशी किंकाळी फोडून नावेत खाली पडला. थोड्या वेळाने उठून उभा रहात म्हणाला—"तूच जीवदत्त वाटते? अमोघ अशी मंत्रविद्या प्राप्त आहे तुला, माझ्या मित्राची बरोबरी करू शकणारी! तुम्हां दोघांचे परस्परांशी वैर कशाला? कोणाच्या आडकाठीशिवाय तो रथ कसा हालविता येईल मी सांगतो



तुम्हांला. ते काम पुरे करून तुम्ही दोघे आपल्या वाटेने जा. तुमची प्रतिज्ञा पुरी झाल्यासारखे होईल.”

खड्गवर्मा दांत ओठ चावून आपली तलवार उगारीत म्हणाला–“ए यक्षा! फुकटच्या गप्पा करायच्या सोडून निमूटपणे यक्षपर्वताच्या दिशेने नाव चालव. त्या यक्षाने आम्ही पोचल्यावर दोघां राजकन्यांना सोडविले आणि क्षमा मागितली तर ठीक, नाही तर त्याच्या सर्वांगाची खांडेखांडे करून विंध्य पर्वतावरच्या कावळ्या गिधाडांसमोर फेंकून त्यांना मेजवानी देऊ.”

सामान्य मानवजातीच्या दोघांकडून अशा धमक्या ऐकून मणिभूषण मनातल्या मनात ...फळली. परंतु त्यांच्यासमोर आपली डाळ शिजणार नाही हे त्याने ओळखले व अपमानाबद्दल त्याला राग आला असल्याचे दर्शविण्यासाठी तो म्हणाला– “क्षत्रिय वीरहो! तुम्हां दोघांना मणिरंजिताकडे पोचविण्याची जबाबदारी मी घेतली आहे. ती पार पाडून मी आपल्या वाटेने निघून जाईन. राजकन्यांना पळवून नेण्याशी व तो दगडी रथ हालविण्याशी माझा काही एक संबंध नाही.”

“तुझा गर्व व अहंकार उतरला आणि तू आतां सामान्य रीतीप्रमाणे मर्यादा ओळखून बोलू लागला आहेस हे पाहून मला अत्यानंद झाला. बरं तर आतां, इकडच्या तिकडच्या गप्पा सोडून तू सरळ नदीच्या मधोमध नाव चालव”, असे यक्षाला दटावून सांगून जीवदत्त, तो सर्व प्रसंग आश्चर्यचकित होऊन काठावरून पहात असलेल्या वीरपूरच्या मंत्र्याला म्हणाला– “तरमग! आतां आम्ही काही काळतरी तुमचा निरोप घेत आहो. वसंतकुमारीला सोडवून आणून तिच्या वडिलांकडे सुखरूप पोचती करण्याची प्रतिज्ञा आम्ही दोघांनी केली असल्याचे आपल्या महाराजांना जाऊन सांगा. शक्य झाले तर त्या यक्षाचे डोके कापून घेऊन येऊ. इतर धाडसी लोकांना दहशत बसावी या साठी ते



येईल महाराजांना!”

दोघे म्हणाले ते करून दाखवू शकतील, या गोष्टीची मंत्र्याला खात्री झाली. नाव काठावरून नदीच्या मध्यभागी जाऊ लागल्यावर मंत्री “त्यांचा प्रवास सुखाचा होवो व त्याच्या हातून कार्यसिद्धी होवो!” असे मनातल्या मनात म्हणत, त्यांच्या नावेकडे बराच वेळ पहात उभा राहिला.

नाव जोराने चालू लागली. खड्गवर्मा व जीवदत्त दोघे नावेत लक्षपूर्वक कोठे काय आहे पहात सुकाणूजवळ आले आणि हीच नाव आकाशात उडत असावी असे वाटल्यावरून मणिभूषणला तसे त्यांनी विचारले. दोघांकडे पाहून त्याला भयंकर भीती वाटू लागली. दोघे क्षत्रियवीर आहेत, इतरांपेक्षा थोडे जास्त शूर व पराक्रमी असतील कदाचित. त्यांना नावेत बसवून थोडी भीती दाखवून पाहिजे तसे नाचवितां येईल व यक्षपर्वतापर्यंत त्यांना पोचवून मोकळे होऊ असे त्याला वाटत होते. परंतु दोघे मंत्रतंत्र विद्येत त्याला निष्णात दिसले.

खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर द्यावे तर कसे द्यावे असा विचार करीत काही वेळ राहील्यावर मणिभूषण शेवटी म्हणाला– “मणिरंजित आकाशमार्गे जातो तो दगडी



रथ हा नाही. त्याला रथाकृती वस्तूच फार आवडतात. म्हणून तो राहतो त्या घरापासून नदीत फिरणाऱ्या या नावेपर्यंत सर्व वस्तूच त्याने रथाकृतीच्या घडविल्या आहेत.”

जीवदत्त रागाने म्हणाला– “अस्सं! तर मग तो आमच्या हातात सापडल्यावर आम्ही त्याला रथाकृतीच्या एखाद्या झाडाच्या फांदीला फांशी देऊ. तशा आकृतीची झाडे तुमच्या यक्ष पर्वतावर आहेत का?”

मणिभूषण यक्ष या प्रश्नाचे काही एक उत्तर न देता तोंड फिरवून बसला. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी त्यानंतर त्या यक्षाकडे फारसे लक्ष दिले नाही आणि नदीच्या दोन्ही किनाऱ्याला असलेल्या

सुंदर व उंच पर्वतांकडे पाहू लागले. उंच आकाशाला शिवणारी उंच झाडे चहूकडे दिसत होती. तेव्हां त्यांना ते विंध्य पर्वतात वाहणाऱ्या कोणत्यातरी नदीतून प्रवास करीत असल्यासारखे वाटू लागले. मणि-भूषणला विचारले तेव्हां त्याने सुद्धा त्या विंध्य पर्वताच्या रांगा असल्याचे सांगितले.

"तू म्हणालास तो यक्ष पर्वत आणखी किती दूर असेलसे वाटते तुला?" जीवदत्तने विचारले.

"आणखी दहा बारा कोस असेल. सूर्यास्तापूर्वी पोचणे शक्य नाही. आपण नाव काठावर नेऊन खाऊन पिऊन घेऊ या आणि मग पुढे जाऊ या? काय म्हणता?" तो म्हणाला.

जीवदत्तला तसे करणे बरोबर वाटले. परंतु नावेत खायला फळांशिवाय काही नव्हते. तरी किनाऱ्यावर खाण्यालायक चांगली शिकार नक्कीच मिळेल, असा विचार करून त्याने खड्गवर्माचा सल्ला घेतला. त्याने पश्चिमाकाशाकडे वळलेल्या [illegible] कडे एकदा पाहिले व म्हणाला–"आपण ही रात्र नदीतीरावरच काढावी. खाऊन पिऊन झोपूया आणि पहाटे पुढच्या प्रयाणाला निघू या."

जीवदत्तने मणिभूषणला विचारले– "ऐकलेसना खड्गवर्मा म्हणाला ते? नाव किनाऱ्याला लाव."

मणिभूषण मागेपुढे करू लागला. म्हणाला–"माझ्या मित्राने शक्य होईल तितक्या लौकर तुम्हांला घेऊन यायला सांगितले आहे! रात्रभर आपण येथे राहलो तर उशीर नाही का होणार? आणि माझ्या मते येथे रात्रभर राहणे धोक्याचे आहे."

जीवदत्त करड्या स्वरात म्हणाला– "येथे आज्ञा हुकूम आमचा! तरुण मुलींना पळवून नेणाऱ्या तुझा मित्र मणिरंजितचा नाही! नाव किनाऱ्याला लाव! ऐकू आले कां?"

मणिभूषणने जास्त न बोलता नाव किनाऱ्याकडे वळविली. (क्रमशः)





# मन पालटले

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्या-वर काढून घेतले आणि नेहमीसारखा मौन-पणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! तुझ्या खंबीर मनाची स्तुती करावी तेवढी थोडीच आहे. तरी अवंती नगरीच्या युवराज अमरध्वजासारखे तू स्वतःचे मन बदलून काही करशील काय अशी एक अंधुक शंका येते. तुला की मी त्याची गोष्ट सांगतो. ऐक!" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी अवंतीपूरच्या आजूबाजूच्या प्रदेशात शेकडो योजने पसरलेले एक भयंकर असे दाट अरण्य होते. त्या अरण्यात लोक-वस्तीपासून खोल दूर भिल्लांची वस्ती होती. त्यांना शहरी जीवनाची कल्पनासुद्धा नव्हती. रानटी जातींचा जसा एक प्रमुख असतो

## वेताळाच्या गोष्टी



तसा त्या भिल्लांचा देखील एक नायक होता. त्या जातीतले लोक आपल्या नायकाच्या आज्ञेप्रमाणेच वागत. त्याच्या आज्ञेबाहेर कधी कोणी वागत नसे.

अवंतीपूरचा युवराज अमरध्वज हा त्या अरण्यात शिकारीला जात असे. तो फार साहसी व पराक्रमी होता. काही शस्त्रास्त्र हातात घेतल्याशिवाय वाघासिंहांसारख्या क्रूर जनावरांनादेखील तो सहजी ठार करीत असे.

एकदां अमरध्वज त्याच्या हातातून निसटून पळून गेलेल्या वाघाचा पाठलाग करीत दूर अरण्यात गेला आणि नकळत भिल्लांच्या वस्तीजवळ येऊन पोचला. त्या अरण्यात माणसांची वस्ती असू शकेल, याची त्याला कल्पनादेखील नव्हती. भिल्लांच्या वस्तीत पोचल्याबरोबर त्याला एक अत्यंत सुंदर भिल्ल तरुणी दिसली. ती वाघांच्या छाव्यांबरोबर खेळत होती.

युवराजाने तिला पाहिले त्याच वेळी तिनेदेखील युवराजाला पाहिले. दोघांची दृष्टादृष्ट झाली. दोघे परस्परांचे सौंदर्य पाहून आश्चर्यचकित झाली. कोणताही दागिना अंगावर नव्हता की सुंदर वस्त्रे तिच्या अंगावर नसूनही साध्या रानटी लोकांच्या पोषाखात इतके सौंदर्य एकवटलेले पाहून युवराज साहजिकच फारच चकित झाला. तिने तरी भिल्ल तरुणांनाच आजपर्यंत पाहिले होते. अगदी पहिल्याने तिने सुसभ्य समाजातल्या इतक्या सुंदर तरुणाला पाहिले होते. तिला पुरुषात इतके सौंदर्य असू शकते या गोष्टीवर विश्वासच होईना. कोणीतरी देवच तर आकाशातून अवतरला नसेल! ती आश्चर्याची गोष्ट वस्तीतल्या इतरांना सांगण्यासाठी ती धावली. युवराज देखील तिच्या पाठोपाठ गेला.

ते पाहून अनेक भिल्ल तरुण हातात भाले घेऊन त्याच्या चारीबाजूला घोळका करून चालू लागले. त्यांच्याबरोबर ती तरुणीसुद्धा होतीच. अमरध्वज त्या तरुणांना म्हणाला–"मी अवंतीपूरचा युवराज आहे. तुम्हाला [illegible] असेल [illegible] कोणाशी लग्न करावे म्हणतो."

भिल्ल परस्परांकडे पाहू लागले. त्यांच्यापैकी वयाने थोडा मोठा होता तो युवराजाला बरोबर यायला सांगून आपल्या नायकाकडे त्याला घेऊन गेला. नायकाने त्याच्या तोंडी सर्व ऐकून घेतले व विचारले–"या मुलीशी विवाह करायचा म्हणत असशील तर तुला एक परीक्षा द्यावी लागेल. तू आहेस का तयार?"

युवराज अमरध्वज साहसी व पराक्रमी होताच. तो तयार झाला.

"तरमग चल!" असे सांगून भिल्लांचा नायक युवराजाला अरण्यातल्या एका उघड्या पटांगणात घेऊन गेला. पाहतां पाहतां भिल्ल पुरुष व स्त्रिया मुलांबाळांसह त्या मैदानात जमा झाली. नायकाने सर्वांना गोल उभे रहायला सांगितले.

थोड्याच वेळाने गर्दीतून एक भयंकर शक्तिशाली असा भिल्ल पुढे आला. त्याच्याबरोबर काही लोक डफ घेऊन आले. हत्तीसारखे होते त्या गलेलठ्ठ पहिलवानाचे शरीर. त्याचे तोंड भयंकरच होते. ते पाहून अमरध्वजला त्याची घृणाच वाटली.

त्या भयंकर माणसाकडे बोट दाखवून भिल्ल नायक अमरध्वजला म्हणाला–"आमच्या वस्तीत याच्याहून बलवान पराक्रमी दुसरा कोणी नाही. तुला आमच्या मुलीशी विवाह करावयाचा असेल तर तू द्वंद्वयुद्धात याला जिंकले पाहिजेस!"





अमरध्वज भिल्ल नायकाला म्हणाला–"तुमच्या मुलीला योग्य वर निवडण्याची ही रीत बरोबर नाही. याला जिंकायला पशुबळच पुरे पडेल. परंतु जांवयात बुद्धी, सौंदर्य इत्यादी गोष्टीसुद्धां लागत नाही का?"

"आम्ही जंगलात राहणारे रानटी जातीचे लोक. आमची पद्धत आमची आणि तुमची पद्धत तुमची. तुमची पद्धत आम्हांला काय उपयोगाची? तुला आमच्या या पहेल-वानाशी युद्ध करायचे नसेल तर आल्या वाटेने चालू लाग!"

ते ऐकून भिल्ल जातीचे सर्व लोक खदखदां हसले.

"मी त्याच्याशी द्वंद्वयुद्धास तयार आहे!" अमरध्वज म्हणाला. लगेच सर्वांची तोंडे बंद झाली. सर्वत्र शांत झाले.

दोघांची कुस्ती सुरू होताच भिल्ल पहलवानाने अमरध्वजाला सहज उचलून दूर फेकून दिले. सर्वांनी टाळ्या वाजविल्या व हंसू लागले. भिल्लकन्येने सुद्धां टाळ्या वाजविल्या व खूप हसली.

भिल्ल तरुणाच्या बळाची कल्पना एका क्षणात अमरध्वजला आली. त्याला थोडे आश्चर्यपण वाटले. परंतु त्याच्या अंगात होते ते फक्त राक्षसी बळच होते, बुद्धी थोडेदेखील नव्हती. डाव पेचतर माहीतच नव्हते. हे सर्व ओळखून अमरध्वज ज्या जागी पडला होता त्या जागेवरून उठून निघाला तो जवळ येत असतां विजेच्या वेगाने अमरध्वजाने त्याच्या डोक्यात इतक्या जोराने लाथ मारली की तो अमरध्वजाच्या अंगावर पडला. परंतु अमरध्वज तत्परतेने बाजूला सरकला व भिल्ल तरुण जमिनीवर आदळल्यावर आपल्या मनगटाने त्याची मान रगडू लागला. भिल्ल युवक निरुपाय व शेवटी गतप्राण होऊन जमिनीवर पडला. ते पाहून सर्वांनी टाळ्या वाजविल्या. भिल्ल कन्येनेदेखील टाळ्या वाजविल्या.

भिल्ल नायकाने अमरध्वजाची पाठ थोपटली व म्हणाला–"शाबास! तू खरो-[illegible] मुलीला योग्य वर आहेस. मी तुमचा दोघांचा विवाह करून देतो."

"तिच्याशी लग्नाचा विचार मी आतां सोडला आहे. आतां मी तुमचा सर्वांचा निरोप घेतो." अमरध्वज म्हणाला.

तो थोडेच अंतर चालून गेला असेल, सर्व भिल्लांनी त्याला अडविले.

भिल्ल नायक त्याला म्हणाला–"हे पहा, युवराज मी सांगतो ते ऐकून मग जा. तुमच्या हाती हरलेल्याशीच या मुलीचे लग्न व्हायचे ठरले होते. कारण तिच्याशी लग्न करण्याची इच्छा दर्शविणाऱ्या सर्वांना त्याने जिंकले होते. कित्येक त्याच्या हाती ठार देखील झाले. म्हणून मी तुला त्याच्याशी कुस्ती खेळून त्याला जिंकण्याची अट घातली होती. आतां तुला जसे वाटेल तसे ठरवून तू जा."

त्याला अडवून उभे राहिलेल्या भिल्लांनी त्यांच्या नायकाची इच्छा ओळखली व अमरध्वजला वाट दिली. परंतु तो जागचा हलला नाही. काही वेळ विचार करून म्हणाला–"मी लग्न करणार आहे."

नायकाने दोघांना विवाहबद्ध केले आणि त्यांना प्रेमाने निरोप दिला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! युवराजाने त्या भिल्ल कन्येशी विवाह करण्याचे सांगून विवाह करण्याचे प्रथम कां नाकारले? त्या भिल्ल पहल-वानाने युवराजाला उचलून दूर फेकून



दिल्यावर भिल्ल कन्या हसली म्हणून का? तसे असेल तर पुन्हां त्याचा विचार कसा काय बदलला न त्याने तिच्याशी कां विवाह केला? त्याला परत जाऊ द्यायचे सांगून तो चालू लागल्यावर भिल्ल त्याला ठार तर करणार नाहीत या भीतीने का? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"त्या भिल्ल कन्येशी लग्न करायचे असेल तर राक्षसी देह असलेल्या त्या तरुणाला कुस्तीत जिंकावे लागणार व तशी भिल्ल लोकांची रीत आहे, हे ऐकल्यावरच त्याने तिच्याशी लग्नाचा विचार मनातून काढून टाकला होता. कारण तो अगदीच रानटीपणा होता. परंतु कोणी भित्रा म्हणू नये यासाठी तो त्याच्याशी कुस्तीला तयार झाला. भिल्ल कन्या भिल्ल तरुणाचे बळ पाहून हसली किंवा नंतर अमरध्वजाने त्याला [illegible] लागली या गोष्टीचा त्याच्या मनावर काहीच अनुकूल किंवा प्रतिकूल परिणाम झाला नाही. कारण तो भिल्ल तरुण जिकला तेव्हां जशी ती हसली तशीच तो मेला तेव्हां देखील हसली. तिला त्यात दुःख मुळीच झाले नाही. तरमग तो तिच्याशी लग्नाला कसा काय तयार झाला? तिच्याशी 'याचे लग्न व्हायचे ठरले होते तो तर [illegible]च्या हातीच मेला होता. त्याने त्यापूर्वी कित्ये-कांना जिंकले तरी होते किंवा ठार तरी केले होते. शौर्य साहसाची कदर करणारी ती भिल्ल कन्या आणखी कोणाशी लग्न करील याची शक्यता जवळजवळ नव्हतीच. त्याला शूर पराक्रमी मानून ती त्याच्याशी लग्नाला तयार झाली होती. म्हणून युव-राजाचे मन दुसऱ्यांदा पालटले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# राजप्रतिनिधीचे घोडे

चित्रसेन राजा महेंद्र देशात राज्य करीत असतां त्या देशात पीक उत्तम होते आणि उद्योग धंदे व व्यापार व्यवसायाची उन्नती होत होती. देशात आहार वस्तू मुबलक होत्या. त्याच बरोबर सोने, चांदी व हिऱ्या माणक्यांनी राजाचा कोषच नव्हे तर श्रीमंतांच्या तिजोऱ्या देखील भरलेल्या असत. त्या भरभराटीच्या काळात नागरिक सुखी होते आणि काही पेठांना मोठ्या नगरांचे स्वरूप आले होते.

अशा मोठ्या नगरांची नागरिक कामे व राज्यव्यवस्थेची कामे सुरळीतपणे चालावी यासाठी काही तर विशेष व्यवस्था करावी असे राजाच्या मनात आले. म्हणून राजाने अशा मोठमोठ्या नगरात राजप्रतिनिधी नेमण्याचा विचार केला. परंतु अशा राज-प्रतिनिधींची निवड प्रजेने करावी असे राजाला वाटले. त्यांच्यावरच आपला प्रतिनिधी निवडण्याची जबाबदारी टाकली तर नागरिक चांगला आणि कर्तबगार असा निवडतील प्रतिनिधी व तो प्रतिनिधी जास्त जागरूकपणे काम करील अशी कल्पना पण होती.

महेंद्र देशात राजधानीच्या पाठोपाठ मोठे असे शहर म्हणजे आनंदपुर हे नगर होते. तेव्हां त्याच नगरात प्रथम राज-प्रतिनिधीची निवड करावी व नवीन पद्धत कितपत कामाची होते हे पहावे, असा राजाने विचार केला. आनंदपूर ही व्यापाराची एक मोठी पेठ होती. ती दहा लाखांची एक वस्ती होती. गावात उंच इमारती व वाडे, रुंद रस्ते व राज मार्ग होते. आनंदपूरच्या पेठेत परदेशी व्यापारी देखील फार मोठ्या संख्येने येत जात.

चित्रसेन राजाने आपला विचार त्याचे प्रधान चतुर यांना कळवून त्यांचा

श्री मनोधर जाधव



सल्ला विचारला. तेव्हां प्रधान म्हणाला– "महाराज! रानात राहणाऱ्या एका जातीचे लोक आपला नायक निवडून त्याच्या बोलण्या सांगण्याप्रमाणे वागतात तसे निरनिराळ्या जातीचे आणि धंद्यात पडलेले शहरात राहणारे लोक आपला नायक निवडून त्याच्या म्हणण्याप्रमाणे वागतीलच हे सांगणे थोडे कठीण आहे. त्यापेक्षां योग्य व समर्थ अशा माणसाची आपणच निवड करून त्याला नेमावे, असे मला वाटते!"

परंतु चतुराचा सल्ला राजाला आवडला नाही. नगरपालकाची नेमणूक नागरिकांच्या हितासाठी करावयाची आहे. आपले हित नागरिकांनाच जास्त चांगले समजते. त्यासाठी जास्त काम करण्याची योग्यता ज्याच्यात असेल अशा माणसाची तेच निवड करतील. त्यात गैर काय?

दहा लाख लोकांचा एकच प्रतिनिधि निवडण्यात अनेक अडचणी येतील असे वाटल्यावरून राजाने आनंदपुराच्या बारा पेठा आखून दिल्या. त्या पेठांची व्यवस्था पाहण्याचे काम एकाला दिले तर जास्त सोयीचे होईल, त्यानंतर त्या सर्वांनी मिळून सर्व शहराकरितां म्हणून एक शहर प्रमुख निवडावा. तो शहराचा मुख्य शासक व इतर सर्व त्याच्या देखरेखी खाली उप-शासक राहतील व त्याला मदत करतील असा निर्णय राजाने घेतला.

ती गोष्ट सरकारी आज्ञेने आनंदपूरला जाहीर करण्यात आली आणि निवडणुकीची सर्व तयारी झाली.

आनंदपूर येथे सुचारु नावाचा एक विद्वान रहात असे. तो त्याच नगरात जन्मला व वाढला. त्याला ते शहर म्हणजे पंच-प्राणासारखे होते. त्या शहरात शांतता व सुव्यवस्था नांदावी यासाठी जीवेभावे अनेक लोकहिताची सार्वजनिक त्याने कामे केली होती. राजाश्रम मिळून शहरात नवीन व्यवस्था होणार हे ऐकून त्याला परमानंद झाला. त्याने विचार केला आपणदेखील निवडणुकीत भाग घेऊन ... जास्त सेवा करावी. त्याच्या नेतृत्वाखाली तरुणांची एक संघटनासुद्धा होती.

सुचारुप्रमाणे अनेक श्रीमंतांनी आणि व्यापाऱ्यांनी निवडणुकीत भाग घ्यायचे ठरविले. कारण नवीन राजवटीत त्यांना प्रामुख्य मिळाले तर त्यांना खूप फायदा मिळेल असे साहजिकच त्यांना वाटले. म्हणून त्यांनी त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वागणारे बोलणारे असे जे लोक होते त्यांना उभे करून त्यांनी निवडून यावे यासाठी पाण्या-सारखा पैसा खर्च केला व त्यांना विजय मिळवून दिला. बारा अशिक्षित खुशालचेंडू लोक उपशासक म्हणून निवडून आले. सुचारु व त्याच्या अनुयायांचा पूर्ण पराभव झाला.

सुचारुच्या पराभवाची गोष्ट ऐकून राजालासुद्धा आश्चर्य वाटले. राजप्रतिनिधी होण्यालायक त्याच्याहून जास्त चांगला दुसरा कोणी मिळणे शक्य नाही, असे राजाला वाटत होते. परंतु बारा लबाड व लुच्चेच निवडणूक जिंकले.

मंत्री चतुर राजाला म्हणाला–"महा-राज! आपल्या सुंदर नगराची शासन व्यवस्था या मूर्खांच्या हातात देऊ नका. नागरिकांनी त्यांचे हित करणारा कोण, हे ओळखले नसल्याचे जाहीर झाले. आतां तरी आपण स्वतःच एखाद्या योग्य..." असे म्हणू लागतांच राजा त्याला मध्येच थांबवून म्हणाला–"प्रजेचा त्याच्यावर विश्वास नाही हे दिसते आहे. सुचारु हा सदाचरणी





असू शकेल. परंतु तो श्रीमंत नाही. नागरिकांनी श्रीमंतांना निवडले आहे. नको कसे म्हणतां येईल?"

प्रमुख राजप्रतिनिधीची निवड मात्र बरेच दिवस झालीच नाही. उपशासकांची निवड होऊन कित्येक दिवस लोटले. त्यांतल्या प्रत्येकाला वाटे की तो प्रमुख शासक म्हणून निवडून यावा. एक महिना लोटला तरीदेखील प्रमुख शासकाची निवडणूक झाली नाही.

निवडणूक न होण्याचे कारण काय, हे पाहून यावे या हेतूने राजा स्वतः प्रधानाबरोबर आनंदपूरला आला. त्याने सर्व उपशासकांची सभा बोलावून विचारले— [illegible] प्रमुख शासकाची निवडणूक न व्हायला?"

ते म्हणाले—"महाराज! तसे विशेष काही नाही. आपण आलाच आहां तर आपणच आमच्या पैकी ज्याला वाटेल त्याला आपला प्रतिनिधी नेमण्याची कृपा करावी."

मंत्री राजाला हळूच म्हणाला—"आपला प्रमुख कोण असावा हे ठरवू न शकल्यावर हे सर्व मूर्ख प्रजेचे प्रश्न कसे काय सोडणार? आपणच विचार करावा."

हे त्यांच्या नम्रपणाचे लक्षण आहे, मूर्खपणाचे नव्हे!" राजा म्हणाला.

त्यानंतर राजाने त्या बारा जणांपैकी थोडासा हुशार वाटला अशा धनगुप्त नावाच्या एकाला प्रमुख शासक म्हणून नेमला आणि आपल्या राजधानीत निघून गेला.

एका नवीन तऱ्हेने फक्त नगरासाठी एक राजवट सुरू होताच नवीन प्रश्न उपस्थित होऊ लागले. प्रत्येक पेठेतले नागरिक आपापल्या पेठेत नवीन काही सोयी करून द्याव्या म्हणून आपल्या पेठेच्या शासकाला आग्रह करू लागले. एका पेठेत नवीन एखादी सोय करून द्यावी तर दुसऱ्या पेठात आणखी काही सोयी करून द्याव्या म्हणून चळवळ सुरू होऊ लागली. या चळवळींच्या मुळाशी त्या त्या पेठेतले उपशासकच होते.



शासकाला, म्हणजे धनगुप्ताला हे चांगले माहीत होते. कारण ते सर्व त्याचे सहायक नव्हतेच, त्याचे प्रतिस्पर्धी होते. अशा लोकांनी उभे केलेले प्रश्न कसे सोडवायाचे, धनगुप्ताला हे कळेना. म्हणून प्रत्येक प्रश्न सोडवावा कसा याविषयी महाराजांचा सल्ला घेण्यासाठी तो राजधानीकडे धाव घेऊ लागला. धनगुप्त त्या पदास आयोग्य असल्याचे थोड्याच दिवसात राजाला चांगले कळले. परंतु प्रधानासमोर हार मानावी लागेल म्हणून राजा धनगुप्ताला सल्ला देत राहला. परंतु धनगुप्ताच्या डोक्यात राजनीतीची तत्वे थोडीदेखील शिरली नाहीत. त्याला कळले ते एवढेच की प्रश्न उभा राहला की महाराजांकडे धाव घ्यायची आणि राजाच्या आज्ञेचे डोळे मिटून पालन करायचे.

परंतु धनगुप्तासमोर एक मोठा प्रश्न उभा राहीला. राजधानी व आनंदपूर दोन्ही शहरातले अंतर जास्त होते. चांगल्या घोड्यावर जायचे झाले तर दीड दिवस लागे. दर आठवड्यात एकदां तरी राजधानीला जावे लागे. धनगुप्त आपल्या प्रवासासाठी प्रजेचा पैसा खर्च करून दर महिन्याला दोनदोन घोडे याप्रमाणे विकत घेऊ लागला. त्याच्याकडे चांगल्या जातीचे आठ घोडे झाले. एकदां प्रवास करून



आलेल्या घोड्याला दोन महिने विश्रांती मिळे. या घोड्यांचा खरारा, दाणापाणी आणि औषधपाणी करण्यासाठी दोघे नोकर व अश्व वैद्यकात प्रवीण असे दोघे अश्व वैद्य नेमण्यात आले. घोड्यांसाठी सुंदर तबेले बांधण्यात आले आणि उच्च प्रतीचा दाणा परदेशातून मागविण्यात येऊ लागला. कारण सर्व राजवट त्या घोड्यावरच तर अवलंबून होती.

एक वर्ष झाल्यावर धनगुप्तने राज्यव्यवस्थेचा पूर्ण अहवाल तयार करून घेऊन महाराजांना सादर केला. त्या अहवालात महाराजांना नवीन असे काही एक दिसले नाही. महाराजांनी केलेल्या निर्णयांचा



अंमलच काय तो होता. त्यात महाराजांचा सल्ला या सदरात सर्वांत जास्त खर्च आढळून आला. कोणत्याही नवीन योजनेखातर किंवा सोयीखातर तेवढी मोठी रक्कम खर्च झालेली नव्हती. प्रधान बरोबरच होते म्हणून राजाने प्रमुख शासकाला त्या खर्चाचा तपशील विचारला नाही.

नंतर राजा प्रधानाला म्हणाला– "धनगुप्त खरोखरच इमानदार दिसतो! त्याने आपल्या अधिकाराचा कोठे दुरुपयोग केल्यासारखा दिसत नाही."

प्रधान चतुर स्मित करून म्हणाला– "त्याने अधिकाराचा उपयोग करण्यासारखे होतेच काय? आपणाच केलेले सर्व निर्णय होते नाही का? म्हणून तर आपला सल्ला घेण्यासाठी खर्चाची रक्कम इतर सुखसोयी व प्रजेच्या उपयोगाच्या कामांसाठी खर्च केलेल्या रकमांपेक्षां जास्त मोठी आहे!"

चित्रसेन राजाच्या मनाला ती गोष्ट बोचली. तो मंत्र्याला म्हणाला–"आनंदपूरची परिस्थिती स्वतः पाहून यावी, म्हणतो. आपण वेष पालटून जाऊन पाहून यायचं का?"

दोघे वेष पालटून आनंदपूरला हिंडत असता नगराचे वैभव पाहून चकित झाले. प्रत्येक गल्लीत एक सरकारी दवाखाना, पाणी भरायला हौद व विहिरी आणि मोठमोठी दुकाने होती.

चित्रसेन एका गल्लीतून जात असतां त्याला एक मनुष्य भेटला. त्याला त्याने विचारले–"तुमचा प्रमुख शासक फार योग्य दिसतो नाही का? हे दवाखाने आणि प्रजेसाठी केलेल्या सोयी वगैरे राजधानीत सुद्धा नाहीत!"

ते ऐकून तो मनुष्य म्हणाला–"काय हो या गावात तुम्ही नवीन आल्यासारखे दिसता आहां. ह्या सोयी मुख्य शासक येण्या पूर्वीपासून आहेत. सुचारू व त्याचे तरुण स्वयंसेवक सर्वांनी मिळून या नगराचे रूप केव्हांचे बदलून ठेवले आहे. आतां धनगुप्ताच्या कारकीर्दीविषयी विचाराल तर [illegible] घोड्याचा जन्म घ्यायला हवा." असे सांगून निघून गेला.

धनगुप्ताच्या राज्यव्यवस्थेशी घोड्यांचा संबंध काय हे राजाला कळले नाही. म्हणून त्याने प्रधानाकडे प्रश्नार्थक दृष्टीने पाहिले. चतुराला त्या गोष्टीचा अर्थ कळल्यासारखे दिसले नाही.

नंतर ते गावात पुष्कळ हिंडले व अनेक लहान थोर गरीब श्रीमंत नागरिकांना भेटले. जवळजवळ सर्वांनीच घोड्यांचा संबंध राज्यव्यवस्थेशी लावला. आनंदपूरला मनुष्य होऊन जन्म घेण्यापेक्षा घोडा होऊन जन्माला येणे जास्त चांगले, ही गोष्ट सर्व सामान्य माणसाला मान्य असल्यासारखी दिसली.

नतर ते सुचारूलासुद्धा भेटले. "आपण नगराची फार सेवा केल्याचे ऐकले. परंतु प्रजेने आपल्याला कां नाही निवडले?" राजाने सुचारूला विचारले.

"मी निवडणुकसाठी प्रजेची सेवा आरंभली नव्हती. म्हणून मी निवडून आलो नाही तरी माझी सेवा थांबणार नाही हे प्रजेला माहीत आहे. प्रजेला ज्यांनी पैसा दिला त्यांना प्रजेने निवडून दिले त्यात नवल ते काय?" सुचारू म्हणाला.

"तसे म्हणतां तर तुम्ही निवडणुकीला उभेच कां राहिलात?" राजाने विचारले.

"अधिकारावर आल्यानंतर प्रजेची जास्त जास्त सेवा करतां येईल असे वाटले होते!" सुचारू म्हणाला.



"अधिकारावर आहेत त्यांच्यापेक्षां तुम्हीच प्रजेची सेवा जास्त करीत आहां. शहर पाहून आल्यास कोणाला ही ही गोष्ट कळून आल्याशिवाय राहणार नाही." राजा म्हणाला.

"आपण चुकतां आहां. इतके दिवस आमच्या स्वयंसेवक संघटनेने प्रजेसाठी तयार करून दिलेल्या सुखसोयी, धनगुप्ताने सहा महिन्यांच्या आत घोड्यांसाठी तयार करून दिलेल्या सुखसोयींच्या मानाने अर्ध्या देखील नाहीत. काहीतरी प्रयत्न करून त्या घोड्यांची जी बरदास्त राखली जात आहे व त्यांना जे चैन व सुख उपभोगण्यास मिळत आहे तेवढे प्रजेला देण्याच्या प्रयत्नात आम्ही आहो!" सुचारू म्हणाला.

सुचारू राजाला प्रमुख शासकाच्या घोड्याची निगा कशी राखली जात आहे हे थोडक्यात म्हणाला–"तो तरी बिचारा काय करणार? तो स्वतः कोणतीच गोष्ट करीत नाही. आपल्या म्हणण्याप्रमाणे उपशासकांनी वागावे हे त्याला शक्य नाही. प्र[illegible] गोष्टीसाठी महाराजांना भेटून त्यांचा सल्ला घेतलाच पाहिजे. म्हणून हे भाग्य त्या घोड्यांना मिळत आहे. यासाठी का महाराजांनी या प्रमुख शासकाला नेमले असे मी आश्चर्याने स्वतः-लाच कित्येकदां विचारले?"

राजाने लगेच अधिकाररीत्या जाऊन धनगुप्ताने घोड्यांची काय व्यवस्था केली आहे हे पाहिले. तेव्हां सल्ला घेण्यासाठी म्हणून येऊन त्याने खर्चाची एवढी मोठी रक्कम कां दाखविली हे राजाला कळले. एका मूर्खाच्या हाती शहराची सूत्रे देऊन प्रजेचा पैसा व्यर्थ खर्च केल्याबद्दल तो मनात-ल्या मनात खजील झाला. त्याने तावडतोब धनगुप्ताला काढून टाकले आणि सुचारूला त्याच्या जागी नेमले आणि उपशासक नेमण्याचे काम त्यालाच सोंपविले.

दुसऱ्या वर्षी सुचारूने सादर केलेल्या अहवालात महाराजांचा सल्ला या नावा-खाली एका पैचा खर्च देखील लिहिला गेला नव्हता.





# आईला मुलीचा सल्ला

एका गावी राजू नावाचा एक तरुण शेतकरी रहात असे. त्याला कोणी जवळचा नातेवाईक नव्हता. वयात आल्यावर त्याचे शेजार गावच्या एका शेतकऱ्याच्या राणू नांवाच्या मुलीशी लग्न झाले.

काही काळ लोटला. एकदां राणू आपल्या नवऱ्याला म्हणाली–"सण आला आहे ना, एक नवीन लुगडे घेऊन यायला हवे. शेजारी रंगोबा आहे ना तो घेतो आहे, म्हणे नवे लुगडे!"

ते ऐकून राजू म्हणाला–"रंग्याला काय? घेईल काय वाटेल ते! त्यांच्या सारख्यांशी आपली काय बरोबरी?"

ते ऐकून राणू तोंड वांकडे करून म्हणाली–"मी कधी मागितले नाही आज मागायला गेले एक लुगडे तर काय काय बोलता आहां. माझ्या माहेरी मी तोंड उघडायची वेळ, मी मागेन ते येई!"

राजू म्हणाला–"तर मग माहेरच्या लोकांकडेच मागून हौस पुरी करून घे!"

दोन दिवस राणू रुसून बसली. तिसऱ्या दिवशी तिने विचार केला की माहेरी जाऊन आल्याशिवाय तिचा मान किंवा तिच्या माहेरच्या लोकांचा मान राहणार नाही.

मध्यंतरी राजूने घडलेली गोष्ट आपल्या सासऱ्याला कळविली होती.

तिसऱ्या दिवशी राणूने घोड्याची गाडी मागविली व मोठ्या तोऱ्यात नवऱ्याला म्हणाली–"मी माहेरी जाते आहे! रेशमी लुगडे घेऊन येते की नाही, पहा!"

ती माहेरी येऊन पोचली. गाडीतून उतरून घरात गेली.

तिचे बाबा आराम खुर्चीवर बसलेले होते. त्यांनी राणूला आलेली पाहून विचा-रले–"एकटीच कां ग आलीस? जांवई

बापू कोठे आहेत? कळविलेस देखील नाहीस? विशेष काही नाही ना?"

"तुमचे जांवई आले नाहीत बाबा! वसूलीची बरीच कामे आहेत त्यांना. तुम्हांला व आईला येऊन भेटावे म्हणून एकटी आले." असे म्हणत राणू सर्व घरात फिरून आली आणि विचारू लागली– "बाबा! आई दिसत नाही की घरात?"

"तुझी आई माझ्यावर रुसून तुझ्या आजीच्या घरी निघून गेली आहे!" बाप म्हणाला.

"म्हणजे! तुमचे दोघांचं भांडण झालं की काय?" राणूने बापाला विचारले.

"तसं काही नाही ग! सणासाठी रेशमी साडी घेऊन द्या म्हणाली. माझ्यात तेवढी शक्ती नाही, म्हणालो मी. झालं, रुसली आणि गेली निघून! तूच बोल आतां, तुझ्या लग्नासाठी काढलेले कर्ज अजून डोक्यावर आहे. आतां रेशमी साडीचा हट्ट धरून ती बसली आहे, हे बरोबर दिसतं का तिला, तूच सांग." बाप म्हणाला.

[illegible] एक शब्ददेखील बोलली नाही परत सासरी निघाली.

"अग पण इतकी घाई कशाला? आली आहेस तर चार दिवस राहून जा." बाप म्हणाला.

"नाही बाबा! निघालंच पाहिजे मला! आई आल्यावर सांगा तिला!" राणू म्हणाली.

"काय ग सांगू तिला?" बापाने विचारले.

"सांगा, आई! असं रुसणं शोभत नाही तुला. घरातल्या अडचणींचा विचार केल्याशिवाय तिने रेशमी लुगड्याचा हट्ट धरावा हे बरं दिसतं का? घरातली परिस्थिती ओळखून बाईमाणसाने वागायचं असते!" असें सांगून राणू एक्कयात जाऊन बसली.

राणू निघून गेल्याबरोबर तिची आई शेजारच्या घरून येऊन नवऱ्याला हसत मुखाने विचारू लागली–"तुम्ही व जांवई दोघांनी मिळून माझ्या मुलीचे उगाच हाल केलेत!"





# शेरास सव्वा शेर

एक ब्राह्मण गुरुजी दर वर्षी गांवोगांव फिरून आपल्या शिष्यांकडून वार्षिक गुरुदक्षिणा वसूल करून आपल्या गावी परत येत असत. त्यांची गाठोडी उचलून न्यायला त्यांच्याबरोबर दोघे नोकर असत. गेल्या वर्षी पिके चांगली निघाली होती, म्हणून गुरुजींना गुरुदक्षिणा भरपूर मिळाली होती. गुरुजींना मिळालेल्या भेटी व दक्षिणांचे ओझे इतके झाले की दोघां नोकरांना ते वाहून नेणे अशक्य झाले. म्हणून दोनां ऐवजी तीन गाठोडी बांधावी लागली. दोन गाठोडी दोघां नोकरांना देऊन गुरुजींनी ती आपल्या गावी घेऊन जायला सांगितले आणि तिसरे घेऊन जायला एका नोकराला परत यायला सांगितले. नोकर परत येईपर्यंत गुरुजींना एका धर्मशाळेत उतरावे लागले.

एका गाठोड्यासह गुरुजी एका धर्मशाळेत उतरले ते दोघां ठगांनी पाहिले. त्यांनी ते गाठोडे किंवा त्यातला माल काहीतरी करून उडवायचे मनाशी ठरविले. परंतु ब्राह्मण हुशार होता आणि फार सावधगिरी बाळगीत असल्याचे लक्षात आल्यावर गाठोडे चोरून नेणे शक्य नाही हे त्यांच्या लक्षात आले.

म्हणून दोघां पैकी मोठा एका गाढवाला घेऊन धर्मशाळेत आला आणि फार नम्रपणे ब्राह्मणाला नमस्कार करून म्हणाला– "गुरुजी! माझ्याकडून आपली काही सेवा होण्यासारखी असल्यास सांगावी!"

"तसे काही नाही रे बाबा! माझे दोघे नोकर माझी दोन गाठोडी घेऊन माझ्या गावी गेले आहेत आणि मी सांगितल्याप्रमाणे एक जण परत येणार आहे. तो परत आल्यावर हे गाठोडे तो उचलून घेऊन जाईल. मी त्याच्या बरोबरच जाणार आहे." ब्राह्मण म्हणाला.

श्री ए. सी. सरकार, जादूगार



मोठ्या ठगाने ब्राह्मणाला गप्पात गुंतवून ठेवले आणि परत येणाऱ्या नोकराविषयी सर्व गोष्टी विचारून घेतल्या. नंतर त्याने धाकट्या ठगाला पाठवून नोकराला वाटेतच भेटायला सांगितले व त्याचे मालक आतांच गावी येणार नसून दोन तीन दिवस थांबून येणार असल्याने त्याने गावी परत जावे असे सांगायला सांगितले. तेव्हां नोकर परत निघून गेला.

ब्राह्मणाने आपल्या नोकराची वाट बराच वेळ पाहिली. तो गेल्यापासुन चवथा दिवस उजाडला तरी तो न आलेला पाहून ब्राह्मणाला धीर धरवेना. त्याच्या घरी देवीची पूजा होती. म्हणून वेळेवर जाणे आवश्यक होते. ब्राह्मण अशा [illegible] असतां मोठा ठग त्याला येऊन भेटला आणि अत्यंत नम्रपणे विचारू लागला–"गुरुजी! माझ्यालायक काही सेवा असेल तर सांगायला संकोच करू नका."

"तुझ्या गाढवावर माझे एवढे हे गाठोडे ठेवून पोचवशील का?" ब्राह्मणाने त्याला विचारले.

त्याने विचारले–"हो, नेईन की पण काय घाल?"

ब्राह्मणाने पांच रुपये द्यायचे मान्य केले आणि ठगाने ते कबूल केले.

गाठोडे गाढवाच्या पाठीवर टाकून ब्राह्मण त्या ठगाबरोबर आपल्या गावी निघाला. दोघे जेमतेम एक मैलभरच चालून गेले असतील, मध्येच धाकटा ठग पोलीसाचा वेष करून आला आणि त्यांना अडवून विचारू लागला–"काय रे, हे गाढव तर चोरून आणलेले दिसते आहे. रघू परटाचे गाढव चार दिवस झाले कोणी तरी चोरून नेल्याची नोंद ठाण्यावर झाली आहे."

मोठा ठग म्हणाला–"वा रे वा! हे तर माझं गाढव आहे. गेल्या वर्षी आठवड्याच्या बाजारात तीस रुपये मोजून दिले आहेत, वाटलं काय तुला?"

"त्याच्या डाव्या कानावर जखमेचा एक वण आहे. हे रघूचेच गाढव आहे. [illegible] एक दांत सुद्धा पडलेला आहे. पाहू दे मला त्याचे दांत." पोलीसाच्या वेषात आलेला धाकटा ठग म्हणाला.

त्या गाढवाचा दांत खरोखरच पडलेला होता. ते पाहून ब्राह्मणाला देखील आश्चर्य वाटले.

"त्यात काय? कानाला जखमांचे वण तर गाढवा गाढवांना असतात? आणि दांत काय या एकट्याचेच पडले आहेत वाटते?" मोठा ठग म्हणाला.

"खोगिराचे खालचे अस्तर लाल आहे आणि त्याच्यावर रघू असे नाव पण लिहिलेले आहे. पाहू दे मला याचे खोगीर!" पोलीस वेषांत असलेला धाकटा ठग म्हणाला.

ते देखील खरे ठरले. आतां गाढव चोरून आणलेले होते हेदेखील सिद्ध झाले. म्हणून आपली चोरी पकडली गेली आणि पळून जाण्याशिवाय दुसरा मार्ग नाही असे जणुंकाही दाखविण्यासाठी मोठा ठग निसटून पाय काढण्याचे सोंग करू लागतांच धाकट्या ठगाने त्याला पकडले आणि ब्राह्मणाला म्हणाला–"महाराज! तुम्हीदेखील न्यायालयात आलं पाहिजे!"

"मला कशाला तुमच्या भानगडीत ओढतो आहेस, बुवा? मला या माणसाच्या



चोरीची गोष्ट मुळीच माहीत नाही." ब्राह्मण दीन मुद्रेने म्हणाला.

"ते काही असो, तुम्ही न्यायाधीशासमोर उभे राहून, पाहिजे तर तेच सांगा! परंतु तुम्ही आले हे पाहिजेच!" धाकटा ठग म्हणाला.

"बाबा रे! मी तुला शंभर रुपये देतो, मला सोड." ब्राह्मण म्हणाला.

"तसं असेल तर तुम्ही खुशाल जा." धाकटा ठग म्हणाला.

"तरमग माझं हे गाठोडे? ते न्यायला हवं की!" ब्राह्मण म्हणाला.

"गाढवाला नाही सोडता येणार. हे गाठोडे तुम्ही उचलून घेऊ जाऊ शकणार नाही का?" धाकटा ठग म्हणाला.



गाठोडे फार जड होते. ते उचलून नेणे शक्य नसल्याचे ब्राह्मण म्हणाला. तेव्हां धाकटा ठग म्हणाला—"काळोख सुद्धा पडू लागला आहे. रात्री तुम्ही, गाढव आणि हा चोर सर्व पोलिसाच्या पाहऱ्यात आमच्या घरी रहा. उद्या सकाळी दुसरे गाढव विकत घेऊन देतो. त्याच्यावर गाठोडे टाकून तुम्ही आपल्या गावी जा."

नको ते नेमके ब्राह्मणाने मान्य केले आणि त्या दिवशी रात्री ब्राह्मणाला नको ते सर्व लाभले! दुसऱ्या दिवशी सकाळी ब्राह्मणाला नवीन गाढव भाड्याने पन्नास रुपये मोजल्यावर मिळाले. धाकट्या ठगाला शंभर रुपये द्यावे लागले ते लागलेच. ते दिल्यावरच सुटका मिळाली. नंतर आपले गाठोडे गाढवाच्या पाठीवर टाकून ब्राह्मण घरी पोचला.

त्याने गाठोडे सोडून पाहिले तर त्यात जुने फाटके कपडे व दगड धोंड्याशिवाय काही मिळाले नाही. ठगांनी त्याला हजार रुपयाला लुबाडले. होते ब्राह्मणाने चोरांची सर्व लबाडी ओळखली. त्याला असावध व भोळा समजून फसविणाऱ्यांची खोड मोडायचे त्याने ठरविले.

चांभाराच्या देवाला खेटरांची पूजा, या म्हणीप्रमाणे या लबाडांना चांगला धडा मिळेल असे काहीतरी केले पाहिजे, ब्राह्मणाने मनात विचार केला.

यथावेळी त्याच्या घरातली देवीची पूजा वगैरे उरकली. दुरदुरून आलेली नातेवाईक मंडळी परत आपापल्या गावी गेली. आतां मनातला बेत पार पाडण्याचे त्याने ठरविले. त्याच्या शेजारीच एक जादुगार मित्र रहात असे. त्याचा सल्ला ब्राह्मणाने घेतला. त्याने ब्राह्मणाला एक युक्ती सुचविली. ती युक्ती यशस्वी व्हावी म्हणून त्याने त्या ब्राह्मणाला एक आवश्यक वस्तूदेखील दिल्या. ब्राह्मणाने त्याची शेंडी, दाढी मिशा सर्व वाढविल्या आणि सैंपाक्याचा वेष करून जादुगाराने दिलेल्या वस्तू एका पिशवीत ठेवून ठगांना धडा द्यायला निघाला.

तो धाकट्या ठगाच्या घरी गेला आणि गोड गोड शब्दात त्याच्यावर किती संकटांवर संकटे ओढविली हे सांगून त्याने धाकट्या ठगाच्या मनात विश्वास उत्पन्न केला. दोघे ठग एकाच घरी रहात होते. त्यांना कोणी सैंपाक करून वाढायला नव्हता. म्हणून त्यांनी ब्राह्मणाला आपल्या घरात सैंपाक करायला ठेवून घ्यायचे ठरविले. त्यांनी ब्राह्मणाला मुळीच ओळखले नाही. ब्राह्मण सैंपाक करण्यात हुशार होता. म्हणून त्याने निरनिराळी पक्वान्ने तयार करून आपल्या मालकांना खूष केले.

एक दिवशी रात्री दोघे ठग आल्याबरोबर ब्राह्मणाने त्यांना काही तरी अत्यद्भुत पक्वान्न करून वाढले. इतके चांगले पक्वान्न त्यांनी त्यापूर्वी जन्मात कधी चाखले नव्हते. ब्राह्मणाने ते पक्वान्न स्वतः-च्या बुद्धीने तयार केले होते.

"इतके दिवस तू कधी इतके चांगले पक्वान्न केलेच नाहीस. आज कसं काय केलेस?" मोठ्या ठगाने विचारले.

"गेल्या शनिवारी आमच्या घरी पाहुणे आले होते त्या दिवशी कां नाही केलेस हे पक्वान्न?" धाकट्या ठगाने विचारले.



"तू आज इतके चांगले पक्वान्न केले आहेस त्याबद्दल तू मागशील ते देतो!" मोठा ठग म्हणाला.

"मालक! यात माझं कसब असं काहीच नाही. हा सर्व त्या योगीश्वराचा महिमा आहे. आज तीन प्रहरी ते आपल्या घरी आले होते. त्यांच्या योगशक्तीचे वर्णन आतां मी आपल्या तोंडाने काय करू? माझ्यावर अनुग्रह करून त्यांनी मला एक अद्भुत नळी दिली आहे. त्या नळीचा हा महिमा आहे की साध्या गव्हाच्या भुशाचे हे इतके स्वादिष्ट पक्वान्न तयार झाले." असे सांगून ब्राह्मणाने डोळे मिटून योगीश्वर



जणुंकाही समोर उभे असल्यासारखा हात जोडून नमस्कार केला.

"खोटे!" असे मोठा ठग म्हणाला.

"तुमचा विश्वास असो अगर नसो, मला त्याच्याशी काय करायचे आहे? येत्या सोमवारच्या आत मला निरोप द्या. मी हे पक्वान्न तयार करून विकून चार पैसे तरी मिळवीन. भुसा तर खूप स्वस्तच. योगीश्वरांच्या या नळीच्या कृपेने मी त्या सामान्य पदार्थांचे उत्तम पक्वान्न तयार करून खूप पैसे मिळवीन. एकच अडचण आहे! फक्त सोमवारी आणि फक्त एक तासभर या नळीचा फायदा होतो. त्यात काय हरकत आहे, म्हणा! एका तासात [illegible] पैशाला विकली तरी दोनशे रुपये मिळतील मला. आठवड्याला दोनशे व महिन्याला आठशे! नशीब उघडेल माझं. काय म्हणता?" ब्राह्मण म्हणाला.

"गव्हाच्या भुशाने हे पक्वान्न तयार होते. हे करून दाखवू शकशील का?" ठगांनी विचारले.

"का दाखवू शकणार नाही हा? सोमवार येऊ द्या, दाखवून देतो." ब्राह्मण म्हणाला.

तो आठवडा लोटला. रविवारी रात्री ब्राह्मणाने त्याच्या मित्राने दिलेली नळी काढली. ती नळी म्हणजे दोन पट्ट्यांच्या केलेल्या निरनिराळ्या नळ्या होत्या. त्यांच्या बरोबर उपयोगी पडणारे एक काचेचे ग्लाससुद्धा होते. एक नळी त्या ग्लासापेक्षा थोडी मोठी, म्हणजे काचेचा ग्लास तिच्यात घालून ग्लास पूर्णपणे बंद करता येण्यासारखा होता. ही नळी एका टोकाला बंद होती. परंतु त्या झांकणाला तर्जनी बोट जाऊ शकेल एवढे भोक होते. दुसरी पट्ट्याची नळी आकाराने आणि प्रमाणाने कांचेच्या ग्लासापेक्षा थोडी लहान आणि ग्लासात बसण्यासारखी होती. या नळीच्या वरच्या टोकालासुद्धां एक कायम बसविलेले झांकण होते व त्याला सुद्धां बोट आत [illegible] होते. या दुसऱ्या नळीच्या वरच्या बाजूस गव्हाचा भुसा डिंकाने चिकटवून ठेवलेला होता. त्याच प्रमाणे झांकणाला सुद्धां भुसा चिकटवलेला होता.

ब्राह्मणाने तयार केलेल्या पक्वान्नाच्या गोळ्या ह्या लहान नळीभर भरल्या व नळीवर ग्लास उपडा ठेवला. नंतर काचेचा ग्लास नळीसह सुलटा करून ठेवला तेव्हां ग्लासभर फक्त गव्हाचा भुसाच आहे असे वाटे. याशिवाय ब्राह्मणाने ग्लासात उपड्या नळीवर भुसा हलक्या हाताने आणखी टाकला. तेव्हां पाहणाऱ्याला ग्लासभर गव्हाचा भुसाच आहे असे वाटू लागले.

सोमवारी उजाडतांच ब्राह्मणाने आंघोळ केली काचेचा ग्लास ठगांना दाखवून एका उंच टेबलावर ठेवला. त्याने फुंकरून दाखविले, ग्लासावरचा भुसा उडलेला दिसला. त्यानंतर त्याने मोठी नळी काढून त्यात काही एक नसल्याचे ठगांना दाखविले आणि ती काचेच्या ग्लासावर उपडी ठेवून दिली. नंतर त्या नळीला भक्तिपूर्वक नमस्कार करून एक मिनिटभर तो डोळे मिटून बसला आणि नंतर हळूच त्याने मोठी नळी वर उचलली.

काचेच्या ग्लासात गव्हाच्या भुशाऐवजी गोळ्या पाहून ठग आश्चर्यचकित झाले.



भुशाचे गोड पक्वान्न कसे काय झाले! दोघे त्या पक्वान्नाची चव घेऊ लागले तेव्हां ब्राह्मणाने आपली नळी पिशवीत ठेवून दिली. ब्राह्मणाची हात चलाखी काय होती? त्याने मोठी नळी उचलली तेव्हां दोन्ही नळ्यात बोट जाईल एवढीजी भोके होती त्या भोकांतून आपले बोट घालून दोन्ही नळ्या उचलल्या. मोठ्या नळीत लहान नळी राहून गेल्याने पाहणारांना फक्त एकच मोठी नळी दिसली. दोन्ही नळ्या उचलल्या तेव्हां लहान नळीतील पक्वान्न काचेच्या ग्लासात पडले.

ठग म्हणाले–"पुन्हा कर हे पक्वान्न!"

ब्राह्मण म्हणाला–"माझ्याजवळचा भुसा संपला."

"आम्ही आणून देतो." ठग म्हणाले.

"तुम्ही परत येईपर्यंत एक तास होऊन जाईल! नळीचा उपयोग त्यानंतर होणार नाही." ब्राह्मण म्हणाला.

दोघे ठग परस्परांचा गुप्त सल्ला घेऊन ब्राह्मणाला म्हणाले–"आपली ही नळी आम्हांला दे."

"मला ती विकायची नाही आहे. ही मला वरप्रसादासारखी आहे!" ब्राह्मण म्हणाला.

ते शंभर रुपये द्यायला तयार झाले, नंतर पांचशे म्हणाले; हजार देतो म्हणाले; परंतु ब्राह्मण ती नळी विकायला तयार होई ना.

"आतां आम्ही शेवटची रक्कम सांगतों, दोन हजार! तरीदेखील तू ही नळी द्यायला तयार झाला नाहीस तर मात्र, लक्षात ठेव, आम्ही बळजबरीने तुझी नळी हिसकावून घेऊ. मग विकतोस की नाही, बोल!" त्यांनी धमकीच दिली.

"बरं, अडीच हजार रुपये द्या!" ब्राह्मण म्हणाला.

त्याने त्यांच्याजवळून अडीच हजार रुपये रोख मोजून घेतले आणि ते आपल्या पिशवीत ठेवून दिले. नंतर ती नळी आणि काचेचा ग्लास त्यांना देत म्हणाला–"घ्या! येत्या सोमवारी मनाला वाटेल तेवढे पक्वान्न तयार करून घ्या. पहिल्या पासून गव्हाचा भुसा एकत्र करून ठेवा, ते मात्र विसरू नका."

त्याने गावी जाताना वाटेत आपल्या दाढी मिशा साफ करवून चम्मन गोटा देखील करवून घेतला आणि आपल्या नेहमीच्या रूपात घरी पोचला.

सोमवार आला. ठगांनी काचेचा ग्लास-भर भुसा घेऊन त्यावर नळी ठेवून काढली. परंतु भुसा तसाच होता. पुन्हां पुन्हां नळी घालून काढून पाहिली. परंतु भुसा भुसाच राहला.

तेव्हां त्यांना कळले की सैपाक्याने त्यांना फंसविले.





# दोन वर

फार पूर्वीची ही गोष्ट आहे, सत्यकीर्ती नावाचा एक तरुण युवक होता. लहानपणीच त्याचे आईवडील वारल्याने तो आपल्या आजीकडेच लहानाचा मोठा झाला. तिने मरणसमयीं नातवाला दोन मूर्ती दिल्या व म्हणाली–"बाळा! तू नियमितपणे यांची पूजा करीत जा!"

आजी वारल्यावर सत्यकीर्ती कोठेतरी जाऊ या असा विचार करून पाय नेतील तिकडे जाऊ लागला. एका जंगलात त्याला एक घर दिसले. त्यात एक बाई रहात होती. तिला त्याने विचारले–"बाई! पोटभर खायला मिळेल आणि निश्चितपणे या दोन्ही देवींची पूजा होऊ शकेल अशी एखादी जागा आहे का?"

ती बाई थोडी हसली व म्हणाली–"तू असाच थोडा पुढे चालत जा. तुला एक टेकडी लागेल. त्या टेकडीवर फळझाडे आहेत. तू पोटभर फळे खात जा आणि देवींची पूजा करीत जा."

सत्यकीर्तीला त्या बाईच्या सांगण्या-प्रमाणे खरोखरच एक टेकडी लागली. त्या टेकडीवर खरोखरच फळझाडे व एक पडके घरदेखील दिसले. तो त्या घरात राहू लागला. दिवसभर फळे वेचून तो ती खाई आणि दोन वेळां भक्तिभावनेने दोन्ही मूर्तींची पूजा करी.

काही दिवसांनी एक देवी प्रसन्न होऊन म्हणाली–"मी प्रसन्न झाले आहे. माग तुला काय हवं ते!"

"देवी! तू कोण देवी हेदेखील मला माहीत नाही!" सत्यकीर्ती म्हणाला.

"मी स्वार्थ देवी आहे. तू जो वर मागशील त्यात काहीतरी स्वार्थ असला पाहिजे. विसरू नकोस." ती देवी म्हणाली.

सौ. संध्या ग. प्रधान



"देवी! मला काय वर मागावा हेदेखील सुचत नाही. उद्यां येशील का? मग मी मागेन वर!" सत्यकीर्ती म्हणाला. स्वार्थ देवी होकार देऊन अंतर्धान पावली.

स्वार्थ म्हणजे काय सत्यकीर्तीला कळले नाही. तो जंगलात त्याला जी बाई भेटली होती तिच्याकडे जाऊन त्याने तिला स्वार्थ शब्दाचा अर्थ विचारला.

ती म्हणाली–"सांगते आणि वर काय मागावा हे पण सांगते. परंतु आधी तू आत ये!" असे म्हणत तिने सत्यकीर्तीला आपल्या घरात बोलावून नेले. त्याला खायला उत्तम खीर दिली आणि एका मुलीला आंतून बोलावून म्हणाली–"कशी आहे रे ही मुलगी?"

"सुंदर, अद्भुत!" सत्यकीर्ती म्हणाला. त्याने पूर्वी कधी इतक्या सुंदर स्त्रीला पाहिले नव्हते.

ती म्हणाली–"बाळा! ही माझी मुलगी आहे. मुकी आहे. तिचे मुकेपण जावे हा स्वार्थपूर्ण वर देवीजवळ माग. मी तुझे लग्न हिच्याशी करून देईन."

सत्यकीर्ती पुन्हा आपल्या जागी आला. दुसऱ्या दिवशी देवी प्रगट झाल्यावर त्याने वर मागितला–"मी एका मुलीशी लग्न करण्याचा विचार करतो आहे. तिचे मुकेपण जाऊन तिला बोलता आले पाहिजे." देवी "तथास्तु!" म्हणून अंतर्धान पावली.

सत्यकीर्ती जंगलातल्या घरी त्या स्त्रीकडे गेला तेव्हांपर्यंत त्या मुलीला बोलता येऊं लागले होते. त्याने त्या वृद्ध स्त्रीला विचारले–"तू माझ्याशी आपल्या मुलीचे लग्न करून देते म्हणाली होतीस, नाही का?"

"सत्यकीर्ती! तू किती भोळा आहेस रे! तुझ्याशी अशा सुंदर रूपवती मुलीचे लग्न कसं काय करून द्यायचे? आतां ती मुकी राहली नाही, म्हणून राजा हिच्याशी डोळे मिटून लग्न करील?" ती स्त्री म्हणाली.

"हा काय न्याय झाला?" सत्यकीर्तीने विचारले.

"न्यायच नाही का? तू स्वार्थ म्हणजे काय, हे कालच विचारलं होतंस ना? मी नंतर सांगेन म्हटले होते तुला! आपल्या मुलीचे लग्न एका राजाशी करून देण्यात माझा स्वार्थ आहे." ती स्त्री म्हणाली.

सत्यकीर्तीला तो स्वार्थ आवडला नाही, तो आपल्या जागेवर परत आला आणि दुसऱ्या देवीची मनोभावे पूजा करू लागला. परंतु कित्येक वर्षे लोटली तरी ती देवी प्रसन्न झाली नाही. त्याला दाढी मिशा आल्या, वाढल्या व पांढऱ्या सुद्धा झाल्या.

त्याला म्हातारपण आल्यावर दुसरी देवी प्रसन्न झाली. प्रगट होऊन म्हणाली–"माग, पाहिजे तो वर!"

"कोण ग देवी तू?" सत्यकीर्तीने तिला विचारले.

ती म्हणाली–"मला निस्वार्थ देवी म्हणतात, तू मागशील त्या वरात तुझ्या स्वार्थाचा लवलेशही असतां कामा नये!"

सत्यकीर्ती तिला पुन्हां दुसऱ्या दिवशी दर्शन द्यायला सांगून जंगलातल्या त्या स्त्रीकडे गेला. तोंपर्यंत ती स्त्री चांगलीच म्हातारी झाली होती. तिने त्याला पंच-पक्वान्नांचे जेवण वाढले आणि येण्याचे विचारले. त्याने तिला निस्वार्थ देवीने दर्शन दिल्याचे सांगून "निस्वार्थ म्हणजे काय?" विचारले.

ती बाई स्मित करून म्हणाली–"माझ्या मुलीशी कलिंग देशाच्या राजाने लग्न केले



आहे. त्याला वत्सला नावाची एक मुकी मुलगी झाली. ती आता लग्नाला झाली आहे. परंतु तिचे लग्न होत नाही. तेव्हां तिचे मुकेपण जावे असा वर तू माग! यात तुझा स्वार्थ नाही, कलिंग देशाच्या राजाचा व माझ्या मुलीचा स्वार्थ आहे. यालाच निस्वार्थ म्हणतात. तिच्याशी तुझे लग्न करून द्यायचे झाले तर तो स्वार्थ होईल."

सत्यकीर्ती त्या स्त्रीचा निरोप घेऊन आपल्या भाग्याला दोष देत परत निघाला. परंतु त्या अन्य मनस्क स्थितीत वाट चुकला आणि एका ऋषीच्या आश्रमात येऊन पोचला. त्याचे सर्व वृत्त ऐकल्यावर तो ऋषी म्हणाला–"बाबा रे! तुझ्या जन्मापूर्वी वीस

वर्षांपासून मी येथे तपश्चर्या करतो आहे. परंतु मला यश मिळाले नाही. त्याचे कारण काय आपल्या निःस्वार्थ देवीला विचारून मला येऊन सांग.

सत्यकीर्ती त्यांना होकार देऊन व पुढील वाट विचारून घेऊन परतल्यावर देवीची आराधना करू लागला. दुसऱ्या दिवशी देवीने दर्शन दिल्यावर त्याने वर मागितला– "देवी! वत्सलाचे मुकेपण जाऊन तिला बोलता येईल असे कर आणि ऋषीला त्याच्या तपश्चर्येत यश कां मिळाले नाही, हे सांग!"

देवीने वत्सलाचे मुकेपण कसे जाईल हे सांगून म्हणाली–"त्या ऋषीच्या तपश्चर्येचे सर्व यश त्याचे कमंडलू गिळत आहे. ते यश त्याच्याशिवाय इतर कोणाला उपयोगी पडेल. ते त्याने कोणाला देऊन टाकले तरच त्याला तपश्चर्येचे पूर्ण फळ त्याला लाभेल!" नंतर देवी अंतर्धान पावली.

तो सरळ त्या ऋषीकडे गेला आणि देवीने सांगितलेले सर्व सांगितले. ऋषीने आ[illegible] हातात घेतल्याबरोबर त्यातल्या तपःपूत शक्तीने त्याला तारुण्य मिळाले.

तो सरळ जंगलातल्या त्या म्हातारीकडे गेला आणि म्हणाला–"आजी! तुझ्या नातीचे तिच्या होणाऱ्या नवऱ्याला पाहल्याबरोबर तिला बोलतां येऊ लागेल, असे देवीने मला सांगितले आहे."

"तूच का तो? अरे, मी तर तुला ओळखलेच नाही. थोड्याच वेळापूर्वी माझी नात आली." ती म्हणाली.

इतक्यात तिची नात राजकन्या वत्सला स्वतःच पुढे येऊन सत्यकीर्तीला पाहतांच बोलू लागली–"अग आजी! हा कोण ग?"

मुलीला वाचा आलेली पाहून म्हातारी चकित झाली. म्हणाली–"अग, तुला बोलतां येऊ लागले तर! म्हणजे तुझा होणारा पती हाच वाटते?"

यथासमयी सत्यकीर्ती कलिंग राजाचा जांवई झाला आणि तोच गादीला वारस पण झाला.





# शठे शाठ्यम्

एका गावी महादेव शास्त्री नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. ते स्वभावाने अगदी साधे भोळे होते. परंतु त्यांची बायको पार्वती हुशार होती. ती नवऱ्याला सल्ला देऊन त्याला संभाळून नेई.

त्याच गावात रंगराव नावाचा एक वस्ताद मनुष्य रहात असे. त्याचे घर महादेव शास्त्र्यांच्या घरासमोरच होते. महादेव शास्त्र्यांचे वडील व रंगरावांचे वडील यांची खूप मैत्री होती. दोघांनी मिळून काही दिवस व्यापार देखील केला होता. परंतु ते दोघे गेल्यावर दोन्ही कुटुंबात परस्पर कोणत्याही प्रकारचा संबंध राहला नाही. त्याला कारण रंगरावच! रंगरावाचे व्यवहारात नेहमी डावपेच असत. परंतु पार्वतीसमोर त्यांची डाळ शिजत नसे.

एकदां रंगराव आपल्या घराची साफ सफाई करवीत असतां त्याला एक जुना कागद सांपडला. रंगरावांच्या वडिलांकडून महादेव शास्त्र्यांच्या वडिलांनी चार हजार रुपये कर्जाऊ घेतल्याचा त्यात उल्लेख होता. ते कर्ज केव्हांच फिटले होते. परंतु महादेव शास्त्र्यांच्या वडिलांनी लिहून दिलेला कागद परत मागून घेतला नव्हता. कारण कर्जाची फेड झाल्याची गोष्ट रंगरावांच्या वडिलांनी आपल्या वहीत त्याच दिवशी लिहून ठेवली होती. आज तो कागद रंगरावांच्या हाती लागल्यावर त्याच्या मनात एक दुष्ट विचार आला. कर्जफेड झाल्याची पावती किंवा साक्षीदार महादेव शास्त्र्यांजवळ नसणार. तेव्हां या कागदाच्या आधारे त्यांच्याकडून चार हजार रुपये व्याजासकट कां वसूल करू नयेत? त्याने देत नाही म्हटले तर न्यायाधिशाकडे जायचे!

तो विचार मनात येतांच रंगराव तो कागद घेऊन महादेव शास्त्र्यांच्या घरी गेले

सौ. कुसुम न. सावंत



आणि काही वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा करून मुद्द्याची गोष्ट काढली. "अहो, हिशोब वगैरे होऊन कित्येक वर्षे लोटली आणि आतां आणखी कर्ज कोठले हो?" महादेव शास्त्र्यांनी चकित होऊन विचारले. रंगरावांनी तो कागद दाखविला. तो कागद पाहून महादेवशास्त्री किंकर्तव्यविमूढ झाले. त्यांनी बायकोला बाहेर बोलाविले.

रंगराव आलेले महादेव शास्त्र्यांच्या बायकोने पाहिले होते व दोघांचे काय बोलणे चालले आहे याचा कानोसा घेत ती बसली होती. तिने रंगरावांची लबाडी ओळखली. परंतु स्वतःला सावरून ती म्हणाली—"रंगराव भावजी! हा कागद तुम्ही दाखवीपर्यंत आम्हांला या कर्जाची गोष्ट मुळीच माहिती नव्हती. आम्ही हे कर्ज फेडले नसेल तर आणखी कोण फेडील हो? तरी तुम्हांला ही गोष्ट न्यायाधिशाकडे न्यावेसे वाटत असेल तर खुशाल घेऊन जा. ते निवाडा देतील तसे करू!"

रंगरावांना तेच पाहिजे होते. त्यांना वाटले की न्यायालयाची पायरी चढल्यावर महादेवशास्त्री माझ्यासमोर काय टिकतो? कर्ज घेतल्याचा कागद आहे. न्यायाधिकारी त्याविरुद्ध निवाडा कसा काय देईल? पार्वतीची वस्तादगिरी या खेपेस चालणे शक्य नाही. नुसते "बरं बुवा!" असे म्हणून रंगराव निघून गेले.

पार्वती त्याच दिवशी संध्याकाळी न्यायाधिशाची बायको तिची मैत्रीण होती तिच्याकडे बसायला गेली आणि तिच्या समोर जो प्रश्न उभा राहला होता त्या-विषयी सांगायचे ते सांगून तिने काय करायचे ठरविले आहे तेदेखील तिच्या कानावर घातले.

न्यायाधिकाऱ्याने बायकोच्या तोंडी पार्वतीने सांगितले ते सर्व ऐकून घेतल्यावर तिने नवऱ्याला सांगितले, असल्या लबाड माणसाला चांगलेच तोंडघशी पाडले पाहिजे.

पार्वती घरी गेली आणि दुसऱ्या दिवशी न्यायाधिकाऱ्याच्या कचेरीत जावे लागले तर काय करायचे ते तिने पतीला चांगले समजावून सांगितले.

दुसऱ्या दिवशी रंगरावाने न्यायाधिकाऱ्याकडे महादेव शास्त्र्यांच्या विरुद्ध आपले गाऱ्हाणे नेले. त्याने न्यायाधिकाऱ्याला तो कागद दाखविला आणि कर्जाची रक्कम व्याजासकट वसूल करून देण्यास न्याया-धिकाऱ्याला विनंती केली.

न्यायाधिकाऱ्याने महादेव शास्त्र्यांना बोलावून तो कागद दाखविला व त्यांचे काय म्हणणे आहे, ते विचारले.

महादेव शास्त्र्यांनी आपली जबानी दिली ती अशी—"माझ्या बाबांनी रंगरावांच्या वडिलांकडून कर्ज घेतले होते ही गोष्ट खरी आहे, परंतु त्यांनी चार हजार रुपये घेतले नव्हते, सहा हजार घेतले होते. त्याला प्रमाण म्हणून आमच्या बाबांनी लिहून ठेवलेला कागद आमच्या घरात आहे. त्या कागदाप्रमाणे मी त्यांना चार हजार नाही सहा हजार देणे आहे." असे सांगून महादेव शास्त्र्यांनी एक कागद न्यायाधिकाऱ्याला सादर केला.

न्यायाधिकाऱ्याने तो कागद ध्यानपूर्वक वाचल्यावर रंगरावांना विचारले—"रंगराव! याविषयी तुमचे काय म्हणणं आहे? तुमच्या म्हणण्याप्रमाणे चार हजार तुम्हांला येणे आहे. या कागदाप्रमाणे सहा हजार आहे.



या दोन्हीत खरा कागद कोणता हे तुम्ही सांगाल का, म्हणजे तुम्हांला मिळावयाच्या रकमेचा खुलासा करता येईल."

नवा प्रश्न उपस्थित झाला. रंगराव गडबडले. सहा हजारांचा कागद खरा म्हटला, तर त्यात जास्त फायदा आहे. त्याने हिशोबात पाहिल्याप्रमाणे मूळ चार हजारांच्या कर्जाची रक्कम फेडल्याचा उल्लेख आहे. ते सांगून टाकले तर या नव्या कागदाच्या आधारे सहा हजार मिळतील. या लोभाला बळी पडून रंगराव म्हणाले—"मी दिलेल्या कागदावरची रक्कम महादेव शास्त्र्यांच्या म्हणण्याप्रमाणे कदाचित बरोबर नसावी अशी शंका मलासुद्धा वाटू

लागली आहे. कदाचित चार हजाराचे हे फर्ज फेडले गेले असावे. मी माझ्या वडिलांची खातेवही पाहून सांगतो." असे सांगून त्याने ती वही आणली. तीन चार हजार कर्जाऊ रुपये परत केल्याचा उल्लेख असल्याचे दाखवून म्हणाले–"हे कर्ज फिटले आहे खरे!"

तेथे जे लोक त्या वेळी हजर होते त्यांना संबोधन करून न्यायाधिकारी म्हणाला–"रंगरावांनी स्वतःच चार हजार रुपयांचे कर्ज फिटल्याचे त्यांच्या जवळच्या खाते वहीच्या आधारे सांगितले आहे. तेव्हां हा कागद रद्दबातल झाला आहे."

सर्वांनी होकारार्थी मान हलविली.

नंतर न्यायाधिकारी महादेव शास्त्र्यांनी दाखल केलेल्या कर्जरोख्याचा उल्लेख करून म्हणाला–"आतां हाच कागद उरला आहे. याप्रमाणे महादेव शास्त्र्यांकडे सहा हजार येणे निघते."

रंगराव आनंदाने मान हलवू लागला.

"परंतु,...महादेव शास्त्र्यांनी आणलेला कागद बरोबर नाही. कारण त्याच्यावरच्या [illegible] दोन्ही कर्जरोख्यांवरच्या सह्या मिळवून पाहिल्यास स्पष्ट होते. म्हणून हा कर्जरोखासुद्धां रद्दबातल होत आहे आणि या कर्जरोख्याप्रमाणे महादेव शास्त्र्यांनी रंगरावांना काही एक देण्याची गरज नाही."

रंगरावांचा चेहरा पांढरा फट्ट पडला. न्यायाधिकारी त्यांना पुढे म्हणाला–"तू गांवातला एक मोठा माणूस म्हणून मिरवीत आलास आणि फेडलेले कर्ज पुन्हां वसूल करण्याचा तु घाट घातला होतास. बिचारे महादेव शास्त्री गोत्यात आले होते. अशा लबाड माणसाला आमच्या गावात स्थान नाही. तू गाव सोडून उद्यां सकाळच्या आत कोठे तो चालता हो!"

रंगरावांची मान खाली झाली. त्यांना आपल्या कर्माचे फळ भोगावे लागले. पार्वतीच्या हुशारीमुळे महादेव शास्त्री वांचले. "शठे शाठ्यम समाचरेत!"






आपले राज्य परत मिळवून देण्यास प्रमुख भार उचलणारा कृष्ण होता हे ओळखून धर्मराजाने श्रीकृष्णाचे आभार मानले आणि त्या उपकाराची फेड होणे अशक्य असल्याचे सांगितले. त्यानंतर तो आपल्या धाकट्या भावंडांस म्हणाला–"माझ्यामुळे तुम्हां सर्वांना जंगलात कल्पनेबाहेर कष्ट सहन करावे लागले. सामान्य लोकांस ते कष्ट सहन करणे अशक्यच झाले असते. आतां आपला जय झाला आहे. तेव्हां तुम्ही सर्व काही काळ पूर्ण विश्रांती घ्या. नंतर भेटू व बोलू."

त्याने धृतराष्ट्राच्या परवानगीने दुर्योधनाचा महाल दासदासीसह राहण्यास भीमाला दिला; त्याचप्रमाणे दुःशासनाचा महाल अर्जुनाला, दुर्मर्षण आणि दुर्मुख यांचे महाल नकुल व सहदेव यांना राहण्यासाठी दिले. ते सर्व आपापल्या महालात जाऊन राहू लागले. कृष्ण व सात्यकी अर्जुनाबरोबर त्याच्या महालात राहायला गेले.

काही दिवसांनी धर्मराज कृष्णाला भेटायला गेला. म्हणाला–"आम्हांला राज्यलाभ झाला, मोठी प्रतिष्ठा मिळाली, परंतु आम्ही धर्महानी केली या गोष्टीबद्दल माझ्या मनाला शांती वाटत नाही. मनातला तो संशय दूर करता आला तर तूच कर."

कृष्ण काही वेळ विचार करून म्हणाला–"मी भीष्माचार्यांविषयी विचार करतो आहे. त्यांना माहीत नाही असा धर्म व कर्तव्यबुद्धी नाही. शरपंजरी पडलेल्या



भीष्माचार्यांनी इच्छिल्याबरोबर त्यांना मृत्यू येईल व त्यांच्या बरोबर ज्ञानाचा अलोट मोठा सांठा कायमचा लयाला जाईल. म्हणून तू लौकर त्यांना जाऊन भेट. त्यांच्याजवळ तुझ्या मनांत आहेत ते सर्व धर्म संदेह सांगून त्यांचा सल्ला व मार्गदर्शन घे. ते नक्कीच तुझ्या मनांतल्या सर्व शंका दूर करून तुझ्या ज्ञानात भर पाडतील."

धर्मराज म्हणाला—"त्यांच्याविषयी माझे देखील तुझ्याच सारखे मत आहे. तूच आम्हांला त्या थोर पुरुषाकडे घेऊन चल. त्यांच्या मनांत तुलादेखील भेटायचे असेल!"

श्रीकृष्ण त्याच्याबरोबर सात्यकी होता त्याला म्हणाला—"चल आपण आतांच

तयार ठेव."

त्यानंतर श्रीकृष्ण व सात्यकी एका रथात, धर्मराज व अर्जुन आणखी एका रथात आणि भीम, नकुल आणि सहदेव आणखी एका तिसऱ्या रथात बसून भीष्माचार्य शरपंजरी पडले होते तेथे गेले. कृपाचार्य, युयुत्सु व संजय निरनिराळ्या रथांत बसून तेथे आले.

वाटेत त्यांना पांच कुंडे लागली. धर्मराजाने ती परशुरामाची असल्याचे सांगितले. परशुरामाने एकवीस वेळां ही पृथ्वी नि:क्षत्रिय केली होती. त्याने क्षत्रियांना हुडकून काढून त्यांच्या रक्ताने त्याच्या वडिलांचे तर्पण केले होते. त्या रक्ताभिषेकाने झालेली ही पांच कुंडे झाली म्हणे.

धर्मराजाच्या विनंतीवरून कृष्णाने परशुरामाची कथा सांगितली ती अशी :—

जन्हू नांवाच्या एका राजर्षीच्या कुळात जन्मलेल्या गाधी नावाच्या राजाला सत्यवती नावाची मुलगी होती. परंतु त्याला मुलगा झाला नाही. त्याने भृगूचा मुलगा ऋचिक याच्याशी सत्यवतीचे लग्न करून दिले. ऋचिकने त्याला त्याच्या सासऱ्याला मुलगा व्हावा यासाठी हवी तयार करून त्याचे दोन भाग केले आणि सत्यवतीला म्हणाला—"हा भाग तू आपल्या आईला





केल्यास तुझ्या आईला एक पराक्रमी आणि विद्वान पुत्र होईल आणि सर्व क्षत्रियांचा नाश करून राजा होईल; तुला एक शांत व सुशील असा ब्राह्मण मुलगा होईल."

त्यानंतर एक दोन दिवसातच सत्यवतीचे आईवडील तीर्थयात्रा करीत ऋचिकाच्या आश्रमात आले. सत्यवतीने आपल्या आईला पतीने सांगितलेल्या गोष्टी सांगून हवीचे दोन्ही भाग तिच्या हातात दिले. सत्यवतीच्या आईने घाईत तिच्या मुलीसाठी जो भाग होता तो खाल्ला आणि स्वत: खायला हवा होता तो भाग मुलीला खायला दिला. थोड्या वेळाने ऋचिक अरण्यातून परतला. त्याला त्याच्या मागे घडलेल्या गोष्टी कळल्यावर तो म्हणाला—"तुझ्या आईच्या चुकीमुळे तुझ्या पोटी एक अत्यंत क्रूर क्षत्रिय आणि तुझ्या आईच्या पोटी एक ब्राह्मण जन्मेल!"

सत्यवती त्याबद्दल फार दु:खी झाली. म्हणाली—"आपल्या तपोबलाने माझ्या पोटी क्रूर क्षत्रिय जन्मणार नाही असे करा. त्याचा मुलगा क्रूर झाला तरी चालेल." ऋचिकने तसे करण्यास होकार दिला. त्याप्रमाणे सत्यवतीच्या पोटी जमदग्नी जन्मला आणि गाधीच्या बायकोच्या पोटी



विश्वामित्र जन्मला. जमदग्नीचा मुलगाच परशुराम. परशुरामाने मोठा झाल्यावर गंधमादन पर्वतावर जाऊन शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न केले आणि अनेक अस्त्रे व परशु मिळविला.

त्याच सुमारास हैहय वंशात कृतवीर्याला अर्जुन नावाचा मुलगा झाला. दत्तात्रेयाच्या कृपेने त्याला एक हजार हात लाभले. त्याने सर्व क्षत्रिय राजांना जिंकून अश्वमेध यज्ञ केला. त्याने ब्राह्मणांना दाने केली. अग्निनारायणाला पर्वत व अरण्ये दिली. अग्नीने तो सर्व प्रदेश जाळून टाकला तेव्हां वसिष्ठ मुनींचा आश्रमदेखील त्यात भस्म झाला. वशिष्ठ मुनीला त्याबद्दल राग आला



व त्यांनी कार्तवीर्य सहस्रार्जुनाला शाप दिला की अग्नीने त्यांचा आश्रम जसा ध्वंस करून टाकला तसा परशुराम तुझे सर्व हात ध्वंस करून टाकील. परंतु तो शाप मिळाला त्याबद्दल सहस्रार्जुनाला जरा देखील भय किंवा चिंता वाटली नाही.

परशुराम व कार्तवीर्यार्जुन यांच्या मध्ये वैर उत्पन्न व्हायला कारण त्याचे मुलगेच झाले. त्यांना बापाच्या शौर्यपराक्रमाचा व वैभवाचा इतका गर्व झाला की ते गर्वांध होऊन परशुरामाच्या आश्रमात शिरले आणि तेथे परशुराम नसतांना त्याच्या होमधेनूला व तिच्या वासराला बळजबरीने घेऊन गेले. त्यामुळे आलेल्या रागाने परशु-मान कार्तवीर्यार्जुनाचे सहस्र हात कापून आपल्या गाईला व तिच्या वासराला सोड-वून आणले.

हैहय वंशियांनी ते वैर तेवढ्यावर सोडले नाही. परशुराम आश्रमात नसतां पुन्हां ते आश्रमात शिरले व त्यांनी क्रूरपणाने जमदग्नीचे डोके कापून टाकले. परशुरामाला आतां मात्र फार संताप आला आणि त्याने सर्व पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची प्रतिज्ञा केली. त्याने सहस्रार्जुनाच्या मुलांची व नातवंडांची कत्तल तर केलीच, पृथ्वीवर क्षत्रिय म्हणून जेथे-जेथे दिसला तेथे जाऊन त्याची कत्तल सुद्धा केली.

तेव्हां कोठे परशुरामाच्या मनाचे समा-धान झाले. पुढे तो वनात जाऊन तपश्चर्या करीत असतां एकदां विश्वामित्राचा परा-वसू नांवाचा मुलगा त्याला भेटायला गेला आणि म्हणाला–"तू पृथ्वी निःक्षत्रिय करतो अशी प्रतिज्ञा केली होतीस, परंतु तू ती पूर्ण करू शकला नाहीस. प्रतर्दन वगैरे अनेक अजून जिवंत आहेतच."

परशुराम पुन्हां परशु धारण करून निघाला आणि काही एक विधिनिषेध न पाळतां त्याने आबाल वृध, मातृगर्भात पिंडरूप असलेले जे क्षत्रिय होते त्या सर्वांचा संहार केला. अशा तऱ्हेने एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करून परशुरामाने अश्वमेध



यज्ञ केला आणि सारी पृथ्वी कश्यपाला दान करून टाकली.

कश्यपाने ते दान स्वीकारले व परशुरामाला म्हणाला–"आता तुला बसायला लागेल एवढीच जागा मी तुला परत देतो आहे. तू तेथे बसून तपश्चर्या कर." नंतर त्याने सर्व भूमी ब्राह्मणांना वांटून टाकली आणि सर्वांना आपापल्या राज्याचा राजा करून तो स्वत: तपोवनात निघून गेला. ब्राह्मणांच्या राज्यात सर्वत्र अराजकता पसरली आणि बळी तो कान पिळी ही म्हण सार्थक झाली.

ते पाहून कश्यपाने पुन्हां पृथ्वीवर शांतता व सुव्यवस्था नांदावी यासाठी क्षत्रियांचा शोध सुरू केला. सुदैवाने पुष्कळ क्षत्रिय सांपडले. काही हैहयवंशीयांना त्यांच्या आयांनी गुप्तपणे संभाळून त्यांना वांचविले होते. पुरु वंशात विदूरथ नावाचा एक क्षत्रिय राजकुमार ऋक्ष पर्वतावर लहानाचा मोठा झाला. सौदास नावाच्या एकाला पराशराने वाढविले. शिबीच्या मुलाला गाईंनी रक्षण करून वाढविले. त्याला गोपती हे नाव मिळाले. प्रतर्थ याचा मुलगा वत्ससुद्धा वांचला. गौतमाने गुप्त नावाच्या क्षत्रियाला वांचविले. मरुत् वंशी क्षत्रियकुमारांना समुद्राने रक्षिले. अशा तऱ्हेने जे क्षत्रिय वांचले होते ते शिल्पकारांच्या किंवा सुवर्णकारांच्या जातीत वाढले होते.

कश्यपाने या सर्व क्षत्रियांना हुडकून काढून त्यांना जमिनीचे भाग पाडून वांटून दिले आणि राज्य करायला सांगितले. त्यानंतर पुन्हां सर्वत्र नवीन राजवंश निर्मिले गेले.

परशुरामाची ही कथा कृष्णाने सांगितल्यावर धर्मराज भीष्माचार्यांच्या दर्शनाला निघाला. उत्तरायण संपायला अद्याप छप्पन्न दिवस उरले होते. भीष्माचार्यांनी धर्मराजाला सांगितले की युद्धात शत्रूचा नाश करण्यात धर्मविरुद्ध असे काहीच नाही, उटल तोच क्षत्रियधर्म आहे. त्यांनी जिवंत असेपर्यंत धर्मराजाला अनेक धर्मकर्तव्ये, धर्माधर्मांतली सूक्ष्म तत्वे, नीतिशास्त्र वगैरे गोष्टींचा उपदेश केला आणि शेवटी देहत्याग केला. त्यावेळी एक अद्भुत गोष्ट घडली. भीष्माच्या देहाच्या ज्या ज्या अंगातून व अवयवातून प्राण निघाले त्या त्या अंगावयातून बाण आपोआप बाहेर येऊन पडले. पाहतां पाहतां त्यांचे सर्वांग बाणांपासून पूर्णपणे मुक्त झाले. ते पाहून सर्व आश्चर्यचकित झाले.

दारुवृक्षाची लाकडे व चंदनादी, सुगंधीद्रव्ये आणून पांडवांनी व विदुराने चिता रचली. भीष्माचार्यांचा देह श्वेत वस्त्रांनी झांकून त्यावर फुले घातली. भीष्माचार्यांचे श्वेत छत्र युयुत्सूने, त्यांच्या चंवऱ्या भीमार्जुनांनी, त्यांची पागोटी नकुल सहदेवांनी हातात घेतली. धर्मराजाने व धृतराष्ट्राने त्यांचे पाय धरले. भीष्माचार्यांचा दहन विधी संपला. सर्व गंगातीरी आले. धर्मराजाने तर्पण केले.

तो शोकसागरात निमग्न होऊन रडू लागला. तेव्हां श्रीकृष्णाच्या सूचनेवरून भीमाने धर्मराजाचे सांत्वन केले. परंतु वडील भाऊ दुःखी झालेला पाहून इतर पांडवदेखील रडूं लागले. तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला–"अरे बाळा! माझ्या पोटची शंभर मुले ठार झाली, मी आपले सर्वस्व



घालवून बसलो, त्यासाठी मी व गांधारी दोघांनी शोक करायला हवा. परंतु तुला दुःख करण्याचे कारण काय? तू राज्य परत मिळविलेस. आतां तुझ्यावर पुष्कळ जबाबदाऱ्या येऊन पडल्या आहेत. रडत बसून कसे चालेल?"

व्यासांनी धर्मराजाला अश्वमेध यज्ञ करण्यास सांगितले.

तेव्हां धर्मराज म्हणाला–"होय! अश्वमेध करून मोठमोठी दाने केली पाहिजेत. लहान लहान दाने मला आवडत नाहीत. परंतु थोर दाने करायला माझ्याकडे आहे काय? प्रजा दीन दरिद्री झाली आहे. ती मला स्वतःच्या मुलासारखी आहेत.

त्यांच्याकडून कर वसूल करायला माझे मन धजत नाही. शोक त्यांनादेखील आहेच. मी त्यांच्याकडून कर कसा काय वसूल करू म्हणतां?

धर्मराजाला पुष्कळ धनप्राप्ती व्हावी यासाठी व्यासांनी एक मार्ग सुचविला. पूर्वी मरुत महाराजांनी यज्ञ करून ब्राह्मणांना दक्षिणा दिली. ब्राह्मणांनी ते सर्व धन हिमालय पर्वतात ठेवून दिले होते. ते धन घेऊन आल्यास धर्मराजाला पाहिजे तेवढे धन मिळेल.

धर्मराजाने मरुताची कथा सांगावयास व्यासांजवळ विनंती केली तेव्हां व्यासांनी ती कथा सांगितली.

त्रेतायुगारंभाच्या सुमारास मानववंशात करंधम नावाचा राजा राज्य करीत असे. त्याने बृहस्पतीला पुरोहित नेमून शंभर अश्वमेध यज्ञ केले आणि तो इंद्रासमान थोर असल्याचे वदवून घेतले.

त्याचा मुलगा मरुत हा आपल्या बापाहून थोर निघाला. त्याने यज्ञ करण्याचे

विली. त्या यज्ञात सुवर्णपात्रांव्यतिरिक्त इतर लहान थोर भांडी व वस्तूदेखील सोन्याच्या केलेल्या होत्या. मरुताने इतर राजांच्या सहकार्याने हिमालयाच्या उत्तरेकडील प्रदेशातल्या डोंगराळ प्रांतात यज्ञ केले.

या यज्ञांसाठी बृहस्पतीचीच गरज होती. परंतु इंद्राला मरुताचा हेवा वाटू लागला व तो आपले आसन पटकावतो की काय अशी भीतीदेखील वाटू लागला. म्हणून त्याने बृहस्पतीला जाऊ दिले नाही. तेव्हां मरुतने बृहस्पतीचा भाऊ संवर्त याला भेटला आणि नम्रपणे त्याला पुरोहित होण्यास विनंती केली. त्याने मान्यता दिल्यावर मरुतने त्याला पुरोहित नेमून मोठ्या समारंभाने यज्ञ केला. त्यानंतर मरुताने सुवर्णाच्या राशी ब्राह्मणांना दान केल्या. तरी पुष्कळ सोने राहून गेले होते. ते सोने हिमालयात राशीच्या राशी होते. ते कोणी उचलून नेले नाही. ते धन घेऊन ये असे व्यासांनी सुचविले.





# मित्रभेद

[ १० ]

सशाने चातुर्य दाखवून क्रूर सिंहाचा वध कसा केला ती कथा दमनकाने सांगितल्यावर करटकाने विचारले–"असे चातुर्य नेहमीच यशस्वी होईल असे कसे म्हणतोस रे?"

"आपण धोक्यात जीव घालायला तयार व्हावे लागते, नाहीतर काही उपयोग होत नाही. शूर धैर्यवानाला देवदेखील मदत करतो. धैर्य व साहस दाखविल्यानेच नाही का एका सामान्य कोष्टयाला, विष्णूचे सोंग यशस्वीपणाने केल्यामुळे एक रूपवती राजकन्या मिळू शकली?" दमनक म्हणाला.

"ते कसं काय बुवा?" करटकाने विचारले.

विष्णूसारखा नटणाऱ्या कोष्टयाची गोष्ट दमनकाने सांगितली, ती अशी–

## कोष्टी विष्णूची गोष्ट

बंगदेशातल्या पुंड्रवर्धन नावाच्या गावी एक कोष्टी आणि त्याचा आप्त मित्रबंधू असा एक सुतार रहात असत. ते दोघे आपापल्या धंद्यात फार हुशार होते. म्हणून त्यांची प्राप्तीपण चांगली होती. ते टुमदार सुंदरशा घरात रहात असत आणि पाण्यासारखा पैसा खर्च करीत. सुवासिक फुलांचे हार व गजरे गळ्यात व हातात घालून हिंडत आणि अंगातल्या कपड्यांना कोणते तरी अत्तर लावीत. एकूण चैनीत रहात.

एक कुठला तरी उत्सव होता. पताका व तोरणें जागोजागी बांधण्यात आली होती. गंमत पहायला लोक सुंदरसुंदर कपडे घालून हिंडत होते. कोष्टी आणि



सुतार छानछान कपडे घालून हिंडू लागले आणि जेथेजेथे त्यांना गमतीचं असं काही दिसलं तेथे थांबून पाहू लागले.

लोक, मुख्यत: वृद्ध स्त्रिया व मुले आपापल्या घराच्या सज्जांत अगर गच्चीत बसून गंमत पहात होती. एका सुंदर व उंच वाड्याच्या खिडकीतून राजकन्या सुदर्शना आपल्या सखींबरोबर उभी राहून गंमत पहात होती. तिला दोघांनी पाहिले. ती ऐन तारुण्यात होती आणि एक अपूर्व सुंदरीपण होती. तिला पाहतांच कोष्टयाला देहभान राहले नाही. तिच्याकडेच एकटक पहात राहला. तरी त्याने आपल्या मनातली गोष्ट कोणाला कळू दिली नाही आणि घरी आला. परंतु घरी आल्यावर त्याला पहावे तिकडे ती राजकन्याच दिसत होती. तो तिचे ध्यान करीत स्वत:ला विसरून जाऊन खाटेवर पडून राहला.

तो स्वत:च्या परिस्थितीविषयी विचार करीत पडला असता त्याच्या मनात विचार येऊ लागले, जेथे सौंदर्य व रूप असते तेथे चांगुलपणासुद्धा असतो, म्हणे. तरमग ती सुंदरी मला असा मानसिक त्रास कां देते आहे? कोणी कधी स्वत:च्या पायावर कुऱ्हाड मारून घेतो का? ती माझ्या हृदयात प्रवेश करून मला अशी कां छळते आहे? देवाने माझा जीवच घ्यायचे ठरविले आहे तर आणखी कोणत्यातरी तऱ्हेने ते न करतां तिच्याकरवी हे दुष्ट काम कां करवीत आहे? या जगात प्रत्येक वस्तु क्षणभंगुर असते असे जे बुद्धाने सांगितले होते ते खरे दिसत नाही. खरे असेल तर राजकन्येवरचा मोह माझ्या मनातून कां नाहीसा होत नाही?

कोष्टी असे विचित्र विचित्र विचार करीत पडला असता सारी रात्र उलटली, त्याला मुळीच झोप लागली नाही. उजाडल्यावर नेहमीप्रमाणे त्याचा मित्र सुतार चांगले कपडे घालून छान नटून आला आणि आपल्या मित्राला प्रेतासारखा खाटेवर पडलेला पाहून म्हणाला—"कायरे बाबा, काय झालं तुला?"

कोष्टयाने दीर्घ श्वास सोडला. पण काही बोलला नाही. सुताराला वैद्यकीची थोडी माहिती होती. त्याने नाडी पाहिली आणि दूर कोठे तरी पहात म्हणाला— "मित्रा! हा प्रेमज्वरसा दिसतो आहे रे! कोण नशीबवान पोर आहे ती?"

कोष्टी आश्चर्यचकित होऊन उठून बसला. "प्रेम पीडा पत्नीने किंवा मित्राने वांटून घेतली तर कमी होते म्हणे! त्यांच्यापैकी कोणाला तरी ते साध्य असते." म्हणाला आणि मनातले गुपित त्याला सांगून टाकले.

सर्व गोष्टी ऐकून घेऊन सुतार म्हणाला— "सुप्रतिवर्मा महाराज क्षत्रिय आणि तू वैश्य! तुझ्याहून उच्च कुलात जन्मलेल्या मुलीवर प्रेम करण्याची हिंमत कशी काय झाली रे तुला?"

कोष्टी म्हणाला—"काय रे क्षत्रियाने क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र मुलीशी विवाह केला तर चालतो की नाही? मला वाटते ही महाराजांच्या वैश्य राणीपासून झालेली मुलगीच असली पाहिजे. नाही तर तिच्यावर माझं मन कसं काय गेलं असतं? त्या गोष्टीस माझा अंतरात्मा साक्षी आहे."

"तरमग आता पुढे काय करायचे?" सुताराने विचारले.

"काही नाही, माझी चिता तयार कर. मला राजकन्या मिळणे शक्य नाही. ती



मिळाली नाहीतर माझा जीव राहणेसुद्धा अशक्यच! मनाचा त्रास आणि देहाचा त्रास सहन करणे अशक्य झाले आहे. मरण चुकत नाही!" कोष्टी म्हणाला.

"हे सर्व सोड! अरे या जगात पैशाने किंवा बुद्धीने मिळणार नाही असं काही आहे का? तू ऊठ, स्नान करून खाऊन पिऊन घे. राजकन्या तुला मिळवून देण्याचा उपाय मी करतो!" सुतार म्हणाला.

कोष्टयाचा मित्राच्या कर्तृत्वशक्तीवर अपार विश्वास होता. म्हणून तो उठला आणि कामाला लागला.

काही दिवस लोटल्यावर सुतार कोष्टयाकडे गरुडवाहनासारखे एक विमान करून

घेऊन आला. ते छान रंगवलेले होते. ते चालवायला एक कळसुद्धां होती. तसे विमान कोणी पूर्वी कधीं पाहिले नव्हते.

ते कसे चालवायचे हे कोष्टयाला सविस्तर समजावून सांगून सुतार म्हणाला– "उडवून वर न्यायचे झाले की ही कळ बाहेर ओढायची आणि खाली उतरवायचे झाले की आत दाबायची!"

सुताराच्या सांगण्याप्रमाणे कोष्टयाने विमान चालवायचे छान शिकून घेतले.

नंतर सुतार कोष्टयाला म्हणाला– "तुला माहीत आहे ना, सुप्रलिवर्मा महाराज, महाराणी आणि स्वतः राजकन्या नारायणाचे भक्त आहेत. त्यांच्या पूर्वजांना म्हणे, नारायणाने प्रसन्न होऊन दर्शन दिले होते आणि वरसुद्धा दिले होते. म्हणून तू शंख, चक्र, गदा व पद्म धारण करून तू या गरुड विमानातून राजकन्येच्या महालावर उडत रहा. राजकन्येचे शयनागार तेथेच आहे आणि ती तेथे एकटीच झोपते ह्या गोष्टीची मी चांगली चौकशी करून घेतली [illegible] नारायणाचे रूप घेऊन तू तिच्याशी गांधर्व विवाह करून घे."

कोष्टी दिवसभर त्याच विचारात गुंगला होता. रात्री उंची रेशमी वस्त्रे धारण करून आणि सर्वांगावर आणि कपड्यांवर उत्तराचा छिडकाव करून आणि शंख, चक्र, गदा, पद्म हातांत घेऊन तो गरुडवाहनात बसला आणि ते उडवून सरळ राजकन्येच्या शयनगृहासमोर गच्चीवर उतरला.

ती पौर्णिमेची रात्र होती, म्हणून दुधासारखे स्वच्छ चांदणे पडले होते. राजकन्या पलंगावर पडून चंद्राकडे आनंदाने पहात होती. इतक्यात एकाएकी नारायण गरुड वाहनात बसून आला. कोष्टी दिसायला सुंदर होता. त्याचे रूप, तिने नारायणाच्या रूपाचे वर्णन ऐकले होते अगदी तसेच होते. ती लगेच उठली आणि तिने कोष्टयाला साष्टांग नमस्कार केला व म्हणाली– "देवा! आपला अनुग्रह माझ्यावर कसा काय झाला?"





# १४८. पुरातन क्रीडा पटांगण

इस्ट्रिया (प्राचीन इटली)तील पोला बंदरानजिक रोमन लोकांनी निर्मिलेल्या रंगशालेचे हे पटांगण २५००० लोकांना बसतां येईल एवढे मोठे होते. हे नगर इ. स. ११४८ मध्ये व्हेनीषियन लोकांनी जिंकले. त्यांनी या पटांगणांतील बसायला केलेल्या दगडी लाद्यांचा उपयोग घरे बांधायला केला. इ. स. १८५० मध्ये पोलानगर ऑस्ट्रियन लोकांच्या स्वाधीन झाल्यावर रोमन युगातील बंदरासारखे प्रसिद्ध झाले.
















# अमरवाणी

विद्या विवादाय, धनम् मदाय
शक्तिः परेषाम् परिपीडनाय
खलस्य; साधो विपरीत मेतत्,
ज्ञानाय, दानाय च, रक्षणाय ॥ १ ॥

[ दुर्जनाचा विद्याभ्यास हा वादविवाद अर्थात भांडणासाठी धन गर्व व अहंकार हे वाढ होण्यासाठी आणि शक्ती ही इतरांना त्रास देण्यासाठी उपयोगी पडतात तर सज्जनाची गोष्ट निराळी आहे. त्यांचा विद्याभ्यास ज्ञानवृद्धीसाठी, धनदान करण्यासाठी आणि शक्ती इतरांच्या रक्षणासाठी असतात.]

समुद्र मंथने लेभे
हरि र्लक्ष्मीम्, हरो विषम्;
भाग्यम् फलति सर्वत्र,
न विद्या, न च पौरुषम् ॥ २ ॥

[ समुद्रमंथन प्रसंगी विष्णूला लक्ष्मी मिळाली तर शंकराला हलाहल विष लाभले. भाग्यात असेल तेच मिळते. विद्या किंवा पौरुष यशस्वी होत नाहीत.]

गुणवंतः क्लिश्यंते प्रायेण,
भवंति निर्गुणाः सुखिनः;
बंधन मायांति शुकाः
यथेष्ट संचारिणः काकाः ॥ ३ ॥

[ गुणी माणसालाच सामान्यपणे कष्ट सहन करावे लागतात. गुणहीनच सुखी होतात; पोपटाला (आयुष्यभर) बंधनात (पिंजऱ्यात) रहावे लागते तर कावळे स्वच्छंदपणे विहार करतात.]



# यक्ष पर्वत

[ २४ ]

[ वीरपूरच्या राजकन्येला सुरक्षितपणे सोडवून घेऊन येण्याचे वचन खड्गवर्मा आणि जीवदत्त दोघांनी वीरपूरच्या मंत्र्याला दिले आणि मणिभूषण यक्षाने आणलेल्या पडावात बसून यक्षपर्वताकडे निघाले. सूर्यास्ताच्या सुमारास ते नदीकाठावरच्या डोंगराळ प्रदेशात येऊन पोचले. जीवदत्ताने सांगितल्याप्रमाणे मणिभूषणने पडाव किनाऱ्याला लावला. पुढे–]

पडाव किनाऱ्याला लागताच खड्गवर्मा व जीवदत्त पडावातून किनाऱ्यावर उतरले. जीवदत्त मणिभूषणला म्हणाला–"पडाव किनाऱ्यावरच्या कोणत्यातरी दगडाला बांधून ठेव. पडावातली फळे वगैरे तुला हवी तर खा. आम्हांला नकोत मी या दाट अरण्यात शिरून एखादे हरण किंवा रानडुक्कर मिळाले तर पाहतो आणि शिकार करून घेऊन येतो."

ते ऐकून मणिभूषण यक्ष घाबऱ्या मुखाने जीवदत्तकडे पहात म्हणाला–"जीवदत्ता! या डोंगराळ प्रदेशात जाऊ नको. या अरण्यात भयंकर राक्षस राहतात."

"राक्षसांहून भयंकर, मंत्रातंत्रांची माहिती असलेले असे जे यक्ष त्यांच्याकडे मी जातो आहे, मग मी या राक्षसांना भिऊन कसं चालेल?" जीवदत्त मणिभूषणला असे व्यंग्योक्तीने विचारीत खड्गवर्मा



म्हणाला–"खड्गवर्मा! मी पाव तासात परत येतो. तू वाळलेल्या काटक्या गोळा करून विस्तव पेटवून तयार ठेव."

जीवदत्त म्हणाला तसा पाव तासात परत आला. त्याच्या खांद्यावर एक हरण होते. त्याला ती शिकार अरण्यात पाऊल टाकतांच दिसली. तोंपर्यंत खड्गवर्माने काटक्या गोळा करून जाळ तयार केला होता.

त्यांनी थोड्याच वेळात त्या हरणाचे कातडे काढून हरण कापले आणि त्याचे मांस भाजत टाकले. मांस भाजताच त्याचा उग्र वास आसपासच्या प्रदेशात पसरला. तो वास आल्यावर एक राक्षसीण दोन्ही

अरण्यातून बाहेर येऊन ओरडली–"नर-वास! मानव वास!"

राक्षसिणीला पाहतांच खड्गवर्माने चट-दिशी उभा राहून आपली तलवार उपसली आणि तिच्या अंगावर धावणार तेवढ्यात जीवदत्तने त्याला थांबविले आणि राक्ष-सिणीला म्हणाला–"तू राक्षसीणच आहेस ना की राक्षसिणीचे रूप घेऊन आलेला यक्ष आहेस? या बाजूने तुला नरवासा-बरोबर चांगल्या भाजलेल्या हरणाच्या मांसाचा वास सुद्धां आला असेल! तो वास नाही वाटतं तुझ्या नाकांच्या भोकांतून आत शिरला?"

राक्षसिणीला एका सामान्य मानवदेह-धारी प्राण्याकडून अशा उर्मट प्रश्नाची अपेक्षा नव्हती. म्हणाली–"कोण रे तू? मनुष्य असून मला भिऊन पळून जायचे सोडून असा उर्मटपणाने प्रश्न विचारतो आहेस?"

राक्षसीण ते म्हणाल्याबरोबर खड्गवर्मा उडी मारून तिच्या अंगावर धावला व तिच्या झिंज्या धरून ओढू लागला. तो तिच्या पोटात तलवार खुपसणार इतक्यात जीवदत्तने पुढे होऊन त्याचा हात धरला व आपली मंत्रवलेली कुबडी राक्षसिणीच्या डोक्याला लावून म्हणाला–"राक्षसिणी!

ना, की?"

राक्षसीण जागच्या जागी उभी राहून थरथर कांपत म्हणाली–"तुम्ही मनुष्य नसणार, यक्ष असणार. मला सोडा माझ्या दोघां मुलांना तुम्ही यापूर्वीच धरून यक्ष पर्वतावर नेले आहे. माझं वय झालं आहे. मी या उतारवयात तुमच्या त्या पर्वतावर जाऊन दगड फोडून त्यातून सोने काढू शकणार नाही."

ते उत्तर ऐकून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांना आश्चर्य वाटले.

जीवदत्तने खड्गवर्माला तलवार म्यानेत ठेवायला सांगितले व राक्षसिणीला म्हणाला–"राक्षसिणी! तुला ठार कर-ण्याचा आमचा हेतू नाही. तुझ्या दोघां मुलांना यक्ष धरून घेऊन गेले असल्याचं तू म्हणालीस! ते खरे असेल तर आम्ही त्यांना सोडवून घेऊन येऊ. तू निश्चिंत रहा. तो पहा, पडावात बसलेला यक्षच आहे. म्हणून त्यांच्याविषयी काही गुप्त गोष्टी तू त्याच्या समोर येथे सांगू नकोस. तू कोठे राहतेस? तिकडे जाऊ या चल! तेथे जाऊन काय ते निवांतपणे बोलू."

तेव्हां राक्षसीण यक्षाकडे पहात डोळे मोठे करून घाबऱ्या आवाजात म्हणाली–"हे नरश्रेष्ठा! मला त्या यक्षाच्या हातात



सोपवून जाऊ नकोस! मला माझ्या वाटेने जाऊ दे कशी!"

जीवदत्त राक्षसिणीला अभयदान देत म्हणाला–"मी व माझ्या हा मित्र, दोघे हे दुष्ट यक्ष जेथे राहतात त्या प्रांतात जात आहों. त्यांच्याविषयी बरीच माहिती तुला आहेसे वाटते. तरमग चल, तुझ्या गुहेत जाऊ. तेथे सांग काय ते!"

यक्षाला पाहिले तेव्हांपासून तेथून होईल तितक्या लवकर पाय काढावासा राक्ष-सिणीला वाटत होते. जीवदत्ताने गुहेत चलायला सांगतांच ती त्याला नमस्कार करून म्हणाली–"हे नरश्रेष्ठा! बरोबर म्हणालास, तू आमच्या गुहेत चल! मला



येथे एक क्षणभरदेखील उभे राहण्याची इच्छा नाही. माझा नवरा राक्षस तेथेच आहे. तो तुम्हांला यक्ष पर्वताविषयी कित्येक भयंकर भयंकर गोष्टी सांगेल!"

जीवदत्त राक्षसिणीला "चल" म्हणून निघताना खड्गवर्माला म्हणाला—"खड्ग-वर्मा! मी परत येईपर्यंत तुझ्या तलवारीला माझ्या कुबडीचा मंत्रप्रताप लाभेल! मणि-भूषण पळून जाण्याच्या बेतात दिसला किंवा इतर काही आपत्ती ओढवणार असा संशय आला तर त्याला निःशंकपणे ठार कर!"

ते ऐकून मणिभूषणचे सर्वांग हादरले. जणुंकाही घडलेच नाही असे वरकरणी दाखवीत हंसतमुखाने तो म्हणाला—"जीव-[illegible]

वर विश्वास ठेवू नकोस! राक्षसांची जातच क्रूर! ती राक्षसीण तुला गुहेत घेऊन जाऊन जिवंत उभा फाडून खाईल!"

जीवदत्त ऐकून थोडेसे स्मित करीत म्हणाला—"यदाकदाचित ती राक्षसीण व तिचा नवरा दोघांनी मिळून मला फाडून खाल्लेच तर तुझा मित्र मणिरंजित याला ठार करायला, दगडी रथ हालवून आणि राजकन्यांना बंदीमुक्त करायला खड्गवर्मा आहेच. ही गोष्ट विसरून कसं चालेल!"

जीवदत्त ते म्हणतांच मणिभूषणला अपमान झाल्याबद्दल राग आला. परंतु तोंड उघडून उत्तर द्यायला त्याची छाती होईना. तो मान खाली करून मनातल्या मनात जळफळत बसून राहिला. राक्षसीण वाट दाखवीत पुढे निघाली आणि जीवदत्त तिच्या मागे मागे चालू लागला आणि झाडीत अदृश्य झाला.

अद्याप राक्षसिणीचे सर्वांग थरथर कापतच होते. ती त्याच मनःस्थितीत जीवदत्ताला घेऊन चारपांच मिनिटांत गुहे-जवळ येऊन पोंचली. गुहेसमोर एक भयंकर मोठा देह असलेला एक राक्षस एक मशाल पेटवून तिच्या उजेडात एका मोठ्या दगडाला टेकून बसलेला होता. त्याने समोर येत असलेल्या आपल्या बायकोला व तिच्या

[illegible]
विचारले—"आश्चर्यच! मी स्वप्न तर पहात नाही? हा माणूस कोण? अगदी निर्भीकपणे तुझ्या बरोबर येतो आहे?"

राक्षसीण थोडी पुढे जाऊन नवऱ्याला म्हणाली—"सावध होऊन मी सांगते आहे ते शांतपणे ऐकून घे. भुकेने तुझा जीव कासावीस झाला असेल, आणि घाईत त्याच्या अंगावर हात टाकायला जाशील! या माणसाच्या हातात एक महा शक्तिशाली मंत्रदंड आहे. त्याने या मंत्रदंडाच्या मदतीने एका यक्षाला काबूत केले आहे."

"यक्षासारख्याला बंदी केले आहे?" असे आश्चर्याने म्हणत राक्षसाने जीवदत्त-कडे आश्चर्याने पहात विचारले—"काय हो! माझी बायको म्हणाली ते सर्व खरे आहे का? ती थोडी भोळसट व खुळी आहे, म्हणून विचारले!"

जीवदत्त थोडा हंसत म्हणाला—"तुझी बायको म्हणाली त्यात एक अक्षरदेखील खोटे नाही. यक्षाने तुझ्या दोघां मुलांना बंदी करून नेले आहे ना? त्याने त्यांना त्याच्या त्या यक्ष पर्वतावर नेले आहे, म्हणे! त्या पर्वताविषयी काही माहिती तुला असेलच!"

राक्षस मान हालवून आणि काही वेळ खाली जमिनीकडे पहात विचार करून



म्हणाला—"होय! तुमच्या अंगात काहीतरी मंत्रशक्ती आहे व मंत्रातंत्रांची तुम्हांला माहिती आहे हे नक्कीच! नाहीतर इतक्या धैर्याने माझ्यासमोर उभे राहून असे विचार-ण्याची हिंमत तुम्हांला झाली नसती. आतां राहिली गोष्ट त्या यक्ष पर्वताविषयी गुप्त माहितीची. या मोठ्या विंध्य पर्वताच्या रांगेतला तो एक लहानसा पर्वत आहे. त्या पर्वताचा मालक मणिरंजित नावाचा एक यक्ष आहे. यक्ष राजाने त्या यक्षाला काही दिवसांपूर्वी त्या पर्वताचा अधिकारी म्हणून नेमले. त्या दिवसापासून या यक्षाने या भागात इतका अन्याय व अत्याचार सुरू केला आहे की सांगता सोय नाही!"



जीवदत्त राक्षसाला सहानुभूती दर्शवीत म्हणाला–"तो यक्ष भयंकर दुष्ट व अत्याचारी आहे हे मला चांगले माहीत आहे. आमच्या देशातल्या दोघां राजकन्यांना तो पळवून घेऊन आला आहे. मला एवढे सांग की तुमच्यासारख्या राक्षसांना पकडून नेऊन तो काय करतो?"

"त्या यक्ष पर्वतावर हिरे माणिक्ये व सोन्याच्या खाणी आहेत, म्हणे! ते सर्व धन खणून काढण्यासाठी त्याने बंदी करून घेऊन नेलेल्या लोकांना गुलामासारखे तो वागवितो आणि त्यांच्याकडून काम करवून घेतो. या गुलामात राक्षसच काय, काही गंधर्वसुद्धां आहेत, असे मी ऐकतो. असे गुलाम रात्रं-

गुलामगिरी भोगावी लागणार आहे!" राक्षस म्हणाला.

जीवदत्ताने त्याला विचारले–"म्हणजे ते गुलाम त्या पर्वताच्या दऱ्या खोऱ्यातून पळून जाऊ नयेत यासाठी त्या मणिरंजिताने बंदोबस्त केला असला पाहिजे! बरं तर हे सांग, तेथे दगडाचा एखादा रथ आहे का?" जीवदत्तने विचारले.

"हो, आहे. डोंगर कोरून कोठेतरी केला आहे म्हणतात. परंतु मी स्वतःच्या डोळ्यांनी तो पाहिला नाही." राक्षस म्हणाला.

जीवदत्ताला त्या राक्षसाकडून आणखी काही माहिती मिळू शकेल असे वाटले नाही. कारण राक्षसाने स्वतः तो पर्वत पाहिला नव्हता. त्याला तरी जी माहिती मिळाली होती ती कोणाच्या तरी तोंडी ऐकलेली माहितीच होती. म्हणून जीवदत्त खड्गवर्मा आणि मणिभूषण वाट पहात होते त्या बाजूला निघाला. निघताना राक्षसिणीला म्हणाला–"तू नरवास येतो आहे असे म्हणत आलीस आणि माझ्या दृष्टीस पडलीस, हे फायद्याचेच झाले. चल माझ्या बरोबर. मी शिकार करून आणलेले हरणाचे मांस भाजून ठेवले आहे. त्यातले मला हवे तेवढे मी घेतो व तुला बाकीचे देतो, चल!"

दिसली. तिने राक्षसाजवळ येऊन हळूच काही तरी सांगितले. तो जीवदत्ताला म्हणाला–"अहो! तुम्ही महाशक्तिशाली आहां हे मी पूर्वीच ओळखले. तुम्ही यदाकदाचित् आपल्या प्रयत्नात यशस्वी झालात व त्या दुष्ट मणिरंजित यक्षाला जिंकलेत तर त्याचे गुलाम म्हणून काम करीत असलेल्या माझ्या दोघां मुलांना अवश्य सोडविण्याची कृपा करा."

जीवदत्त थोडा थबकला आणि मागे वळून राक्षसाला म्हणाला–"राक्षसा! मी तुझे नांव नाही विचारले व मला ते कळले देखील...? त्या मणिरंजिताच्या हातून फक्त तुझ्या मुलांनाच कां, जे कोणी आणखी त्याचे गुलाम झाले असतील त्या सर्वांना सोडविणे आमचे कर्तव्य आहे. तू निश्चिंत रहा."

"अहो! माझं नाव चंडमुख आहे. विसरू नका!" राक्षस म्हणाला.

काही वेळाने दोघे नदी काठावर पोचले आणि जीवदत्तापाठोपाठ एका राक्षसिणीला येत असलेली पाहून मणिभूषण थरथर कांपू लागला व खड्गवर्माला म्हणाला–"हे काय मी आणखी काही भयंकरच पाहतो आहे. एका राक्षसिणीला बोलावून आणतो आहे तुझा मित्र?"



"कदाचित् त्याला आहार म्हणून तुला देणार असेल त्याच्या हातात! जीवदत्तला विचारतो, मी." खड्गवर्मा म्हणाला.

"हे मात्र बरोबर नाही! मी पहिल्यानेच नव्हते का सांगून ठेवले की, मणिरंजित हा माझा मित्र नाही, मालक आहे. त्याच्या आज्ञेचे डोळे मिटून पालन करणे मला भाग आहे, इतरांना इजा करणे मला आवडत नाही." मणिभूषण म्हणाला.

ते ऐकून जीवदत्त थोडा रागाने म्हणाला–"आतां पासूनच मरण भय तुझ्या पाठीशी लागलं आहे वाटतं? थोडा थांब, मी या राक्षसाकडून तुमच्या यक्ष पर्वताची सर्व माहिती विचारून घेतली आहे. समज,

आम्ही दोघं तुझ्या मालकाला जिंकू शकलो नाहीच तर रावणाची शक्ती असलेल्या या राक्षसाचे सैन्य तुमच्या यक्षपर्वतावर चालून येईल."

"राक्षस सैन्य!" असे म्हणत मणिभूषण जास्तच घाबरला. त्याचा चेहरा पांढरा फट्ट झाला.

"होय राक्षसांचे सैन्य!" असे सांगून राक्षसिणीला म्हणाला—"हरणाच्या मांसातले तुला हवं तेवढं तू घे, बाकी उरेल ते आम्हांला पुरेल! यक्ष पर्वतावर स्वारी करण्याची वेळ अद्याप आली नाही, असे तू आपल्या नायकाला सांग!"

राक्षसी मानेने होकार देऊन हरणाचे मांस उचलून घेऊन गेली. त्यानंतर खड्गवर्मा, जीवदत्त आणि मणिभूषण तिघांनी आपापले जेवणखाण आटोपून घेतले आणि चांगलीशी जागा पाहून तिथे झोपण्यासाठी आडवे झाले. मणिभूषण खड्गवर्मा आणि जीवदत्त होते त्या जागेपासून थोडा दूर झोपला होता. त्याने झोपण्याआधी दोन

वर्माला अगदी हळू म्हणाला—"हा यक्ष आपल्याला एवढा भितो आहे, मध्यरात्रीच्या वेळी आपल्या हातावर तुरी देऊन जायचा विचार तर नसेल याचा? म्हणून याच्यावर नजर ठेवणे आवश्यक आहे!"

खड्गवर्माला सुद्धा तो संशय होताच. म्हणून तो मणिभूषणवर एक डोळा ठेवून होता. मध्यरात्रीच्या सुमारास जमीन हुंगत एक अस्वल आणि एक लांडगा तिकडे आले. त्यांना हरणाच्या मांसाचा वास आला असावा. ती दोन्ही मणिभूषण झोपला होता त्या बाजूला गेली. परंतु खड्गवर्माने त्यांना एक दगड मारतांच ती दोन्ही झाडीत पळून गेली. परंतु त्या गडबडीत मणिभूषणची झोप मोडली तो ओरडला—"खड्गवर्मा व जीवदत्त! उठा, राक्षस येत आहेत आपल्या अंगावर!"

(पुढल्या अंकात समाप्त)





# मेहनतीचे फळ

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू इतकी मेहनत करीत आहेस. परंतु मेहनत एक करतो तर त्याचे फळ आणखी एकाला मिळते. त्याला उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी एका नगरावर एका राजाचे राज्य होते. त्याला फार उशिरां एक मुलगी झाली. गादीला तीच वारस होती. म्हणून राजाराणीने आपल्या एकुलत्या एका मुलीचे सर्व लाड पुरविले. तिला शिकविण्यासाठी उत्तमोत्तम शिक्षक लोक नेमण्यात आले आणि अल्प वयात तिने सर्व विद्यांत प्राविण्य संपादन केले होते. लग्नाचे

वेताळाच्या गोष्टी



वय झाले तेव्हां राजाने तिचे लग्न करून द्यायचे ठरविले.

परंतु मुलगी एकाएकी एका विचित्र आजाराने अंथरुणाला खिळली. तिने खाणे-पिणे सोडले आणि अंथरुणावर नुसती तळमळत पडून राहू लागली. तोंडाला येई ते ती बडबडे. तिला काय होत आहे, हे तिचे तिलाच कळेना. एवढेच नव्हे तर तिला वेडबीड तर लागले नाही, हा संशयदेखील येऊ लागला. दिवसे दिवस ती अशक्त होत गेली. म्हणून राजाने उत्तम वैद्यांकडून इलाज करविले. परंतु काही उपयोग झाला नाही. आश्चर्य हे की नक्की कोणता आजार आहे, हेदेखील कोणाला सांगता येईना.

जे कोणी मुलीचा आजार काय अ. सांगून तिचा यशस्वीपणे इलाज करील त्याला आपला जांवई करून घेईन आणि तोच राज्याला वारस होईल. ते कळल्यावर अनेक मोठमोठे वैद्य दूर देशातून आपल्या भाग्याची परीक्षा पाहण्यासाठी आले. परंतु एकाचे देखील नशीब उघडले नाही.

त्याच सुमारास एक साधू त्या गावी आला. तो गावाच्या वेशीवरच्या देवाल्यात उतरला. तो साधू त्या नगराच्या नागरिकांना औषधे देई आणि लोक चांगले बरे होत. हळूहळू ती गोष्ट राजाच्या कानावर गेली. राजाने मुलीला मेण्यात बसवून त्या साधूकडे नेले.

साधूने मुलीला तपासून काही आजार नसल्याचे सांगितले आणि म्हणाला—"एक ब्रह्म राक्षसीण तिच्या मानेवर बसली आहे. तिला पळविले पाहिजे ?"

"त्या ब्रह्मराक्षसिणीच्या हातातून सुटका कशी मिळेल. सांगावे!" अशी राजाने विनंती केली.

साधू म्हणला—"महाराज! आपण आपल्या मुलीच्या हस्ते ब्राह्मणांना दानधर्म करवा. सकाळपासून संध्याकाळपर्यंत येणारे ब्राह्मण जे मागतील जे आपण देत जावे. परंतु कोणी दान देण्याचे नाकारले तर

राजाने दुसऱ्याच दिवसापासून ब्राह्मणांना दानधर्म करायला सुरवात केली. फार दुर दुरून ब्राह्मणांनी येऊन दानधर्म स्वीकारला. राजकन्येने एकालाही दान देण्याचे नाकारले नाही.

असेच एक वर्ष लोटले. एके दिवशी एक ब्राह्मण भिक्षा मागायला राजवाड्यात आला. त्याला राजकन्येने दुरूनच पाहिले आणि वेड्यासारखी ओरडू लागली—"त्याला काढा धक्के मारून बाहेर!" आणि तशीच राजवाड्यात निघून गेली.

राजाने त्या ब्राह्मणाला आदरपूर्वक बोलावून विचारले—"काय हो! आपणांस मंत्रातंत्राची माहिती आहे, वाटते? आमच्या मुलीला कोणीतरी ब्रह्मराक्षसीण पुष्कळ दिवसापासून फार त्रास देते आहे.

त्या ब्राह्मणाने राजकन्येला ब्रह्मराक्षसिणीच्या त्रासातून कायमचे सोडविले. राजाने खूष होऊन जाहीर केल्याप्रमाणे आपल्या मुलीचे लग्न त्याच्याशी करून देऊन त्याला आपला वारस नेमण्याचे ठरविले. परंतु त्याच दिवशी तो साधू आला आणि म्हणाला—"महाराज! आपण राजकन्येचे लग्न माझ्याशी करून दिले पाहिजे व मला आपल्या मागे आपला वारस म्हणून नेमले पाहिजे."

राजाने ती गोष्ट कबूल करून त्या साधूशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले



आणि त्यालाच आपला वारस म्हणून नेमले. राजाने त्या ब्राह्मणाला एक लक्ष सुवर्ण मुद्रा देऊन निरोप दिला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! त्या राजाने असा अन्याय कां केला बरे? त्याने जाहीर केल्याप्रमाणे या ब्राह्मणाला आपली मुलगी व राज्य न देतां त्या साधूला कसं काय दिले? साधू शाप देईल अशी भीती वाटली का त्याला? की एका सामान्य भिक्षुकाशी राजकन्येचा विवाह करून देण्यापेक्षा एका साधूशी करून देण्यात त्याला थोरपणा वाटला. या शंकांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीत आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजाने जाहीर केले तेव्हां राजकन्येच्या मानेवर ब्रह्मराक्षसीण बसली असल्याचे कोणालाही माहीत नव्हते. ती गेल्यावर राजा त्या ब्राह्मणाशी आपल्या मुलीचे लग्न करून द्यायला तयार झाला [illegible] पाहिजे हे सांगितल्यावर राजाने त्याचा हक्क मान्य केला. कारण राजकन्येचा इलाज करणारा तिच्याशी लग्न होईल या आशेने आला नव्हता, फक्त भिक्षा मागायला आला होता. त्याने जे दान मागितले असते ते राजकन्येने त्याला दिले असते व तो परत निघून गेला असता. परंतु साधूची गोष्ट निराळी होती. त्याने राजकन्येच्या मानेवर ब्रह्मराक्षसीण बसली असल्याचे सांगितले आणि तिला कोण पळवून लावू शकेल हेदेखील सांगितले होते. याशिवाय तो राजकन्या चांगली बरी होईपर्यंत एक वर्षभर वाट पहात राहिला. राजकन्येची तब्येत पूर्णपणे बरी व्हायला मुख्य कारण तो साधूच होता. मंत्रबळाने तिला बरी करणारा ब्राह्मण निमित्त मात्रच होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# रद्द [illegible]लेला कायदा

उदयनगरच्या महाराजांनी एक कायदा करून कोणी हिंसा केली तर त्याला कडक शिक्षा केली जाईल असे जाहीर केले. परंतु त्याला शिकारीचा फार नाद होता. ते त्याने स्वत: केलेल्या कायद्याविरुद्ध असल्या कारणाने तो वेष पालटून शिकारीला जात असे.

एकदां जंगलांत राहणाऱ्या एका कोया जातीच्या माणसाने एक हरण मारले आणि त्याचे मांस विकत असतां तो राजाच्या शिपायांच्या हाती पकडला गेला. शिपायांनी त्याला राजासमोर नेऊन उभे केले. राजाने त्याला कायद्याप्रमाणे कोरडे ओढण्याची शिक्षा केली.

कोरडे पडल्यामुळे त्या माणसाच्या सर्वांगाची आग आग होऊ लागली. त्याच स्थितीत तो आपल्या घरी गेला. सर्व वस्ती झोपली होती, पण त्याला झोप आली नाही.

त्या दिवशी रात्री राजा नित्याप्रमाणे शिकारीला गेला. परंतु त्याला शिकार मिळाली नाही. तो हताश होऊन परत येत असतां कोया लोकांच्या वस्तीजवळ आला. त्याला कोया लोकांचे पाळलेले ससे दिसले. राजा त्यातल्या एकाला उचलून पळून जाऊ लागला. शिक्षा झालेला मनुष्य जागाच होता. त्याने चार चौघांना जागे करून राजाला झाडाला बांधून ठेवले.

दुसऱ्या दिवशी सकाळी शिकारीला गेलेला राजा परतला नाही. राजधानीत ओरडा झाला. कोया लोकांनी झाडाला बांधून ठेवलेल्या राजाला दाखविले.

त्यानंतर राजाने अहिंसेचा कायदाच रद्द करून टाकला.





# निरर्थक शब्द

कर्पूर देशाचा राजा इंद्रसेन हा प्रजावत्सल राजा म्हणून प्रसिद्ध होता. तो स्वतःच्या मुलांहून जास्त प्रेमाने प्रजेचे पालन करी. परंतु त्याच्यात एक जाणवण्यासारखा दोष पण होता. त्याला आपले राज्य वाढविण्याची फार महत्वाकांक्षा होती, म्हणून तो नित्य युद्धे करी. त्याला युद्धात कधी पराभव झाल्याचे माहीतच नव्हते. त्याच्या राज्यात प्रजा सुखी राही, म्हणून त्याने जिंकलेल्या राज्यात देखील त्याने करून दिलेल्या सुखसोयींमुळे तेथील प्रजा सुखी झाली. म्हणून नव्या प्रदेशातदेखील कधी बंडवगैरे झाले नाही.

इंद्रसेनाची ही राज्याकांक्षा त्याचा मंत्री सुदर्शन यास मुळीच आवडत नसे. युद्धात होणारी जनहानी व धनहानी पाहून त्याला फार वाईट वाटे. परंतु जगज्जेता व्हायची महत्वाकांक्षा ठेवणाऱ्या राजाला परावृत्त करणे हे साहसाचेच काम ठरले असते. राज्याकांक्षा हा एक दोष सोडला तर इंद्रसेनासारखा दुसरा राजा मिळणे अशक्यच होते. त्याला लागलेले हे व्यसन सोडविण्याचा उपाय करण्यासाठी सुदर्शन संधी पाहू लागला.

इंद्रसेनाने नव्याने लाक्षणिक नावाचा देश जिंकला होता. त्या देशाचा सुलक्षण नावाचा राजा युद्धात हारला आणि आपल्या शेजारच्या सौगंधिक देशाचा राजा भीमसेन याच्या आश्रयास जाऊन राहू लागला. सौगंधिक देश हा एक फार मोठा देश होता. त्या देशातली जमीन सुपीक असल्यामुळे धनधान्य भरपूर होते. राजाकडे फार मोठे सैन्यदेखील होते. परंतु भीमसेनाला युद्धाचे व्यसन नव्हते. तो एक शांतिप्रिय राजा होता. स्वतः होऊन तो कोणत्याही देशावर स्वारी [illegible] साहसदेखील नव्हते.

अशा एका शांतिप्रिय, परंतु शूर भीमसेनाचे राज्य जिंकण्याची महत्वाकांक्षा इंद्रसेनाच्या मनात फार होती. भीमसेनाने सुलक्षण राजाला आश्रय दिल्याचे कळताच इंद्रसेनाला चांगली संधी चालून आल्यासारखे वाटले. तरी त्याने भीमसेनाकडे दूताकरवी निरोप पाठविला की सुलक्षण राजाला मुकाट्याने पाठवून द्यावे. भीमसेनला ती गोष्ट कशी काय मान्य होणार? म्हणून भीमसेनाच्या राज्यावर चालून जाण्यासाठी इंद्रसेनाने सर्व तयारी सुरू केली. त्याने प्रथम लाक्षणिक देशात आपला पडाव टाकला आणि आपले हेर सौगंधिक देशात पाठविले. त्या हेरांचा नायक चारुदत्त हा होता.

तिकडे भीमसेन झोपत घोरत पडलेला नव्हता. इंद्रसेनाच्या मनात राज्याकांक्षा किती आहे, हे त्याला चांगले माहीत होते. इंद्रसेन बरेच दिवस लाक्षणिक देशात पडाव टाकून बसला असल्याचे त्याला चांगले माहीत होते म्हणून त्याने रुद्र नांवाच्या एका विश्वासपात्र माणसाच्या नेतृत्वाखाली गुप्त हेरांचे एक जाळे लाक्षणिक देशात पसवून ठेवले होते.

रुद्र आपल्या कामात फार हुशार होता. तो लाक्षणिक देशात जाण्यापूर्वी सुलक्षण राजाला भेटला होता आणि देशात त्याचे





मित्र कोण आणि शत्रू कोण कोण होते त्यांची माहिती विचारुन घेतली होती. परंतु त्या गोष्टीचा त्याला विशेष फायदा झाला नाही.

त्याचे कारण असे होते की इंद्रसेनाच्या हाती आपल्या कमकुवतपणामुळे सुलक्षण हारला होता. इंद्रसेनाने त्याचे राज्य जिंकताच उत्तम राजवट स्थापन केली. त्याने प्रजेच्या सुखसोयींची व्यवस्था करुन प्रजेचे प्रेम संपादन केले. म्हणून सुलक्षणचे राजभक्त म्हणून जे लोक होते ते इंद्रसेनाचे भक्त झाले. चारुदत्त नावाचा हेरांचा नायक सुलक्षणला विसरुन इंद्रसेनाचा भक्त झाला होता. म्हणून भीमसेनाचा हुशार असा

चारुदत्ताच्या हातीसहजी कैद झाला.

त्याच्याकडून भीमसेनाच्या राज्यातल्या अनेक गुप्त गोष्टी काढून घेण्याचा विचार इंद्रसेनाच्या मनात आला. त्याने तसा प्रयत्न करुन पाहिलाही. परंतु रुद्रने तो लाक्षणिक देशाचीच प्रजा असून सौगंधिक देशाची त्याला काही एक माहिती नसल्याचे सांगितले.

इंद्रसेनाला त्या गोष्टीचा राग आला व तो आपल्या मंत्र्याला म्हणाला—“या राजद्रोह्याला फांशीची शिक्षा देऊन टाका.

ते ऐकून रुद्र थोडा हंसला व म्हणाला—“महाराज! आपण मला राजद्रोही म्हणत आहां. परंतु मला आपण ज्या घरात कैद करुन ठेवले आहे त्या घरात आणखी तिथे राजद्रोही आहेत. पाहिजे तर चवकशी करुन पहावी.”

“या सर्व निरर्थक गप्पा सोड आणि काही कामाची गोष्ट असेल तर सांग!” इंद्रसेन म्हणाला.

पुन्हां एकदां इंद्रसेन स्मित करुन म्हणाला—“त्या घरात एक म्हातारा आहे. त्याच्या काळात म्हणे या देशावर सूर्य वंशीयांचे राज्य होते. तेव्हां युद्ध झाले आणि चंद्र वंशीयांनी हे राज्य जिंकले. त्या म्हाताऱ्याने चंद्र वंशी राजवट मान्य केली

राहू लागला. त्यानंतर सुलक्षण राजाच्या वडिलांनी चंद्र वंशी राजाच्या हातची सत्ता बळकावून आपली सत्ता कायम केली. त्या म्हाताऱ्याचा मुलगा सुलक्षणच्या बापाचा स्वामिभक्त सेवक झाला आणि चंद्र वंशी राजाचा राजद्रोही नोकर ठरला. त्या म्हाताऱ्याचा नातू आला तेव्हां आपण सुलक्षणची सत्ता बळकावून आपली सत्ता स्थापन केली. त्याने मला, सुलक्षणचा मित्र समजून आपल्या हाती कैद करविले. तो देखील आपला राजभक्त सेवक असला तरी राजद्रोहीच नाही का? त्याने आपल्या मालकाच्या मित्राला, म्हणणे मला पकडवून देण्यात राजद्रोहच केला की नाही?”

ते ऐकून इंद्रसेनाच्या मनात खळबळ उडाल्यासारखे झाले. एक मिनिटभर विचार करुन तो म्हणाला—“त्यांचे म्हणणे काही असो, तू निःसंदेह राजद्रोही आहेस.”

“कैद झालो त्या क्षणापूर्वीदेखील माझ्या बाबतीत तरी राजद्रोही आणि राजभक्त या मध्ये एका क्षणाचेच अंतर मला दिसले.” रुद्र म्हणाला.

“मूर्खा! म्हणजे, तु पुन्हां राजभक्त व्हायला कालचक्र मागे फिरले पाहिजे!” असे म्हणत इंद्रसेन बाहेर निघून गेला.

त्याच्या पाठोपाठ त्याचा मंत्री सुदर्शन बाहेर आला व म्हणाला—“महाराजांनी क्षमा केली तर बोलू इच्छितो. रुद्राला राजभक्त करायला कालचक्र मागे फिर-



विण्याची आवश्यकता नाही.” दुसरा उपाय आहे. प्रथम हे पत्र राजाच्या हातात दिले.

ते पत्र वाचून इंद्रसेन घाबरला. त्याचा सर्वांत उत्तम असा मानला गेलेला हेर चारुदत्त भीमसेनाच्या हाती कैद झाला होता. कोणत्याही प्रकारचा शारीरिक मानसिक त्रास दिल्याशिवाय रुद्रला मुक्त केल्यास चारुदत्ताला मुक्त करण्यात येईल असे भीमसेनाने त्या पत्राद्वारे कळविले होते.

“मग काय करावे, म्हणतां?” इंद्रसेनाने आपल्या मंत्र्याला विचारले.

“रुद्रला मुक्त करावे, दुसरे काय?” सुदर्शन म्हणाला.

“त्याला राजभक्त करायला काही उपाय आहे, असे म्हणाला होतां तुम्ही?” इंद्रसेनाने आठवण करून देत विचारले.

“आपल्या राज्याची सरहद्द ओलांडतांच रुद्र रायभक्त होऊन जाईल. राजभक्त आणि राजद्रोही या दोन्ही मधले अंतर म्हणजे राज्याची सीमारेषा आहे!” सुदर्शन म्हणाला.

करतां...?” इंद्रसेनाने विचारले.

“निरर्थकच नव्हे का, प्रभू? प्रजेला सुखी करणारी राजवट महत्वाची आहे, राजा नव्हे! राजभक्त व राजद्रोही हे शब्द जसे निरर्थक आहेत तसेच स्वदेश व परदेश हे शब्ददेखील निरर्थकच आहेत. आपण सौगंधिक देशावर स्वारी करून तो देश जिंकायच्या विचारात आहां. यात व्यर्थ रक्तपात मात्र होईल, निरपराध लोकांची कत्तल होईल, याशिवाय काय मिळणार आहे? आपण दुसरा मार्ग अवलंबवावा आणि भीमसेनाची मैत्री संपादन करावी.” सुदर्शन म्हणाला.

इंद्रसेन राजाला मंत्र्याचे म्हणणे पूर्णपणे पटले. त्याने रुद्रला बंदीमुक्त केले आणि भीमसेनाशी मैत्रीचा संधी केला. चारुदत्तला कोणी कैद केले नव्हते हेदेखील नंतर कळले. परंतु या कल्पित गोष्टीच्या मुळाशी स्वतः मंत्री सुदर्शनच होता ही गोष्ट इंद्रसेनाला कधीच कळली नाही.



# शिक्षकाला शिक्षा

ही गोष्ट चाळीस वर्षांपूर्वी घडलेली सत्यकथा आहे. एका गावातल्या शाळेत रेवरंड अरुळस्वामी नावाचे एक शिक्षक होते. त्याला विद्यार्थी म्हणजे स्वतःच्या मुलासारखे होते आणि विद्यार्थ्यांना पण ते शिक्षक फार आवडत. ते आम्हांला गणित शिकवीत. माझा गणित हा विषय नावडता होता. तरी मला ते शिक्षक फार आवडत.

एकदा वर्गात एक विचित्र गोष्ट घडली. त्यापूर्वी आमच्या गुरुजींनी घरून चार गणिते सोडवून आणायला सांगितली होती. आमच्या वर्गातल्या एका मुलाशिवाय सर्व मुलांनी चारीच्या चारी गणिते सोडवून आणली होती. तो एकटा गणिते करून आला नाही याबद्दल लज्जित होण्याऐवजी ऐटीत बसून राहला.

अरुळस्वामी गुरुजी हसतमुखाने वर्गात आले. प्रत्येकाची गणिते पाहून त्यांनी गुण दिले. त्या मुलाची पाळी आली तेव्हां त्याने घरी गणिते केली नसल्याचे सांगितले. गुरुजींनी त्याला विचारले–“कां केली नाहीस? तुला आली नाहीत का?”

“येत होती, परंतु नाही केली!” तो मुलगा म्हणाला.

“हेड मास्तरांच्या खोलीत जाऊन छडी घेऊन ये!” गुरुजी म्हणाले. तो मुलगा छडी घेऊन आला. गुरुजींनी त्याला वर्गासमोर उभा राहायला सांगितले. आतां गुरुजी त्याला मारणार असे सर्वांना वाटले.

परंतु अरुळस्वामी हात पुढे करून त्याला म्हणाले–“मी तुला न आवडणारी गणिते देऊन तुला दुःखी केले त्याबद्दल मला तू शिक्षा कर. मार!”

त्या विद्यार्थ्याने थरथर कांपत छडी गुरुजींच्या हातात देत, “क्षमा करा गुरुजी!” असे रडत म्हणत गुरुजींचे पाय धरले.

–श्री एम्. दंडपाणी





# ऋण मुक्ती

एका गावी रंगनाथराव नावाचा एक लोभी मनुष्य रहात असे. लक्षावधी रुपये तिजोरीत कुजत असून तो एखाद्या भिकारी दरिद्र्यासारखा रहात असे.

रंगनाथरावाची बायको परलोकी निघून गेल्यावर त्याचा एक अक्कलशून्य मुलगा काय तो घरात होता. रंगनाथ त्याला पेज किंवा कण्हेरी प्यायला देऊन गप्प करी.

पैसे जमा करून ठेवायला रंगनाथाने घरात एका कोपऱ्यात एक खड्डा खणून त्यात एक हंडा कोणाच्या दृष्टीस पडणार नाही अशा तऱ्हेने पुरून ठेवून दिला होता. त्याच्या झांकणाला पैसे टाकण्यापुरते एक भोक होते. तेवढेच काय ते दिसे. स्वतःच्या खर्चाला लागणारे पैसे बाहेर ठेवून बाकी सर्व तो त्या हंड्यात टाकून ठेवी.

बापाला हंड्यात पैसे टाकतांना मुलाने एकदा पाहिले. त्याने बापाला विचारले— "काय ते बाबा? खायला पैसे हवे ते न ठेवतां जमिनीत पैसे कशाला टाकतां आहां?"

रंगनाथ त्याला म्हणाला—"बाळा, हे पहा! जमिनीत आपल्याला कर्ज देणारे लोक आहेत. त्यांचे बरेच कर्ज फेडावयाचे आहे. एकदम कर्ज फेड करतां येणार नाही. म्हणून दररोज थोडे थोडे करून कर्ज फेडतो आहे. मी टाकलेला प्रत्येक पैसा त्यांना पोचतो."

त्या गोष्टीवर विश्वास करून मुलाने विचार केला की याचमुळे बाबा इतक्या गरीबीत दिवस काढीत आहेत. त्याला त्यामुळे कर्ज देणारांचा फार रागदेखील आला. म्हणाला—"त्यांच्यामुळेच आपणांला उपाशी मरावे लागते आहे. कर्जफेड करण्याचे सोडून देऊन दोन वेळ आपण पोटभर जेवलो तर काय हरकत आहे?"

मुलाच्या डोक्यांत हे काय खूळ शिरले आहे? तो आपल्या या प्रयत्नात नक्कीच आला. म्हणून त्याला दहशत बसावी यासाठी रंगनाथ मुलाला म्हणाला—"बाळा! असे पहा, ते सामान्य लोक आहेत असे का वाटलं तुला? आपण एखाद दिवस कर्ज फेडण्याचे सोडले समज, तर ते लोक तलवारी घेऊन आपल्या अंगावर धावून यायला कमी करणार नाहीत. ते असे भयंकर व क्रूर आहेत!"

रंगनाथाच्या मुलाला या सर्व गोष्टी खऱ्या वाटल्या व त्यांचे भूत त्याच्या डोक्यात कायमचे शिरले.

हिवाळ्यात रात्री जेवणाच्या वेळी एक बैरागी दार उघडून आत शिरला व म्हणाला—"दाता! एक घास अन्न वाढा!"

ते पाहून रंगनाथाला भयंकर राग आला व ओरडून त्या बैराग्याला म्हणाला—"हे तुझ्या आज्याने उघडलेले धर्मसत्र आहे, असे वाटले होय तुला?"

बैरागी थोडा राग आल्यासारखा रंगनाथाला म्हणाला—"आमच्या जेवणाखाण्याची फिकीर तो देव करील. फक्त रात्र काढायला आपल्या ओसरीत थोडी जागा द्याल का? बाहेर फार थंडी आहे. मी या गावात अगदी नवा आहे."

रंगनाथाला जास्तच राग आला. म्हणाला—"मी काय तुझं कर्ज घेतलं आहे?



तू मनुष्य आहेस की आणखी कोणी? मी म्हणालो ते डोक्यात शिरलं की नाही? चालता हो?" असे म्हणत रंगनाथाने त्या बैराग्याची मानगुटी पकडून त्याला धक्के मारून बाहेर काढले.

"माझं कर्ज तू घेतलं नाहीस तर आणखी कोणाचं कर्ज काढलं आहेस रे, इतके पैसे जमा करून पुरून ठेवायला? तू मिळविलेले धन आणखी कोणाला तरी मिळणारच. ते उपभोगायचं तुझ्या नशिबात नाही!" बैरागी म्हणाला.

"तुझ्या सारख्या पापिष्टांना घरात पाऊल टाकू दिलं तर तेदेखील होईल.



आजची रात्र थंडीत कुडकुडलास म्हणजे कळेल सुख तुला!" रंगनाथ म्हणाला.

"काल आला म्हणजे तुला तेच अनुभवायला मिळेल, घाबरू नकोस!" बैरागी म्हणाला.

"लंकेचे सोने माझ्या घरात असतां मला ते दिवस कां बघावे लागतील रे? रस्ते आणि गल्ल्या आहेत त्या सर्व तुझ्यासारख्या फुटक्या नशिबाच्या भिकाऱ्यांसाठीच तर आहेत?" असें सांगून रंगनाथाने दार बंद केले.

पुढे काही दिवसांनी रंगनाथाला अनपेक्षितपणे बाहेर गावी जावे लागले. तो आपल्या मुलाला म्हणाला—"बाळा! घरात

ते जमिनीत टाकीत जा. रात्री जवळच तिथे खाट टाकून झोपत जा. मी दोन तीन दिवसात परत येईन." असे मुलाला सांगून रंगनाथ परगावी निघून गेला.

रंगनाथाच्या मुलाला हातात आलेले पैसे जमिनीत टाकणे आवडले नाही. तो आपल्या हौशी पुऱ्या करून घेऊ लागला. आवडे ते विकत घेऊन खाऊ लागला. असेच दोन दिवस गेले. तिसऱ्या दिवशी रात्री एक विचित्र गोष्ट घडली. मध्यरात्रीच्या सुमारास कोणीतरी दार वाजविले. रंगनाथाचा मुलगा अर्धवट झोपेतच उठला आणि त्याने दार उघडले. तिथे चोर तलवारी व सुरे घेऊन घरात शिरले.

त्यांना पाहतांच मुलाला बापाने एकदां सांगितलेली गोष्ट आठवली. हे लोक कर्ज देणारे असणार, असे त्याला वाटले. त्याने दोन दिवस त्यांना पैसे दिले नव्हते. बाबांनी सांगितल्याप्रमाणे ते आले म्हणायचे!

असा विचार करून तो त्यांना म्हणाला—"कर्ज देणाऱ्यांनो! क्षमा करा! पैसे हातात नसल्यामुळे मी दोन दिवस पैसे जमिनीत टाकू शकलो नाही, बाबा घरात असते तर जितके पैसे तुम्हांला दिल्याशिवाय राहले नसते. ते गावात नाहीत. उद्यां तुमचे जेवढे

खेपेस मला क्षमा करा!" रंगनाथाचा मुलगा म्हणाला.

तो काय म्हणतो आहे, चोरांना कळेना. परंतु त्यांच्यासाठी कोठे तरी तो पैसे टाकतो आहे एवढे त्यांना कळले. त्यांच्यापैकी एका जणाने त्याला विचारले—"कोठे? तुझे बाबा कोठे पैसे टाकीत होते? बरेच दिवस झाले आम्हांला पैसे मिळाले नाहीत."

रंगनाथाच्या मुलाने खाटेजवळ हंडा पुरून ठेवला होता, ती जागा दाखविली. चोरांनी जमीन खणून हंडा बाहेर काढला. त्यात काठोकाठ पैसे भरलेले होते. ते पैसे घेऊन चोर निघून गेले.

दुसऱ्या दिवशी रंगनाथने गावाहून परतल्यावर हंड्याच्या जागी एक खड्डा पाहल्यावर छाती कपाळ बडवून घेतले. म्हणाला—"माझा हंडा! माझे पैसे?" असा वेड्यासारखा ओरडू लागला आणि जमिनीवर डोके आपटू लागला.

बापाला वेड्यासारखा काही करत असलेला पाहून मुलगा विचारू लागला—"बाबा! चोर पैसे चोरून घेऊन गेले, म्हणून का असे ओरडतां आहा?"

"नाही तर तू काढून कोठे ठेवून दिले आहेस का?" रंगनाथाने विचारले.



"काही भिऊं नका बाबा! ते त्यांचे पैसे होते म्हणून मीच त्यांना ते घेऊन जाऊ दिले!" रंगनाथ म्हणाला.

रंगनाथाला, सर्व अंगाचा तिळपापड झाल्यासारखे झाले. तो मुलाचा गळा दाबीत म्हणाला—"कोण रे ते? माझे पैसे त्यांचे कसे काय झाले?"

"तेच तर बाबा! तुम्ही त्या दिवशी नव्हते का सांगितले मला, ते कर्ज देणारे लोक आले होते. मी त्यांना चांगले ओळखले." असे सांगत मुलाने रात्री घडलेली गोष्ट सांगितली.

"अरेरे! माझी अक्कल कोठे चरायला गेली होती त्या दिवशी म्हणून तुला मी

तसे सांगितले. तुझ्या अर्धवटपणामुळे माझी आयुष्यभराची कमाई एका क्षणात नाहीशी झाली. ज्यांचे तोंड देखील पाहिले नाहीस, असे लोक मध्यरात्रीच्या वेळी घरात शिरले काय आणि तू त्यांना दार उघडून आत बोलावून घेतलेस! तुला म्हणावयाचे तरी काय?" रंगनाथ म्हणाला.

होय, त्याच्या हातून चूक झाली खरी! अशी चूक पुन्हा त्याच्या हातून कधी होणार नाही! मुलाने मनाशी निश्चय केला.

त्याच्यावर झालेल्या त्या घोर अन्यायाची दाद सरकार दरबारात घ्यायला गेला तर सर्वांना त्याच्या अपार धनाची गोष्ट कळेल, असा विचार करून रंगनाथ रात्री चोरांच्या शोधार्थ निघाला आणि जवळपासच्या खेड्यापाड्यांत हिंडू लागला. एक दिवशी मध्यरात्री तो घरी परतला व त्याने दार वाजविले. परंतु काही उपयोग झाला नाही. मुलाला नाव घेऊन हांका मारू लागला. मोठमोठ्याने ओरडून हांका मारल्या, परंतु सर्व प्रयत्न फुकट गेले. मुलाचे डोके

[illegible] मुळे कुडकुडत होता. उजाडण्याच्या सुमारास उठण्याचा प्रयत्न केला, पण उठवेना.

अशा वेळी तो वैरागी त्या वाटेने जात असतां रंगनाथाला पाहून उठवीत म्हणाला— "लंकेचे सोने घरात असतां असा उघड्यावर कां झोपला आहेस रे?"

"आता काय बोलू? त्या दिवशी तू म्हणालास ते शापासारखं आज उपभोगायला लागलं आहे! स्वतः खाल्लं नाही, इतरांना घातलं नाही आणि चोर माझं सर्वस्व लुटून घेऊन गेले!"

"तसं का म्हणतोस? ते चोर नव्हते. कर्ज देणारे होते. तुझं कर्ज फिटलं असा विचार करून मनाचं समाधान कां करून घेत नाहीस!" असे म्हणत वैरागी निघून गेला.

त्या दिवसापासून रंगनाथाचे मन पालटले. तो स्वतः पोटभर जेवून इतरांना वाढू लागला आणि त्याचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# ताइताचा महिमा

एके दिवशी सकाळी एका गावात एक उंच गलेलठ्ठ मनुष्य आला. त्याचे ते आडदांड मोठे शरीर सामान्य मनुष्यात आढळणे कठीण होते. त्याच्या सर्वांगावर एक काळा डगला होता. त्याच्या त्या जाडजूड शरीराला झाकणाऱ्या सदऱ्याला एक ताईत बांधलेला होता. त्या माणसाला पाहून मुले दूर पळून गेली. बायकांनी दारे व खिडक्या बंद करून घेतल्या.

तो स्वतः आपल्या आडदांड देहाचे ओझे जणुकाही कसे तरी ओढीत नेत होता आणि ओरडत जात होता—"ताइताचा महिमा समजून घ्यायचा असेल तर लौकर या." परंतु त्याचा घोगरा आवाज ऐकूनच लोक घाबरून दूर पळून जात होते. कोणी जवळ येत नव्हता.

त्या गावाच्या टोकाला लाकडू सरडे नावाचा एक मनुष्य एकटाच रहात होता. तो ताइताचा महिमा कळावा म्हणून आपल्या घरून निघाला आणि त्या आडदांड देहवाल्या माणसाला म्हणाला— "तू ताइताचा महिमा दाखवितो म्हणालास, दाखवतोस का?"

त्या आडदांड देहाच्या माणसाने लाकडूकडे चकित मुद्रेने पहात म्हटले—"चल, माझ्याबरोबर!" तो त्याला गावाबाहेर घेऊन गेला आणि वडाच्या झाडाखाली थांबून त्याने आपल्या सदऱ्याचा ताईत काढल्याबरोबर तो एकदम लहान झाला. तो ताईत त्याच्या मोठ्या डगल्याला शोभेल इतका मोठा होता तरी एकदम बेताचा लहान झाला.

"हाच महिमा म्हणतोस होय?" लाकडूने विचारले.

"अजून तू पाहिलेसच काय? मी हा तुझ्या सदऱ्याला बांधतो आणि मी तुझ्या



दृष्टीआड होईपर्यंत तुला याचा महिमा कळणार नाही. याच्या हातातून तुला स्वतःला सोडवून घ्यायचे असेल तेव्हां आणखी कोणाच्या तरी सदऱ्याला हा चिकटवून दे." असे सांगून त्याने लाकडूच्या सदऱ्याला तो शिवून दिला आणि काही विचारणार त्या आधीच काही बोलल्याशिवाय तेथून निघून गेला.

लाकडू त्या आडदांड देहाच्या माणसाकडे पहात होता आणि आपल्या सदऱ्याला शिवलेल्या ताइताकडे पाहून घाबरला. त्याला त्याचा स्वतःचा देह उंच व लठ्ठ होत गेलेला पाहून मूर्च्छा आल्यासारखे झाले होते.

देणारा मनुष्य सारखा पळत जात होता. त्याने एकदांदेखील मागे वळून पाहिले नाही. तो गल्लीच्या टोकाला पोचला तोपर्यंत तो काळा डगलेवाला सामान्य माणसासारखा झाला, परंतु त्याचा डगला तसाच मोठा दिसत होता. लाकडूला आतां त्या ताइताचा महिमा कळला. ताईत सुटला तर आडदांड देहदेखील सुटणार हे ओळखायला त्याला वेळ लागला नाही.

लाकडू घराजवळ येऊन पोचला तेव्हां त्याला पाहून शेजारपाजारचे लोक धावरून गेले. म्हणाले–"आम्हांला वाटते की यात काहीतरी लबाडी असली पाहिजे, हे पहिल्यापासूनच शंका येत होती. तू तो ताईत काढून फेकून दे रे!"

लाकडूने त्यांच्या सल्ल्याप्रमाणे ताईत काढून फेकला, परंतु तो पुन्हा उडत येऊन लाकडूच्या सदऱ्याला चिकटला. एवढेच नव्हे तर या खेपेस तो जळू लागल्यासारखा वाटला. लाकडूने त्याला काढून टाकण्याचा विचार मनातून काढून टाकताच तो आपोआप विझून गेला.

आतां लाकडूचा जीव संकटात पडला. महिनाभर पुरणारे अन्न त्याला दोन दिवस देखील पुरेनासे झाले. उपासमार झाल्याने त्याचे स्थूल शरीर जागचे हालेनासे झाले.

लागू लागले. अगदीं निराश होऊन तो त्या वडाच्या झाडाखाली आला आणि मरण येण्याची वाट पाहू लागला.

ऐन दुपारच्या वेळी शेजारच्या गावचा एक हडकुळा मनुष्य वडाच्या झाडाखाली विश्रांती घेण्यासाठी आला आणि लाकडूचा आडदांड देह पाहून त्याला म्हणाला– "गुरुवर्य! माझे नांव हडकू! शरीर मोठे आणि लठ्ठ व्हायला काही औषध किंवा जादू मंत्र असेल तर सांगा! माझे लग्नाचे वय झाले असून ही माझ्या या हडकुळ्या देहाकडे पाहून कोणी आपली मुलगी मला द्यायला तयार होत नाही."

जिवात जीव आल्यासारखा लाकडू थोडा सरळ बसून म्हणाला–"हा सर्व या ताइताचा महिमा आहे!"

"मला कळू दे तरी तो महिमा!" हडकू म्हणाला.

लाकडूने आपल्या सदऱ्याचा ताईत सोडून हडकूच्या सदऱ्याला शिवून दिला आणि म्हणाला–"मी दृष्टीआड होईपर्यंत याचा महिमा कळणार नाही. तुला हा ताईत कधी नकोसा वाटला की हा आणखी कोणाच्या तरी सदऱ्याला शिवून टाक. काढून फेकून देऊ नकोस. तुला विस्तवाचे चटके बसतात तसे याचे चटके बसतील."

सुटलो बुवा! असे मनाशी म्हणत लाकडूने तेथून पाय काढला.





लाकडू दृष्टीआड होईपर्यंत पहात राहल्या नंतर हडकूने आपल्या देहाकडे पाहिले. त्याला घेरी आल्यासारखे झाले. तो आपला स्थूल देह घेऊन आपल्या गावी गेला. परंतु त्याच्या त्या विकृत देहाला पाहून कोण आपली मुलगी त्याला देणार? तेव्हां हडकू निराश होऊन परतला.

आतां हडकूला त्याचा अस्थिपंजर देहच बरा होता असे वाटू लागले. त्याच्या समोर देखील लाकडूसारखा पोटाचा प्रश्न उभा राहला. त्याने भगवी वस्त्रे धारण केली आणि भिक्षा मागू लागला. परंतु तसे फिरणे त्याला स्थूल देहामुळे कष्टाचे वाटू लागले. देखील चार घरे फिरल्यावरच तो धापा टाकू लागे.

वाजविली. त्या घरात एक अविवाहित स्त्री रहात होती. हडकूसमोर जो प्रश्न होता, तो तिच्यासमोर अगदी निराळ्या कारणामुळे उभा होता. ती दिसायला कुरूप होती, म्हणून तिच्याशी लग्न करायला कोणी तयार होत नसे. तिने दार उघडून भगवी वस्त्रे धारण केलेल्या हडकूला पाहिले व विचारले–"स्वामीजी! रूप चांगले व्हायला काही जादू मंत्र आहे का?"

हडकूला झोपेतून जागा झाल्यासारखे वाटले. तो म्हणाला–"आहे! हा ताईत आहे की!"

"तो ताईत मला देता का? देव तुम्हांला सुखी करील!" त्या बाईने अगदी गळ घातल्यासारखे विचारले.

हडकू आपला ताईत चटदिशी काढून तिच्या पोलक्याला शिवून देत म्हणाला–"मी दृष्टीआड झाल्यानंतर ताइताचा महिमा कळेल. तुला हा कधी नकोसा वाटला तर दुसऱ्या कोणाच्या तरी सदऱ्याला किंवा पोलक्याला बांधून टाक." असे सांगून हडकू तेथून निसटला.

ती बाई घरात गेली आणि आपले रूप पहायला एका मोठ्या आरशासमोर उभी राहली. परंतु ती दचकली कारण आरसा मोठा असूनही तिचा चतुर्थांश देहच त्यात

लागली. संध्याकाळपर्यंत त्याच अवस्थेत ती जमिनीवर पडून होती.

शेजारपाजारच्या लोकांनी येऊन विचारपूस केली. त्यांच्या बरोबर त्या गावच्या युवराणीची दासीसुद्धा होती. त्या अविवाहित स्त्रीला पाहून ती दासी पोट धरून हसू लागली. मनात म्हणाली–"आपल्या युवराणी सरकार गेली कित्येक वर्षे उदास आहेत. त्यांच्या तोंडावर कधी हसू म्हणून दिसले नाही. हिला पाहून त्या नक्कीच हसतील." तिने त्या स्त्रीला युवराणीच्या उद्यानात बोलावून नेले.

युवराणी सरकार एका ओटयावर उदास बसल्या होत्या. त्यांनी भुतासारख्या त्या स्त्रीला आपला देह कसाबसा संभाळत येत असतांना पाहिले आणि पोट धरून हसू लागल्या.

"किती वर्षांनी आज तू मला हसविलेस? असा कोणता महिमा आहे तुझ्यात?" तिने त्या अविवाहित स्त्रीला विचारले.

"महिमा आहे तो सर्व या ताइताचा." ती म्हणाली.

"पाहू दे तरी मला तुझा तो ताईत!" युवराणी सरकार म्हणाल्या.

"पाहून काय? बांधून पहाल तर मजा येईल." असे म्हणत तिने आपल्या पोलक्यातला ताईत काढून युवराणीच्या पोलक्याला शिवून दिला व म्हणाली–"नकोसा



वाटला तर दुसऱ्याच्या पोलक्याला बांधून मोकळी हो!" असे सांगून ती तेथून पळून गेली.

अविवाहित स्त्री निघून गेल्यावर युवराणी पालखीत बसून राजवाड्यात निघाली. थोडे अंतर चालून गेल्यावर भोयांना 'ओझे' नेववत नाहीसे वाटू लागले. त्याच वेळी युवराणी एकाएकी ओरडली. घाबरून जाऊन भोयांनी पालखी जमिनीवर टाकली. पालखी मोडून गेली. मोडक्या पालखीतून युवराणी भुतीणीसारखी उठून बाहेर आली. तिला मोठ्या कष्टाने अंतःपुरापर्यंत दासदासी घेऊन गेले. बापाला पाहतांच युवराणी गळा काढून रडू लागली आणि घडलेली गोष्ट तिने सांगितली.

एकुलत्या एका मुलीची ती दुरवस्था पाहून बापाने तो ताईत काढून फेकून दिला. परंतु दुसऱ्या क्षणाला तो युवराणीच्या अंगरख्याला येऊन चिकटला आणि विस्तवासारखा जळू लागला. ते पाहून

दुसऱ्या क्षणाला राक्षसासारखा मोठा झाला. युवराणी पहिल्यासारखी नाजुक सुंदर दिसू लागली. राजासमोर उपासमार होण्याचा प्रश्नच नव्हता. परंतु त्याला वस्त्रे लहान वाटू लागली, सिंहासन लहान वाटू लागले व राजमुकुट डोक्याला बसेना. राजाच्या प्रतिष्ठेचा प्रश्न होता.

राजाने चौकशी करून त्या अविवाहित स्त्रीकडून हडकूचा व त्याच्याकडून लाकडूचा शोध काढला व ताईत देणारा मूळ मनुष्य कोण याचा शोध सुरू केला. परंतु काहीच कळले नाही. तेव्हां दरबारात त्याने ताइताची कथा सांगून तो ताईत बांधून घेणाऱ्याच्या पोटापाण्याची व्यवस्था करून देण्याचे वचन दिले.

तेव्हां एक मनुष्य पुढे आला. लाकडूला ताईत बांधणाराच तो होता. त्याने स्थूल शरीर धारण करणे स्वीकारले आणि राजाच्या कृपेने तो आयुष्यभर सुखी झाला.





# लबाड गवळी

एता नावाच्या गावी राम्ना नावाचा एक गवळी रहात असे. त्याची बायकोदेखील लबाड होती. ती दोघं दुधात स्वस्त वस्तू मिसळून ते विकत असत. त्यांच्या जवळ गाई म्हशी पुष्कळ होत्या व त्या पुष्कळ दूधदेखील देत असत. परंतु दोघं लोभाला बळी पडून मिसळ दूध गावकऱ्यांना विकत असत आणि पुष्कळ पैसे मिळवीत असत.

त्याच गावात निळू नावाचा एक गवळी रहात असे. तो प्रामाणिकपणाने दुधाचा धंदा करी. त्याच्याकडे दोनच गाई आणि दोनच म्हशी होत्या. त्या दूधदेखील कमीच देत होत्या. परंतु तेवढ्या दुधावरच एका मुलाचे व नवराबायकोची पोटे भरत. त्याच्या मित्रमंडळींनी त्याला किती सांगितले की दुधात थोडे पाणी घालून दूध विकलेस तरी मोठे पाप लागेल असे थोडेच आहे. अरे हा धंदा आहे, यात खरं खोटं फार पहायचं नसतं; वगैरे. परंतु त्याने तिकडे दुर्लक्ष केले आणि सरळ मार्गाने धंदा करीत राहिला. त्याचं दूध शुद्ध होते म्हणून तो राम्ना विके त्या दराने विकू शकत नव्हता. अर्थातच त्याला दोन वेळ पोटभर जेवण मिळणे कठीण वाटू लागले. पुष्कळदां तर त्यांना अर्धपोटीच झोपावे लागे. तरी त्याने गाईंना किंवा म्हशींना द्यायचा तो दाणापाणी देण्यात कधी कसूर केली नाही.

राम्नाची धनाशा अमर्याद होती. तो पैसे खर्च करून सोने विकत घेई, परंतु गाईंना व म्हशींना द्यायचा चारा व दाणा-पाणी बरोबर देत नसे. म्हणून त्याच्या गाई म्हशी दिवसेंदिवस रोड होत गेल्या. त्यांचे दूधदेखील कमी होत गेले. तरी तो व त्याची बायको कमी झालेल्या दुधात












मैदा व पाणी मिसळून व चव नीट रहावी यासाठी थोडी साखर घालून रतीबाचे दूध घालीत राहूले.

इतके करून ही राम्ना दूध घाली त्याची चव बदललेली आढळे. त्याच्या गिऱ्हाइकांनी तक्रार करायला सुरवात केली, परंतु राम्ना शक्य तोंवर भांडण वाढवल्याशिवाय काम भागवून घेऊ लागला.

तो आपल्या गिऱ्हाइकांना सांगे–"काय करावे हो, हल्ली चाराच बदलला आहे. हिरव्या गवताऐवजी गाई म्हशींना वाळलेले गवत घालावे लागत आहे. म्हणून चवीत फरक भासतो आहे. परंतु पहा, वाळलेल्या गवताचे दूध प्रकृतीला चांगले असते,

आयुर्वेदाची माहिती असलेल्या वैद्याला विचारून पहा." त्याप्रमाणे तो तंतुशर्मा नावाच्या वैद्याला विचारून घ्यायला सांगे. त्याने त्या वैद्याला थोडे पैसे चारले होते व तो राम्नाच्या इच्छेप्रमाणे दूध प्रकृतीला चांगले असल्याचे सांगे. म्हणे–"आमच्या वैद्यक शास्त्राप्रमाणे वाळलेले गवत खाणाऱ्या गाई म्हशींचे दूध आयुर्वृद्धीला उत्तम आहे!"

अशा तऱ्हेने राम्नाचा धंदा चालू असतां निळू गवळी किती नीती धर्म पाळत असून सुद्धा त्याचे फासे उलटेच पडत गेले आणि त्याचे कष्ट दिवसेंदिवस वाढतच गेले.

गावाच्या पूर्वीकडील भागात एक चौधरी कुटुंब रहात असे. ते एक मध्यम वर्गीय कुटुंब होते. त्यांचे काही नातेवाईक शहराच्या मध्यभागी रहात होते. लग्नानिमित्ते दूरदूरची नातेवाईक मंडळी चौधरी कुटुंबाच्या घरी पुष्कळ जमली होती. चौधरी बंधूत सर्वात धाकटा जो दीनू चौधरी त्याचे रवी आणि छवी नावाचे दोघे मुलगे फार हुशार होते. रवी मोठा होता, सुमारे अठरा वर्षांचा, इंद्रजाल विद्येत निपुण होता.

दोघे अगदी पहिल्याने खेडे गावात आले होते. म्हणून आनंदाने गावात हिंडत फिरत गमती पहात होते. कुंभाराचे चाक, हात-

नवीन वाटत होती. सकाळी उजाडल्यापासून संध्याकाळ होईपर्यंत गांवभर हिंडणे एवढेच काम होते त्यांना.

नातेवाईक पुष्कळ आले होते म्हणून चौधरी कुटुंबाला जेवढे जास्त दूध लागे तेवढे सर्व राम्नाच देत होता. दोघे भाऊ उजाडताच दूध पीत असत. परंतु शहरातले दूध प्यायची संवय असल्याने राम्नाच्या दुधात काही मिसळ असल्याचे त्यांना कळले नाही.

दोघे असेच एकदां हिंडत हिंडत माळरानात गेले तेथें त्यांना निळू गवळी आपल्या गाई गुरांना चरायला घेऊन गेलेला दिसला. गुरे शांतपणे चरत होती व निळू मुरली वाजवीत होता. त्याला मुरली छान वाजविता येत होती. दोघांना त्याची मुरली फार आवडली. दोघे त्याच्याजवळ गेले आणि मन लावून त्याची मुरली ऐकू लागले.

त्याने मुरली वाजवायची थांबवतांच रवीने त्याला विचारले–"दादा! तुम्हांला बासरी किती छान वाजविता येते, हे कसं काय?"

"मुरलीवर मी नाही हे गाणे बसविले, मुला! माझ्या दुःखाकष्टातून हे गाणे आपोआप बाहेर येते आहे!" निळू म्हणाला.



"दुःख! तुम्हांला कसले दुःख?" त्याने विचारले.

"दुःख एक आहे का? पोटभर खायला मिळत नाही. अंगभर वस्त्र नाही. सामान्यपणे घरातले सर्वच अर्धपोटी राहतो." निळू म्हणाला.

ते ऐकून रवीला निळूची करुण कथा ऐकावीशी वाटली. सहानुभूतीने निळू विरघळला आणि त्याने आपल्या दुःखी जीवनाचे वर्णन करीत असतां राम्नाच्या लबाडीची गोष्ट सुद्धा संकोच सोडून सविस्तर सांगून टाकली.

"हे सर्व गांवकऱ्यांना तू सांगून नको का टाकायला?" रवीने विचारले.



"माझ्या बोलण्यावर कोणाचा विश्वास बसणार हो? गावातले वैद्यबुवा तंतुशर्मा राम्नाला अनुकूल तेच बोलतात. तो बोलतो ते गांवकऱ्यांना वेदवाक्यासारखे आहे." निळू हताश झाल्यासारखा म्हणाला.

"तसं कां म्हणतां दादा? तंतुशर्मा वैद्य आहे का? तो भूतवैद्य, मंत्रतंत्र वगैरे शिकला आहे वाटते? कधी मधून मधून अद्भुत अविश्वसनीय असे प्रयोग करतो का?" रवीने विचारले.

"तुम्ही कसं अगदी बरोबर ओळखलंत! तंतुशर्मा वैद्यकच फक्त करीत नाही, रोग्यां-वर ताइतांचा व मंत्रातंत्रांचा प्रयोगदेखील करून पाहतो. त्यांच्या घराच्या आवारात

त्याने वश केलेली भुते राहतात असं गांव-कऱ्यांना वाटतं. अमावास्येच्या रात्री तो त्यांचे आवाहन करतो, म्हणे." निळू म्हणाला.

"तू आपलं एक ग्लासभर दूध देऊ शकशील का?" रवीने त्याला विचारले.

त्या दिवशी दोघां भावांनी ग्लासभर दूध निळूकडून नेले व ते तापवून प्याले. त्याची चवच काही निराळी होती.

"राम्नाच्या दुधांत काही तरी गडबड दिसते आहे. आपण शहानिशा करून चोराला पकडले पाहिजे." रवी म्हणाला.

"कसं बुवा?" छबीने त्याला विचारले.

रवी थोडा वेळ विचार करून म्हणाला—"ठरलं रवी! जादू करून सर्व काम ठीकठाक होईल!"

गांवकऱ्यांच्या करमणुकीसाठी म्हणून रवीने जादूचे प्रयोग करण्याचे ठरवून त्या-साठी आवश्यक तयारी केली. त्या प्रयो-गाच्या वेळी त्याने तंतुशर्माला मुख्य अतिथी म्हणून हजर राहण्यास विनंती केली.

तो त्यांना म्हणाला—"काका! तुम्हांला सर्व विद्या अवगत आहेत. आम्ही तुमच्या-समोर पोरं आहों. तुम्ही आलात तर आमचा उत्साह वाढेल." स्तुती ऐकून तंतुशर्मा खूष झाला. येऊन सर्वांच्या पुढे बसला.

दुधाचा राहील असे रवीने प्रेक्षकांना जाहीर केले आणि राम्नाच्या दुधाचा एक ग्लास व निळूच्या दुधाचा एक ग्लास भरून त्यावर त्यांची नांवे लिहून दोन्ही ग्लास एका मेजावर ठेवून दिले. सर्वांना ते ग्लास व त्यावर लिहिलेली नांवे स्पष्ट दिसत होती.

नंतर रवीने प्रयोग सुरु केले. त्याने अनेक अद्भुत जादूचे प्रयोग करून प्रेक्षकांना आश्चर्यचकित करून सोडले. रवीला दैवी शक्ती प्राप्त असल्या पाहिजेत, असे गाव-कऱ्यांना वाटू लागले. भूतपिशाच्चांना वश करण्यात तो तंतुशर्माची बरोबरी तर करूच शकेल, कांकणभर त्याच्याहून जास्तच असेल असेदेखील सर्वांना वाटू लागले. अशा तऱ्हेने गांवकऱ्यांच्या मनांत आपल्या जादू मंत्राचा पूर्ण पगडा बसल्याची खात्री करून घेऊन चोराला पकडून द्यायच्या प्रयोगाला रवीने सुरवात केली.

तो गांवकऱ्यांना म्हणाला—"माझ्या हातांत जी भुते आहेत ती दमलेली आहेत, म्हणून बाहेर येण्याचे साहस करणार नाहीत. तरी त्यांना माणसांसारखी कॉफी प्यायला फार आवडते. म्हणून मी त्यांच्या-साठी आतां कॉफी तयार करतो. बंधू व भगिनींनो! आपण मनुष्य मिसळ नसलेले



पदार्थच खायला प्यायला जातो. भुतांचे तसंच असते. त्यांना मिसळ पदार्थ खायला किंवा प्यायला दिले तर ती गडबड करतात. मिसळ पदार्थ ओळखण्यात ती आपणांहून जास्त हुशार असतात. ही गोष्ट मी तुम्हां सर्वांना आतांच दाखवून देतो!"

असे सांगून रवीने दोन टेबलांवर दोन रिकामे ग्लास ठेवले. एका भांड्यातले कॉफीचे डिकॉक्शन (म्हणजे कॉफीचा काढा म्हणा पाहिजे तर), दोन्ही ग्लासात थोडे थोडे ओतले; नंतर निळूने दिलेले दूध एका कॉफीच्या ग्लासात ओतल्याबरोबर उत्तम कॉफी तयार झाली. रंगदेखील चांगला व वासदेखील उत्तम. तसंच त्याने रवीने

दिलेले दूध काफीच्या दुसऱ्या ग्लासात ओतले. त्याबरोबर त्या ग्लासातली काफी काळ्या शाईसारखी काळी झाली.

ती दाखवीत रवी सर्व प्रेक्षकांना म्हणाला–"बंधु व भगिनींनो! राम्नाचे मिसळ दूध भुतेदेखील प्यायला तयार नाहीत. तुम्ही मात्र मनुष्यांसारखे मनुष्य असून ते पितां आहां, हे किती आश्चर्य म्हणावयाचे?"

रवीने केलेल्या जादूच्या प्रयोगाचा परिणाम गावकऱ्यांच्या मनावर इतका पडला की त्याच्या बोलण्यावर त्यांचा पूर्ण विश्वास बसला आणि ते राम्नाला त्याच्या फसवेगिरीबद्दल शिव्याच देऊ लागले. त्यानंतर राम्नाची लबाडी चव्हाट्यावर आली. त्याच्या घराची झडती घेतली तेव्हां त्याच्या घरांतून मैद्याची पोती बाहेर पडली. गांवकऱ्यांनी राम्नाला गावाबाहेर हाकलले आणि त्याच्या सर्व गाई म्हशी निळूला दिल्या. तंतुशर्माने आपली चूक कबूल केली. त्याने गांवकऱ्यांची क्षमा मागून [illegible] दिले.

शहरांत परत गेल्यावर रवी व छवीने आपल्या मित्रांना या सर्व प्रयोगाचे वर्णन करून सांगितले तेव्हां त्यांनी रवीला "दूध पाण्यासारखे कसे काय करून दाखविलेस?" विचारले.

रवी म्हणाला–"टिंक्चर आयोडिनने!"

मित्रांनी विचारले–"म्हणजे आपण जखमेला लावतो तेंच ना?"

तो म्हणाला–"होय! ते पाण्यात मिसळून कॉफी डिकॉक्शन सारखें तयार केले. बाकीचा जादूचा प्रयोग हा रसायन शास्त्राचाच प्रयोग आहे. आयोडिन पिठाच्या पदार्थांना लागले तर पीठ काळे होते. राम्ना दुधात मैदा पुष्कळ मिसळत होता हे मला कळले होते. पीठ काळविले असल्याने दूध काळे झाले. निळूचे दूध शुद्ध होते म्हणून ते काळे झाले नाही."

त्याचे मित्र म्हणाले–"शाबास रवी, शाबास!"



# आळशी

फार जुनी गोष्ट आहे, एका राजाला उशिरां उठायची एक वाईट संवय लागली होती. दररोज तो उठल्यावर आपला प्रातर्विधी वगैरे उरकून दरबारी व मंत्र्यांना भेटे. तेव्हांपर्यंत जेवायची वेळ होऊन जाई. यामुळे राजाला व त्याच्या दरबारी व मंत्री वगैरेंना फार कष्टाचे वाटत होते. राजाने ही संवय जावी म्हणून मंत्र्याचा सल्ला विचारला.

मंत्र्याने सल्ला दिला–"महाराज! उजाडताच गोड संगीत ऐकवून आपणांस जागे करण्यासाठी काही सनई चौघडा वगैरे वाजंत्री वाजवणाऱ्यांना नेमावे. आपणांला सहजी जाग येईल."

राजाने त्याच दिवशी काही वाजंत्री वाजविणाऱ्यांना नेमले. त्यांनी पहाटे उठून चौघडा व इतर वाजंत्री वाजवायला सुरवात केली. राजाची झोप मोडली. परंतु साखरझोप मोडल्यामुळे महाराजांना भयंकर राग आला. त्यांनी लगेच आपल्या शिपायांना बोलावून वाजंत्री वाजविणाऱ्या पैकी प्रत्येकाला चार चार फटके द्यायला सांगितले आणि पुन्हां झोपला.

दुसऱ्या दिवशी काय वाटेल ते होवो, पहाटे उठायचे, असे राजाने मनाशी ठरविले. पहाटे वाजंत्री वाले आले, परंतु आवाज मोठा झाला तर फटके बसतील या भीतीने काही बोलल्याशिवाय परत निघून गेले. राजा नेहमीच्या संवयीप्रमाणे उशिरां जागा झाला. त्यादिवशी वाजंत्रीवाल्यांनी त्याला उठविले नाही. त्याने ताबडतोब त्यांना बोलाविले आणि त्यांना सोंपविलेले काम त्यांनी ठरल्या वेळेला केले नाही याबद्दल प्रत्येकाला चार चार फटके देण्याची शिक्षा ठोठावली.















# बोलणारे वासरू

एका खेडेगावात व्यंकू नावाच्या एका शेतकऱ्याकडे एक वासरू होते. शेतकऱ्याचे लग्नबिग्न झाले नव्हते म्हणून व्यंकू घरात एकटाच होता. त्याचे त्याच्या वासरावर फार प्रेम होते. इतका सुंदर गोऱ्हा देवाने दिला, परंतु त्याने त्याला बोलण्याची शक्ती दिली नाही, याचे व्यंकूला आश्चर्य वाटे. दिली असती तर किती बरे झाले असते, त्याला वाटे.

'हळहळू तीच गोष्ट मनात घोळत राहल्याने मनोव्याधी सारखी वाढू लागली. म्हणून तो सर्व ओळखीच्या लोकांना विचारू लागला–"काय हो माझ्या गोऱ्ह्याला बोलायला शिकवायला काही उपाय आहे का? असला माहीत सांग."

"गोऱ्हा बोलणार? तुझे डोकं फिरलं आहे का?" असे सर्व त्याला विचारू लागले.

परंतु व्यंकूच्या डोक्यातलं ते वेड गेले नाही. साधू, संन्यासी, योगी वगैरेंना मंत्रविद्या अवगत असते असे त्याने ऐकले होते. हिमालय पर्वतात जाऊन एखाद्या योग्याला विचारून घ्यावे, गोऱ्ह्याला बोलायला शिकवायला काही तरी मार्ग निघेलच असे त्याला वाटू लागले. त्याने आपल्या गोऱ्ह्याच्या चारा पाण्याची व्यवस्था चांगली ठेवायला एका विश्वासपात्र नोकराला नोकराला नेमले आणि तो स्वतः हिमालय पर्वतात निघून गेला. त्याने त्याला भेटलेल्या प्रत्येक बैराग्याला विचारून पाहिले, परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही.

शेवटी त्याचे पुण्य फळाला आल्यासारखा एक साधू त्याला भेटला. त्याने व्यंकूला एक मुळी दिली व ती गोऱ्ह्याला खायला दिली तर गोऱ्हा बोलू लागेल असे त्या साधूने सांगितले.

[illegible] लागला.

"मी इतके दिवस दिसलो नाही म्हणून बिचाऱ्याच्या मनाला किती वाईट वाटलं?" असे मनात म्हणत त्याने बरोबर आणलेली मुळी वासराला खायला दिली व म्हणाला– "आता तुला बोलतां येईल! तुझ्या मनात येईल ते तुला मोकळेपणी सर्वांना सांगतां येईल."

वासराने मुळी खाल्ली आणि म्हणाले– "इतके दिवस कोठे गेला होतास?"

व्यंकूचा आनंद गगनात मावेना. त्याला कोणकोणते कष्ट सहन करावे लागले हे त्यांने त्या वासराला सांगितले व म्हणाला–

"उन्हात [illegible] नकोस. झोपडीत खुशाल पाय पसरून पडून रहा."

"तुम्हांला काय? तुम्ही गादीवर पाय पसरून झोपतां. वाळलेल्या गवतावर झोपले तर त्याची कुसळे बोचतात. तुम्ही आपली एक गादी गोठ्यात घालून दिलीस तर मला छान झोपतां येईल." गोऱ्हा म्हणाला.

"अरे! किती छान बोलायला शिकलास रे? हे गांवकऱ्यांना कळलं तर दृष्ट लागेल तुला, चल!" असे म्हणत व्यंकूने वासराला गोठ्यात नेऊन बांधून ठेवले.

नंतर व्यंकू जेवायला बसला असतां "अहो, व्यंकोजी!" अशी मोठ्याने वासराने हाक मारली.



"काय रे!" असे म्हणत व्यंकू गोऱ्हाकडे धावत गेला.

"काय हो, तुम्ही एकट्याने जेवता आहां का? आम्ही मातीचा वास घेत चरत फिरलं पाहिजे नाही का? आज खायला थोडीशी पेंड घेऊन ये." वासरू म्हणाले.

व्यंकूने जास्त काही बोलल्याशिवाय वासरू म्हणाले ते केले.

"हे काय रे, खायला भुसाच का? आणि त्यात किती पाणी? आणली कायकाय काटक्या कुटक्या घातल्या आहेस? एखादा दोसा, वडा वगैरे वगैरे कालवून घाल. खायचे ते रुचकर नको का असायला?" असे व्यंकूला वासराने विचारले.

व्यंकूचे डोळेच पांढरे झाले. परंतु गोऱ्हा म्हणाला ते त्याने मुकाट्याने केले.

अशा तऱ्हेने वासरू प्रत्येक वस्तू व्यंकूला सांगून मागून घेऊन खाऊ पिऊ लागले. एके दिवशी रात्री व्यंकू नेहमीप्रमाणे झोपला असतां वासराने जोराने हाक मारली– "अहो व्यंकोजीराव! डास चावताहेत हो!"

काठी घेऊन वासराला झोडपू लागला.

काठीचा मार असह्य झाल्याने गोऱ्हा ओरडू लागला–"अहो रामराव! अहो श्री निवासराव! अहो गणोजी! वांचवा हो वांचवा! मला ठार करतो आहे!"

व्यंकोजीला कोणी चोर मारतो आहे, असे वाटून शेजार पाजारचे लोक धावून आले आणि त्यांनी काळोखात व्यंकूलाच चोर समजून त्याचे डोके फुटेपर्यंत त्याला बडविले.

"मेलो रे मेलो!" असे म्हणत व्यंकू तडफडू लागला.

"मरतो आहेस होय? मर!" वासरू म्हणाले.

घडलेले सर्व वृत्त ऐकून मारणारांनीच व्यंकूच्या जखमांवर मलम लावले आणि पट्टी बांधून ठेवली.

काही काळ गेल्यावर व्यंकूने पुन्हां हिमालयाकडे धांव घेतली.





# महाभारत

धर्मराजाचा राज्याभिषेक झाल्यावर कृष्ण बरेच दिवस हस्तिनापुरातच राहला. त्यानंतर आपले वडील वसुदेव यांना भेटावे असे त्याला वाटले. म्हणून सात्यकी आणि सुभद्रा दोघांना बरोबर घेऊन द्वारकेला आला.

महाभारत युद्धाचे वर्णन कृष्णाच्या तोंडी वसुदेवाला कळले. त्याचा एकुलता एक नातू अभिमन्यू, युद्धात मरण पावल्याचे ऐकून त्याला फारच वाईट वाटले.

मध्यंतरी धर्मराजाने अश्वमेध यज्ञासाठी आवश्यक धन हिमालय पर्वतावरून आणण्याचा निश्चय केला. पांडवांनी आपले चतुरंग सैन्य युद्धासाठी तयार करविले आणि धृतराष्ट्र, गांधारी, कुंती यांचा निरोप घेऊन ते हिमालय पर्वताच्या मोहिमेवर निघाले. ते मोठमोठी अरण्ये नदनद्या ओलांडीत हिमालय पर्वतावर गेले आणि मरुत्तने ज्या जागी धन संचय करून ठेवला होता ती जागा शोधू लागले.

एके दिवशी रात्री त्यांनी उपवास केला व जागरण करून आणि दर्भासनावर बसून शंकराचे ध्यान केले. दुसऱ्या दिवशी शंकर, कुबेर आणि मणिभद्राची आराधना करू लागले. नंतर त्यांनी भूत पिशाच्चांना द्यावयाचा बली दिला आणि जमिनीखाली पुरलेले धन खणून काढण्याच्या प्रयत्नाला लागले. त्यांत त्यांना तांबे, पातेली, तपेली, ताटे, पराती, वेळण्या वगैरे अनेक भांडी मिळाली. ती सर्व सोन्याची



होती. ती घेऊन जाण्यासाठी असंख्य उंटांचा घोड्यांचा आणि अशाच अनेक तऱ्हेच्या वाहनांचा उपयोग करावा लागला. त्या सर्वांना घेऊन पांडव हस्तिनापुरी आले.

अश्वमेध यज्ञाची सुरवात होणार असे कळल्यावर श्रीकृष्ण प्रद्युम्न व सात्यकी इत्यादिकांना बरोबर घेऊन हस्तिनापूरला निघाला. त्याच्याबरोबर सांब, चारुदेष्ण, आणि कृतवर्मा, सुभद्रेसह बलराम देखील निघाले. धृतराष्ट्र स्वतः व विदुर त्यांच्या स्वागतार्थ सामोरे आले. श्रीकृष्ण ठरल्याप्रमाणे युयुत्सूच्या महालात आपल्या सर्व परिवारासह उतरला.

तिला मुलगा झाला. परंतु मुलगा जन्मल्यावर रडला नाही. प्रेतासारखा निष्प्राण पडून होता. सर्वांच्या आनंदा उत्साहावर पाणी पडले. सर्व किंकर्तव्यविमूढ स्थितीत असतां कृष्णाला बोलावून आणायला कुंती निघाली. त्याच वेळी सात्यकीला बरोबर घेऊन कृष्ण स्वतःच आला. सुभद्रा, द्रौपदी वगैरे स्त्रिया रडत होत्या. कुंतीने कृष्णाला पाहताच कळवळून विचारले—" कृष्णा ! आतां काय करायचं रे ? तूच रक्षण केलेस तर होणार ! दुष्ट अश्वत्थाम्याने टाकलेल्या अस्त्रामुळे तुझ्या भाच्याचा मुलगा मृतावस्थेत जन्मला आहे. याला काय वाटेल ते करून वांचव ! आमच्या वंशाचा हाच एक अंश उरला आहे."

त्याचप्रमाणे सुभद्रा, उत्तरा, द्रौपदी कृष्णाला काकुळतीने विनंती करू लागल्या. उत्तराला तर वेडच लागल्यासारखे झाले. ती बेशुद्ध होऊन पडली.

कृष्णाने त्याला धरून आपल्या पायांवर ताठ उभे धरले. तेव्हां त्या मुलांत एकाएकी चैतन्य आले. सर्वांना आनंद झाला. ब्राह्मणांनी त्या मुलाला आशीर्वाद दिला. पांडव वंशाची सत्वपरीक्षाच होती ती. ती परीक्षा झाल्यावर तो जन्मला म्हणून कृष्णाने त्याचे नाव परीक्षित असे ठेवले. सर्व थोर स्त्रीपुरुषांनी मृत्यूच्या दाढेतून वांचलेल्या त्या

त्याची वाढ होऊ लागली.

परीक्षिताला पहिला महिना पुरा झाला त्याच दिवशी पांडव हिमालय पर्वतावरचे धनवैभव घेऊन परतले. ते येणार हे कळल्यावर सर्व हस्तिनापूर शहर त्यांच्या स्वागतार्थ सजविण्यात आले. यादव पांडवांना सामोरे गेले. पहावे तिकडे नृत्यगायन चालू होते आणि मंगलवाद्ये वाजत होती. मोठ्या समारंभाने पांडवांनी हस्तिनापुरात प्रवेश केला. त्यांना नातू झाल्याचे आणि तो मृतावस्थेत जन्मला असतां कृष्णाने त्याला पुनर्जन्म दिल्याचे ऐकून पांडवांना परमानंद झाला. त्यांनी कृष्णाच्या दर्शनाला जाऊन त्याचे आभार मानले.

त्यानंतर धर्मराजाने व्यास आणि कृष्ण दोघांची परवानगी घेऊन अश्वमेध यज्ञाचा प्रारंभ करण्यासाठी चैत्र पौर्णिमेला यज्ञदीक्षा घेतली. यज्ञाच्या घोड्यात कोणकोणती लक्षणे असावीत याची माहिती असलेले सूत व ब्राह्मण यांच्याकरवी निवड करावयाची होती. त्यानंतर तो घोडा देश देशांतरात फिरण्यासाठी सोडावयाचा व तो जगभर फिरून परतणार.

अश्वमेध यज्ञ चालू असतां धर्मराजाने यज्ञदीक्षा घेतली असल्या कारणाने, भीमाने नकुलाच्या मदतीने राज्यव्यवस्था पहावयाची, अर्जुनाने यज्ञाच्या अश्वाबरोबर जाऊन त्याचे रक्षण करावयाचे आणि सहदेवाने सर्व कौटुंबिक व्यवस्था पहावयाची असे ठरले.





अश्वमेध यज्ञाच्या अश्वाबरोबर त्याच्या रक्षणार्थ अर्जुन निघाला तेव्हां धर्मराज त्याला म्हणाला–"अर्जुना! तू यज्ञाच्या अश्वाबरोबर त्याच्या रक्षणार्थ जात आहेस. वाटेत कोणी क्षत्रियाने आह्वान केलेच तर त्याच्याशी वैर केल्याशिवाय त्याचे मन वळवून घे आणि त्याला या यज्ञास हजर राहण्यास निमंत्रण दे!"

धर्मराजाने स्वतः अश्वमेधाचा घोडा सोडला आणि घोड्याच्या पाठीमागून गांडीव धारण करून अर्जुन निघाला, तेव्हां नागरिकांची गर्दी रस्त्यांच्या दुतर्फा निरोप देण्यासाठी आणि गंमत पाहण्यासाठी उभी राहिली. अश्वाबरोबर त्याच्या खाण्या-

असलेला याज्ञवल्क्यांचा एक शिष्य, वेद-वेदांगांचा चांगला अभ्यास असलेले असे ब्राह्मण आणि काही क्षत्रियदेखील निघाले. पांडवांनी जिंकलेल्या सर्व प्रदेशात तो घोडा निर्विघ्नपणे फिरला.

कोणाशी शक्यतोंवर युद्ध करू नकोस, असे धर्मराजाने सांगितले होते तरी अर्जुनाला वाटेत कित्येक ठिकाणी युद्ध करावे लागले. त्याला वाटेत किरात, यवन आदिकांनी आह्वान केले. त्यांच्याशी युद्ध करावे लागले. अनेक आर्यक्षत्रियांनी देखील यज्ञाच्या घोड्याला अडविले. परंतु सर्व युद्धात अर्जुन विजयी झाला.

महाभारत युद्धात अर्जुनाच्या हातीं मरण पावलेल्या त्रिगर्तांच्या मुलांनी व नातवंडांनी अश्वमेध यज्ञाच्या अश्वाबरोबर अर्जुन येतो आहे हे कळल्यावर त्याच्याशी युद्ध करण्याचे ठरवून घोड्याला अडविले. अर्जुन त्यांच्याशी प्रेमाने बोलायला गेला असतां त्याच्या त्या सद्व्यवहाराकडे दुर्लक्ष करून त्यांनी अर्जुनावर बाण सोडले. त्रिगर्तांचा सेनापती सूर्यवर्मा याच्याशी अर्जुनाला युद्ध करावे लागले. त्याने सूर्यवर्मा, केतुधर्मा, धृतवर्मा व इतर अठरा त्रिगर्त वीरांना ठार केल्यावर उरलेले लोक त्याला शरण आले.

मुलगा वज्रदत्त अर्जुनाशी युद्धाला आला. अर्जुनाने त्याचा पराभव केला, परंतु त्याला ठार न करतां जिवंत सोडून दिले आणि अश्वमेध यज्ञप्रसंगी उपस्थित राहण्यास निमंत्रण दिले.

त्यानंतर त्याचे सैंधवांशी युद्ध झाले. अर्जुनाने सैंधवांचा पूर्ण पराभव केला. भारत युद्धात अर्जुनाच्या हातीं सैंधव जयद्रथाचा वध झाला होता. त्याची बायको दुःशला ही धृतराष्ट्राची एकुलती एक मुलगी होती. तिचा मुलगा सुरथ यज्ञाश्वाबरोबर स्वतः अर्जुन आला असल्याचे ऐकतांच त्या धक्याने मरण पावला.

तेव्हां दुःशला आपल्या तान्ह्या नातवाला एका रथात बसवून अर्जुनाकडे येऊन म्हणाली–"हादेखील तुझा नातूच, परीक्षितासारखाच आहे. याच्या तोंडाकडे पाहून सैंधवांचा संहार करू नकोस. त्यांची चूक झाली, त्यांना क्षमा कर. याच्या आजोबांनी तुमच्याशी फार वैर केले हे खरे आहे. ते विसर!"

अर्जुनाने आपल्या चुलत बहिणीला पोटाशी धरून तिचे सांत्वन केले आणि तिला तिच्या नातवाबरोबर तिच्या घरी पोंचते केले आणि घोड्याला घेऊन पुढे निघाला.



घोडा फिरत फिरत मणिपूरला येऊन पोंचला. त्यावेळी मणिपूरला बभ्रुवाहन राज्य करीत होता. तो अर्जुनापासून चित्रांगदाला झालेला मुलगा होता. आपले वडील आपल्या देशात आल्याचे कळल्यावर बभ्रुवाहन काही ब्राह्मणांना बरोबर घेऊन अर्जुनाच्या दर्शनास आला.

अर्जुनाला त्याची वागणूक पाहून राग आला. म्हणाला–"तू क्षत्रिय नाहीस का? मी गमतीखातर या बाजूला फिरायला आलो नाही. शस्त्रास्त्रे घेऊन यज्ञाश्वाच्या रक्षणार्थ आलो आहे. तू शूरासारखे या घोड्याला धरून ठेवून माझ्याशी युद्ध करायला हवं होते. परंतु तू शरण आल्या-



सारखा सरळ माझ्याशी बोलायला भेटायला येतो आहेस हे कसे काय ?"

ते ऐकून बभ्रुवाहनाचा स्वाभिमान जागा झाला. तो युद्धाची वस्त्रे धारण करून, रथात बसून अर्जुनाशी युद्धाला आला. भयंकर युद्ध झाले. दोघे द्वंद्वयुद्ध करीत असतां मूर्च्छित होऊन पडले. चित्रांगदा धावत आली आणि पती व पुत्र दोघांना बेशुद्धावस्थेत पाहून रडू लागली. थोड्या वेळाने बभ्रुवाहनाला शुद्ध आली. आई अर्जुनाला मूर्च्छितावस्थेत पाहून रडत असल्याचे त्याने पाहिले. आपण केलेल्या चुकीबद्दल त्याला फार पश्चात्ताप वाटू लागला आणि उपवास सुरू केला.

म्हणाली–"वेड्या! तुझे बाबा तुझ्या हाती मरण पावले असे वाटले का तुला? ते अजेय आहेत. मी आपली माया पसरवून तुला भ्रमात पाडले. मी तुला एक मणि देते तो त्यांच्या अंगाला नुसता लाव, ते तत्काळ उठून बसतील." बभ्रुवाहनाने मणि नेऊन अर्जुनाच्या अंगाला लावताच अर्जुन झोपेतून जागा झाल्यासारखा उठून बसला.

अर्जुन प्रेमाने बभ्रुवाहनाला गाढ आलिंगन करून भेटला व उलूपी, चित्रांगदा तेथेच असलेल्या पाहून त्याला फार आनंद झाला. तो त्यांना म्हणाला–"या युद्धभूमीवर तुम्ही सर्व कशासाठी आलां आहां?"

उलूपी म्हणाली–"अर्जुना! तु भीष्माचार्यांचा अन्यायाने वध केलास. म्हणून तुला पाप लागले. त्या पापाचे शमन व्हावे यासाठी मी तुझ्या पुत्राच्या हाती तुझा वध करविला.

ते ऐकून अर्जुनाला फार आनंद झाला. त्याने बभ्रुवाहनाला अश्वमेध यज्ञाचे निमंत्रण दिले. बभ्रुवाहनाने अर्जुनाला एक दिवस त्याच्या घरी त्याचे आतिथ्य स्वीकारण्यास विनंती केली. परंतु अर्जुनाने त्याला घोड्याबरोबर नित्य रहावे लागणार असल्याने ते शक्य नसल्याचे सांगितले.

यज्ञाश्व समुद्रापर्यंत जाऊन इंद्रप्रस्थाकडे परतला. तो मगध देशाची राजधानी राजगृह येथे आला. तेथे मेघसंधी हा राजा राज्य करीत होता. तो अर्जुनाशी युद्धाला आला आणि अर्जुनाशी युद्ध करून युद्धात हारला.

अर्जुन त्याला म्हणाला—"तू लहान असलास तरी चांगला पराक्रम दाखविलास. येत्या चैत्र पौर्णिमेला आमचा दादा धर्मराज अश्वमेध यज्ञ करणार आहे. तू त्या यज्ञप्रसंगी आले पाहिजेस!"

अशातऱ्हेने अर्जुनाला घोड्याबरोबर जात असतां म्लेंच्छांबरोबर व एकलव्याच्या निषादांबरोबर, शकुनी मामांचा मुलगा गांधार देशाचा राजा व द्राविड राजा, यांच्याबरोबर आंध्राबरोबर आणि शेवटी ओड्र वगैरेंबरोबर युद्ध करावे लागले व जय मिळवून तो हस्तिनापूरला परत आला. चैत्र पौर्णिमाजवळ येऊ लागली. एक महिनाभर आधीपासून त्यासाठी तयारी चालू होती.

यज्ञसमारंभास असंख्य जनसमुदाय हजर होता. त्यात अनेक वेदशास्त्र पारंगत विद्वान

बरोबर सात्यकी, प्रद्युम्न, सांब, कृतवर्मा आणि इतर यादव प्रमुखांना बरोबर घेऊन आले होते. चित्रांगदाला व उलूपीला बरोबर घेऊन बभ्रुवाहन आला होता.

अश्वमेध यज्ञ मोठ्या थाटामाटाने संपन्न झाला. धर्मराजाने अतिथीअभ्यागतांना निरनिराळ्या भेटी, नजराणे व दाने देऊन निरोप दिला. सर्वांनी यज्ञाची व त्यांना मिळालेल्या अतिथी सत्काराची दानधर्माची मुक्त कंठाने स्तुती केली. त्याच वेळी तेथे एक मुंगूस आला व म्हणाला—"तुम्ही सर्व या यज्ञाची फार प्रशंसा करीत आहां, परंतु कुरुक्षेत्रात अत्यंत दारिद्र्यात दिवस काढणाऱ्या एका मुनीने केलेल्या सातूच्या पिठाचे दान याहून मोठे आहे.

मुंगूस म्हणाला ते ऐकून सर्व आश्चर्यचकित झाले. त्यांनी त्याला विचारले—"तू कोण? कोठून आलास? शास्त्रोक्त विधीने झालेल्या यज्ञदानादी गोष्टीत तुला कोणती उणीव दिसली? खरे खरे सांग!"





# मित्रभेद

[ ११ ]

राजकुमारीने विचारले तेव्हां विष्णुरूपात असलेला कोष्टी म्हणाला—"ए सुदर्शने! मी तुझ्यासाठीच आलो आहे. तुला प्रेमाने भेटायला!"

सुदर्शना म्हणाली—"प्रभो! तुम्ही देव आणि मी मानवजातीची स्त्री आपलं परस्पर प्रेम कसं?"

"प्रिये! तू माझी अर्धांगी, लक्ष्मी आहेस. तू मला ओळखले नाहीस का? तुला शाप मिळाल्याने मनुष्यजन्म घ्यावा लागला. आपल्याला काही काळ हा विरह सहन करावा लागणार होता. तरी मी मानव देह धारण करून काही काळ तुझा पती म्हणून राहल्यावर तू शापमुक्त होशील, म्हणून आलो आहे. कोणी इतर मानव तुझा पती होऊ नये व त्याच्या पासून तुझे संरक्षण व्हावे हाच हेतू. तेव्हां आपण गांधर्व विवाह करून घेऊं या." कोष्टी म्हणाला.

राजकन्येला परमानंद झाला. तिने त्याच्याशी विवाह करून पत्नीरूपाने राहण्यास मान्य केले.

अशातऱ्हेने विवाह झाल्यावर कित्येक दिवस दोघं परस्परांना भेटत राहली. मध्यरात्रीच्या सुमारास कोष्टी आपल्या गरुडवाहनावर राजकन्येकडे येई आणि उजाडण्यापूर्वी निघून जाई. निघण्यापूर्वी तो तिला वैकुंठलोकी जात आहे व परत रात्री येईन असे सांगून जात असे.

काही काळ लोटल्यावर राजकन्येच्या सखींना कोणी तरी पुरुष राजकन्येच्या महालात दररोज रात्री येऊन उजाडण्या-










पूर्वी निघून जात असल्याचा संशय आला. आपण निष्काळजीपणा दाखविल्याबद्दल महाराज व महाराणी रागावतील ही भीती त्यांना वाटू लागली. तरी ती गोष्ट गुप्त ठेवणे अशक्य वाटल्यावरून राजासमोर जाऊन त्या हात जोडून उभ्या राहल्या व राजाने विचारल्यावर त्याचे पाय धरून नम्रपणे म्हणाल्या–"महाराज! आम्हांला अभयदान देण्याची कृपा करावी! एक महत्वाची गोष्ट सांगणे भाग आहे!"

"अभयदान दिले! बोला, जे सांगावयाचे असेल ते!" राजा म्हणाला.

त्या म्हणाल्या–"महाराज! राजकन्येच्या रक्षणार्थ आम्ही रात्रंदिवस डोळ्यात तेल

नजर चुकवून तिला भेटून जातो. तो कसा येतो व कसा जातो हे आम्हांला कळले नाही. तो जिना चढून राजकन्येच्या शयनागारात जात नाही, कारण तसे केले तर आम्हांला नक्कीच कळेल. तो अंत:पुरात दाराने प्रवेश करीत नाही, कारण दारावर रात्रंदिवस कडक पाहरा असतो. आम्ही रात्री दहावाजेपर्यंत राजकन्येबरोबरच राहतो आणि त्यांची झोपायची वेळ झाली की आम्ही निघून येतो. पुन्हां पहाटे पांच वाजतां त्यांच्या खोलीत जातो. त्या मधल्या अवधीत त्यांनी बोलाविले तरच आत जातो. तेव्हां त्या अवधीतच कोणी येत जात असावा. तो कसा येतो व कसा परत जातो हे अंदाजाने देखील कळण्यासारखे नाही. आम्ही खरे खरे ते निवेदित केले आहे. या पुढे जे करावयाचे ते प्रभूच्या आज्ञेप्रमाणे होईल.

ते ऐकून राजा फार काळजीत पडला. उच्चकुळात जन्मली असून राजकन्येची ही वागणूक त्यांची मान खाली आणणारी आहे. यात त्याचा, राणीचा किंवा दासींचा बेफिकीरपणा काहीच नाही. मुलीच्या आई-वडिलांना सगळी कष्ट सुखे भोगावीच लागणार. असा विचार करून राजाने राणीला सर्व जाऊन सांगितले व म्हणाला–

पाहिजे!"

राणीला पायाखालची जमीनच खचल्या-सारखे वाटले. धावत मुलीच्या खोलीत जाऊन तिने तिला विचारले–"तु कुलाचार सोडून अशी काय वागू लागली आहेस? कोण आहे तो तुझा यार?"

राजकन्या मान खाली करून लाजत म्हणाली–"आई! स्वत: नारायण गरुडावर बसून मला भेटायला येत आहेत."

ती अद्‌भुत बातमी ऐकून राणीला इतका आनंद झाला की तिला काय करावे आणि काय नाही, असे झाले. ती स्वत:च्या भाग्याचे आभार मानीत पतीकडे धावत जाऊन म्हणाली–"आपलं सर्वांचं भाग्य थोर आहे. आपण धन्य झालो. स्वत: श्रीमान् नारायण आपल्या मुलीसाठी दररोज येतो आहे हो! त्या दोघांचा गांधर्व विवाहदेखील झाला आहे. आज रात्री आपण खिडकीतून नारायणाचे दर्शन घेऊ या. तो आपल्या सारख्या सामान्य मानवांशी कधीच बोलणार नाही, म्हणा."

राजालादेखील अपार आनंद झाला. तो दिवस त्याला एका वर्षासारखा गेला. रात्र होताच दोघं राजाराणी खिडकीजवळ जाऊन बसली आणि आतुरतेने आकाशाकडे नजर लावून बसली. शंख, चक्र, गदा व



पद्म धारण करून कोष्टी गरुडवाहनावर बसून येत असलेला त्यांना दिसला. डोळ्याचं जणुंकाही पारणेच फिटल्यासारखा राजा राणीला म्हणाला–"आपण धन्य झालो! आपल्या पोटी स्वत: लक्ष्मीने जन्म घेतला. साक्षात् नारायण आपले जामाता झाले. मी आपल्या जांवयांच्या कृपाप्रसादाने सर्व जग जिंकू शकेन!"

ही घटना घडली त्यानंतर काही दिवसांनी विक्रमसेन चक्रवर्तीचे लोक सुप्रति-वर्मा जवळून खंडणी वसूल करायला आले. आतां स्वत: नारायणाचा श्वशुर असल्या-मुळे सुप्रतिवर्माने चक्रवर्तीच्या दूतांचा यथोचित आदर सत्कारदेखील केला नाही.

म्हणून त्यांना राग आला व ते म्हणाले–"राजा! खंडणी स्वतः घेऊन पोचती करण्याची वेळ टळली तरी तू ती पोचती केली नाहीस! ही गोष्ट विक्रमसेन महाराजांना राग येण्यासारखीच आहे. कोणी देव तुझ्या मदतीला धावून येईल असे वाटते आहे, वाटतं तुला?"

राजाने त्यांच्या त्या धमक्यांकडे दुर्लक्ष केले. दूतांनी चक्रवर्तीकडे जाऊन आपल्या अपमानाचे तिखट मीठ लावून मनाला आले तसे वर्णन करून सांगितले. विक्रमसेन चक्रवर्ती आपल्या सर्व सामंत राजांना बरोबर घेऊन ससैन्य सुप्रतिवर्माच्या राज्यावर चालून आला. त्याने कत्तल सुरू करताच प्रजा दूरदुरून पुंड्रवर्धन राजधानीत येऊन आक्रोश करू लागली. विक्रमसेनाचे सैन्य राजधानीकडे वळले. मंत्री, पुरोहित, नगर प्रमुख राजाकडे धावले.

राजा स्मित करून म्हणाला–"घाबरण्याचे काही कारण नाही. शत्रूचा नाश कसा करावयाचा हे मला माहीत आहे. [illegible] कशी मोडते ती!"

त्याने मुलीला बोलवून गोड शब्दात राज्यावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन केले व म्हणाला–"मुली! मी तुझ्या पतीच्या कृपा प्रतापाच्या आशेने शत्रूची पर्वा केली नाही. आज रात्री ते आले की उजाडण्याच्या आंत शत्रूचा नाश करायला त्यांना सांग."

कोष्टी रात्री आला तेव्हां राजकन्येने सर्व गोष्टी त्याला सांगितल्या.

तो स्मित करून म्हणाला–"प्रिये! हिरण्यकश्यपू, कंस, मधुकैटभांसारख्यांचा मी वध केला तेव्हां या क्षुद्र पामर मानवांचा वध करणे कठीण आहे का? मी त्यांचा सर्वनाश करतो, तू आपल्या वडिलांना सांग!"

सुदर्शनाने मोठ्या अभिमानाने दुसऱ्या दिवशी ती गोष्ट आपल्या वडिलांना सांगितली. त्याला फार आनंद झाला. उजाडण्याच्या आत विक्रमसेनाचा वध होईल, राजाने दवंडी पिटून जाहीर केले.



# १४९. कोलोन कॅथिड्रल

सेंट पीटरच्या स्मृत्यर्थ बांधलेले हे कॅथिड्रल जर्मनीच्या कोलोन शहरांत आहे. गोथिक शिल्पकलेचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. याची कोणशिला इ. स. १२४८ मध्ये घातली गेली. पण त्याची निर्मीती १८८० पर्यंत पुरी झाली नाही. याच्या दोन्ही शिखरांची उंची ५०० फुटांहून जास्त आहे.





# अमरवाणी

सत्संगात् भवति हि साधुता खलानाम्,
साधूनाम् न हि खलसंगमात् खलत्वम्;
आमोदम् कुसुमभवम् मृदेव धत्ते,
मृद्गंधम् न हि कुसुमानि धारयंति ॥ १ ॥

[सत्पुरुषांच्या संगती दुष्टांचा स्वभाव साधुत्व ग्रहण करतो; परंतु दुष्टांच्या संगतीत सत्पुरुषांच्या स्वभावात दुष्टपणा येत नाही. फुलावर पडलेल्या धुळीला फुलांचा वास लागतो, परंतु मातीत पडलेल्या फुलाला मातीचा वास लागत नाही.]

कर्पूरधूली रचितालवाल:,
कस्तूरिका कुंकुम दोहदश्री:,
पन्नीरनीरै रभिषिच्यमान:,
प्रांचं गुणं मुंचति किं पलांडु:? ॥ २ ॥

[कांद्याला कापराच्या पुडीचे अळे करून त्याला कस्तुरी केशर इत्यादिक सुगंधी द्रव्यांचे (किती) खत घालून गुलाबपाणी घातले तरी तो आपला वास सोडील का?]

विद्यया विमलया प्यलंकृतो
दुर्जन: सदसि मास्तु कश्चन;
"साक्षरा:" विपरीतताम् गता:
केवलम् जगति तेपि "राक्षसा:" ॥ ३ ॥

[निर्मल विद्येचा प्रसाद असूनही दुर्जन हा सभेत (म्हणजे चार चौघांच्या समाजात) राहू शकत नाही. कारण असे हे "साक्षरा:", म्हणजे शिकलेले असतात ते जगात उलटे, म्हणजे उजवीकडून डावीकडे वाचल्यास "राक्षसा:" राक्षस सिद्ध होतात.]





# यक्ष पर्वत

[२५]

[खड्गवर्मा व जीवदत्त मणिभूषणसह ज्या ठिकाणी रात्री उतरले होते त्या ठिकाणी एक राक्षसीण आली. तिच्या नवऱ्याकडून जीवदत्ताने यक्षपर्वताविषयी माहिती विचारून घेतली. मध्यरात्रीच्या सुमारास मणिभूषणला एक विचित्र आवाज ऐकू आला. त्याला वाटले, राक्षस त्यांना खायला येत आहेत. म्हणून तो ओरडू लागले. पुढे–]

मणिभूषणचा आवाज ऐकून जीवदत्ताची झोप मोडली. खड्गवर्मा मणिभूषणला धीर देत म्हणाला–"अरे मणिभूषणा! तू उगाच भितो आहेस. त्या दोघां राक्षसांना तू मणिरंजित यक्ष नाहीस, त्याचा नोकर आहेस व तुझे नाव मणिभूषण आहे, हे मी सांगितले, तेव्हां ते निघून गेले."

परंतु त्यानंतर मणिभूषणला झोप आली नाही. कारण जीवदत्ताने त्याला धीर दिला होता तरी त्याच्या मनाचे समाधान झाले नव्हते. उजाडेपर्यंत तो जागाच होता. परंतु उरलेली रात्र निर्विघ्न पार पडली. उल्लेख करण्यासारखी एकही गोष्ट घडली नाही. सूर्योदय होतांच खड्गवर्मा व जीवदत्त उठले. प्रातर्विधी वगैरे उरकून घेऊन परत पडावाजवळ आले. मणिभूषणने सुकाणू धरले आणि होडी किनाऱ्या किनाऱ्याने चालू लागली.



सुमारे अर्ध्या तासाने पडाव किनाऱ्या लगतच्या एका जागी येऊन थांबला. तेथे नदी वळण घेऊन पुढे वहात होती. म्हणून किनारा थोडा चिंचोळा झाला होता व नदी आत गेल्यासारखी वाटत होती. मणिभूषणने पडाव त्या बाजूला वळविला आणि किनाऱ्यावर उतरून म्हणाला–"हाच यक्षपर्वत आहे. आता तुम्ही उतरा." तेवढ्यात त्याचे लक्ष पर्वतावर एका विशिष्ट जागेवर खिळले व तो आश्चर्य करीत उद्गारला–"ओ हो हो! ते पहा माझे धनी मणिरंजित आपल्याला भेटायला इकडेच येत आहेत."

दाखविलेल्या दिशेकडे पहात पडावातून खाली उतरले आणि त्यांनी डोंगराकडे जास्त न्याहाळून पाहिले. खडकाळ डोंगरातून उतरून एका खडकावर ऐन तरुण वयात असलेला एक यक्ष त्यांना दिसला. त्याच्या हातात एक लहानशी गदा होती. तो टक लावून खड्गवर्मा व जीवदत्त दोघांकडे पहात होता.

मणिभूषण पुढे वाट दाखवीत चालू लागला आणि खड्गवर्मा व जीवदत्त त्याच्या पाठीमागून चालत यक्ष होता तेथे येऊन पोचले. तो दोघांकडे करड्या नजरेने पहात म्हणाला–"खड्गवर्मा आणि जीवदत्त! तुमचे दु:साहस पाहून मी थक्क झालो आहे. 'बुद्धि: कर्मानुसारिणी!' असे थोरां मोठ्यांचे सांगणे आहे. परंतु तुमच्याजवळ ते सांगून काय उपयोग?"

जीवदत्ताने मणिरंजिताकडे एकदां पायापासून डोक्यापर्यंत पाहिले व स्मित करून म्हणाला–"मणिरंजिता! राजकन्या पद्मावतीला येथील दगडी रथाला जो हलवील तोच खरा शूर असे पटवून देऊन इकडे येणाऱ्यांना ठार करण्याचा उपक्रम तू छान चालविला आहेस! परंतु तू टाकलेल्या या भयंकर जाळ्याची दोरीच तुला फाशीची दोरी ठरणार आहे. कोठे आहेत दोघी आणि कोठे आहे तो दगडाचा रथ? मुकाट्याने सांग."

ते ऐकून मणिरंजिताची मुद्रा एकाएकी उग्र झाली. त्याने आपली गदा वर उचलली. तितक्यात खड्गवर्मा आपल्या तलवारीच्या मुठीवर हात ठेवीत म्हणाला–"मणिरंजिता! तुला वाटत असेल की तुझी गदा पाहून आम्ही जागच्या जागी थिजून जाऊ. परंतु लक्षात ठेव, आमच्या हातात तुला कायमचा धडा देऊं शकेल अशी शस्त्रे आहेत. त्या दगडी रथाला आम्ही हलवू शकलो नाही तर तू पाहिजेतर आमचा वध करण्याचा विचार कर. तेव्हां कदाचित राजकन्या पद्मावती तुला फार मोठा शूर मानून तुझ्याशी विवाह करील ही,–अर्थात वसंतकुमारीची गोष्ट मी आतांच सांगू इच्छित नाही! तेव्हां प्रथम तो दगडाचा रथ आहे कोठे हे तरी दाखविशील!"

मणिरंजिताला भयंकर राग आला व तो आतां काही बोलणार एवढ्यात मणिभूषण म्हणाला–"घाई करू नकोस मणिरंजिता! या दोघां तरुणांना कदाचित ओळखले नसशील. मी तुला मित्र म्हणून सावध करतो आहे. पुढे तुला पश्चात्ताप करावा लागेल. तेव्हां प्रथम तो दगडी रथ आहे तिकडे दोघांना घेऊन चल!"



मणिरंजित थोडा नरमला आणि चालू लागला. थोड्या वेळाने सर्व पर्वतातल्याच एका विस्तीर्ण व समतल अशा जागेत येऊन पोचले. ती जागा फारच मनोहर व शांत उद्यानासारखी होती. त्या प्रदेशाच्या उतरणीवर पुष्कळशी फुलझाडे व फळझाडे फुलां फळांच्या भाराने वांकलेली होती. त्यांच्या मध्यभागी रथाकृती असलेल्या थोड्या थोड्या अंतरावर दोन इमारती होत्या. त्यांच्यापैकी एकीवर उभ्या राहून दोघी तरुण युवती दोघां क्षत्रिय तरुणांकडे कुतूहलपूर्वक दृष्टीने पहात होत्या.

जीवदत्ताने एकदां त्या दोघींकडे पाहिले व विचारले–"मणिरंजिता! त्याच का ऐ



तू पळवून आणलेल्या दोघी राजकन्या– पद्मावती आणि वसंतकुमारी ?"

"होय! त्याच त्या दोघी तुमचा काय तो पराक्रम स्वतःच्या डोळ्यांनी पाहण्या-साठी येथे उभ्या आहेत!" असे व्यंग्योक्तीने सांगून मणिरंजित एका बाजूला वळून बोटाने दाखवीत म्हणाला–"अणि तो पहा, तोच तो दगडी रथ आहे!" त्या वेळी तो दांत ओठ चावीत होता जणुंकाही त्या दोघांच्या शौर्य व पराक्रमाला तो आव्हान करीत होता.

तेथून जवळच सुमारे वीस फूट उंचीचा एक दगडी रथ होता. रथापासून खालच्या बाजूस डोंगर उतरणीवर पसरलेला होता.

'अस्सं' अशा अर्थाने पहात अगदी बेदर-कारपणे त्या बाजूला चालू लागले. लगेच मणिरंजितने "मणिभूषणा!" असे म्हणत बाजूला वळून पाहिले. परंतु त्याला तो जवळपास कोठेच दिसला नाही.

त्याचा मित्र काही बोलल्या सांगितल्या-शिवाय निघून गेलेला पाहून मणिरंजित आश्चर्यचकित झाला आणि मुकाट्याने दगडी रथाकडे चालू लागला. खड्गवर्मा व जीवदत्त दोघांनी रथाच्या चारी बाजूला एकदां फिरून पाहिले. जीवदत्ताने खाली वांकून रथाचा पाया पाहिला व खड्गवर्माला म्हणाला–"खड्गवर्मा! हा रथ डोंगरात कोणी आणून टाकलेला नाही. येथेच एका मोठ्या खडकाला कोणीतरी रथाकृतीत कोरून काढलेला आहे. खाली बारीक उजेड दिसतो आहे, लोक हळूहळू बोलत असल्याचा भास होतो आहे."

जीवदत्त ते म्हणाल्याबरोबर तलवार लागल्यासारखा उडी मारून मणिरंजित म्हणाला–"रथाखालून उजेड दिसतो आहे आणि कोणीतरी बोलल्यासारखं वाटते आहे म्हणतोस? अशक्य! अशक्य!"

"अशक्य कसं काय म्हणतोस? डोंगरात जे हिरे आणि माणिक्ये आहेत सोने आहे

लोक मुके नाहीत, ठाऊक आहे का?" जीवदत्त मणिरंजिताला थोडेथोडे दटावून म्हणाला.

मणिरंजित थोडा वेळ किंकर्तव्यविमूढ स्थितीत उभा राहून थोड्याशा करड्या आवाजात म्हणाला–"कोणी रे सांगितले तुला ते? तो दुष्ट मणिभूषणच वाटते ते सांगणारा?"

"बिचाऱ्या मणिभूषणावर कां राग काढतो आहेस? तो तुझा मित्र की नोकर कोणास ठाऊक, पण तो आमच्याशी तुझ्या विषयी जे काही बोलला त्यावरून आम्हांला काहीच बोध झाला नाही. मी आपल्या दिव्य दृष्टीने या पर्वतातल्या सर्व गोष्टींची माहिती काढून घेतली आहे." जीवदत्त हंसत स्मित करीत म्हणाला.

मणिरंजित दोन्ही नाकपुड्यातून नागा-सारखा फूत्कार सोडीत ओरडला–"तुझ्या या बढाया सोड आणि दगडी रथाला तू हालवून दाखवितो म्हणालास तो तुझा पराक्रम काय तो दाखव, मला थोडा पाहू दे! तुझा पराक्रम पाहण्यासाठी पद्मावती त्या इमारतीवर केव्हांपासून वाट पहात उभी आहे!"

जीवदत्तने खड्गवर्माकडे सार्थक नजरेने एकदां पाहिले आणि जवळच डोंगराच्या उतरणीवर रथाकृतीच्या इमारतींकडे बोट दाखवीत म्हणाला–"राजकन्या उभ्या





आहेत त्या इमारतीच्या जवळची इमारत तुझी राहण्याची जागा आहे, नाही का रे मणिरंजिता?"

"होय! तो प्रश्न विचारण्याची गरज तुला कां रे वाटली?" मणिरंजिताने विचारले.

"काही नाही, ती इमारत आतां ढासळून खाली पडणार आहे, ती पहा तू!" असे म्हणत जीवदत्त मंत्र म्हणू लागला आणि आपली कुबडी दगडी रथावर ठेवून रथाला जोराने एक लाथ मारली.

त्याबरोबर भूकंप झाल्यासारखा आवाज झाला आणि रथ जागचा हलला. नंतर जवळच डोंगराच्या उतरणीवर मणि-

बाणांसारखा वेगाने जाऊन आदळला आणि वाडा व तो दगडी रथ खापरासारखे तुकडेतुकडे होऊन जमिनीवर पसरले. त्या वाड्याचे मोठमोठे तुकडे आणि दगडी रथाचे तुकडे आकाशात उडाले आणि फुला फळांच्या झाडावर येऊन पडले.

पापणी लवायच्या आत घडलेली ती भयंकर घटना पाहून मणिरंजिताचा आपाद-मस्तक देह हादरला. तरी त्याने स्वतःला सावरून एका क्षणात आपली गदा जीव-दत्ताला मारण्यासाठी उचलली. परंतु तेवढ्यात खड्गवर्माने तलवार उपसून त्याला अडविले.

जीवदत्ताला इतका आनंद झाला की तो स्वतःचे हंसू आवरू शकला नाही. त्याने त्याला वसुमती गंधर्वाने दिलेले कांशाचे झांकण हातात घेतले आणि जोराने वाज-विले. दुसऱ्या क्षणाला तो दगडी रथ हालला आणि त्याच्या खालच्या तळघरातून काही राक्षस, गंधर्व वर येऊन ओरडू लागले.

जीवदत्तने त्यांना शांत व्हायला सांगितले व म्हणाला—"तुम्ही सर्व या क्षणापासून बंदी मुक्त झालां आहां. तुम्ही आपापल्या घरी निघून जा." नंतर कांशाचे झांकण वर उचलून जोराने वाजवीत म्हणाला—"हे कांशाचे झांकण आमच्या देशाच्या

दिले आहे. तुमच्यापैकी कोणी गंधर्व असेल तर त्याने पुढे येऊन हे झांकण खुशाल घेऊन जावे."

गंधर्वांपैकी एकजण पुढे आला आणि जीवदत्ताने दिलेले झांकण घेऊन ते एकदां श्रद्धा भक्तिपूर्वक डोळ्याला लावले. जीवदत्त बंदीमुक्त झालेल्या राक्षसांना विचारीत होता तेवढ्यात "मेलो!" अशी मणिरंजिताची किंकाळी ऐकू आली. जीव-दत्ताने त्या आवाजाकडे वळून पाहिले. खड्गवर्माने त्याला खाली पाडले होते आणि त्याच्या छातीवर पाय ठेवून तलवारीचे टोक त्याच्या कंठावर ठेवले होते. ते दृश्य त्याला दिसले.

ते पाहून जीवदत्तला परमानंद झाला. खड्गवर्मा त्याला म्हणाला—"काय रे याला ठार करू या की जीवदान देऊ या? याने दोघां राजकन्यांना पळवून आणून त्यांना दुःखी केले. त्यांच्या आईवडिलांना जी काळजी करावी लागली ती थोडी आहे का?"

त्याच वेळी तेथे राजकन्या पद्मावती व राजकन्या वसंतकुमारी आल्या. वसंत-कुमारी मणिरंजिताला त्या स्थितीत पाहून म्हणाली—"या नीचाला ठार करील त्या-च्याशीच मी लग्न करीन अशी प्रतिज्ञा



केली होती. स्वतःच्या डोळ्यांनी हा ठार झाल्याचे मी पाहू शकले नाही तर आयुष्य-भर ब्रह्मचारिणीच राहीन."

खड्गवर्मा वसंतकुमारीचे अपरूप सौंदर्य पाहून मूर्तिवत् तिच्याकडे पहात उभा राहिला. तिच्याशी विवाह करावयाचा म्हणजे मणिरंजिताला ठार करावे लागणार! म्हणून त्याला कंठस्नान घालण्यासाठी त्याने तलवार उचलली. तेवढ्यांत आकाशवाणी झाली—"थांबा!" सर्वांनी आकाशाकडे पाहिले.

त्याच वेळी एक हंसाकृती विमान आकाशातून समोर उतरले. त्यातून यक्षराज व मणिभूषण बाहेर आले. यक्षराज सर्वां-

कडे एकदां पाहून म्हणाला–"खड्गवर्मा व जीवदत्त! तुम्ही शूर वीर आहां. मला मणिभूषणच्या तोंडी सर्व वृत्त कळले आहे. यक्ष कुलांगार अशा या मणिरंजिताला तुम्ही प्राणदान द्या. यापुढे तो जिवंत राहला तरी मेलेल्यासारखाच आहे."

खड्गवर्मा काय करावे या विचारात असतां जीवदत्त म्हणाला–"खड्गवर्मा! यक्षराज म्हणाले ते तू ऐकलेच आहेस. मणिरंजिताला क्षमा करून सोडून दे."

"पण मग वीरपुरच्या राजकन्येच्या प्रतिज्ञेचे कसं काय?" खड्गवर्मा म्हणाला. त्या वेळी त्याची दृष्टी तिच्या अशांत मुद्रेवर होती. ती मान खाली करून पद्मावती उभी होती तिकडे निघाली.

यक्षराज स्मित करून म्हणाला–"मणिरंजित जिवंत असून मेलेलाच आहे, हे मी यापूर्वीच सांगितले. म्हणून वसंतकुमारीची प्रतिज्ञा भंग होत नाही. आतां मीच दगडी रथ हालविणाऱ्या थोर वीर जीवदत्ताशी पद्मावतीचे व खड्गवर्माशी वसंतकुमारीचे

[illegible] आणा!"

मणिभूषणाने विमानातून चार हार आणले आणि जीवदत्त, खड्गवर्मा, पद्मावती व वसंतकुमारी प्रत्येकाच्या हातांत एकेक हार दिला. पद्मावती व जीवदत्ताने परस्परांना हार घातले आणि त्यानंतर खड्गवर्मा व वसंतकुमारीने परस्परांना हार घातले. सर्वांनी टाळ्या वाजवून दोन्ही जोडप्यांना आशीर्वाद दिले.

नंतर यक्षराजाने दोन्ही जोडप्यांना विमानात बसायला सांगितले व म्हणाला–"आतां तुम्ही सांगाल तेथे हे विमान उतरेल. एक महिनाभर तुम्ही या विमानात विहार करा. त्यानंतर माझे विमान माझ्याकडे परत येईल."

यक्षराजाचा निरोप घेताना खड्गवर्मा व जीवदत्त म्हणाले–"कोणत्या शब्दांत आम्ही आतां आपले आभार मानू?" त्यांनी नमस्कार केल्यावर विमान उडू लागले आणि वीरपूरच्या दिशेने उडू लागले.



# ऋणानुबंध

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणत्या तरी मित्राच्या स्नेहबंधनात पडून हा त्रास सहन करीत आहेस का? अरे, स्नेहाचे, इतके मनाला काय लावून घेतोस? मैत्रीचे संबंध तुटून जातात रे! त्याचे उदाहरण म्हणून तुला मी एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी एका गावी शंकर आणि केशव नावाचे जीवश्चकंठश्च असे दोन मित्र रहात असत. ते सामान्य स्थितीतलेच होते. लग्न झाल्यावर दोघांच्या जबाबदाऱ्या वाढत गेल्या आणि जीवन कष्टसाध्य वाटू लागले. म्हणून दोघांनी जवळ जे काही होते ते

## वेताळाच्या गोष्टी



विकून चार पैसे गोळा केले आणि परदेशात जाऊन व्यापार करू लागले.

त्यांना व्यापारधंद्यात बराच फायदा होऊ लागला. मध्यंतरी शंकरला एक मुलगा झाला आणि केशवला एक मुलगी झाली. शंकरने आपला स्नेहसंबंध पिढ्यान् पिढ्या कायम रहावा यासाठी केशवच्या मुलीला आपली सून करून घ्यायचे ठरविले. त्या गोष्टीस केशवने होकार दिला.

दोन्ही मुलं लग्नाच्या वयाची झाली तेव्हां दोघां मित्रांनी सुमुहूर्तावर त्यांचे लग्न करून द्यायचे ठरविले. परंतु त्याच सुमारास शंकरच्या दुर्दैवाने त्याची व्यापारी गलबते बुडून गेल्याचे समजले.

त्याच्या सावकारांनी त्याला दिलेले कर्जाऊ रुपये त्याचे घरदार विकून वसूल करून घेतले. शंकरला आतां त्या गावात तोंड दाखविणे शरमेचे वाटू लागले. तो बायको मुलाला घेऊन परगावी जायला निघाला.

ते पाहून केशव त्याला भेटून म्हणाला—"मित्रा! आपण आपल्या मुलांचे लग्न करून घ्यायचे नव्हते का ठरविले. तसं करूया."

शंकर म्हणाला—"आतां मी अगदी गरीबीच्या स्थितीत आहे. तू आपल्या बरोबरीचा संबंध पाहून मुलीचे लग्न करून टाक."

केशव म्हणाला—"मित्रा! तू एवढे मनाला कां लावून घेतोस? माझं आहे ते निराळं कां समजतोस? देवाची अवकृपा झाली त्याला कोण काय करणार?"

परंतु शंकरला ते मान्य नव्हते. केशवने किती सांगितले, परंतु व्यर्थ!

शंकर दक्षिणेकडील प्रदेशातल्या मोत्यांचा व्यापार असलेल्या नगरात जाऊन एका जेव्हेऱ्याच्या दुकानात मुलासह नोकरी करू लागला. त्याला चांगला अनुभव होता व तो इमानदार होता, म्हणून त्या जेव्हेऱ्याला पुष्कळ फायदा होऊ लागला. चार पैसे जमल्यावर शंकरने स्वतःचे दुकान काढले.

ऊर्जितावस्थेत आणले.

शंकरने एक योग्य मुलगी पाहून तिच्याशी आपल्या मुलाचे लग्न करून दिले. काही दिवसांनी त्याला एक नातदेखील झाली. त्याने नातीचे नाव मालती असे ठेवले. मालती जन्मल्यानंतर शंकरचा व्यापार चांगलाच जोराने चालू लागला. थोड्याच दिवसात त्याची गणना श्रीमंत व्यापाऱ्यात होऊ लागली.

शंकर निघून गेल्यावर केशवने आपल्या मुलीचे लग्न एका दुसऱ्या व्यापाऱ्याच्या मुलाशी करून दिले. त्या मुलीला एक मुलगा झाला. त्याचे नाव वसंत असे ठेवण्यात आले.

वसंत मोठा झाल्यावर एकदां केशवला त्याचे व्याही म्हणाले—"हे पहा, अरबस्तानात आपल्या कडील मालाला फार मागणी आहे, असे ऐकतो. त्या देशातला खजूर, शिलाजित वगैरे पदार्थांना आपल्या देशात चांगली मागणी आहे. एकदां जाऊन येऊ या कां? आपलं भाग्य चांगलं असेल तर कोट्याधीश होऊ!"

केशवने होकार दिला. प्रवासासाठी आवश्यक उंटांचा तांडा भाड्याने ठरविण्यात आला. अरबस्तानात ज्या मालाला चांगली किमत मिळेल असे त्यांना वाटले तो माल विकत घेऊन त्यांनी उंटांवर लादला आणि दोघे व्याही सकुटुंब प्रवासाला निघाले





काही दिवस प्रवास सुखाचा झाला. कोणतेच विघ्न आले नाही. परंतु एक दिवशी रात्री सर्व निश्चिंतपणे झोपले असतां, चोरांच्या टोळीने हल्ला केला आणि जे जागे होते त्यांना ठार करून मालासह चोर उंटांना पळवून घेऊन गेले. त्या हल्ल्यात केशवचा नातू वसंत याला सोडून सर्वांना चोरांनी ठार केले. केशवचे कुटुंब व त्याच्या व्याह्यांचे कुटुंब सर्वांची त्या हल्लयात कत्तल झाली. काही उरले ते जख्मी होऊन आपापल्या जागी पडले होते.

जिवंत राहिले ते फार कष्टाने हिंडत कसेबसे त्या वाळवंटाच्या बाहेर आले. त्या

जावेसे वाटेना. कारण तेथे त्याची विचार-पूस करणारा देखील कोणी नव्हता. मिळेल ते खात, जागा मिळेल तेथे विश्रांती घेत आणि वाट फुटेल तिकडे हिंडत राहीला.

काही वर्षे असाच फिरत राहिल्यावर वसंत त्या मोत्यांच्या मंडीच्या गावी येऊन पोचला. तो शंकरच्या दुकानासमोर उभा राहून विचारू लागला–"काय हो, काही काम मिळेल का?"

अगदी अशक्त व उन्हाने काळवंडलेल्या त्या तरुण मुलाला पाहून शंकरला दया आली. त्याने त्याला जवळ बोलावून निरखून पाहिले तर त्याच्या तोंडावळयावर शंकरला केशवची आठवण होईल अशा काही खुणा दिसल्या. म्हणून त्याने त्याला विचारले–"काय रे मुला, तू कोठला राहणारा? तुझ्या बाबांचे नाव काय? आजोबांचे नाव काय?"

वसंतने आपली पूर्ण ओळख सविस्तर सांगितली.

शंकरला या दैवदुर्विलासाचे आश्चर्य व दुःख वाटले. म्हणाला–"बाळा! तुझे आजोबा माझे फार मोठे मित्र होते. तू माझ्याकडेच रहात जा."

वसंत हुशार मुलगा होता. त्याला पाहील्याव

रक्ताचे नाते जोडून बळकट करणे शक्य झाले नाही. परंतु आतां पुन्हां चांगली संधी मिळाली आहे हे पाहून त्याने आपल्या नातीचे वसंतशी लग्न करून देण्याचे ठरवून तसे केले देखील. आपल्याला चांगला नात-जांवई मिळाल्याबद्दल त्याला फार आनंद झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! वसंत देशोधडीला लागलेला आणि अनाथ असा मुलगा असूनही त्याला आपली नात देऊन शंकरने, केशवशी त्याची जी मैत्री होती ती रक्ताचा संबंध जोडून कायम केली. परंतु पूर्वी त्यानेच नाही का तसा संबंध जोडण्याचा केशवने आग्रह केला असतां नकार दिला होता? तो कां? त्यावेळी त्याची आर्थिक स्थिती वाईट होती व केशवने आपल्या मुलीचे लग्न शंकरच्या मुलाशी करून देतो असे म्हटले होते. परंतु ती गोष्ट नाकारून आपल्या मित्राला सोडून तो परदेशी कां निघून गेला? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"शंकरच्या मनातले केशवविषयीचे प्रेम कधीच कमी झाले नव्हते. परंतु तो स्वाभिमानी होता. केशवने त्याच्याशी जो सद्व्यवहार दर्शविला तो एक प्रकारे उपकारच आहे असे त्याला साहजिकच वाटले. तो भार त्याला नको होता. उपकाराचे ओझे वहन करणे अशा माणसांना शक्य होत नसते. केशव आपले सर्वस्व घालवून बसला असता तरी त्याच्या मुलीला त्याने आपली सून करून घेतले असते. परंतु तसे झाले नाही. परंतु ती परिस्थिती केशवच्या नातवाच्या दुर्दैवाने त्याच्यावर आली. तेव्हां त्याने त्याला आपली नात देऊन आपला नातजांवई करून घेतले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.



# मूर्ख को[illegible] ?

एका गावी दोघे मित्र रहात होते. दोघे एकदां आपापल्या नोकरांचा मूर्खपणा वर्णन करून सांगू लागले. दोघां नोकरात जास्त मूर्ख कोण हे ठरवायचे होते.

एका मित्राने आपल्या नोकराच्या हातात एक पैसा देऊन म्हटले–"अरे! तू लगेच बाजारात जा आणि एक रत्नहार घेऊन ये!" त्याला उत्तर म्हणून "हा आलोच!" असे सांगून तो नोकर पैसा घेऊन निघाला.

दुसरा आपल्या नोकराला म्हणाला–"अरे! तू उद्यानात जाऊन मी तेथे आहे का नाही, पाहून ये." नोकर होकारार्थी मान हलवून निघून गेला.

आपापल्या नोकरांचा मूर्खपणा पाहून दोघे खूप हसले.

नोकर वाटेत कोठे तरी परस्परांना भेटून बोलू लागले.

"आमच्या मालकांना मूर्ख नाही म्हणावयाचे तर काय म्हणावयाचे? नाहीतर त्यांनी बाजारातून रत्नहार आणायला मला सांगितले असते का? आज रविवार आहे. दुकाने बंद आहेत की नाही?" एकजण म्हणाला.

"आमचे मालक तरी कमी आहेत का? त्यांनी माळ्याला बोलावून ते उद्यानात आहेत की नाहीत हे विचारले असते तर?" दुसरा नोकर म्हणाला.





# सुतार पक्षी

फार दिवसांपूर्वीची गोष्ट आहे. एका जंगलाशेजारी दोन लाकूडफोडे रहात असत. ते दोघे दररोज जंगलात जाऊन लाकडे तोडून विकीत. असेच एकदां ते दोघे बराच वेळ जंगलात फिरत राहले, परंतु त्यांना जळाऊ लाकडांच्या बेताचे एकही झाड आढळले नाही. शेवटी निराश होऊन दोघे घरी निघाले असतां वाटेत त्यांच्यापैकी एकाला एक चंदनाचे झाड आकस्मिकपणे दिसले. तो आपल्या मित्राला म्हणाला–"अरे पाहिलेस का ते चंदनाचे झाड आहे!"

"खरंच की रे! मी झोप मोडून जागा होत असतां मला हे झाड स्वप्नात दिसलं होतं!" दुसरा म्हणाला.

"दिसलं म्हणून काय झाले रे?" पहिल्याने त्याच्या त्या म्हणण्याचा खोल हेतू ओळखून विचारले.

"देवाने म्हणूनच मला या वाटेने घरी परतायला प्रेरणा दिली. तेव्हां हे झाड माझे आहे!" दुसरा म्हणाला.

"परंतु मीच नाही का दाखविले ते तुला? मी दाखविले नसते तर हे झाड येथे आहे, हेदेखील तुला कळले नसते. म्हणून न्यायाने हे माझे झाड आहे. तरी मी असा लोभी नाही. तुझ्याबरोबर अन्याय करणार नाही. तू माझ्याबरोबर आहेस म्हणून, आपण दोघे हे झाड अर्धे अर्धे वांटून घेऊ या. ही न्यायनीतीला धरून गोष्ट होईल." पहिला म्हणाला.

ते ऐकून दुसरा संतापून म्हणाला–"देवाचे म्हणणे नाकारणार का तू? स्वप्नात देवाने हे झाड मला दाखविले होते. नंतर देवाने मलाच हे झाड प्रथम दाखविले. असे असून ही तू त्यात अर्धा वांटा मागू लागला आहेस का? ते होणार नाही, सांगून ठेवतो.

पाहिजे तर झाडाच्या एक दोन फांद्या मी तोडून देतो. नाकबूल केलेस तर देवाच्या अनुज्ञेने मी तुझे डोके फोडून मोकळा होईन."

पहिला धर्मभीरू होता. दुसरा जे म्हणाला ते बरोबर असेल असे समजून म्हणाला–"कर बाबा, तुला हवं असेल तसं!" नंतर दुसऱ्याने दिलेल्या दोन फांद्या घेऊन तो त्यात संतोष मानून निघून गेला.

दुसऱ्याने आपल्या हुशारीची प्रशंसा स्वतःच करीत फुलून जाऊन उरलेले चंदनाचे झाड तोडले आणि सर्व लाकडे घरी पोचती केली.

पहिला, जे घडले त्या गोष्टीचा विचार करू लागला आणि त्याच नादात वाट [illegible] [illegible] पडले. ती जंगलात भटकत भटकत दमला आणि शेवटी एका दगडावर विश्रांती घेण्यासाठी लवंडला आणि कोणीतरी "कोण आहे ते?" विचारीत असल्याचा त्याला भास झाला आणि त्याच्या पाठोपाठ "घशाला कोरड पडली आहे!" असा कण्हत कोणीतरी बोलला. त्याने उठून आवाजाच्या दिशेने पाहिले तेव्हां त्याला झाडीत चांदण्याच्या उजेडात एक झोपडी दिसली. झोपडीत कोणीतरी असल्यासारखे त्याला वाटले. तो घाईघाईने आत गेला तेव्हां मरणाला टेकलेली एक म्हातारी त्याला दिसली. त्याने एका मडक्यातले पाणी काढून तिला पाजले.

[illegible] [illegible] लाकूडफोड्याला जवळ बोलवून म्हणाली– "बाबा रे! आतां मी काही क्षणाची पाहुणी आहे. फक्त एक इच्छा मनात उरली आहे, माझा देह चंदनाच्या लाकडांनी जाळला जावा. तसे झाले तर माझा आत्मा शांत होईल."

लाकूडफोड्या म्हणाला–"आजी बाई! मी फार गरीब आहे, तरी माझ्याजवळ चंदनाच्या दोन फांद्या आहेत. त्या तुला देतो."

"तू फार शाहाणा आहेस रे बाळा, तू तसेच कर. माझ्या बिछान्याखालची जमीन खणलीस तर तुला मी सांठवलेले पैसे मिळतील. ते सर्व तू घेऊन जा. त्याचे दहा वाटे करून एक वाटा स्वतःसाठी ठेव आणि बाकी नऊ गोरगरिबांना मदतीसाठी खर्च कर. तुला पुण्य मिळेल. तुला स्वर्गप्राप्ती होईल." असे सांगून म्हातारीने कायमचे डोळे मिटले.

दुसऱ्या लाकूडफोड्याने चंदनाचे सर्व झाड तोडून नेले आणि ते विकून पुष्कळ पैसे मिळविले. त्याने मोठे घर बांधले आणि शेत विकत घेऊन श्रीमंतासारखा राहू लागला. त्याने पहिल्या लाकूडफोड्याची चवकशीसुद्धा केली नाही.

पहिल्याने म्हातारीच्या पैशातले नऊ वांटे गोरगरिबांना मदतीसाठी खर्च केले आणि उरलेल्या एका वांट्यातले काही पैसे खर्च करून स्वतःच्या घराची डागडुजी केली





व जे उरले ते अडीअडचणीच्या वेळेसाठी जपून ठेवून दिले. तो स्वभावाने सज्जन होता, म्हणून लोक त्याला येऊन भेटत व आपल्या सुखदु:खाच्या गोष्टी सांगून त्याचा सल्ला घेत.

सर्व लोक त्याची स्तुती करतात, हे पाहून दुसरा लाकूडफोड्या पहिल्याचा हेवा करी. एकदा तो आपल्या बायकोला म्हणाला– "त्याची एवढी चांगली स्थिती कशी काय झाली कळत नाही बुवा!"

त्याची बायको म्हणाली–"त्याला कोठे तरी फुकटाचे पैसे मिळाले असावेतसे वाटते. त्यातले थोडेथोडे दररोज आपल्या पिशवीत काढून आणीत असावा."

"तेच असणार!" दुसरा लाकूडफोड्या म्हणाला.

एक दिवशी दुसरा लाकूडफोड्या पहिल्या लाकूडफोड्याच्या पाठोपाठ त्याला कळू दिल्याशिवाय जंगलात गेला. तेथे तो एका पडक्या झाडाच्या फांदीवर बसून राहलेला दिसला. तेथेच त्याला

[illegible]
त्याने पहिल्या लाकूडफोड्याकडे जाऊन विचारले–"तुला मिळालेले धन कोठे आहे रे?"

"धन? कोणते धन?" असे आश्चर्यचकित होऊन पहिल्याने विचारले.

चोर लबाड छान सापडला आहे, लपवितो आहे माझ्यापासून, असे त्याला वाटले. तो बसला होता त्या झाडाखालीच धनाचा सांठा असणार असेदेखील त्याला वाटले. त्याने रागाने पहिल्याच्या हातातली कुऱ्हाड ओढून घेतली आणि त्याच्या कपाळावर मारून त्याला ठार केले.

"आयुष्यभर शोधित राहलास तरी तुला ते धन मिळणार नाही." असे म्हणत त्याने प्राण सोडला.

दुसऱ्या क्षणाला दुसरा लाकूडफोड्या सुतार पक्षी झाला. तेव्हांपासून तो व त्याचे सुतारपक्षी वंशज वाळून गेलेल्या झाडाला चोचीने भोंक पाडून धनाचा सांठा आजपर्यंत शोधीत आहेत.



# तोंडास तोंड

एका राजाला एक विचित्र स्वप्न पडले. दुसऱ्या दिवशी उठल्यावर ते स्वप्न आपल्या दरबारी मंडळींस व मित्रांस सांगून त्यांना आश्चर्यचकित करून टाकायचे त्याने ठरविले. परंतु उठल्यावर त्याला ते स्वप्नच आठवेना.

राजा फार निराश झाला. त्याने राजधानीतल्या सर्व ज्योतिष्यांना बोलवून विचारले– "मला काल रात्री एक विचित्र स्वप्न पडले. परंतु सकाळी उठल्यावर ते पार विसरून गेलो. ते माझे स्वप्न काय होते हे कोणी सांगितले तर मी त्याला मोठे बक्षीस देईन."

ते ऐकून सर्व ज्योतिषी परस्परांची तोंडे पाहू लागले. एकजण म्हणाला–"महाराज! आमच्या ज्योतिषशास्त्रात स्वप्नात पाहिलेले सांगता येईल असे सूत्र नाही."

परंतु त्यांच्यापैकी एकजण धाडस करून म्हणाला–"महाराज! आपण माझ्या एका प्रश्नाचे उत्तर सांगितलेत तर आपणांस पडलेल्या स्वप्नाची गोष्ट मी सांगेन."

"विचार, काय प्रश्न आहे तुझा? राजाने विचारले.

"आपण दिलेल्या बक्षिसाचा उपयोग मी कशा तऱ्हेने करीन हे मेहरबानी करून सांगावे." त्या चिकित्सक ज्योतिष्याने विचारले.

"ते मला कसे कळणार?" राजाने विचारले.

"जागा असलेल्या माणसाच्या मनात काय आहे हे जर दुसऱ्याला सांगतां येण्यासारखे नसेल, तर इतरांची स्वप्ने कशी काय कळणार?" ज्योतिष्याने विचारले.

राजाने त्या चमत्कारपूर्ण उत्तरावर खूष होऊन त्याला मोठे बक्षीस देऊन निरोप दिला.





# महाराजांचा मेहुणा

फार प्राचीन काळची गोष्ट आहे, महासेन नांवाचा राजा सर्व भारत जिंकून चक्रवर्ती झाला. त्याने जिंकलेल्या सर्व राजांनी त्याचे मांडलिकत्व स्वीकारले आणि त्याच्या आज्ञेप्रमाणे वागू लागले.

साम्राज्य स्थापन करण्यासाठी अनेक युद्धे केली असून ही महासेन राजाने प्रजेला कधी त्रास दिला नाही. उलट प्रजेच्या सुखसोयींसाठी तो नित्य झटत असे. त्याने अनेक योजना योजून त्या अमलात आणल्या व प्रजेला सुखी केले. म्हणून त्याच्या साम्राज्यात सर्वत्र नेहमी सुकाळ असे. फक्त कोशल देशच काय तो या बाबतीत अपवाद होता.

सर्व मांडलिक संस्थानांत त्याने अमलात आणलेल्या योजना यशस्वीपणे चालू होऊन लोक सुखी झाले. फक्त कोशल राज्यात त्या कां निरुपयोगी ठराव्या हे महासेन राजाला कळेना. त्याने कारण शोधण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, परंतु काही फायदा झाला नाही.

चक्रवर्ती राजाकडे एक राजपुरोहित होते. त्यांचा एक जवळचा नातेवाईक गुणनिधी नावाचा एक भोळा तरुण होता. गुणनिधी बोले ते हंसू येईल असें असे. महासेन विरंगुळ्यासाठी गुणनिधिला बोलवी आणि त्याच्याशी गप्पा गोष्टीत वेळ घालवी.

गुणनिधीच्या मनात देवभक्ती फार होती. भारतात जितकी तीर्थक्षेत्रे आहेत त्यांच्या दर्शनास जाऊन पुण्य संपादन करण्याची त्याच्या मनात फार इच्छा होती. कोशल देशात गावोगावी थोर देव व देवळे आहेत. एवढेच नव्हे तर खोल जंगलात सुद्धा देवळे आहेत हे ऐकून त्या देशाच्या प्रवासाला तो निघाला.

श्री गो. ना. सरनाईक

गुणनिधीचा प्रवास सुखाचा व्हावा व लवकर व्हावा म्हणून राजपुरोहिताने एक रथ आणि उत्तम सारथी बरोबर दिला होता. कोशल देशात पाऊल टाकले ते रामपूर या गावीच. त्या गावी शंकराचे नटराज रूप असलेले देऊळ होते. ग्रामस्थांनी नटराजाचे एक सुंदर देऊळ बांधले होते. गुणनिधी ते देऊळ पाहूनच देहभान विसरला आणि सरळ देवळाच्या गर्भगृहात जाऊन "शंभो, हरहर, महादेव!" म्हणून मोठ्याने ओरडला. त्याची ती आरोळी ऐकून दुसऱ्या क्षणाला दोघे शिपाई कोठून तरी धावत आले व त्यांनी त्याला अटक केली.

"म्हणजे, हे काय?" आश्चर्यचकित होऊन गुणनिधीने विचारले.

"गर्भगृहात ओरडणे हा एक गुन्हा आहे. चल, पाटलांकडे!" शिपाई म्हणाले.

त्याला तो नियम माहीत नव्हता. त्याचा पहिलाच गुन्हा आहे तेव्हां त्याला मेहरबानी करून सोडून द्यावे अशी त्याने विनवणी केली, परंतु शिपायांनी त्याला सोडले नाही. निरुपाय होऊन त्याला त्यांच्या बरोबर पाटलाकडे जावे लागले.

हे सर्व देवळातच पहात असलेला एक तरुण युवक गुणनिधी जवळ जाऊन कानात हळूच म्हणाला—"बिचाऱ्या ब्राह्मणा! यांच्याशी उगाच भांडण कशाला? प्रत्येकाला



एकेक रुपया देऊन सुटका करून घे." गुणनिधीने लगेच एकेक रुपया दोघां शिपायांना दिला आणि स्वतःची सुटका करून घेतली. दोघे शिपाई काही बोलल्याशिवाय निघून गेले.

गुणनिधीला हा एक नवीन व विचित्र अनुभव होता. तो महासेनाच्या साम्राज्यात सर्वत्र फिरून आला होता. परंतु असला अनुभव पूर्वी कधी आला नव्हता. म्हणून काहीं वेळ तो विचार करीत उभा राहिला. त्यानंतर गुणनिधीने त्या तरुणाचे आभार मानले व आश्चर्यचकित मुद्रेने गर्भगृहात देवाचे नाव घेण्यात अपराध असा काय झाला, त्याला विचारले.



तो तरुण स्मित करून म्हणाला—" या देशात हा गुन्हा आणि तो गुन्हा नाही असा कायदा म्हणशील तर काही एक नाही. केव्हां कोणता गुन्हा ठरेल हे आम्हांला या देशाच्या नागरिकांनाच माहीत नाही. आम्हांला एक गोष्ट माहीत आहे की राजाच्या शिपायांनी गुन्हा सांगून आम्हांला कैद केले की त्यांच्या हातावर चार पैसे ठेवायचे आणि स्वतःला सोडवून घ्यायचे. पाटलासमोर जावेच लागले तर त्याची आणखी जास्त मोठी मूठ भरायची."

गुणनिधी चकितच होऊन गेला. हा उघड लाचलुचपतीचा प्रकार आहे, म्हणावयाचा चक्रवर्तीला या गोष्टीची

अशा राजवटीला आळा घातला असता. परंतु चक्रवर्तीशी त्याची चांगली ओळख असल्याची गोष्ट कळू न देता तो म्हणाला—" म्हणजे पाटील सुद्धा लांच खातो म्हणावयाचा. तर मग तुमच्या महाराजांच्या कानापर्यंत ही गोष्ट का नाही नेत?"

" फिर्याद काय करणार? तो राजाचा मेहुणा आहे ना!" तो तरुण म्हणाला.

तो स्वतः राजपुरोहिताचा नातेवाईक असल्याचे गुणनिधीने सांगितल्यावर तो तरुण म्हणाला—" आपण ही गोष्ट पाटील-बुवांना सांगितली तर या पुढे तुम्हांला कोणत्याही प्रकारचा त्रास सहन करावा लागणार नाही."

गुणनिधीने तसे केले. त्यानंतर त्याला त्या गावात कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही. सर्व गोष्टी सुरळीतपणे चालू राहल्या. इतर गावात देखील तो तसेच करीत गेल्यामुळे त्याला कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाही व त्याची तीर्थयात्रा निर्विघ्नपणे पार पडली. परंतु त्याला प्रत्येक गावी रामपूरला आलेला लाचखाऊपणाचा अनुभव मात्र आला. त्या देशाचीप्रजा असो किंवा नसो, त्याला राजाचे शिपाई भय दाखवून लाच घेत आणि आपल्या

त्यांची तोंड कसे बंद करीत हे त्याला आढळून आले. अधिकाऱ्यांविरुद्ध राजाकडे गाऱ्हाणे न्यायला लोकांना भीती वाटे. कारण त्यांच्या पैकी प्रत्येक जण महाराजांचा मेहुणाच असायचा.

प्रत्येक गावातले गावकरी म्हणत— " आमच्या गावचा पाटील राजाचा मेहुणा झाला आहे, आतां आम्ही काय करायचं?"

गुणनिधी तीर्थयात्रा संपवून परत आलेला कळल्यावर राजाने त्याला बोलवून त्याचे प्रवासाचे अनुभव विचारले. गुणनिधीने एकामागून एक आपले सर्व अनुभव वर्णन करून सांगितले व म्हणाला—" द्वारकेच्या त्या कृष्णानंतर कित्येकांना आपला मेहुणा करून घ्यायचे भाग्य फक्त कोशलच्या महाराजांनाच मिळाले असेल."

महाराज हसत गुणनिधीला म्हणाले— " मोजून हिशोब नाही का लावलात किती होते ते मेहुणे?"

" हिशोब काय लावणार? प्रत्येक गावात आहे ना महाराजांच्या बायकोचा भाऊ! राज्याची कामे पाहणारे सर्व अधिकारी महाराजांचे मेहुणेच तर आहेत!"

या खेपेस महासेन महाराज हसले नाहीत. त्यांनी गुणनिधीला विचारून



कोशल देशातल्या प्रजेने जे काही सांगितले ते खरे असल्याची स्वतःची खात्री करून घेतली. यात काही तरी गुपित असले पाहिजे असे त्यांना वाटले. कोशल राजाला दोन राण्या आहेत, एवढे महासेनाला चांगले माहीत होते. त्या दोघीत महासेन चक्रवर्तीची एक धाकटी बहीणच होती. अशास्थितीत कोशलचा राजा राज्य कार-भार कसा चालवीत असणार? कोशल राजाच्या दुसऱ्या राणीला इतके भाऊ असणे अशक्यच होते.

गुणनिधीला निरोप दिल्यानंतर महासेन महाराज काळजीत पडले. त्यांनी योजलेल्या योजना किती चांगल्या असल्या तरी त्या

अमलात आणणारे लोक योग्य आहेत की नाही हे आपण पाहिले नाही. आपण सुरू केलेली योजना इतर सर्वत्र यशस्वी झाली, परंतु कोशल राज्यात ती यशस्वी झाली नाही याचे कारण कोशल राज्यातली अव्यवस्थाच असली पाहिजे, या गोष्टीची खात्री होताच त्यांनी दोघां विश्वासपात्र हेरांना कोशल देशात पाठविले. त्यांनी कोशल देशात हिंडून चक्रवर्तीला हवी असलेली सर्व माहिती पुरविली.

गुणनिधीने सांगितले होते ते खरे निघाले. राज्यात प्रजेचा कैवारी कोणी नव्हता. अधिकारी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून स्वतःची तुंबडी भरीत होते. अधिकाऱ्यांची नेमणूक त्यांची योग्यता पाहून होत नव्हती. उदाहरणार्थ कोशल देशाचा सेनापती शूरसिंह याने हातात कधी तलवार धरली असेल तर शपथ. त्याचा पराक्रम काय तो त्याच्या नावात होता. तो कोशल राजाचा मेहुणा होता. म्हणून व इतर कारणामुळे राज्याच्या सर्व

ओळखी.

हें सर्व ऐकून महासेन राजाला एकदम डोळे उघडल्यासारखे वाटले. कारण कोशल राज हा त्याचा मेहुणाच होता आणि आपल्या मेहुण्याच्या बेफिकीरपणामुळे राज्यात अव्यवस्था पसरली होती. तो सांगे ते महासेन खरे मानीत असे. अशा या अंध विश्वासाचा दुष्परिणाम प्रजेला भोगावा लागावा, या बद्दल महासेनाला फार वाईट वाटले.

महासेनाने तावडतोब आवश्यक पावले टाकून जे अयोग्य अधिकारी होते त्यांना कामावरून काढून टाकले. काही वर्षांनी पुन्हां कोशल देशाची भरभराट होऊन प्रजा सुखी झाली. महासेन त्या देशात प्रवास करीत असतां गावकरी म्हणू लागले—"आतां आमच्या गावचे पाटील महाराजांचे मेहुणे राहिले नाहीत हो! म्हणून प्रजा फार सुखी आहे!"





# खट्याळपणा गेला

मेघना नदीच्या काठी सुरूपा नावाचे एक सुंदर गाव आहे. त्या गावाला भरपूर पाणी आहे, पीकपाणी चांगले असते. म्हणून वृक्षलता नेहमी फुलांफळांनी नटलेल्या असतात. गावकरी मेहनती आणि सरळ स्वभावाचे आहेत.

त्या गावात दीनानाथ नावाचा एक सुखवस्तू गांवप्रमुख रहात असे. तो हुशार होता आणि सज्जनपण होता. स्वतःच्या स्वार्थासाठी तो कोणतेही काम करीत नसे. त्याच्या हातून गावकऱ्यांच्या हिताची जी कामे होण्यासारखी असत ती तो बिनचूक करी. म्हणून गावकरी त्याच्या शब्दाबाहेर एकही काम करीत नसत.

दीनानाथला फार उशिरां म्हणजे पन्नाशीत पोचल्यावर एक मुलगा झाला. मुलाचे नांव हरिनाथ असे होते.

वयाबरोबर हरिनाथाचा खट्याळपणा वाढू लागला. तसा अभ्यासात तो हुशार होता. सहाव्या वर्षी त्याला शाळेत घातले. सुरवातीपासून तो वर्गात पहिला राही. कोणतीही गोष्ट एकदां किंवा दोनदां ऐकली की त्याला ती तोंडपाठ होई. तो पुस्तक उघडून क्वचितच बसत असे.

परंतु नवनवीन उपद्रव कैरणे व त्यात आनंद व मौज मानणे हा त्याचा नित्याचा उद्योग होता. कोणाच्याही बागेत किंवा मळ्यात शिरावे, कच्ची पिकलेली फळे जी हाताला येत ती खावी किंवा झाड हलवून खाली जमिनीवर पाडावी, अगर तोडून खाली फेकावी. झाडाच्या फांद्या तोडाव्या. गोठ्यात शिरून गुरांना सोडून द्यावे आणि गावकऱ्यांना नको जीव करून सोडावे हा त्याचा नित्याचा खेळ होता. झाडावरच्या पक्ष्यांना तो फार त्रास देई.

श्री ए. सी. सरकार, जादूगार



दगड मारून त्यांना ठार करी किंवा त्यांच्या घरट्यांत शिरून त्यांची अंडी बाहेर फेकून देई.

गावातल्या मोठ्या तळ्याच्या काठी एक मोठी आमराई होती. तीत पोपटांचे थवेच्या थवे रहात होते. हे पोपट फार सुंदर होते आणि गांवकऱ्याना करमणुकीचे एक साधन होते. परंतु हरिनाथाच्या खट्याळपणामुळे त्यांचे जीवित कष्टाचे झाले होते. त्यांची संख्या कमी कमी होऊ लागली होती. पोपट पकडून विकणारांचे नुकसान होऊ लागले होते ते निराळेच.

एकदा हरिनाथ पक्ष्यांचे घरटे शोधीत एका उंच ताडावर चढला. त्याने ताडाच्या [illegible] साठी हात पुढे केला मात्र त्याला सापाचा फूत्कार ऐकू आला. त्याने चटदिशी हात मागे घेतला, परंतु त्याला साप चावलाच. विषाचा परिणाम होऊन हरिनाथ थोड्याच वेळात बेशुद्ध होऊन झाडावरून खाली पडला. सुदैवाने ताडाच्या झाडाखाली बराचसा चिखल होता, म्हणून हाडबीड मोडले नाही की विशेष लागले नाही. तरी एक बारीकसे बोटाचे हाड मोडलेच. गावात सापाचे विष उतरविणारे मांत्रिक होते व औषधपाणी करणारे वैद्य होते, कदाचित साप तितका विषारी नसेल ही. म्हणून हरिनाथ वांचला. परंतु त्याचे बोटाचे हाड मात्र बरे व्हायला बरेच दिवस लागले.

त्यापूर्वी दीनानाथने आपल्या उपद्रवी मुलाचा खट्याळपणा कमी करण्यासाठी निरनिराळ्या तऱ्हेने प्रयत्न करून पाहिले. त्याला बडविले, रागावला, त्याला उपाशी ठेवले, खोलीत कोंडून ठेवले. परंतु,ते सर्व प्रयत्न निरुपयोगी ठरले. ही घटना झाल्या-नंतर मुलाच्या खट्याळपणाला थोडा तरी आळा बसेल असे दीनानाथला वाटले होते, परंतु ते झाले नाही. हरिनाथने आपला इतर खट्याळपणा सोडला, परंतु पक्ष्यांची घरटी काढण्यासाठी झाडावर चढणे मात्र त्याचे सुटले नाही.

[illegible] त्याला म्हणाला— "कशाला रे इतका निर्दय-पणा करतोस? पक्ष्यांना मारण्यात तुला आनंद तो काय वाटतो? तुला साप कां चावला, कळलं का? तू त्यांना त्रास देतोस म्हणून साप तुला चावला."

"नाही, काका! मी पक्ष्यांना हल्ली त्रास नाही देत! फक्त त्यांची मी अंडी काढून खेळतो, गोट्यांसारखी!" हरिनाथ म्हणाला.

"अरे, अंड्यात सुद्धा जीव असतो. अंड्यात प्राण नसतो वाटलं का तुला? तुला माहीत नाही वाटते, अंड्यात सुद्धा जीव असतो, हे?" सोमनाथ म्हणाला.

"सगळं खोटं काका! अंडी गोट्यां-सारखी असतात. पक्षी ती घेऊन खेळतात. आपण बदकांची अंडी नाही का खात? अंड्यांनी खेळायला काय हरकत आहे? ती खेळण्यासाठीच तर असतात!" सोमनाथ म्हणाला.

"तुला मी खरं सांगतो अंड्यात सुद्धा जीव असतो." सोमनाथ म्हणाला.

"नाही, काका! अंडी कोठे हलतात किंवा चालतात का? बोलतात का? त्यात जीव आहे हे कसं मानायचं? गोट्यात जेवढा जीव असतो तेवढा त्यांच्यात असतो." हरिनाथ म्हणाला.

"बरं तर, अंड्यात जीव असतो हे दाखवून दिलं तर तू त्यांना हात लावायचे



व इतर दंगामस्ती सोडशील का? सोडीन म्हणून शपथ घेऊन सांग." सोमनाथ म्हणाला.

"मी ते सर्व सोडीन, पण तुम्ही अंड्यात जीव असतो हे सिद्ध करून दाखविले पाहिजे!" हरिनाथ म्हणाला.

"अंडे स्वतः हलते, हे मी दुपारी तुला दाखवून देतो. पहा बरं, तु शपथ घेऊन त्यानंतर अंड्यांना हात लावणार नाहीस हे कबूल कर. उद्यापासून तु चांगल्या मुला-सारखं वागलं पाहिलेस? आहे कबूल?" सोमनाथ म्हणाला.

"शपथ घ्यायला तयार आहे, पण आधी अंड्यात जीव असतो हे दाखविले पाहिजे." सोमनाथ म्हणाला.

इंद्रजाल विद्येत निपुण अशा सोमनाथला अंड्यात जीव असतो हे दाखविणे, तेवढे कठीण नव्हते. त्याने पोपटाचे एक अंडे आणविले आणि त्याच्या एका टोकाला एक लहानसे भोक करून अंड्यातला सर्व बलक बाहेर काढला. अंडे आतून स्वच्छ [illegible] काढले. नंतर अंडे कोरडे झाल्यावर [illegible] बंद केले. किड्याला हवा मिळावी म्हणून दुसऱ्या जागी एक बारीक भोक करून ठेवले. असे तयार केलेले अंडे त्याने हरिनाथला दाखविले.

काकाने बोलावल्याबरोबर हरिनाथ एका खुर्चीवर येऊन बसला. शेजारच्या टेबलावर सोमनाथने ते अंडे आणून ठेवले. एका मिनिटात ते अंडे हलू लागले.

"पाहिलेस हरिनाथ? अंडे हलू लागले! त्यात जीव आहे!" सोमनाथ म्हणाला.

स्वतःच्या डोळ्यांनी अंडे हालत असलेले पाहिल्यावर त्यात जीव नाही असे हरिनाथ तरी कसे म्हणणार? त्याने देवाची शपथ घेऊन त्या दिवसापासून अंड्याला कधी हात न लावण्याची शपथ घेतली. हरिनाथ त्या दिवसापासून पूर्ण बदलला आणि गावातल्या हुशार व शहाण्या मुलात त्याची गणना होऊ लागली.



## वायफळ गप्पा

एका जंगलाच्या वाटेने पांच जण प्रवासी जात होते. त्यांच्यापैकी एकजण आंधळा होता, तर दुसरा बहिरा होता, तिसरा दोन्ही पाय गेलेला पांगळा होता, तर चवथा दोन्ही हात गेलेला थोटा होता आणि पांचवा अंगावर लंगोटीशिवाय दुसरे काही नसलेला दरिद्री माणूस होता.

बहिरा एकाएकी ओरडला–"दूर घोडे धावत पळत असल्याचे त्यांच्या टापावरून ऐकू येत आहे. चोर किंवा लुटेरे येत असावेत."

लगेच आंधळा म्हणाला–"ते पहा धुळीचे लोट आकाशापर्यंत उडत आहेत." आंधळ्याच्या खांद्यावर बसलेला पांगळा म्हणाला–"तर मग चला तर पळ काढू या, पायात शक्ती आहे तोंवर!"

ते ऐकून थोटा म्हणाला–"चल चल! पळायचे काय म्हणून? चोराशी दोन हात केल्याशिवाय जायचे का? त्यांची खोड मोडू या!"

ते सर्व ऐकत उभा राहलेला तो दरिद्र म्हाणाला–"ते चोर येऊन मला लुटून नेईपर्यंत तुम्ही या वायफळ गप्पा मारीत बसणार काय?"





# बिंग फुटले

गोपाळपूर नावाच्या गावी शिवशर्मा नावाचा एक तरुण युवक रहात होता. त्याला आईबाप किंवा इतर कोणी नव्हते. त्याच्याजवळ त्याच्या वाडवडिलांकाळातला एक हिरा होता. तो कोठे तरी गहाण ठेवून कर्ज काढावे आणि व्यापार करावा असे त्याने ठरविले. त्याने वीरूशेट नावाच्या एका सावकाराकडे हिरा गहाण ठेवून थोडे पैसे कर्जाऊ घेतले.

नंतर थोडा माल विकत घेऊन आठवड्याचा बाजार एका गावी लागला होता, तेथे तो माल विकायला बसला.

वीरूशेटला हिऱ्यांची थोडी फार माहिती होती. शिवशर्माने त्याच्याकडे ठेवलेला हिरा खरा आहे हे ओळखले. शक्य झालं तर तो हिरा पचवायचे त्याने मनाशी ठरविले. त्याने तो बायकोला दिला आणि जपून ठेवायला सांगितले.

वीरूशेटची बायको नवऱ्याला म्हणाली– "नकली हिरे विकणाऱ्या व्यापाऱ्याकडून असाच एक हिरा घेऊन तो शिवशर्मा कर्ज फेडायला येईल तेव्हां त्याला द्या. हा राहील आपल्याजवळ!"

वीरूशेटला बायकोचा तो सल्ला फारच पसंत पडला. तो नकली हिरा विकत घेऊन आला.

शिवशर्माला व्यापारात फायदा झाला. त्याने व्याजासह कर्जाची रक्कम आणून वीरूशेटला दिली आणि पावती घेऊन हिरा मागून घेऊन गेला.

शिवशर्माला घरी गेल्यावर तो हिरा त्याचा नसल्याचा संशय आला. नकली हिरा घेऊन तो सरळ न्यायाधिशाकडे गेला आणि घडलेली गोष्ट सांगून त्याने तो हिरा त्याचा नसून वीरूशेटने खरा हिरा दाबून ठेवून नकली हिरा देऊन

श्री सुधाकर र. जाधव

न्यायाधिशाला सुद्धा तो हिरा नकली असावा असा संशय आला. त्याने एका हिरालाल नावाच्या रत्नपारख्याला दाखवून तो खरा आहे की खोटा, पाहून सांगायला सांगितले. हिरालालने लक्षपूर्वक हिरा खालीवर करून पाहिला आणि नकली कांचेचा असल्याचे सांगितले.

वीरूशेटची लबाडी न्यायाधिशाला कळली. त्याने वीरूशेटकडून खरा हिरा काढण्यासाठी एक युक्ती योजली आणि हिरालाल व शिवशर्माला ती समजावून सांगून त्याप्रमाणे वागायला सांगितले.

न्यायाधिशाने सांगितल्याप्रमाणे शिवशर्मा वीरूशेटकडे गेला आणि नकली हिरा त्याला दाखवून म्हणाला–"हा हिरा मी तुमच्याकडे ठेवलेला हिरा नाही. हा नकली हिरा आहे. माझा मला परत द्या."

"मी तुझाच हिरा तुला परत दिला. मी तुझा हिरा खायला ठेवून घेतला आहे का? मी तुझा हिरा बदलून काय करणार? मी काय हिऱ्याचा व्यापारी आहे का?" वीरूशेट बतावणी करू लागला.

"हे पहा, तसे असेल तर चला, न्यायाधिशाकडे. ते न्याय निवाडा करतील तसे करू या." असे सांगून शिवशर्मा वीरूशेटला न्यायाधिशाकडे घेऊन गेला.



न्यायाधीश, जणुकाही फिर्याद नव्यानेच ऐकत आहे असे दाखवीत म्हणाला–"तुम्ही त्याचा हिरा परत दिला, म्हणतां आहां आणि शिवशर्मा तो नकली असल्याचे सांगतो आहे. आपण रत्नपारख्याला दाखवून विचारू या, म्हणजे कळेल, खर काय ते!"

रत्नपारखी पाहणार म्हटल्याबरोबर वीरूशेट घाबरला. आपलं बिंग फुटलं तर गावात तोंड दाखवायला जागा उरणार नाही, असा त्याने विचार केला. काय करावे त्याला सुचेना.

इतक्यात रत्नपारखी हिरालाल आला. त्याने तो हिरा फार काळजीपूर्वक पाहिला व म्हणाला–"हा हिरा तर अस्सल

हिरा आहे. फार मूल्यवान आहे." त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्य झळकत होते की अशा खऱ्या हिऱ्याचा संशय कोणाला कसा काय यावा ?

ते ऐकून वीरूशेटला फारच आश्चर्य वाटले. परंतु त्याने ते चेहऱ्यावर उमटू दिलं नाही आणि गंभीर चेहरा करून बसून राहला.

न्यायाधीश म्हणाला–"वीरूशेटांसारख्या नामवंत सावकारावर संशय घेणे शहाण-पणाचे नाही. अशी फिर्याद करणे तर मोठीच चूक. तेव्हां शिवशर्मा तुम्ही आपला हिरा घेऊन आतां खुशाल घरी जा." नंतर कष्ट दिल्याबद्दल न्यायाधिशाने वीरूशेटची क्षमादेखील मागितली.

वीरूशेट आनंदाने घरी निघाला. परंतु तो घोटाळ्यात पडला की नकली हिरा पाहून तो रत्नपारखी हिरालाल सुद्धां कसा फसला ? कदाचित घाईगर्दीत खरा हिराच तर नाही आपण शिवशर्माला काढून दिला ? घरी येताच वीरूशेट बायकोला म्हणाला–

"[illegible] घाई गर्दीत न शिवशर्माला [illegible] नाही दिलास ? हिरे पाहताना त्याच्या जागी हा आणि ह्याच्या जागी तो तू ठेवला असशील. झोपली तर नव्हतीस ? आण पाहू लौकर तू आत ठेवलेला हिरा पाहू दे तरी !"

ते ऐकून वीरूशेटची बायकोसुद्धा गोंधळली. तिने धावत जाऊन जपून ठेवलेला हिरा आणून नवऱ्याच्या हातात दिला. त्या वेळी खिडकीतून न्यायाधीश स्वतः व शिवशर्मा आत काय चालू आहे हे पहात असतील, याचे भान दोघां नवराबायकोला राहले नाही. परंतु ते कळल्यावर मात्र दोघांचा चेहरा खाडकन् उतरला.

न्यायाधिशाने दार उघडायला सांगितले आणि आत जाऊन म्हणाला–"खरा हिरा बाहेर काढण्यासाठीच आम्ही हे नाटक रचले होते." त्याने तो हिरा शिवशर्माला देववून फसवेगिरी केल्याबद्दल वीरूशेटला दंड केला.



# डोक्याची किंमत

एकदां अशोक राजा आपल्या मंत्रीवगैरे बरोबर कोठेतरी जात असतां वाटेत एक बौद्ध भिक्षु दिसले. अशोक महाराजांनी वाकून त्यांना नमस्कार केला व त्यांच्या पायां पडले.

नंतर प्रधान अशोक महाराजांना म्हणाले–"महाराज ! वाटेत आपणाला जो जो बौद्ध भिक्षु भेटतो त्याच्या पायां पडून नमस्कार करणे बरोबर नाही. आपण पुन्हां कधी कोणाला असा नमस्कार करू नये. अशी आपणांजवळ नम्र विनंती आहे."

दुसऱ्या दिवशी अशोकाने आपल्या मंत्र्याला एक बोकडाचे, एक वाघाचे आणि एक माणसाच्या प्रेताचे अशी तीन डोकीं दिली आणि ती विकून जी किंमत येईल त्या किमतीला विकून यायला सांगितले. मंत्री एका नोकराला तीन डोकी घेऊन बरोबर चलायला सांगून ती विकायला निघायला. बोकडाचे डोके तावडतोब विकले गेले. नंतर वाघाचे डोके विकत घ्यायला बरेच लोक आले. दिवाणखान्यात शोभेसाठी ठेवतां येईल असे त्यांना वाटले. परंतु माणसाचे डोके विकत घ्यायला कोणी आला नाही. म्हणून मंत्री अशोक महाराजाकडे आला आणि ते कोणी विकत घ्यायला तयार नसल्याचे सांगितले.

"पाहिलेत मंत्री ! माणसाच्या डोक्याला काही किंमत नाही. असे डोके नम्रपणे बौद्ध भिक्षूला समर्पित केले तर त्यात कमीपणा कसला ?" अशोकाने विचारले.





# बोक्याचा पहारा

फार पूर्वीची गोष्ट आहे, एका राजाला चार मुलगे होते. ते नेहमी अंतःपुरात सकाळपासून संध्याकाळपर्यंत रहात. जगाचा अनुभव घेतल्याशिवाय राज्याच्या जबाबदारीची कामे मुलांना कशी सांभाळता येतील, याची राजाला काळजी वाटू लागली. म्हणून राजाने त्यांना एकदां बोलाविले आणि म्हणाला–"मी रात्रंदिवस किल्ल्यातच असल्यामुळे जगात काय काय घडते आहे ते मला कळत नाहीसे झाले आहे तेव्हां तुम्ही चौघे बाहेर हिंडून फिरून मला राज्यांत विशेष असे काय पाहिलेत येऊन सांगा."

दुसऱ्या दिवशी पहाटे चौघे मुलगे घोड्यावर बसून निघाले. राजधानीच्या बाहेर एक जंगल होते. तेव्हां मोठा मुलगा म्हणाला–"आपण चौघे चार दिशांना जाऊ या आणि आपण जे काही विशेष पाहूं बाबांना येऊन सांगू." असे सांगून तो उत्तर दिशेने निघाला.

थोरला मुलगा निघून गेल्यावर दुसऱ्याच्या मनात एक शंका आली, दादावर एखादे संकट आले तर त्याला मदत कोण करणार? असा विचार करून तोदेखील उत्तरेकडे निघाला.

दोघे थोरले उत्तर दिशेने निघाले तेव्हां तिसरादेखील त्याच दिशेने निघाला. त्याच्या पाठीमागून थोड्या वेळाने चवथा सुद्धा त्याच वाटेने निघाला.

थोरला काळोख होईपर्यंत एका नदीच्या काठी येऊन पोचला. नदीलगत एक डोंगर होता. त्या डोंगरावर एक जुनाट घर होते. थोरल्याने ती रात्र त्या घरात काढायचा विचार केला. त्याने घोड्याला टेकडीच्या पायथ्याशीच सोडले व टेकडी चढून वर गेला.

श्री रं. रा. धारप

[illegible] त्याच्या ओसरीत एक काळा बोका बसलेला होता. तो थोरल्या भावाला पाहून विचित्र असा आवाज काढून बाजूला झाला.

थोरल्याने वाड्याचे दार बराच वेळ वाजविल्यावर दार उघडून एका योगिनीने बाहेर तोंड काढून पाहिले. तिचे केस योग्यांबैराग्यां सारखे बांधलेले होते. तिच्या अंगात एक भगवी कफनी होती. तिच्या गळ्यात रुईच्या फुलांची माळा होती. तिचे डोळे घारे चकचकीत होते.

"बोका बरा पाहारा देतो आहे की! दार लाव रे!" असे म्हणत ती आत गेली.

थोरला भाऊ दार लावून आत गेला त्या योगिनीने कोनाड्यातली पणती काढून लावली. त्या खोलीत खिडकीतून चांगला वारा आत येत होता. कारण तो वाडा उंच टेकडीवर होता आणि खिडकीच्या खालूनच बाजूने नदी वहात होती.

थोरल्याने योगिनीला विचारले–"खायला आहे का काही?"

"मासा पाहिजे की शिळा भात?" योगिनीने विचारले.

"मासा पाहिजे!" थोरला म्हणाला.

"तर मग, तूच मासा हो!" असे म्हणत योगिनीने तिच्या गळ्यातल्या रुईच्या



फुलांच्या माळेतले एक फूल काढून थोरल्याच्या अंगावर फेकले.

लगेच थोरला एक मासा होऊन जमिनीवर तडफडू लागला. योगिनीने विकट हास्य हसून त्या माशाला उचलले आणि मडक्यातल्या पाण्यात त्याला टाकले.

तोंपर्यंत दुसरा नदी काठावर येऊन पोचला होता. तेथे त्याला थोरल्याचा घोडा चरत असलेला दिसला आणि टेकडीवरचा पडका वाडा दिसला. त्याने थोरला भाऊ वाड्यात गेला असावा हे ओळखले. त्याने आपला घोडा चरायला सोडला आणि डोंगर चढून गेला.

घरासमोर बसलेला काळा बोका दुसऱ्या भावाला पाहून एक विचित्र आवाज काढीत



बाजूला निघून गेला. दुसऱ्याने दार खडका-वल्यावर योगिनी दार उघडून म्हणाली– "पाहतांच भयभीत करून सोडणारा बोका पाहारा देण्याऐवजी समोर बसून राहला आहे वाटते? दार लावून ये!" असे म्हणत घरात निघून गेली.

दुसरा भाऊ दार बंद करून आत गेला व त्याने योगिनीला काही खायला असले तर द्यायला सांगितले.

"शिजवून घालायला मडक्यात मासा आहे, पानात वाढू की चांदीच्या ताटात?" योगिनीने विचारले.

"चांदीच्या ताटातच वाढ!" दुसरा भाऊ म्हणाला.

असे म्हणत योगिनीने रुईचे एक फूल माळेतून काढून त्याच्या अंगावर टाकले.

दुसरा भाऊ लगेच चांदीचे ताट झाला.

योगिनीने विकट हास्य केले. तितक्यात पुन्हां दार वाजले. योगिनीने दार उघडून काळ्या बोक्याला दटाविले आणि तिसऱ्या भावाला आत यायला सांगितले. तिसरा दार बंद करून आत आल्याबरोबर म्हणाला– "भूक लागली आहे!"

योगिनी म्हणाली–"मासे आहेत शिज-वायला आणि जेवायला चांदीचे ताट आहे. झोपायला रेशमी गादी पाहिजे की चटईवर भागेल?"

"रेशमी गादी हवी!" तिसरा म्हणाला. योगिनीने त्याला रेशमी गादी केले आणि सैंपाकाच्या तयारीला लागली.

चवथा भाऊ नदी काठी तीन घोडे चरत असलेले पाहून आणि टेकडीवरचा वाडा पाहून त्याचे तिन्ने मोठे भाऊ तिकडेच गेले असावेत असा विचार करून टेकडी चढून गेला. त्याला पाहून समोर दारात बसलेला काळा बोका विचित्र आवाज करीत बाजूला निघून गेला. धाकट्याने दार वाजवताच योगिनीने दार उघडले.

धाकटा आत गेला नाही. दारातच उभा राहला. त्याला आत आणखी कोणी



नीला विचारले–"माझे तिन्ने भाऊ इकडे आले. दिसत नाहीत?"

तो पडका वाडा पाहून आणि त्या योगिनीला पाहून धाकट्या भावाला थोडा संशय आला.

योगिनी तोंड वाकडे करून म्हणाली– "वाटेने किती लोक जातात! मी सर्वांची चौकशी करीत बसते की काय? आत यायचे असेल तर दार लावून आत ये. बाहेर बोका पाहारा देतोच आहे!" असे म्हणत ती आत निघून गेली.

धाकट्याला योगिनीचे बोलणे वागणे थोडे विचित्रच दिसले. त्याने कमरेचा दुपट्टा सोडला आणि त्या काळ्या बोक्याच्या अंगावर टाकून त्याला चटदिशी पकडून खाकेत धरले आणि आत जाऊन दार बंद केले.

तो आत येताच मडक्यातला मासा उड्या मारू लागला. चांदीच्या ताटावर रेशमी गादीवर रुईचे एकेक फूल होते. धाकट्याचा संशय जास्तच वाढला.

तो काहीच बोलला नाही हे पाहून योगिनीने विचारले–"मडक्यात ताजा मासा आहे, खातोस का, वाढते!"

"मासा कशाला? खाकेत मी खाणं आणलं आहे." धाकटा म्हणाला.



"ते खायला चांदीचं ताट पाहिजे का!" योगिनीने विचारले.

"एक घासभर तर खायचं, त्याच्या साठी चांदीचे ताट कशाला?" धाकटा म्हणाला. योगिनीच्या घाऱ्या डोळ्यात रागाची एक लाल झांक दिसली.

"खाऊन पिऊन घेतल्यावर झोपायला रेशमी गादी ठेवू का तयार करून?" योगिनीने विचारले.

"गवतावर पडून झोपणाऱ्याला रेशमी गादी कशाला?" धाकट्याने विचारले.

आतां मात्र योगिनी स्वतःचा राग आवरू शकली नाही. म्हणाली–"थोरल्या तिघपेक्षा तुझ्या डोक्यात चरबी जास्त

चढलेली दिसते आहे. तुझी सर्व चरबी आता उतरवते पहा!" असे म्हणत ती रुईचे फूल माळेतून काढू लागली.

इतक्यात खाकेतला बोका इतक्या जोराने ओरडला की सर्व खोली दुमदुमली. ते ओरडणे ऐकून योगिनीचे सर्वांग पाया-पासून डोक्यापर्यंत हादरले. धाकट्याने चटदिशी योगिनीच्या गळ्यातली रुईच्या फुलांची माळ तोडून फेकून दिली आणि बोक्याला योगिनीच्या अंगावर फेकले, बोक्याने तिचे सर्व तोंड ओरबाडून तिचे दोन्ही डोळे फोडले. योगिनी घाबरून जाऊन खिडकीपर्यंत पळत गेली आणि खिडकीतून बाहेर पळून जाण्याच्या प्रयत्नात नदीत पडली आणि धारेबरोबर वाहू लागली.

धाकट्याने रुईच्या फुलांची माळ नदीत फेकून दिली.

दुसऱ्या क्षणाला मासा, चांदीचे ताट आणि रेशमी गादी बदलून त्यांच्या जागी त्याला त्याचे तिघे मोठे भाऊ दिसले.

"चला परत जाऊ या घरी." थोरला म्हणाला.

धाकट्याने तो बोका कोठे आहे, खूप शोधून पाहिले, परंतु कोठेच सांपडला नाही.

मुलगे इतक्या लौकर परत आलेले पाहून राजाला फार आश्चर्य वाटले. म्हणाला— "इतक्या लौकर परतलात? काही विशेष पाहिलेत का?"

"मनुष्य मासा कसा होतो, याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला बाबा!" थोरला म्हणाला.

"मनुष्य चांदीचे ताट कसा होतो, याचा अनुभव घेतला मी, बाबा!" दुसरा म्हणाला.

"मनुष्य रेशमी गादी कसा होतो, याचा अनुभव मी घेतला." तिसरा म्हणाला.

"एक मासा, एक चांदीचे ताट आणि एक रेशमी गादी बदलून माझे तिघे भाऊ कसे होतात, हे मी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले बाबा!" सर्वांत धाकटा म्हणाला

सर्व गोष्टी कळल्यावर राजाने सर्वांत धाकट्या मुलाची पाठ थोपटली.





# विदूषक

कामंदक नावाच्या एका लहानग्या देशात चंद्रपाल नावाचा राजा राज्य करीत असे. तो आपला दरबारी विदूषक आनंद याच्याशी बुद्धिबळे खेळत असे. खेळात बहुतेक विदूषकाचीच मात होत असे.

एकदा राजाचे लक्ष दुसरीकडे कोठे तरी होते आणि त्यामुळे राजा हारला. राजाने उठून बुद्धीबळाचा पट लाथेने उडवून दिला आणि उठून निघून गेला.

तो सरळ स्नानगृहात गेला आणि घाईत त्याचा पाय गंगाळाला लागला. ते गंगाळ तेथे ठेवणाऱ्या नोकराला कैद करून हजर करा, अशी राजाज्ञा झाली.

आंघोळ करून राजा कपडे घालू लागला. फेटा घट्ट बांधू लागला तेव्हां तो थोडा फाटला. त्याने कपडे ठेवणा-ऱ्याला कैद करून हजर करण्यास सांगितले. बराच वेळ राजा रागात आहे हे पाहून पायातले चढाव आणून ठेवणारा कापऱ्या हातांनी चढाव घेऊन आला आणि घाई गर्दीत उजवा जोडा डाव्या पायाच्या जागी जागी आणि डावा उजाव्याच्या जागी त्याने आणून ठेवला. पायांत चढाव चढेनासा झाल्यावर राजाने खाली वांकून पाहिले. त्याने लगेच चढाव आणून ठेवणाऱ्या नोकराला कैद करायला सांगितले.

त्याच वेळी पलीकडच्या खोलीत विदूषक आपल्या हाती महाराज हारल्याची गोष्ट हसत हसत कोणाला तरी सांगत असल्याचे महाराजांना ऐकू' आले. महाराजांनी विदूषकाला कैद करून हजर करण्यास आज्ञा केली.

अर्ध्या तासाने कोतवालाने चौघां कैद्यांना आणून महाराजांसमोर उभे केले. राजाने आज्ञा केली की या चार जणांना दुसऱ्या दिवशी फांशीची शिक्षा देण्यात यावी.

श्री बाळ गणेश कुळकर्णी

परंतु दुसऱ्या दिवशी सकाळी राजाचा राग एकदम उतरला. त्याने चौघां कैद्यांना समोर हजर करण्यास सांगितले व ते आल्यावर म्हणाला—"तुम्हां चौघांना फाशीची शिक्षा देणे मला बरोबर वाटत नाही. फक्त तिघांना मी सोडण्याचा विचार करतो आहे. तेव्हां तुमच्या पैकी एकाने स्वतःपुढे येऊन फाशी जाण्यास तयार असल्याचे सांगावे म्हणजे मी इतरांना फाशीची शिक्षा माफ करीन."

विदूषक चटदिशी पुढे येऊन म्हणाला—"मला द्यावी शिक्षा! ह्या तिघांची लग्ने झाली आहेत आणि यांना मुलेबाळे पण आहेत. मी काय एकटा आहे. मेलो तरी कोणी उपाशी मरणार नाही."

राजाने तिघांना शिक्षा माफ केली आणि विदूषकाला म्हणाला—"तू कां रे लग्न केले नाहीस?"

तो म्हणाला—"महाराज! माझ्यासारख्या दरिद्र्याला कोण मुलगी देणार? परंतु मरण-समयी माझी एकच एक शेवटची इच्छा

यासाठी एक वर्षभर शिक्षा देण्याचे काम पुढे ढकलण्यात यावे."

राजा ते ऐकून मनातल्या मनात थोडा हसला आणि राजाने एक मुलगी शोधून विदूषकाचे लग्न करून दिले.

एका वर्षाने विदूषकाला एक मुलगा झाला.

राजा विदूषकाला बोलावून म्हणाला—"काय रे! एका वर्षाची मुदत संपली आणि आतां तुला पाणी द्यायला मुलगासुद्धा जन्मला. मग आतां फाशीची शिक्षा द्यायला सांगतो."

"तसं कसं होईल महाराज? त्या दिवशी त्या तिघांना बायको पोरे आहेत म्हणून नाही का शिक्षा माफ केलीत? आतां मला देखील बायको व एक पोरगा आहे?" विदूषक म्हणाला.

"ओहो! तर मग तुलादेखील शिक्षा माफ!" स्मित करून राजा म्हणाला.





# महाभारत

धर्मराजाने व याज्ञिकांनी विचारलेल्या प्रश्नाचे मुंगुसाने उत्तर दिले ते असे—

"मी खोटे बोललो नाही. हा यज्ञ सातूच्या पिठाच्या दानाने बरोबर होणार नाही. मी सांगतो आहे, ती स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलेली गोष्ट आहे. गळून पडलेले धान्य गोळा करून कुरुक्षेत्रात राहणारे मुनी, त्यांचे कुटुंब, मुलगा व सून देखील स्वर्गाला गेले. त्याच्या मुळेच माझ्या शरिराचा अर्धा भाग सोन्याचा झाला आहे.

"मी म्हणालो तो ब्राह्मण, त्याची बायको, मुलगा व सून पक्ष्यांसारखे आयुष्य घालवून, म्हणजे मिळेल त्यावर स्वतःची भूक भागवून घेत. दररोज फक्त एकदाच ते जेवत.

"दुष्काळाचे दिवस होते. वृक्षवनस्पती सर्व वाळून गेले. आतां त्या कुटुंबाला एक वेळदेखील पोटभर अन्न मिळेनासे झाले. एके दिवशी कडक उन्हांत बरेच फिरल्यावर त्याना थोडे धवधान्य मिळाले. त्यांचे पीठ करून त्यांनी ते भिजवून चार गोळे केले आणि ते खायला बसणार इतक्यात त्यांच्या झोपडीत एक अतिथी आला.

"त्यांनी त्या ब्राह्मणाला आत बोलावून नेले. त्याची अर्घ्यपाद्य पूजा केली आणि त्याला दर्भासनावर बसविले. त्या गृहस्थाने सर्वप्रथम आपल्या वांट्याचा गोळा आपल्या अतिथीला खायला दिला. त्या पाहुण्याने तो खाल्यावर आणखी पोट न भरल्याचे दर्शविले. तेव्हां गृहिणीने आपला वांटा त्या ब्राह्मणाला

६३. धृतराष्ट्र वानप्रस्थाश्रमात



खायला दिला. त्या पाहुण्यानं मुलाचा वाटा आणि सुनेचा वांटादेखील खाऊन टाकला. नंतर प्रसन्न होऊन म्हणाला—'मीच यम-धर्मराज आहे. तुम्हांला सर्वांना स्वर्गप्राप्ती होईल!'

"तेव्हां मी आपल्या बिळातून बाहेर आलो. तेथल्या सातूच्या पिठाचा वास घेतल्यामुळे आणि तेथले पाणी प्यायल्या-मुळे माझे डोके व अर्धे अंग सोन्याचे झाले आहे. येथे एक मोठा यज्ञ होणार असल्याचे ऐकून माझे बाकीचे अर्धे अंग सोन्याचे होईल ही आशा लावून मी आलो आहे. परंतु माझी आशा पूर्ण झाली नाही."

असे सांगून तो मुंगूस अंतर्धान पावला.

नसून एक घडलेली घटना होती, ही गोष्ट धर्मराजाला माहीत होती. त्यावरून अतिथी अभ्यागताचा सत्कार कसा करावा लागतो, कधी कधी स्वतः उपाशी राहण्याचा प्रसंग आला तरी गृहस्थ धर्म सोडता कामा नये हा बोध धर्मराजाने घेतला. तो आपल्या भावंडांच्या सल्ल्याप्रमाणे व मदतीने राज्य करू लागला. विदुर, संजय, युयुत्सु आणि कृप धृतराष्ट्राची काळजी वहात. कुंती नेहमी गांधारीबरोबर असे. द्रौपदी, सुभद्रा व पांडवांच्या इतर स्त्रिया दोघां सासवांची काळजी वहात. व्यासमुनी मधूनमधून येत व विचारपूस करून व हिताच्या चार गोष्टी सांगून जात. धर्मराज चुकूनसुद्धा धृतराष्ट्राच्या शब्दाबाहेर रहात नसे. तो मागेल ते किंवा त्याला काय हवे ते तो आणून देई. धृतराष्ट्राला किंवा गांधारीला त्यांच्या पुत्रवियोगाची आठवण होऊ नये याची सर्व पांडव काळजी बाळगीत. फक्त भीमाला धृतराष्ट्राचा तिटकारा वाटत असे.

धृतराष्ट्र दानधर्म करी. ब्राह्मणांना जमिनी दान करी. त्याला न आवडणारी गोष्ट करणाराला शिक्षा केली जाईल अशी धर्मराजाने सर्वांना ताकीद केली होती. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास धृतराष्ट्राचे मुलगे जिवंत असते तर धृतराष्ट्राला जशा

तशी त्याला पांडवांच्या अमदानीत मिळत होत्या. धृतराष्ट्र व गांधारी दोघं पांडवांना आपले मुलगे मानीत.

अशीच पंधरा वर्षे लोटली. धृतराष्ट्राला किंवा गांधारीला कोणत्याही प्रकारची उणीव भासत नसूनही भीम मात्र संधी मिळे तेव्हां काही व्यंगोक्ती करून त्यांच्या हृदयाला कांट्यासारखे बोचेल असे करीतच असे. परंतु ही गोष्ट धर्मराजाला माहीत नव्हती.

एक दिवशी धृतराष्ट्र धर्मराजाला म्हणाला—"बाबा! आजपर्यंत इतके दिवस तू आमची किती काळजी वहात राहलास! मी कित्येक दानधर्म केली. क्षत्रिय धर्मा-नुसार युद्ध करून मरण पावलेल्या माझ्या सर्व मुलांना स्वर्गप्राप्ती झाली. मी त्यांची श्राद्धे केली. आतां मी त्यांच्या हिताचे असे जास्त काही करण्यासारखे उरलेंच नाही. आतां परलोकासाठी काही पुण्य संपादन करणे मला आवश्यक वाटत आहे. तू होकार दिलास तर वानप्रस्थाश्रमात प्रवेश करावा, म्हणत आहे. गांधारीसुद्धा माझ्या-बरोबर येणार आहे. मी वनात राहून तुला आशीर्वाद देत राहीन."

परंतु धर्मराजाने त्या गोष्टीस होकार दिला नाही व म्हणाला—"तुम्ही वनात जे कष्ट सहन कराल ते पाहून मला सुखाने



राज्य करणे कसे काय सुचेल? तुम्ही उपास करणार, जमिनीवर झोपणार आणि मला किंवा माझ्या भावंडांना लोकनिंदा नाही का सहन करावी लागणार? मला हे राज्य नको. राज्य भोग नको. मी हे राज्य युयुत्सूला देतो. तुमच्या मनाला कोणती तरी गोष्ट लागली असणार, म्हणून तुम्ही वानप्रस्थाश्रमात जाण्याचा विचार करीत आहां. मी तुम्हांला ज्यामुळे दुःख किंवा कष्ट होत असेल ते कारण दूर करतो."

"तपश्चर्या करावी म्हणतो आहे मी. वृद्धावस्थेत वानप्रस्थाश्रमात प्रवेश करणे ही आमच्या वंशाची रीत आहे. तुझ्याजवळ मी कमी दिवस का राहालो? आतां मी



म्हातारा झालो आहे, तू माझी ही इच्छा मान्य कर." धृतराष्ट्र म्हणाला. त्याने धर्मराजाला असेदेखील सांगितले की त्याची वनवासाची इच्छा पुरी करायला धर्मराज तयार झाला नाही तर त्याला अन्नत्याग करावा लागेल.

तेव्हां व्यासमुनींनी येऊन धर्मराजाला सांगितले की धृतराष्ट्राला त्याच्या इच्छेप्रमाणे वानप्रस्थाश्रमात प्रवेश करण्यास परवानगी द्यावी. तेव्हां धर्मराजाने मान्य केले.

पांडवांनी वैर करून आणि अन्यायाने व कपटाने दुर्योधनाने त्यांचे राज्य बळकावले, म्हणून प्रजेचा राग त्याच्यावर होता. पिता म्हणून धृतराष्ट्राने त्याला अडविले नाही,

होती. परंतु तो जात्या वाईट नव्हता, ही गोष्ट प्रजा ओळखून होती. म्हणून धृतराष्ट्र वानप्रस्थाश्रमात जात असल्याचे ऐकून हस्तिनापुरातील सर्व वर्णाचे नागरिक व प्रजा त्याला निरोप द्यायला जमा झाले. धृतराष्ट्र प्रजेला. म्हणाला–"मी आणि गांधारी दोघं वानप्रस्थाश्रमी प्रवेश करीत आहो. त्याला तुमची सर्वांची अनुज्ञा पाहिजे आहे. दुर्योधनापेक्षां धर्मराज राज्य-चालविण्यात जास्त निष्णात आहे असे माझे मत आहे. या भूमीवर शंतनु महाराजांनी प्रथम राज्य केले. त्यांच्यानंतर भीष्माचार्य व विचित्रवीर्यांनी राज्य केले. मी देखील तुमची थोडी फार सेवा केली आहे. कशी केली हे मला माहीत नाही. त्यात काही दोष व उणीवा असल्यास क्षमा करा. दुर्योधनाने दुर्बुद्धीने वागून आमच्या व कित्येक क्षत्रिय कुळांचा नाश केला. त्यात मी निर्दोष होतो असे नाही. ते आतां सर्व विसरा, अशी मी हात जोडून विनंती करतो आहे. यापुढे धर्मराज तुमचा राजा आहे."

ते ऐकून प्रजेतल्या प्रमुखांचा एक प्रतिनिधी म्हणून एक ब्राह्मण पुढे येऊन म्हणाला–"राजा! तू आमचे सर्वांचे पुत्रांमित्रांसारखे पालन केलेस. तुझ्या वंशांतील कोणीच कधी आम्हांला दुःखी केले नाही.

कष्ट दिलेला नाही. तू वानप्रस्थाश्रमात गेलास तर आम्हांला नेहमीच तुझी आठवण होत राहील. युद्ध ओढवून घेतल्याबद्दल देखील आम्ही दुर्योधनाला कधीच दोष देणार नाही. कारण, वास्तविक कुरुवंशाच्या नाशाला कारण फक्त दैवच आहे आणखी कोणी नाही. धर्मराज सत्पुरुष आहे. सहस्र वर्षे त्याचे राज्य चालू रहावे, तो राजा व आम्ही प्रजा म्हणून रहावे हेच देवाजवळ आमचे मागणे आहे."

दुसऱ्या दिवशी विदुर धर्मराजाकडे येऊन म्हणाला–"धृतराष्ट्र कार्तिक महिन्यात वनवासात जाणार आहे. त्यापूर्वी भीष्माचार्य, सोमदत्त, बाल्हिक, त्याचे स्वतःचे मुलगे, द्रोण, सैंधव व इतर मित्रांचे श्राद्ध त्याला करावयाचे आहे. त्यासाठी काही धन खर्च होणार, ते त्याला हवे आहे."

धर्मराज व अर्जुन आनंदाने त्या गोष्टीस कबूल झाले. परंतु भीम काहीच बोलला नाही. अर्जुन त्याला म्हणाला–"तूदेखील थोडे धन दे. धृतराष्ट्र वानप्रस्थाश्रमात जात असतां श्राद्धे करण्यासाठी आपणांजवळ थोडे धन मागत आहे. एके काळी आपण त्याच्याजवळ राज्यासाठी मागणी केली नव्हती का?"

ते ऐकून भीम म्हणाला–"भीष्माचार्य, सोमदत्त, बाल्हिक, भूरिश्रवा, द्रोण व



इतरांच्या श्राद्धासाठी धन देण्यात हरकत नाही. कर्णासाठी माता कुंती काही धन देईल. पण दुर्योधनादिक कौरवांसाठी कां? त्यांना परमलोक प्राप्त झाला नाही तर काय हरकत आहे?"

तेव्हां धर्मराज भीमाला म्हणाला–"भीमा! असं बोलणं आपणांस शोभत नाही!" आणि विदुराला म्हणाला–"भीमाने एवढे मनाला लावून घ्यायचे कारणच काय? धृतराष्ट्राला हवे असेल तेवढे धन द्यायला मी तयार आहे."

नंतर धृतराष्ट्राने श्राद्धकर्मे करून धर्मराजाकरवी अनेक मोठमोठी दाने करविली. सर्व कामे झाल्यानंतर धृतराष्ट्राने गांधारी



सह कार्तिक पूजा करून वल्कल वस्त्रे धारण केली व वानप्रस्थाश्रमात प्रवेश करण्यास निघाला. सर्वात पुढे अग्निहोत्र चालू लागले. धृतराष्ट्राबरोबर कौरव पांडव स्त्रिया निघाल्या. तो निघाला तेव्हां निरोप देतांना पांडव खूप रडले. कुंती गांधारीचा हात धरून तिला वाट दाखवू लागली. द्रौपदी, सुभद्रा, परीक्षिताला घेऊन उत्तरा आणि राजधानीतल्या इतर स्त्रिया बरोबर चालू लागल्या. विदुर व संजय दोघांनी धृतराष्ट्राबरोबर जाण्यास अनुमती घेतली.

धृतराष्ट्राने नगराचे द्वार ओलांडल्यावर युयुत्सूला व कृपाचार्यांना परतायला सांगितले. एकेक जण थांबून मागे परंतु

तो कुंतीला म्हणाला–"आई! तू परत जा. मी महाराजांबरोबर जातो."

परंतु कुंतीने धृतराष्ट्र व गांधारीबरोबर जाण्याचे ठरविले होते. ती धर्मराजाला म्हणाली–"धृतराष्ट्र व गांधारी मला सासरा व सासूसारखे आहेत. मी त्यांची सेवा करीत राहून तपश्चर्या करीन."

पांडवांनी तिची अनेक प्रकारे समजूत घालून परतायला सांगितले. परंतु तिने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. शेवटी पांडव द्रौपदीसह हस्तिनापूरला परतले.

धृतराष्ट्र सायंकाळपर्यंत चालत राहल्यावर गंगातीरी एका जागी थांबला. ब्राह्मणांनी अग्निहोत्र उरकले. त्यानंतर विदुराने व संजयाने त्याच्यासाठी व गांधारीसाठी दर्भासने घालून झोपण्याची तयारी करून दिली, ती रात्र निर्विघ्न पार पडली.

विदुराच्या सल्लयाने गंगातीरी तेथेच एक पर्णकुटी धृतराष्ट्रासाठी तयार करविण्यात आली. तेथे काही दिवस राहून धृतराष्ट्राने कुरुक्षेत्री एका आश्रमात प्रवेश केला. तेथे शतयूप नांवाचा एक राजर्षी रहात असे. त्याने आपल्या मुलाला राज्य देऊन वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला होता. धृतराष्ट्राने तपश्चर्या सुरू केली. त्याला भेटायला जे कोणी येत, त्यांचे आतिथ्य वगैरे



करी असतां मधूनमधून पुराणा-तल्या अनेक गोष्टी गांधारी व कुंतीला सांगत असे.

धृतराष्ट्र वानप्रस्थाश्रमी निघून गेल्यावर हस्तिनापूरच्या नागरिकांना राजधानी एकाएकी लहान झाल्यासारखी वाटू लागली. त्या वृद्ध राजाविषयी ते आपसात तासन् तास बोलत बसत. पांडवांची गोष्ट निराळी सांगण्याची गरजच नाही. धृतराष्ट्राबरोबर माता कुंती देखील निघून गेल्यामुळे त्यांना जिवंत असून मृतावस्थेत असल्यासारखे भासू लागले.

सर्वांआधी बोलला तो सहदेव, कुंतीला भेटण्याची इच्छा त्याला फार होऊ लागली. द्रौपदीदेखील धर्मराजाला म्हणाली–"सर्व बायकांची इच्छा एकदा धृतराष्ट्र गांधारीला आणि कुंतीमातेला भेटावे अशी आहे."

लगेच धर्मराजाने धृतराष्ट्राच्या भेटीस जाण्याची तयारी केली. कोणा नागरिकांना बरोबर यायचे असेल तर यायला हरकत नाही असे त्याने जाहीर केले. दुसऱ्याच दिवशी सर्व निघाले. जणुकाही एक मोठे थोरले सैन्यच निघाले. रथांत, घोड्यांवर, उंटांवर बसून आणि ज्यांना ते शक्य नव्हते ते पायीच चालू लागले. बायका पालख्यांतून निघाल्या. फक्त युयुत्सू आणि धौम्य मुनी राजवाड्यात मागे राहिले.



पांडव येत आहेत हे कळल्यावर काही आश्रमवासी त्यांना भेटायला सामोरे आले. धर्मराजाने त्यांना विचारले–"आमचे मोठे काका कोठे आहेत?"

धृतराष्ट्र महाराज स्नानासाठी आणि फुले व पाणी आणण्यासाठी यमुना नदीवर गेल्याचे त्यांनी सांगितले. पांडव त्यांनी सांगितलेल्या वाटेने निघाले. दुरून त्यांना धृतराष्ट्र, गांधारी व कुंती येत असलेली दिसली. सहदेव धावत पळतच गेला आणि मातेचे पाय धरून रडू लागला. तिचे डोळे देखील ओले झाले. तिने त्याला उचलून उभे केले व प्रेमाने त्याला भेटली आणि सहदेव आला असल्याचे तिने गांधारीला

सांगितले. आतां तिला सर्व पांडवदेखील दुरून दिसू लागले होते.

नंतर पांडव, त्यांच्या पत्नी व इतर लोक चारीबाजूला घोळका करून बसल्यावर धृतराष्ट्राला तो हस्तिनापुरातच असल्या सारखा आनंद झाला. आश्रमातले सर्व मुनी पांडवांना भेटायला आले. संयजाने सर्वांचा परस्पर परिचय करून दिला. सर्व निघून गेल्यावर धर्मराजाने धृतराष्ट्राला कुशल वार्ता विचारून "विदुर काका दिसत नाहीत, कोठे गेले आहेत ते?" असे विचारले.

"विदुर अनशनव्रत करून घोर तपश्चर्या करीत असल्याने फार थकला आहे. तो दिगंबर होऊन वनात फिरतो व कधीकधी दिसतो असे 'मुनी सांगतात." धृतराष्ट्र म्हणाला.

इकडे त्यांच्या विषयी असे बोलणे चालू असतानाच विदुर दुरून येत असलेला दिसला. धर्मराज एकटा त्याला भेटायला गेला. विदुर दाट अरण्यातून जात असतां [illegible] — "विदुर काका! तुमच्या दर्शनासाठी येतो आहे!" असे म्हणत निघाला.

विदुर अरण्यात एका अगदी निर्जन स्थानी थांबला. "मी धर्मराज!" असे म्हणत धर्मराज त्याच्या समोर हात जोडून उभा राहला. विदुर ओळखू न येण्या इतका थकला होता व टक लावून धर्मराजाकडे पहात होता. धर्मराजाला विदुराचे अवयव त्याच्या अवयवात व प्राण त्याच्या प्राणात लीन झाल्यासारखे भासले.

त्यानंतर थोडया वेळाने विदुराचे प्रेत एका झाडात लीन झाल्यासारखे दिसले. परंतु ते दृश्य झाले नव्हते.

धर्मराजाने विदुराच्या देहाचा अग्नि संस्कार करण्याचे ठरविले. परंतु योगी-यतींचा अग्निसंस्कार होत नसतो. म्हणून तो विचार सोडून आश्रमात परत येऊन त्याने सर्वांना घडलेली गोष्ट सांगितली. सर्व आश्चर्यचकित झाले.





# मित्रभेद

[ १२ ]

कोष्टयाने राजकन्येला वचन दिले खरे, परंतु दुसऱ्या क्षणाला विचारात पडला. आतां पुढे काय करायचे? गरुड-वाहनावर बसून त्याला तेथून जीव वांच-विण्यासाठी वाटेल तिकडे पळून जाणे शक्य होते. परंतु मग त्याचा सर्व प्रयत्न निष्फळ ठरणार आणि त्याला त्याची प्रेमिका कशी लाभणार? विक्रमसेन नक्कीच आपल्या भावी सासऱ्याचा वध करून सुदर्शनाला पळवून नेईल व तिच्याशी लग्न करील. आपण त्याच्याशी युद्ध केले तर आपल्याला मरण निश्चितच येणार! सुटकाच नाही तर शौर्य दाखवून मरण्यातच शहाणपण आहे. आपण या नारायणाच्या वेषात युद्ध केले तर शत्रू कदाचित भ्रमात पडून पळून देखील जाईल.

इकडे कोष्टयाने मनाशी असा विचार केला आणि तिकडे वैकुंठ लोकात गरुड श्रीमन्नारायणाला मर्त्य लोकात घडलेली गोष्ट सांगून नम्रपणे म्हणाला–"देवा! तुझे सोंग करून फिरणारा हा कोष्टी युद्धात मारला गेला तर तुझी पूजाअर्चा पुढे कोण करणार? तुझ्यावरचा लोकांचा विश्वास कायमचा उडेल! तेव्हां काय करायचे ते लौकरच ठरवा!"

तेव्हां श्रीमन्नारायण म्हणाला–"हे पक्षि-राजा! मला हा अन्याय सहन होणार नाही अन्यायाने खंडणी कर वसूल केल्या-बद्दल हा विक्रमसेन ठार झाला पाहिजे. फार झालं! तो माझ्या भक्ताच्या वंशाचा सर्वनाश करायला निघाला आहे. मला हे पाहवणार नाही. मी त्या कोष्टयाच्या देहात

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



प्रवेश करून त्याच्या चक्रात माझे चक्र प्रवेश करतील."

उजाडताच कोष्टी राजकन्येच्या मदतीने युद्धाला तयार झाला. राजादेखील स्वतःचे सैन्य घेऊन युद्ध करण्यास राजधानीच्या बाहेर पडला. दोन्ही सैन्ये परस्परांशी भिडली. कोष्टी आपल्या गरुडवाहनावर बसून आकाशांतून उडत रणांगणावर आला. त्याने आपला शंख जोराने फुंकला.

शंखनाद ऐकून शत्रुसैन्याने वर आकाशा-कडे पाहिले आणि स्वतः श्रीमन्नारायण युद्धाला आला असल्याचे समजून सैन्याची गाळण उडाली. कित्येक जण घाबरूनच जमिनीवर निःचेष्ट पडले. कित्येक बेशुद्ध

कडे नुसते पहातच राहले. त्याच वेळी कोष्टयाने आपले सुदर्शन चक्र फेकले. ते विक्रमसेनाचा शिरच्छेद करून परत कोष्टयाच्या हातात आले. त्याच्या मांड-लिक राजांनी कोष्टयासमोर साष्टांग नमस्कार करून जीवदान मागितले.

"यापुढे तुम्ही सुप्रतिवर्माला प्रमुख म्हणून मान्य केले पाहिजे!" कोष्टी म्हणाला.

सर्व त्या गोष्टीस कबूल झाले. विक्रम-सेनाचे सर्व सैन्य सुप्रतिवर्माच्या स्वाधीन झाले. त्यानंतर कोष्टयाला सर्व सुखोपभोग कायमचा लाभला. त्याचा मानमरातब वाढला.

दमनकाने विष्णूचे सोंग करणाऱ्या कोष्टयाची ही गोष्ट सांगितल्यावर करटक त्याला म्हणाला—"तुझा तितकाच विश्वास आहे तर तू पिंगलकाकडे जाऊन तुझी युक्ती काही उपयोगाची होते का, पहा. विजयी भव."

दमनक पिंगलकाकडे जाऊन नम्रपणे नमस्कार करून त्याच्या अनुमतीने बसला.

पिंगलकाने त्याला विचारले—"काय रे, बरेच दिवसांनी भेटायला आलास?"

"धन्याने बोलाविले नाही तरी क्षेमकुशल व्हावे या विचाराने एक महत्वाची गोष्ट निवेदन करायला इकडे आलो होतो. धन्याला

करून सांगणे कधी कधी आवश्यक असते. न रुचणाऱ्या खऱ्या गोष्टी सांगण्याचे धैर्य स्वामिभक्त व विश्वासपात्र अशा सेवकां-मध्येच असते." दमनक म्हणाला.

"काय रे ते, तू एवढा अगत्याने सांगा-यला आला आहेस?" पिंगलकाने उत्कंठेने विचारले.

"महाराज! राजकर्त्याचा विश्वासपात्र असलेल्या संजीवकाने राजद्रोह करण्यासाठी विडा उचलला आहे. मला सर्व कळलं आहे. आपला वध करून आपलं सिंहासन बळ-कावण्याचा विचार त्याने कित्येकांना कळविला आहे. आजच हा कट यशस्वी करण्याचा घाट घालण्यात आला आहे. पिढ्यान् पिढ्या आपल्या पदरी सेवा करीत आल्यामुळे कर्तव्य समजून मी आपणांस सावध करण्यासाठी आलो आहे." दमनक म्हणाला.

ते ऐकून पिंगलक घाबरून गेला. ते ओळखून दमनक पुढे म्हणाला—"महाराज! रोग मूळ धरण्यापूर्वीच नष्ट केला पाहिजे. कीड वेळेवरच काढून टाकली नाही तर झाड मुळापासून नष्ट होते. शत्रूचा नाश वेळीच केलेला बरा. सगळी राज्यव्यवस्था या बैलाच्या हातात देऊन आपण स्वतःच आता फसलां आहां."



"परंतु संजीवक माझ्या विरुद्ध कां बरं उलटावा? मी त्याला कोणत्याही प्रकारे असंतुष्ट केले नाही!" पिंगलक म्हणाला.

"दुष्टाला काही कारण लागते का, महाराज? तो पहिल्यापासूनच द्रोह करीत आला आहे, असे माझे म्हणणे आहे. आपण या बैलासारख्या दोघां बलिष्ठ वीरांना पुरे आहां या अरण्यात. त्याने छलकपट करून आपला अनुग्रह संपादन केला आहे. परंतु आपण त्याचा उद्धार करण्यासाठी हात दिलात तोच हात धरायच्या विचारात तो दिसतो आहे. कृतघ्नाची गोष्ट आपण ऐकली नाही वाटते?" दमनकाने विचारले.

"कोणती गोष्ट?" पिंगलकाने विचारले.

दमनक गोष्ट सांगू लागला.

## कृतघ्नाची गोष्ट

यज्ञदत्त नावाच्या एका प्राप्ती नसलेल्या दरिद्र माणसाला टोपलीभर मुलं होती. एक दिवशी घरात चूलच पेटली नाही. मुलांच्या आईचा जीव कळवळला. रागानें ती नवऱ्याला म्हणाली–"काय हो! हातावर हात धरून काय बसला आहां! मुलांचा जीव जायची वेळ आली आहे, दिसत नाही का? जाऊन आणा काहीतरी मिळवून! रिकाम्या हातानें येऊ नका!"

ते ऐकून ब्राह्मण जागचा हलला आणि बाहेर निघाला. बराच दूर चालून गेल्यावर एक जंगल लागले. त्याला फार तहान लागली म्हणून पाण्याच्या शोधार्थ हिंडू लागला. दाट झाडीत त्याला एक खोल खड्डा दिसला. त्याच्या चारीबाजूला खूप गवत उगवले होते. परंतु आत पाणी मुळीच नव्हते. त्याने वाकून आत पाहतांच त्याला त्यात एक वाघ, एक माकड, एक सांप आणि एक मनुष्य दिसला.

नाही. म्हणून मला बाहेर काढून माझ्या कुटुंबियांना भेटायला संधी दे."

"तुझं नांव ऐकूनच सर्व प्राणी थरथर कापू लागतात. मग मी तुला बाहेर कसा काय काढीन?" यज्ञदत्ताने विचारले.

"अहो, प्रत्येक पापाला प्राय:श्चित्त असते, परंतु कृतघ्नपणाला प्राय:श्चित्त नाही. तुम्ही मला भिण्याचे कारण मुळीच नाही. तुम्ही मेहरबानी करून मला वर काढा." वाघ म्हणाला.

प्राणरक्षण करीत असतां स्वत:चा प्राण गेला तरी पुण्य लाभ होतो, असा विचार करून त्या ब्राह्मणाने लतावेलीचे एक दोरखंड तयार करून त्याच्या मदतीने वाघाला बाहेर काढले.

"अहो! मलासुद्धां बाहेर काढा!" अशी माकडाने विनंती केली. सांपानेदेखील तशीच विनंती केली. ब्राह्मणाने त्या दोघांना बाहेर काढले.



# १५०. प्राचीन देवालयांचे अवशेष

४००० वर्षांपूर्वी बाबिलोनवासियांनी साम्राज्य स्थापन केले. त्यांचा देव "मर्डुक" होता. खालील चित्रात मर्डुकाच्या देवालयाचे अवशेष आहेत. जमिनीवरच्या इमारती ढासळल्या. म्हणून काढल्यावर सापडलेला हा भाग आहे. बाबिलोन नगर बगदादच्या दक्षिणेला आहे.





# अमरवाणी

"अंगुल्या कः कवाटं प्रहरति?"
"कुटिले, माधवः" "कं वसंतः?"
"नो चक्री." "कं कुलालो?" "नहीं धरणीधरः"
"किं द्विजिह्वाः फणींद्रः?"
"नाहं घोराहिमर्थी." "किमुत खगपतिः?"
"नो हरिः" "किं कपीन्द्रः?"
इत्येवं सत्यभामा प्रतिजित वचनः
पातु व श्चक्रपाणिः

सत्य० : बोटाने दार कोण वाजवितो आहे?
कृष्ण : ए लबाड पोरी! अग, माधव मी!
सत्य० : म्हणजे वसंत का? (माधव शब्दाचा अर्थ वसंत असाही होतो.)
कृष्ण : नाही, चक्री! (चक्र धारण करणारा)
सत्य० : कुंभार का? (चक्री याचा अर्थ कुंभार असा सुद्धा होतो.)
कृष्ण : नाहीं ग, धरणीधर (भूमीचा उद्धार करणारा वराह विष्णु.)
सत्य० : म्हणजे दोन जिव्हा असलेला नागराज? (धरणी धारण करणारा शेषनाग.)
कृष्ण : घोर सर्पांचे मर्दन करणारा! (येथे कालिया नागाकडे संकेत आहे.)
सत्य० : म्हणजे गरुड का?
कृष्ण : नाही ग, हरि!
सत्य० : म्हणजे वानर का? (हरि शब्दाचा एक अर्थ वानर असाही आहे)
अशा तऱ्हेने सत्यभामेसमोर शब्दच्छलात हारलेला चक्रपाणी कृष्ण तुमचे रक्षण करो.





# तिळ्या बहिणी

हजारो वर्षें लोटली, श्रावस्ती येथें दानशील नांवाचा राजा राज्य करीत असे. जवळपासच्या राजेरजवाड्यात तोच मोठा होता. त्याच्याकडे कित्येक लाखांचे उभे सैन्य होते. असंख्य दासदासी रात्रंदिवस राजपरिवाराच्या सेवेला हजर असत. त्याचा खजिना जडजवाहीर, हिरे, माणिक्ये, सोने, चांदी इत्यादिकांनी नेहमी भरलेला असे. या सर्वांहून भाग्याची मोठी गोष्ट म्हणजे त्याची राणी कांतिरेखा ही खरो-खरच नक्षत्रासारखी सुंदर आणि पतिव्रता होती. एवढे मोठे ऐश्वर्य लाभले असूनही राजाला गर्व कधी शिवला नाही. तो गोर-गरिबांना दानधर्म करी. तो धर्मभीरू व देवभक्तदेखील होता. कोणी याचक त्याच्या दारासमोरून कधी रिकाम्या हाताने परतला नाही. अर्थातच नावारूपाला साजेल असाच तो वागे, किंबहुना त्याच्या त्या उदार दानवृत्तीमुळेच त्याला दानशील हे नाव मिळाले होते.

परंतु त्याच्या दुर्दैवाने त्याची राणी एकाएकी आजारी पडली आणि त्या आजारातच राजाला शोकसागरात सोडून तिने परलोकगमन केले. पत्नी विरहाने राजाच्या डोळ्याचे पाणी थांबतच नव्हते. प्रजादेखील दुःखी झाली. परंतु किती शोक केला तरी गेलेली राणी परत येणे शक्यच नव्हते.

राणी गेल्याला कित्येक दिवस लोटले आणि हळूहळू राजा व प्रजा दोघांचा



दुःखावेग ओसरत गेला. तरी सर्वांना दुःख वाटत होते ते एकाच गोष्टीचे की राणी काही अपत्य होण्यापूर्वीच निघून गेली. म्हणून प्रधान, दरबारी व प्रजा सर्वांना वाटू लागले की, गादीला वारस असला पाहिजे, म्हणून राजाने दुसरा विवाह करावा. त्याप्रमाणे मंत्री, सामंत, दरबारी सर्वांनी तोच आग्रह धरला. राजा त्यांना नकार देऊ शकला नाही आणि एका सुमुहूर्तावर राजाचे दुसरे लग्न झाले. परंतु राजाचे दुर्दैव जणुंकाहीं त्याची पाठ सोडीत नव्हते. दुसरी राणीदेखील एकाएकी आजारी पडून मरण पावली.

रजवाड्यांपर्यंत पोचली होती. मंत्र्यांनी व सामंत राजांनी आणखी एक विवाह करून घेण्याबद्दल आग्रह करून राजाचा होकार मिळविला. परंतु राजाशी लग्न करून त्याची गृहलक्ष्मी म्हणून नांदायचे भाग्य कोणत्याही स्त्रीला नाही याची खात्री सर्वांना झाली होती. तेव्हां कोण राजा स्वतः होऊन उघड्या डोळ्याने आपल्या पोटच्या मुलीला मृत्युमुखात लोटणार? अशा परिस्थितीत कोणत्याही राजकन्येशी राजाचा विवाह होणे अशक्यच होते. तरी मंत्र्यांनी आणि सामंतांनी प्रयत्न करण्याचे सोडले नाही आणि प्रयत्नांची शिकस्त करून पाहिली. परंतु त्यांना यश आले नाही.

शेवटी विचार आला की एखाद्या गरिबाची मुलगी राजघराण्यात यायला तयार झाली तर पहावे. त्याप्रमाणे एक गरीब बाई आपल्या एकुलत्या एका मुलीला द्यायला तयार झाली. ती मुलगी गरीब घराण्यात जन्मलेली असून कोणत्याही राजघराण्यात शोभेल अशीच रूपवती होती. त्या मुलीला पाहून मंत्र्यांनी आणि सामंतांनी अत्यंत आनंदाने राजाला ती मुलगी दाखविली व राजाने आपली पसंती दर्शविली. उकिरड्यावर पडलेले रत्नच जणुंकाहीं त्याला गवसले व तो मंत्र्यांना म्हणाला—

काय, सारखेच! माझे एवढे मोठे ऐश्वर्य असून एवढा मोठा राजवाडा असून आणि पाहारा देण्यासाठी पाहारेकरी डोळ्यात तेल घालून चोवीस तास उभे असून आणि लाखांचे सैन्य असून ही मी आपल्या राण्यांचे रक्षण करू शकलो नाही. जगायचे भाग्यच असेल तर कोणीही जगेल. खरोखरी मी या मुलीला पाहण्याचीच गरज नव्हती. तुमचे मन मोडू नये म्हणूनच मी मुलीला पाहण्याचा सोहळा होऊ दिला. आतां तुम्हांला योग्य वाटत असेल तसे करा. मुलीच्या आईला व तिच्या आईवडिलांना आश्वासन द्या की मुलीला राजवाड्यात सर्व प्रकारच्या सुखसोयी करून दिल्या जातील."

ते ऐकून मंत्र्यांचा उत्साह वाढला. काही दिवसांनी राजाचे त्या गरीब बाईच्या मुलीशी लग्न ठरले आणि मुहूर्त धरण्यात आला. लग्न लागे पर्यंत लग्न निर्विघ्नपणे पार पडेल व राणी सुखरूप राजधानीत येईल असे कोणाला वाटले नाही. कारण त्या पूर्वी झालेल्या लग्नानंतर राणी एकाच आठवड्यात निवर्तल्याची गोष्ट सर्वांस माहीत होती.

नवी राणी राजवाड्यात येऊन दिवस आठवडे आणि महिने काही अशुभ घटना घडल्याशिवाय पार पडले. तेव्हां राजाला, मंत्र्यांना व प्रजेला धीर आला. प्रजा देवाची करुणा भाकू लागली—"देवा! या तिसऱ्या राणीच्या पोटी राजाला अपत्य-प्राप्ती होऊं दे!"





प्रजेच्या हांकेलाच जणुंकांहीं देव पावला आणि राणी गरोदर असल्याची शुभ वार्ता पसरली. प्रजेच्या आनंदाला पारावार नव्हता. मग राजाला व राजपरिवाराला जो आनंद झाला त्याबाबत सांगण्याची गरजच नाही.

नऊ महिने पूर्ण झाले आणि एका शुभ नक्षत्रावर राणी पद्ममुखी प्रसूत होऊन तिला तिळया मुली झाल्या. सर्वांना आश्चर्य वाटले. परंतु राजाने आपले आश्चर्य बोलून किंवा चेहऱ्यावर दर्शविले नाही. मुलं झाली काय किंवा मुली झाल्या काय, तीन अपत्ये झाली व ती देवाने एकाच वेळी दिली, याबद्दल राजाने देवाचे आभार मान [illegible] साजरे झाले. राज्यभर गोर गरिबांना दान-धर्म करण्यात आला. दुष्ट ग्रह टाळण्यासाठी वेदोक्त पद्धतीने शांत करण्यात आली. हे सर्व करूनही मनाचे समाधान झालेच असे नाही.

आईवडिलांनी तिघां मुलींची नावे अनुक्रमे सुहासिनी, सुभाषिणी व सुकेशिनी अशी ठेवली. तिघी मुली वाढू लागल्या तसतशा एकीहून एक सुंदर असल्याचे पाहून सर्व राजपरिवाराला आनंद झाला. त्या मुलींचे रूपलावण्य पाहून लोक म्हणत— "तिघी मुली म्हणजे लक्ष्मी, पार्वती व सरस्वतीचा अवतारच आहेत!"

या सर्व आनंदाला मधून मधून दुःखाचे व काळजीचे धक्के बसत. राजा व राणी दोघांना मुलींची चिंता वाटू लागली. तिघी मुली कोणत्या ना कोणत्या तरी संकटांत सांपडत व त्यांतून त्या बाहेर येईपर्यंत राजा व राणी दोघांची झोप उडून जाई.

एकदां सुहासिनी आपल्या वडिलांबरोबर उद्यानात हिंडत असतां तिच्या अंगावर एक सांप धावून आला. वेळेवर राजाने आपल्या तलवारीने सापाला ठार केले नसते तर सुहासिनी या जगाचा कायमचा निरोप घेऊन निघून गेली असती.





[illegible] ई-बरोबर नदी काठी हिंडायला गेली असतां, एकाएकी नदीला पूर आला आणि नदीची धार सुभाषिणीला ओढून घेऊन गेली. ईश्वरकृपेने तेव्हां एक नावाडी तेथे जवळ-पास होता, त्याने राणीला घाबऱ्या आवा-जाने ओरडताना ऐकले आणि नदीत उडी टाकून सुभाषिणीला किनाऱ्यावर घेऊन आला. तो नावाडी त्या वेळेस तेथे नसता तर सुभाषिणी वांचली नसती आणि तिला जलसमाधी मिळाली असती.

अशाच तऱ्हेने आणखी एका वेळी तिसरी मुलगी सुकेशिनी एका मोठ्या संकटातून वांचली. ते असे झाले—एके दिवशी सुकेशिनी आपल्या दोघी बहिणीं-बरोबर फुले काढायला बागेत गेली. तिघी आपापल्या परडीत फुले वेंचून किंवा तोडून परडी भरल्यावर राजवाड्याकडे निघाल्या. सुभाषिणी सर्वांत पुढे जात होती. तिच्या पाठीमागून सुहासिनी चालत होती आणि शेवटी सुकेशिनी येत होती. एकाएकी सुकेशिनी मोठ्याने किंकाळी फोडून ओरडली आणि बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली. मोठ्या दोघी इतक्या घाबरल्या की धावत पळत आईकडे गेल्या आणि त्यांनी घडलेली गोष्ट सांगितली.

आई दोघां मुलींना बरोबर घेऊन सुकेशिनी बेशुद्ध होऊन पडली होती तेथे येऊन पाहूं लागली तर बाजूला पडलेल्या फुलाच्या परडीत तिला एक





गोम रांगत असलेली दिसली. तेव्हां गोम चावल्याने मुलगी बेशुद्ध होऊन पडली असावी असे आईला वाटले. तिने ती गोम मारली आणि मुलीला घेऊन राजवाड्यात आली. दरबारी राजवैद्यांना निरोप गेला व त्यांनी येऊन औषधपाणी केल्यावर मुलगी शुद्धीवर आली आणि बोलू लागली.

फार उशिरां झालेल्या या तिघां राजकन्यांवर एक न एक संकट येत असलेले पाहून राजा व राणी दोघं काळजीत पडली. राजाचे चित्त इतके अस्थिर झाले की त्याने ज्योतिष्याला बोलावून तिघां मुलींच्या जन्मकुंडल्या दाखविल्या.

[illegible] तिघींच्या जन्मकुंडल्या बराच वेळ पाहिल्या, परंतु काहीच बोलला नाही. तेव्हां राजाला जास्तच काळजी वाटली व म्हणाला—"बऱ्याच विचारात पडल्यासारखे दिसतां? आहे ते जसेच्या तसेच सांगा! सहे कळावे म्हणून तर तुम्हांला बोलाविले होते!"

तेव्हां ज्योतिषी म्हणाला—"या मुली दिवसेदिवस वाढत जातील तसतशी त्यांच्या रूप लावण्याची वृद्धीच होत जाईल. त्यांची कीर्ती जगभर पसरेल; परंतु काळजी करण्याचे कारण वाटते आहे ते यासाठी की, त्यांचे अपूर्व सौंदर्यच त्यांच्यावर निरनिराळे प्रसंग ओढवण्यास कारण होतात की काय याची भीती वाटते. त्या जन्मल्या त्या घटकेपासून त्यांच्यावर एक न एक संकट येत राहले आहे, व तसेच" ज्योतिषी बोलतां बोलतां मध्येच थांबला.

ज्योतिष्याच्या तोंडच्या प्रत्येक शब्दाबरोबर राजाच्या हृदयाचे ठोके वाढत होते. त्याच्या डोळ्याचे पाणी थांबतच नव्हते. ते पाहूनच ज्योतिष्याला पुढे बोलवेना. परंतु राजाने जन्म कुंडल्यात जे काही लिहिले आहे ते निःसंकोचपणे अक्षर अक्षर सांगायला आग्रह केला. म्हणाला—"जे भोगायचेच आहे ते भोगावेच लागणार, टळणे

शक्य नाही, परंतु थोडे आधी कळले तर सावधगिरी तरी बाळगतां येईल किंवा मन घट्ट करून सहन करतां येईल! तेव्हां आहे ते स्पष्ट सांगा, थांबू नका!"

"खरं सांगून आपल्या मनाला दुःखी कष्टी करावे लागेल की काय याबद्दल वाईट वाटले, म्हणून थांबलो होतो." ज्योतिषी कष्टाने म्हणाला.

"काही हरकत नाही, सांगा, सर्व सांगा, माझ्यां मुलींवर जे जें संकट येईल त्याला तोंड द्यायला मी आपला जीव पणाला लावीन. तुम्ही कोणतीही गोष्ट निर्भयपणे आहे तशी सांगा." राजा म्हणाला.

तेव्हां ज्योतिषी म्हणाला—"राजकन्यांना सातवे वर्ष लागेपर्यंत प्रत्येक दिवस शंभर वर्षे गेल्यासारखा जाईल. परंतु ही सात वर्षे पूर्ण झाली की त्यांच्यावर कोणतेही संकट येणार नाही. म्हणून सात वर्षे पूर्ण होईपर्यंत डोळ्यांच्या पापण्या रक्षणार्थ जशा सतत सिद्ध असतात तसे रहावे लागेल. [illegible] सारखे काही नाही!"

राजाने ज्योतिष्याचा सर्व प्रकारे सत्कार करून आदरपूर्वक नमस्कार केला आणि त्याला निरोप दिला. नंतर राणीच्या महालात जाऊन सांगावे की सांगू नये अशा विचारात बराच वेळ गप्प राहील्यावर मनाचा धीर करून त्याने सर्व सांगून टाकले. ते सर्व ऐकून राणी घाबरून बेशुद्ध होऊन पडली.

दासदासींनी धावपळ केली व डोक्यावर तोंडावर पाणी शिंपडल्यावर राणीला शुद्ध आली. राजा तिच्या मनाचे सांत्वन करू लागला तेव्हां मुलींना सांभाळणारी दाई धांवत पळत येऊन म्हणाली—"सरकार! तिघी राजकन्या बेशुद्ध होऊन उद्यानांत पडल्या आहेत, आपण चलावे!"

राणी घाईघाईने उद्यानात पळत गेली. दाई तिच्या बरोबर धावली. राजवैद्याला निरोप पाठविण्यात आला. राजादेखील उद्यानाकडे धांवला. (क्रमशः)



# राजकुमारी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! एखादी राजकुमारी तुझी परीक्षा तर घेत नसेल ना? अशा परीक्षा निरर्थक असतात. तरी कधी कधी त्यांत कोण का यशस्वी होतो, कळत नाही. उदाहरण म्हणून मी तुला हिमबाहूची मुलगी हिमानी हिच्या स्वयंवराची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी हिमालय पर्वतातल्या सहज प्रवेश मिळणे अशक्य अशा एका खोऱ्यात हिमगड नावाचे एक राज्य होते. त्याच्या चारी बाजूला उंच पर्वतांच्या रांगा होत्या. बाहेरून आत प्रवेश करण्यास फक्त एकच एक चिचोळी खिंड होती. म्हणून कधी

## वेताळाच्या गोष्टी



कोणी त्या राज्यावर स्वारी करण्याचा विचार केला नाही.

हिमगड राज्याच्या गादीवर हिमबाहू नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला हिमानी नावाची एकुलती एक मुलगी होती. हिमबाहूला दुसरे एकही अपत्य नव्हते. त्या कारणाने हिमानीच गादीला वारस होती.

हिमानीला सोळावे वर्ष लागले तेव्हां-पासून हिमबाहू तिचे लग्न करून देण्याचा विचार करु लागला. तिच्यासाठी योग्य वर मिळणे हा एक फार मोठा प्रश्नच त्याच्या समोर उभा होता. कारण तिच्याशी लग्न करणारा एक नर राजकुमारच असला पाहिजे आणि दुसरे राज्य व्यवस्थेत सर्व

असला पाहिजे, असे त्याला वाटत होते. असा वर मिळणे, अर्थातच सोपे नव्हते. कारण हिमगड ज्या जागी होते ती जागा इतर जगाशी काही संबंध राहील अशी नव्हती. इतर देशातला कोणी राजकुमार प्रदेशात स्वतः होऊन कसा काय येणार?

परंतु हिमबाहूजवळ कबूतरे होती. म्हणून त्याने त्याच्या मुलीसाठी योग्य वर बघत असल्याच्या चिठ्ठ्या लिहून त्या कबूतरांच्या गळयात बांधल्या व त्यांना त्याने ती कबूतरे चतुर्दिक पाठवून दिले.

त्या काळात समुद्राच्या काठी समतात नांवाचे एक राज्य होते. एके दिवशी रात्री प्रलय काळातल्या समुद्रासारखा समुद्र खवळला आणि समुद्रात ते सर्व राज्य बुडाले. एका रात्रीत सर्व राजवाडा व इतर मोठमोठ्या इमारती, प्रजा सर्वांस जलसमाधी मिळाली. हा दैवीकोप झाला तेव्हां समतात राज्याचा राजकुमार समुद्र-सेन सतरा वर्षांचा होता. तो त्यावेळी एका बौद्ध मठात विद्याभ्यासासाठी गेला असल्या कारणाने बांचला. समतात राज्य नामशेष झाले, म्हणून तो बौद्ध मठातच राहला आणि त्याने सड्शास्त्र आणि शोडष कलांत प्राविण्य संपादन केले. मठातल्या

इंद्रजाल विद्येतील शिकविल्या.

बराच काळ लोटला आणि समुद्रसेनाला बाविसावे वर्ष लागले. त्याच सुमारास हिमानीच्या विवाहाची वार्ता देशदेशांतरांत पोहोचली. अनेक देशांच्या राजकुमारांनी हिमगड देशात जाण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांना त्यांत यश आले नाही. समुद्रसेनाने विचार केला की, आपणही प्रयत्न करून पहावा. हिमगडचे राज्य मिळाले नाहीतरी हरकत नाही, हिमानीशी विवाह तर होईल. असा विचार करून त्याने मठाधिपतीजवळ जाऊन आपला विचार प्रकट केला.

मठाधिपती त्याला आशीर्वाद देत म्हणाला–"जा, मुला! अवश्य जा. तू राजकुमारच आहेस. तुला राजाला उचित अशा सर्व विद्या शिकविल्या आहेत. मात्र तू ज्या प्रदेशात निघाला आहेस त्या प्रदेशात जाणे फार कष्टाचे आहे, हे विसरू नकोस. तिकडे जायला एकच एक उपाय आहे. गेंड्याशिवाय इतर कोणत्याही स्वारीने तुला त्या प्रदेशात पोंचता येणार नाही.

दुसऱ्याच दिवशी समुद्रसेन शिकारीसाठी अरण्यात गेला आणि जाळे टाकून त्याने एक गेंडा धरला. एका आठवड्यात त्याने त्याला चांगले शिकवून स्वारीलायक तयार केले. नंतर मठातल्या सर्व लोकांचा निरोप घेऊन गेंड्यावर निघाला.

सुमारे तीन आठवडे कष्टाने प्रवास केल्यावर तो कसातरी हिमगड राज्यात





पोहोचला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे, तो पोहाचला त्याच्या आधी रत्नपूरचा राजकुमार हीरककुमार हिमगडला येऊन पोहोचला होता. राजाच्या अतिथिगृहात दोघांची भेट झाली.

"तुम्ही येथे कसे काय येऊ शकलात?" समुद्रसेनाने हीरककुमाराला विचारले.

"मी विमानातून आलो. आमच्या देशात एक फार मोठा शिल्पशास्त्री आहे. त्याने माझ्यासाठी एक विमान तयार केले. वीस हंस मला आकाशमार्गे येथवर घेऊन आले." हीरककुमार म्हणाला.

"राजकन्येशी विवाह करण्याच्या हेतूने दोघे राजकुमार आले आहेत. आता निवड [illegible] विचारले.

"काय करायचे ते मी पाहून घेते, ते काम माझ्यावर सोडा, बाबा!" हिमानी म्हणाली.

"तू काय करण्याच्या विचारात आहेस?" राजाने विचारले.

"मी एक परीक्षा ठेवते. ती कशी आहे, हे तुम्ही फक्त पहात रहा." राजकन्या हिमानी म्हणाली.

राजा दोघां राजकुमारांना विश्रांती घ्यायला सांगून म्हणाला–"स्वतः राजकुमारी आपल्या पतीची निवड करणार आहे, तेव्हां यथावेळी तुम्हांला सर्व कळेलच!" दोघांनी राजकन्येला पूर्वी कधी पाहिले नव्हते. म्हणून तिला पाहतां आले तर पहावे, अशी उत्सुकता अर्थातच त्यांच्या मनात होती.

एके दिवशी उजाडतांच राजकन्येची दासी आली व हीरककुमाराला राजोद्यानात बोलावून घेऊन गेली. एका झुडपा आडून त्याने हिमानीला पाहिले. ती एका नारिंगाच्या खाली बसून फराळ करीत होती. नारिंगाचे झाड फळांनी लवलबलेले होते. तिने फराळ झाल्यावर नारिंगे काढून खाल्ली. शेवटी तिने एक नारिंग तोडले आणि नको ते असे दर्शवीत अमृत फळाच्या



[illegible] दासीने अमृतफळाच्या झाडाखाली तिच्या अंथरुणाची व्यवस्था केली. ती त्याच्यावर जाऊन झोपली. तेव्हां हीरककुमाराला अतिथिगृहातून बोलावून घेऊन आलेल्या दासीने त्याला पुन्हां अतिथिगृहात परत बोलावून नेले.

दुसऱ्या दिवशी सकाळी ती दासी पुन्हां अतिथिगृहात आली आणि समुद्रसेनाला बोलावून घेऊन गेली. हीरककुमाराने जे पाहिले होते ते सर्व पाहून समुद्रसेन परत आला.

दोघां राजकुमारांनी राजोद्यानात जे काही पाहिले, त्याविषयी ते परस्परांशी बोलले.

हीरककुमार म्हणाला–"राजकन्येला नारिंगे फार आवडतात असे दिसते आहे."

"तसंच दिसतं आहे, खरं!" समुद्रसेन म्हणाला.

इतक्यात राजकन्येची दासी परत येऊन म्हणाली–"राजकन्या आपणां दोघांना एका मागून एक अशी उद्यां भेटणार आहे. तिला जो नजराणा द्यावयाचा असेल तो घेऊन चला आणि तिला द्या. तुम्ही तिला नजराणा द्याल त्यावर ती तुमच्यापैकी कोणाची निवड करते हे अवलंबून राहील, एवढे लक्षांत असू द्या."

ती निघून गेल्याबरोबर दोघे प्रतिस्पर्धी विचारात पडले. ते परस्परांशी काही बोलल्याशिवाय आपापल्या खोलीत निघून





गेले. रात्रभर दोघे विचार करीत राहल्या-मुळे दोघांपैकी एकालाही झोप लागली नाही.

उजाडतांच पुन्हां ती दासी आली आणि हीरककुमाराला राजकन्येच्या महालात बोलावून घेऊन गेली. हीरककुमार आपल्या उपरण्याच्या आड एक नारिंग लपवून घेऊन गेला आणि त्याने ते हिमानीला प्रेमाची भेट म्हणून दिले. तिने ते अत्यंत नम्रपणे स्वीकारले आणि त्याच्याशी थोडा वेळ संभाषण करून त्याला निरोप दिला. आपणांस पूर्ण यश मिळाले अशा आनंदात हीरककुमार सुमारे एका तासाने परत आला.

समुद्रसेनाची पाळी आली. हिमानीच्या समोर येतांच त्याने आपल्या खिशातून एक नारिंग काढले व ते मेजावर ठेवले. नंतर त्याने दुसऱ्या खिशातून एक रुमाल काढला व नारिंग डाव्या हातात घेऊन नारिंगावर तो टाकला. एक क्षणभर थांबून त्याने आपला रुमाल काढला. तेव्हां त्याच्या हातात एक अमृत फळ पाहून हिमानी आश्चर्यचकित झाली. तिला त्याने ते अमृत फळ दिले. तिने ते अत्यानंदाने स्वीकारले.

"एक लहानसे इंद्रजाल केले!" समुद्र-सेन म्हणाला.

हिमानीने समुद्रसेनाला वरले असल्याचे कळले. हीरककुमार हताश झाला. निरोप घेऊन निघताना त्याने समुद्रसेनाला विचारले—"तू काहीतरी जादू करून नारिंगाला अमृतफळ केलेस. ते कसे कलेस?"

"पहा!" असे म्हणत समुद्रसेनाने एक नारिंग घेतले आणि त्याची साल खालपासून वर सहा जागी अर्धीच कापली. त्यानंतर साल अर्धी काढून आंतल्या सर्व फोडी काढल्या व सालीचा आतला भाग पुसून आत अमृतफळ ठेवले आणि सर्व साल पुन्हा बंद केली. आतां

उजव्या हाताने त्यावर रुमाल टाकून ते झांकले. पुन्हा रुमाल काढतांना तो सालीसकट उचलला. त्याच्या हातात अमृतफळ राहले.

"एवढीच का जादू?" असे म्हणत स्मित करून हीरककुमार आपल्या हंसांच्या विमानात बसून निघून गेला.

त्यानंतर हिमानी व समुद्रसेन दोघांचा विवाह झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! राजकन्या हिमानीविषयी तुला काय वाटते? तिने तिला वरण्यासाठी आलेल्या राजकुमारांची परीक्षा घेते, म्हटले होते, परंतु तिने एका सामान्य इंद्रजाल करणाऱ्याशी कसा काय विवाह केला? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्या पायावर लोळू लागतील!"

त्याचे उत्तर म्हणून विक्रमादित्य म्हणाला—"राजकुमारीने घेतलेली परीक्षा स्पष्टच आहे. तिचे नारिंग खाणे आणि नारिंग अमृत फळाच्या झाडाकडे फेकून त्याच्या खाली झोंपणे दोघां राजकुमारांनी पाहिले होते. परंतु त्याचा अंतरार्थ हीरक-कुमाराला कळला नाही. समुद्रसेनाला कळला. तिचे प्रस्तुत जीवित नारिंगसारखे निस्सार द्रवच आहे, ते भरपूर गर असलेला अमृतफळासारखे व्हावे अशी तिच्या मनात इच्छा होती. जो कोणी तिला अमृतफळ देईल त्याच्याशी ती विवाह करील हा तो अंतरार्थ होता. समुद्रसेनाने तर हात-चलाखीने नारिंग अमृतफळ झाल्याचे दाख-वून तिचा भाव अधिक स्पष्टपणे कळल्याचे चातुर्याने दर्शविले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्याने वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)

श्री ए. सी. सरकार, जादुगार





# सोन्याची कडीं

एका गावी रामजी पाटील नावाचा शेतकरी रहात असे. त्याची साठी उलटली होती. त्याच्या मुलाचे नाव लखुजी होते आणि लखुजीच्या बायकोचे नाव दुर्गी होते. तिला मारुती नावाचा एक भाऊ होता. असे ते पाच जणांचे कुटुंब होते.

रामजीच्या हातांत चार पाचशे रुपये किमतीची सोन्याची कडी होती. दुर्गीचे लक्ष नेहमीं त्याच्यावर असे. रामजी ते ओळखून होता. त्यांच्या आशेने तरी सून दोन वेळचे जेवण वाढील असे रामजीला वाटे.

बाप मेल्यावर ती कडीं विकून बायकोला वाटतील तें एकदोन दागिने करून देता येतील असे लखुजीला वाटत होते.

एके दिवशी रामजी नेहमीप्रमाणे सायंकाळी शेताजवळच्या आंब्याच्या झाडाखाली बसून काहीतरी विचारात गढून गेला होता. काळोख पडल्याचे त्याच्या लक्षात आले नाही त्याला काळोख पडल्यावर मुळीच दिसत नसे. काळोख पडल्याचे लक्षात येताच तो थोडा घाबरून गेला.

"कोणी आहे का रे तिकडे? जवळ असाल कोणी तर इकडे या जरा!" असे म्हणत त्याने एक दोनदां हाक मारली. कोणी घरापर्यंत पोचवील, असे वाटले त्याला.

दूर शेतात मारुती काम करीत होता. त्याने म्हाताऱ्याचा आवाज ऐकला. म्हातारा बरा सापडला आहे काळोखात असा विचार करून त्याने आपला कोयता रामजीच्या पोटाला लावला व थोडा आवाज बदलून म्हणाला—"कडीं काढून देतोस की नाही?"

निरुपायाने रामजीने कडीं काढून मारुतीला दिलीं. मारुतीने ती घेऊन तेथून गपचुप पाय काढला.

रामजी कसाबसा घरी पोहोंचला.

श्री गो. स. भट

सोनूशेट सोनाराकडे गेला आणि त्याला ती कडीं दाखवून म्हणाला—"एवढे सोने विकून याची किंमत करून दे. अर्धा वांटा तुला देईन." सोनूशेटने त्याला होकार दिला.

काळोख पडल्यावर घरी आलेल्या सासऱ्याचे बुच्चे हात पाहून दुर्गी स्वत:ला आवरू शकली नाही आणि "कडी कोठे गेली" म्हणून तिने विचारले.

"तुला दागिने करून द्यायला सोनाराकडे टाकून आलो आहे." रामजी खरी गोष्ट लपवून सुचले ते उत्तर देत म्हणाला.

दुर्गीला त्याचा इतका आनंद झाला की तिने स्वत:साठी म्हणून निराळे जे काही शिजवून ठेवले होते ते सासऱ्याला वाढले.

मध्यरात्रीच्या वेळी सोनूशेटला कोणत्या तरी कामात गर्क झालेला पाहून त्याच्या बायकोने लक्ष्मी जवळ येऊन "इतक्या रात्री काय करताय हो?" म्हणून विचारले.

बायकोला अवेळी येऊन तो प्रश्न विचारतांना पाहून सोनेशेट चपापला व हातातली कडी लपवीत म्हणाला—"जाऊन झोप जा!" नवरा काहीतरी लपवीत असल्याचा संशय तिला आला.

दुर्गी कोंबडा आरवण्यापूर्वी पहाटे उठली आणि सोनूशेट सोनाराच्या घरी धावत गेली. सोनूशेट घरी नव्हता. नदी कालव्याकाठी गेला असल्याचे लक्ष्मीने सांगितले.



दुर्गी तिला म्हणाली—"काही नाही हो, लक्ष्मुबाई! मामंजींनी आपली दोन कडी माझ्यासाठी दागिने करून द्यायला सोनूशेटला दिली काल रात्री. तेव्हां कोणकोणते दागिने करायचे ते मला विचारून जायला सोनूशेटला सांगाल का?" असे लक्ष्मीला सांगून दुर्गी घरी निघून गेली.

सोनूशेट घरी आल्याबरोबर लक्ष्मी दुर्गीने जे सांगितले होते ते सांगून नवरा काय म्हणतो ते पाहू लागली. त्याला आश्चर्य वाटले. तो म्हणाला—"पण तो जिन्नस त्यांचा नाही!" आणि तिला गप्प केले.



ता सोनाराकडे जाऊन आल्याचे दुर्गीने सर्वांसमक्ष सांगून टाकले. ते ऐकून रामजी व मारुती दोघांना आश्चर्य वाटले. परंतु दोघे गप्प राहले, जणुकाही त्यांना त्यात लक्ष देण्यासारखे काही दिसलेच नाही.

त्यानंतर संधी पाहून मारुती सोनाराकडे गेला आणि कड्यांची गोष्ट विचारू लागला. परंतु सोनूशेट त्याच्याहून वस्ताद होता. विचारू लागला–"कोणती कडीं रे? तू केव्हां दिलीस? आणि कशासाठी दिलीस? जा, जा, पाहिजे तर ठाण्यावर जाऊन वर्दी दे!"

ते ऐकून मारुतीचा चेहराच पडला. सोनूशेट चोर लबाड आहे, हे रुजू कसे

टयाने घरी येऊन पुढे काय करायचे, या विचारात पडला.

रामजीने मुलाला जे घडले ते सांगितले. म्हणाला–"काळोखात कोणीतरी आला आणि मला एकटयाला पाहून विळा दाखवून कडी घेऊन गेला. कोण होता हे मी पाहिले नाही आणि काळोखात मला त्याचा चेहरादेखील दिसला नाही!"

ते कळल्यावरच लखुजीने त्याच्या मेहुण्याला सोनाराच्या घरी जाताना पाहिले होते. त्याचा या घटनेशी संबंध असावा असा संशय त्याला आल्याशिवाय राहला नाही.

मारुती सोनाराकडे येऊन बोलत असतां दाराआड उभी राहून लक्ष्मी सर्व ऐकत होती. तिला या पाठीमागे काहीतरी गुपित असल्याचा संशय आला. तिच्या माहेरच्या लोकांनी तिच्या अंगावर दागिने घातले नव्हते, म्हणून सोनूशेट मधूनमधून टोचण्या देत असे. लक्ष्मीला त्या टोचण्या असह्य वाटू लागल्या होत्या. रात्री नवऱ्याने वितळविलेले सोने लांबवून माहेरी नेऊन द्यावे व चार दागिने त्यांच्याकडून देववून नवऱ्यासमोर मिरवावे, असा विचार तिच्या मनात आला. म्हणून नवरा घराबाहेर पडल्याबरोबर तिने ते सोने लांबवून लुगड्याच्या केळयात लपवून ठेवून दिले.

सारखा खवळून बायकोला मारायला धावला. तिला त्या गोष्टीचा पत्ताच नाही आणि तिला उगाच चोर ठरविल्याबद्दल तिने रडण्याचे सोंग केले.

सोनूशेटने फसविल्याबद्दल तिकडे चिडून जाऊन मारुतीने त्याला ठार करून सूड उगवायचे मनाशी ठरविले आणि मध्यरात्रीच्या सुमारास सोनूशेटच्या घरी येऊन घराबाहेरच्या एका झाडाआड लपून बसला.

कडीं चोरी गेल्यानंतर मारुतीवर आणि सोनूशेटवर लखुजीला संशय आला. म्हणून त्याची नजर मारुतीच्या हालचालीवर सारखी असे. मारुती मध्यरात्र उलटल्यावर घराबाहेर पडलेला पाहून लखुजी त्याच्या पाठोपाठ निघाला आणि मारुती लपला होता त्या जागेपासून थोड्या अंतरावर तो काय करतो हे पहात दुसऱ्या एका झुडपाआड लपून उभा राहला.

घरातले सोने नाहीसे झाले, म्हणजे हे काम त्याच्या बायकोशिवाय कोण करणार, या संशयामुळे सोनूशेटला झोप लागली नाही. झोपल्याचे सोंग करून तो बायको काय करते हे पहात पडून राहला.

सोने जवळ राहले तर चोरी बाहेर पडेल या भीतीने व ते कोठेतरी बाहेर लपवून ठेवण्याच्या विचाराने आणि नवऱ्याला संशय येऊ नये यासाठी लक्ष्मी तपेली भरून घेऊन बाहेर पडली. ती गावाच्या वेशीपर्यंत



सरळ चालत गेली. झोपेचे सोंग करीत असलेला सोनूशेट तिच्या पाठोपाठ मांजराच्या पावलाने चालू लागला.

त्या दोघांना घराबाहेर पडलेले पाहून व दोघे कोठे जात आहेत हे न कळल्यामुळे मारुती सोनूशेटच्या पाठोपाठ निघाला. मारुतीच्या पाठीमागून लखुजीदेखील निघाला.

त्या चौघांपैकी कोणालाही त्यांच्यावर आणखी कोणाची नजर असेल व कोणी पाठीमागून येत असेल याचा संशयदेखील आला नाही. ती एकटीच असल्याचे लक्ष्मीला वाटत होते. बायकोच्या पाठोपाठ तो एकटाच जात असल्याचे सोनूशेटला वाटत होते. त्याचप्रमाणे मारुतीला त्याच्या समोर दोघे गेले असल्याचे माहीत होते, परंतु त्याच्या पाठीमागून लखुजी येत असेल याचा संशयदेखील आला नाही.

चौघे एकामागून एक मांजराच्या पावलांनी चालत होते. परंतु त्यावेळी एकजण रस्त्याच्या कडेला एका ओट्यावर झोपेचे सोंग करून पडून सर्व पहात होता. लखुजीच्या- [illegible] मनुष्य उठून त्याच्या पाठोपाठ चालू लागला.

लक्ष्मी गावाबाहेरच्या एका जुनाट पडक्या देवळाजवळ थांबली. तिने एक लहानसा खड्डा करून त्यात सोने पुरून ठेवले आणि घरी निघून गेली. ती निघून गेल्यावर तिघे एकदम त्या खड्ड्याजवळ धावले आणि पुरून ठेवलेल्या सोन्यासाठी मारामारी करू लागले. इतक्यात "थांबा!" असे दरडावून पाठीमागून येणारा मनुष्य म्हणाला.

सर्वांनी मागे वळून पाहिले. तो त्या गांवचा राजा होता. सर्व त्याच्या पायां पडून क्षमा मागू लागले. राजाने घडलेले सर्व वृत्त त्यांच्या तोंडून ऐकले आणि सोने चोरल्याबद्दल मारुतीला आणि चोरीला सामील होऊन विश्वासघातकीपणाबद्दल सोनाराला शिक्षा केली आणि सोने रामजीला परत देवविले. यथावेळी दुर्गीला ते सोने सासऱ्याकडून मिळाले व तिने त्याचे दागिने करवून घेतले.





एका गावी एका श्रीमंताला गौरी नावाची मुलगी होती. ही दिसायला सुंदर होती आणि हुशारपण होती. तिच्यात एकच एक दुर्गुण होता, ती सदा वटवट करीत असे. एक क्षणभरदेखील ती बोलल्याशिवाय राहील तर शपथ. जास्त वटवट आणि वाचाळपणा कधीकधी अंगाशी येतो, असे तिच्या आईने तिला किती समजावून सांगितले, परंतु तिच्या डोक्यात ते शिरले नाही. बोलणे ही एक कला आहे. तो दुर्गुण होऊच शकत नाही, असे तिला वाटत असे.

लग्न होऊन ती सासरी गेली तरी तिची ती संवय गेली नाही. या संवयीमुळे तिचे काही बिघडते आहे, असे तिला वाटले नाही. कारण तिच्या शेजारपाजारच्या मैत्रिणीदेखील तिच्याच सारख्या गप्पिष्ट होत्या. तिचा नवरा राज्याच्या मोठ्या हुद्यावर होता तसे त्या चौघींचे नवरेदेखील मोठमोठ्या हुद्यांवर नोकरी करीत. पुरुष मंडळी कामावर गेली की पांचही मैत्रिणी जमत आणि त्यांच्या चकाट्या चालू होत.

गौरीच्या घराशेजारी शारदा नावाची एक घरंदाज सुगृहिणी रहात असे. ती कधी या पांच मैत्रिणींच्या कंपूत सामील होत नसे. म्हणून पांचही जणींच्या नजरेत ती एक मागासलेली स्त्री होती. त्यांना तिची निंदा करण्यात रस वाटत असे.

एकदां त्या पांच जणी गप्पा मारीत बसल्या असतां गौरीला घेरी आली आणि ती बेशुद्ध होऊन खाली पडली. बाकीच्या चौघी घाबरून गेल्या. गोंधळल्यासारख्या त्या काही केल्याशिवाय बाहेर रस्त्यावर बडबडत आल्या. त्याच वेळी तिकडून जात असतां शारदाने त्यांना, त्या घाबऱ्या

सौ. वसुंधरा र. सावंत



स्थितीत पाहून काहीतरी अनपेक्षित घड-ल्याचे ओळखले आणि विचारल्यावर गौरी एकाएकी बेशुद्ध होऊन पडल्याचे त्यांनी सांगितले. ती सरळ गौरीच्या घरात गेली आणि तिच्या तोंडावर पाणी शिंपडून तिने तिला शुद्धीवर आणले. तिने नाडी पाहिली आणि गौरीला गरम दूध प्यायला देऊन स्मित करून म्हणाली—"अहो गौरीताई, तुम्ही आई होणार आहां. जरा संभाळून रहा, बरं का!"

शारदा निघून गेल्यावर तिने सांगितले ते खरे असल्याचे कळले. गौरी माहेरी गेली आणि सात आठ महिन्यांनी एका सुंदर मुलाला घेऊन स्वगृही आली. तिने आपल्या

दिली. तिच्या मैत्रिणींनी तिला अनेक वस्तू भेट म्हणून दिल्या. गौरी खूष झाली. शारदाने लोकरीचे कपडे मुलाच्या अंगाला पुरतील असे विणून आणून दिले. ते सर्व स्वत: तिने विणल्याचे कळल्यावर गौरीला आश्चर्यच वाटले.

दुसऱ्या दिवशी तिने आपल्या मैत्रिणींना ती गोष्ट सांगितल्यावर त्या म्हणाल्या—"अहो, लोकरीचे कपडे विणणे म्हणजे ब्रह्मविद्या आहे का? दरिद्री कुठली! अहो, ती पैसा दाताने पकडणारी बाई आहे. प्रत्येक काम हाताने करते. ती तरी काय करणार बिचारी? जवळ पैसे असतील तर ना! कोणाजवळ मागायला काय गेलं? पण गर्व आहे ना डोक्यात भरलेला!"

शारदा सर्व कामे स्वत:च करीत असे. तिला त्या गोष्टींची हौस होती. ती रांगोळी स्वत:च घरी तैयार करी. गोवऱ्या लावी, परसात भाजीपाला लावी. जास्त असला म्हणजे शेजार पाजाऱ्यांना देई. नवऱ्याचे कपडे, आपल्या चोळया व पोलकी स्वत: शिवी. लहान मोठे आजार घरगुती औषधा-वर भागवी, वगैरे गोष्टी गौरीने स्वत: पाहिल्या होत्या.

एकदां गौरीला नवऱ्याने राज्यकार-भारातील एक गुपित सांगितले. राजाच्या





बजावून सुद्धा सांगितले होते.

परंतु गौरीच्या पोटात ते गुपित कसे पचणार? दोन दिवस नेमतेम ती गप्प राहिली. परंतु माशी गिळल्यासारखे तिला होऊ लागलं. तेव्हां तिने आपल्या सर्व मैत्रिणींना अगदी कानांत सांगितल्यासारखे, परंतु थोडे तिखटमीठ लावून सर्व काही सांगून टाकले आणि त्यांनी ते कोणाला सांगू नये असे बजावून ठेवले. त्यांनी क्रमाने आणखी चार जणींना सांगितले आणि गांवभर ती गोष्ट पसरली.

या सर्व अफवांच्या मुळाशी गौरीचा पती असल्याचे कळल्यावर शिपायांनी त्याला अटक केली. गौरी रडरड रडली. पण त्याचा काही एक उपयोग झाला नाही. तिचा नवरा राजाच्या नजरेतून उतरल्या-वर तिच्याकडे येणाऱ्या सर्व मैत्रिणींनी येणे जाणे बंद केले. परंतु ती गोष्ट कळल्यावर शारदा तिच्याकडे धावून आली आणि तिला धीर देऊन म्हणाली—"माझ्याकडून होईल ती सर्व मदत मी करीन."

घरी जाऊन तिने आपल्या नवऱ्याला घडलेली गोष्ट सांगितली आणि तिच्या नवऱ्याला बांचविण्याला एक दोन सूचना केल्या. तो राजाकडे निवेदन करायला गेला.



आपल्या एका विश्वासपात्र नोकराकडून झालेल्या चुकीमुळे राजाला राग आला होता व त्याने राजद्रोहाचा आरोप लावून गौरीच्या नवऱ्याला फांशीची शिक्षा किंवा कमीत कमी हद्दपारीची शिक्षा देण्याचे ठरविले होते. अशा परिस्थितीत शारदाचा पती शिफारस करायला आला. राजाने त्याला थोडेसे रागानेच विचारले—"तुला त्याच्याशी काय काम आहे?"

तो म्हणाला—"महाराज! समजा, एका चोराने फक्त पैशासाठी चोरी केली. त्याच्या पिशवीत फक्त पैसे निघाले तर तो सामान्य चोर ठरेल. त्याच्या पिशवीत राजकीय कागदपत्र निघाले तर तो

राजद्रोही ठरेल. पण तो राजद्रोहीच आहे, हे आधीच ठरवितां येईल का?"

"हे सर्व तू कशासाठी सांगतो आहेस?" राजाने विचारले.

"आपण समजतां आहां तो खरोखरी राजद्रोही नाही. त्याने बायकोवर विश्वास करून काही गोष्टी तिला सांगितल्या. तिला बडबड करायची संवय आहे. म्हणून ते गुपित ती राखू शकली नाही." शारदाचा पती म्हणाला.

"मला नाही हे खरे वाटत. कोणी किती वाचाळ असला तरी गुपित राखू शकणार नाही, हे मी मानीत नाही." राजा म्हणाला.

"आपण क्षमा कराल तर मी साहस करून एक गोष्ट सुचवूं इच्छितो. राणी सरकारांना एखादे गुपित सांगून पहावे. आपण हे त्यांच्या परीक्षेसाठी करीत आहां, हे मात्र कोणाला कळू देतां कामा नये. फक्त चारच दिवसात मी म्हणतो ते कळेल." शारदाचा पती म्हणाला.

तो म्हणाला. त्यात काही अर्थ आहे असे ... पाहिले. राणीसरकार सुद्धा अशा गोष्टी करण्यात विधिनिषेध राखीत नाहीत, हे सर्वांस माहीत होते. राजाला देखील हे कळले.

राजाने आपली चूक ओळखून गौरीच्या पतीला बंदीमुक्त केले आणि सर्व गोष्टी बायकांजवळ बोलू नये हे समजावून सांगितले. नंतर त्याने बेफिकीरपणे बोलल्याचे कसे दुष्परिणाम होतात हे शिलालेखांद्वारे प्रजेला जाहीर करून कळविले.

पती कैदेतून सुटून आल्यावर गौरीने शारदाचे अनेक प्रकारे आभार मानले व म्हणाली–"तू आमच्यावर केलेल्या उपकाराची फेड कधी होणार नाही."

शारदाने तिला समजावून सांगितले की आपण व्यर्थ बडबड करण्याचे सोडून द्यावे. परनिंदा माणसाला फार आवडते. त्याने द्वेष, हेवा, मत्सर वाढतात आणि कोणाचेच हित होत नाही.





# शेरास सव्वा शेर

एका गावी नागनाथराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात होते. तो एक आतल्या गाठीचा मनुष्य होता. त्याच गावी धोंडीबा नावाचा एक शेतकरी रहात असे. धोंडीबाला त्याच्या बापाने मागे ठेवलेले दोन एकराचे एक शेत होते. शेतातले पीक कुटुंबाला काय पुरणार या विचाराने धोंडीबाने थोडा व्यापारधंदा करावा असा विचार केला. व्यापाराला चार पैसे हवे होता. म्हणून धोंडीबाने नागराजरावांकडे थोडे कर्जाऊ पैसे मागितले. त्यांनी धोंडीबाचे शेत गहाण म्हणून ठेवून घेऊन कर्जाची रक्कम दिली.

धोंडीबाने पुष्कळ मेहनत करून कर्जाची अर्धी रक्कम कशी तरी जमा केली व अर्धे कर्ज फेडायला गेला. तेव्हां नागराजराव म्हणाले–"सर्व कर्ज एकदमच फेड. असे अर्धे मुर्धे काय कामाचे? कागद पुऱ्या रकमेचा लिहिला आहे ना?" म्हणून धोंडीबा सर्व रक्कम एकदम फेडायचा विचार करून घरी आला आणि जमवलेली रक्कम जपून एका जागी घरात ठेवली. नंतर बाकी रक्कम मिळविण्यासाठी रात्रंदिवस मेहनत करू लागला.

एकदां धोंडीबाला व्यापाराच्या कामाने परगावी जावे लागले. तेव्हां त्याच्या घरी कोणी तरी साधू आपल्या बायकोला बरोबर घेऊन आला. धोंडीबाच्या बायकोने त्यांचा सर्व प्रकारे अतिथी सत्कार केला. धोंडीबाच्या कुटुंबाला किती कष्टात जीवित घालवावे लागत आहे हे त्या साधूने धोंडीबाच्या बायकोच्या तोंडी ऐकले. या कष्टाचे आयुष्य कसे तरी संपविण्याला काही मार्ग आहे का तिने विचारल्यावर त्या साधूने होकार दिला.

त्याने तिला पुष्कळ मंत्रतंत्र करायला लागतील असे सांगितले. त्याने तिच्या

श्री गणपतराव कुलकर्णी



डोळ्यांवर पट्टी बांधून मंत्रातंत्राचे सोंग केले आणि चाळीस दिवस दररोज तशी पट्टी बांधून रात्री झोपायला सांगितले, म्हणजे पुरलेले धन सांपडायला दिव्यदृष्टी येईल अशी तिची समजूत घातली.

त्यानंतर पुष्कळ दिवसांनी धोंडीबा कर्जाची उरलेली रक्कम मिळवून घरी परत आला. पूर्वीच जपून ठेवलेली काढायला गेला तर ती नाहीशी झालेली दिसली. त्याने बायकोला विचारले. परंतु तिला ते ऐकून आश्चर्य वाटले. दोघांना घरातली रक्कम कशी उडाली, कळले नाही.

त्यात पोळल्या जागी मीठ चोळायला नागराजराव आले. म्हणाले–"माझी सर्व ठेवलेली जमीन माझ्या नावे करून द्यायला तयार हो. धोंडीबाला कळेना की मुद्दलाच्या दुप्पट व्याजाची रक्कम कशी झाली. परंतु नागराजरावांनी आंकडेमोड करून हिशोब दाखविला. तेव्हां धोंडीबा म्हणाला– "धनी ! मला काय हिशोब कळतो ? तुम्हीच गळा सोडवायला मार्ग काढा काहीतरी."

नागराजरावांनी त्याला–"दुसरा मार्ग नाही, शेत लिहून दे" असे स्पष्ट सांगितले.

धोंडीबाने शेत लिहून दिले आणि बायकोला घेऊन दुसऱ्या गावी निघाला. वाटेत बायकोने धोंडीबाला सायूने येऊन मंत्रतंत्र केल्याची गोष्ट सांगितली. तेव्हां घरातली रक्कम चोरीला गेली असल्याची आणि त्यात नागराजरावाचा हात असल्याचे गोष्ट धोंडीबाच्या लक्षात आली. पण आतां करण्यासारखे काहीच उरले नव्हते. नागराजरावांनी अशा लबाड्या करून गरिबांची शेते व घरे लुबाडल्याची गोष्ट जगजाहीरच होती.

तो ज्या गावी आला त्या गावात एक सावकार रहात होता. त्याच्याकडे शेती भाती होती आणि सावकारी पण होती. त्याच्याकडे धोंडीबा व त्याची बायको दोघं नोकरी करू लागली.

धोंडीबा नोकरीला लागला त्यानंतर थोड्याच दिवसांनी सावकाराने त्याच्या



[illegible] वड्डरांच्या नायकाला दिले. विहीर खणीत त्या जागी वड्डरांना काम हवं नको ते पाहण्याचे काम धोंडीबाला करावे लागे.

एकदा विहीर खणण्याचे काम ऐन रंगात चालू असतां वड्डरांच्या नायकाने एकाएकी खणण्याचे काय बंद करायला वड्डरांना सांगितले. म्हणाला–"आज एवढेच काम पुरे !" आणि वड्डरांना बरोबर घेऊन मालकाला किंवा धोंडीबाला काही सांगितलेशिवाय निघून गेला. त्यावेळी धोंडीबा सर्व पहात होता. खणताना 'खण्ण्' असा आवाज झालेला त्याच्या लक्षात आला होता आणि लगेच नायकाने काम बंद केल्याचे त्याने ओळखले होते.

काळोख पडल्यावर धोंडीबाने भुताचे भयंकर सोंग केले आणि विहीर खणण्याचे काम चालले होते तेथे जवळच एका झाडामागे लपून बसला. प्रहररात्र उलटल्यावर धोंडिबाने अंदाज केला होता त्याप्रमाणे वड्डरांचा नायक एकटा त्या जागी आला. धोंडीबा एकाएकी भयंकर आवाज काढीत समोर आला आणि घोगऱ्या आवाजात बोलू लागला–"अरे, तूच का, माणसाच्या पिल्ला ! माझे पुरलेले धन न्यायला आला आहेस का? माझा वांटा दिल्याशिवाय



हात तर लाव ! तीन बोकड आणि तीन कोंबडी आण आधी !" असे म्हणत त्याने नायकाची गर्दन धरून त्याला ढकलले.

"आणतो बाबा !" म्हणत नायकाने तेथून पाय काढला आणि मागे वळून देखील पाहिले नाही.

धोंडीबा उजाडेपर्यंत तेथेच पाहरा देत बसून राहला आणि उजाडल्यावर सावकाराच्या घरी जाऊन घडलेली गोष्ट थोडक्यात सांगितली. दोघे त्या जागी पहारी व फावडे घेऊन आले. खणल्यावर त्यांना त्या जागी एक हंडा सापडला. हंड्यात सोन्या चांदीची नाणी व रत्नमाणिक्ये होती. ती एक देवीचा कृपा होती.



धोंडीबाचा मालक खूष झाला आणि म्हणाला—"तुला काय पाहिजे ते मागून घे, धोंडीबा!"

"हे तुमचे धन आहे, तुमच्या पूर्वजांनी सांठवून ठेवलेले आहे, ते तुम्हीच घ्या!" असे सांगून धोंडीबाने त्याला नोकरी कां करावी लागली ते सर्व सांगितले.

सावकार त्याला म्हणाला—"त्या नाग-राजाची कायमची खोड मोडेल असे काही तरी करूया."

त्यानंतर काही दिवसांनी नागराजराव ज्या गल्लीत रहात असे त्याच गल्लीत परगांवाच्या एका श्रीमंताने घर भाड्याने घेतले आणि त्यात तो राहू लागला. एकदां

येऊन चार सोन्याची नाणी देऊन मोड मागू लागला.

ती नाणी पाहूनच नागराजरावाचे डोळे दिपले. म्हणाला—"ही कोठे मिळाली रे तुला?"

"मालक! ही आमच्या धन्याकडची! त्यांना मोड हवी आहे." नोकर म्हणाला. नंतर त्याने नागराजरावाला जवळपास कोणी पहात ऐकत नाहीना असे नटून त्याच्या मालकाकडे तशी नाणी पुष्कळ असल्याचे गुपित सांगितले.

ते ऐकून त्या श्रीमंत सावकाराशी मैत्री वाढविण्याचा विचार नागराजरावाच्या मनात आला. त्याप्रमाणे त्याने त्या श्रीमंताला भेटून तो कोठला काय आणि त्याच्याकडे किती धन असेल वगैरे विचारून काढून घेतले. ते त्याचे धन स्वतः मिळ-विलेले नाही हे देखील त्या श्रीमंताकडून नागराजरावाला कळले.

तो म्हणाला—"हे गुपित मी तुम्हांलाच सांगतो आहे, बरं का! माझे वडील राज-पुतान्यात एक शिल्पकार होते. त्यांनी आपल्या राजाच्या राजकोषांत जायला एक चोरवाट असल्याची माहिती कळल्या-वर मला सांगितली. ते धन चोरून मी इकडे येऊन राहू लागलो आहे."

असतात तर काय बिघडले असते?" नाग-राजरावाने विचारले.

"मी तेथेच राहलो असतो तर पुन्हां पुन्हां त्या चोरवाटेने जाऊन धन चोरून आणण्याचा मोह झाला असता. मोहाचे भूत शेवटी मानेवर बसले असते आणि त्याने केव्हां गळा दाबला असता, कोणास ठाऊक? आतां हे पैसे आहेत त्यांचा उपयोग करण्यासाठी कारखाना काढण्यासाठी आलो आहे." असे सांगून त्या श्रीमंताने नाग-राजरावाला त्याच्या जवळचे धन दाखविले. ते पाहिल्यावर नागराजरावाला तो श्रीमंत म्हणाला ते सर्व खरे वाटले. एवढे धन राजाच्या खजिन्याशिवाय इतरत्र असणे शक्यच नव्हते.

नागराजरावांनी त्या श्रीमंताशी दोस्ती थोडी वाढविली आणि एके दिवशी त्यांनी विचारले—"काय हो? त्या राजाच्या खजिन्यातले धन प्राप्त करण्याचे भाग्य या गरिबाला मिळणे अगदीच अशक्य आहे का?"

"अहो, तुम्हांला वाटते तसं ते सोपं नाही? किती भानगडी आहेत त्यात! आणि वर जिवाला धोका आहे तो निराळा. मी वडिलांना काय म्हणून सांगावयाचे? परंतु तुम्ही एक काम करतां येईल का



पहा. आम्ही एक साखरेचा कारखाना काढणार आहो. त्यासाठी शंभर एकर भूमीत ऊस लावावा लागेल. तुम्ही शंभर एकर जमीन आमच्या नावे करून दिलीत तर मी आपल्या वडिलांना समजावून सांगून ते गुपित तुम्हांला सांगू शकेन." तो श्रीमंत म्हणाला.

नागराजराव म्हणाले—"त्यात काय मोठेसे? नाही तरी मधाचे बोट लावल्या-शिवाय कधी काम होते का?" असे सांगून नागराजराव घरी आला. त्याने त्या धनि-काच्या नांवी आपली शंभर एकर जमीन लिहून त्याचा कागद दोन दिवसांनी आणून दिला. ते दोघे एकां खोलीत बसून त्या

विषयी बोलू लागले. तो श्रीमंत नागराजरावाने लिहून दिलेला कागद वाचू लागला.

त्यावेळी अनपेक्षितपणे खोलीत एक सरकारचा अधिकारी आला. त्याला पाहून त्या श्रीमंताने त्याला जणुंकाही कळू न देतां तो कागद खिशात लपविला.

तो अधिकारी त्या श्रीमंताला म्हणाला–"तुझी सर्व लबाडी आम्हांला कळली आहे. चल महाराजांकडे, महाराज तुला सुळावर चढविणार आहेत." असे म्हणत घाबऱ्याघाबऱ्या पहाणाऱ्या नागराजरावाकडे पहात विचारू लागला–"आणि हा कोण? तुझा साथीदार वाटते? चल, याला सुद्धांबरोबर घेऊन चल! महाराजांना याची गरज कदाचित भासेल."

"ह्या बिचाऱ्याला सोडा हो! ह्याला काही एक माहिती नाही. सहज भेटायला आलेला एक थोर माणूस आहे." असे तो श्रीमंत त्या अधिकाऱ्याशी बोलत असतां नागराजरावाने ते बोलण्यात गुंतले असल्याचे पाहून तेथून पाय काढला.

ज्यांचे शेत लुबाडले होते ते आपापल्या शेतात काम करू लागले होते. त्याने त्यांना जाऊन विचारले–"काय रे! तुम्ही कर्जाची रक्कम फेडली नाहीत आणि शेतात कोणाला विचारून पाय ठेवलात?"

ते सर्व त्याला म्हणाले–"पहिल्याने तू आपले तोंड येथून काळे कर, नाही तर आमच्याशी गाठ आहे, लक्षात ठेव. नंतर पश्चात्ताप करू लागशील!"

म्हणजे आपण लिहून दिलेल्या कागदाची गोष्ट या लोकांना इतक्यात कळली काय, असा विचार करून आश्चर्य करीत नागराजराव उभा राहला.

धोंडीबा पुढे येऊन एक कागद दाखवीत म्हणाला–"आमच्या शेतावर तुझा हक्क होता तो तू स्वतःच हा कागद लिहून सोडलास. विसरलास का?"

धोंडीबाने आपल्या बऱ्याच्या सहाय्याने स्वतःचेच नव्हे तर इतरांची शेते सुद्धां सोडविली व त्यांची त्यांना देवविली.



# योगी अन् कर्मयोगी

एक शेतकरी रात्र पडल्यावर आपल्या शेतातून परत येत होता. एका झाडाखाली एक साधू समाधी लावून बसला होता. तो न दिसल्याने शेतकऱ्याच्या पायाचे नख चुकून त्याला लागले.

साधूने रागाने डोळे उघडून पाहिले आणि शेतकऱ्याला शाप दिला–"ए पापी! मला तुझ्या ज्या पायांची नखे लागली आहेत ते दोन्ही पाय गळून पडतील. परंतु तो शाप शेतकऱ्याला लागला नाही. त्याने साधूची माफी मागितली आणि मुकाट्याने घरी गेला.

आपली तपश्चर्या व्यर्थ झाली असे वाटून साधू आत्महत्या करण्याच्या बेतात होता.

तेव्हां झाडावर निवास करणारी एक देवी त्याला दर्शन देऊन म्हणाली–"तू आत्महत्या कां करतो आहेस आणि तपश्चर्या कां करीत आलास इतके दिवस?"

"मोक्ष मिळावा म्हणून?" साधू म्हणाली.

"मग तू मूर्खच दिसतोस! तू स्वतःच्या स्वार्थासाठीच तपश्चर्या केलीस! तो शेतकरी आपल्या कुटुंबासाठी मेहनत करतो आहे. तू योगी असशील तर तो कर्मयोगी आहे! तो इतरांसाठी जगतो आहे. म्हणून तुझा शाप व्यर्थ झाला." ती देवी म्हणाली.

तेव्हां साधूच्या मनात ज्ञानोदय झाला.







# भाग्य दूत

**क**धी काळी मोरगाव येथे रघुनाथ शास्त्री नावाचे एक विद्वान कवी रहात असत. एकदा ते कोणत्या तरी दूरच्या गावी कामाला गेले होते आणि तेथले काम पुरे झाल्यावर परत आपल्या गावी निघाले. परत येतांना पांडू नावाच्या एका गाडीवाल्याची गाडी पांच होन भाड्याने ठरवून गाडीत बसले.

वाटेत पांडूने शास्त्रीबुवांना विचारले– "काय हो, तुमचे गांव मोरगांवच का?" त्या वेळी शास्त्रीबुवा कोणत्यातरी विचारात होते. मान वर करून म्हणाले–"आमचे खरे गांव म्हणशील तर जेजूरी आहे. आमचे वडील मोरगांवला आम्हांला घेऊन आले."

"म्हणजे तुमचे पूर्वज जेजूरीचे का?" पांडूने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"कां, एवढे आश्चर्य कां वाटलं तुला? त्या गांवी तुझे ओळखीचे लोक आहेत वाटते?" शास्त्रीबुवांनी विचारले.

पांडूच्या मनाला कोणतीतरी गोष्ट लागल्यासारखे वाटले. तरी स्वतःला सावरून म्हणाला–"होते एका काळी! तेदेखील या पोटाच्या पायी गांव सोडून निघून गेले. बरं ते सोडा! तुम्ही काय करतां?"

"कविता करतो. दोन एक काव्ये लिहिली आहेत!" शास्त्रीबुवा म्हणाले.

पांडूला आश्चर्याबरोबर आनंद झाला. म्हणाला–"म्हणजे तुम्ही चांगलेच कवि असलां पाहिजे. असं बोला न! मला कवी म्हणालात तर फार आवडतात. तुमच्या सारख्या थोर कवीला आपल्या गाडीत घेऊन जायला मिळते आहे, ही माझ्या भाग्याचीच गोष्ट आहे. तुमचे वाडवडील सुद्धां कवीच होते का?"

गाडीवाला म्हणाला ते ऐकून शास्त्रीबुवा खूप होऊन म्हणाले–"अरे, ती काय विचारायची गोष्ट आहे? त्यांच्या रक्तातच

पांडूने काही वेळ विचार केल्यावर विचारले–"मी विचारले तर रागवणार तर नाहीना, तुम्ही? ही कविता रचल्याने तुम्हांला पोटापाण्याला काही मिळते का हो?"

शास्त्रीबुवा तो प्रश्न ऐकून रागावले नाहीत, उलट गाडीवाला हुशार दिसतो आहे, असे त्यांना वाटले. ते त्याला म्हणाले–"अरे, या काळात पूर्वीसारखे कवींचे पोषण करणारे राजेमहाराजे कोठे राहले आहेत? आमचे आजोबा पंडित गोपाळशास्त्री जेजूरीच्या सरदार रघुजी जाधवांच्या दरबारी थोर कवी होऊन गेले. सरदार रघुजी राजे आमच्या आजोबांची कविता ऐकून इतके खूप झाले की त्यांनी रोख एक हजार होन देऊन त्यांच्या गळ्यात पंचवीस तोळ्यांचा सोन्याचा हार घातला. त्यावेळी मी लहान होतो."

पांडू त्यानंतर काही बोलला नाही आणि गाडी हांकण्यात निमग्न होऊन गेला.

दुपार झाली. कडक ऊन पडले होते. शास्त्रीबुवा पांडूला म्हणाले–"हे पहा, पांडू! थोडा वेळ गाडी थांबवतोस का? गाव दिसते आहे ना, त्या गावात जाऊन पाणी पिऊन यावे, म्हणतो!"

पांडूने गाडी थांबविली–"शास्त्रीबुवा! तुम्ही नका उतरू! मी जाऊन पाणी आणवण्याची व्यवस्था करवितो." असे म्हणत तो मधल्या पाऊलवाटेने गावात गेला आणि



सौ. सुमित्रा शं. प्रधान








उलटपावली एका ब्राह्मण मुलाच्या हाती ताक आणवून शास्त्रीबुवांना प्यायला सांगितले. ताक प्याल्यावर शास्त्रीबुवांना हलके वाटले व म्हणाले–"पांडू! कोणत्या शब्दात तुझे आभार मानू रे!"

"त्यात काय हो मोठेसे?" असे म्हणत पुन्हा गाडी हाकू लागला. संध्याकाळी गाडी मोरगावला पोचली. शास्त्रीबुवा गाडीतून उतरले. त्यांनी मोलकरणीच्या हाती पाच होन गाडीवाल्याला द्यायला पाठविले.

पांडूने गाडी हांकली आणि मोलकरणीला म्हणाला–"शास्त्रीबुवांना पैसे नको म्हणून सांगायला मी सांगितले आहे असं सांग!" मोलकरणीने ती गोष्ट येऊन शास्त्रीबुवांना सांगितली. तेव्हां शास्त्रीबुवा धावत बाहेर आले. परंतु गाडी बरीच दूर निघून गेली होती. म्हणून त्यांनी टाळी वाजवून हाक मारून गाडी थांबविली शास्त्रीबुवा गाडी-जवळ गेले आणि बळजबरीने पैसे देऊ लागले. तेव्हां पांडू म्हणाला–"शास्त्रीबुवा! तुम्हीच सांगा, दिलेले दान कोणी परत घेतो का?"

[illegible] जरा सांग की!"

"तुम्ही मला आज जे भाडे द्यायला निघाला आहां ते पैसे तुमच्या आजो-बांना सरदार रघुजी जाधवांनी दिले-ल्या दानातलेच नाहीत का?" पांडूने विचारले.

"होय, नाही कसं म्हणू?" शास्त्रीबुवा म्हणाले.

"सरदार रघुजीराजे जाधव हे माझे आजोबा! मी त्यांच्यासारखे तुम्हांला हजार होन देऊन स.न्याचा हार तुमच्या गळ्यात घालू शकलो नाही, किंवा एखादी शालसुद्धां देण्याच्या स्थितीत नाही. परंतु तुमच्या-सारख्या थोर कवीला आपल्या गाडीत घरी पोचवायचे भाग्य मला लाभले, याबद्दल मी देवाचे आभार मानतो." असे सांगून पांडूने बैलांना हांकले आणि शास्त्रीबुवा त्याच्या थोर मनाचे कौतुक करीत जागच्या जागी थांबले.





# मंत्रवलेली लिंबे

एका गावी पं. रामनाथ नावाचे वैद्य रहात असत. त्यांच्या हाताला चांगला गुण होता. त्यांना त्यांच्या धंद्यात चांगलीच प्राप्ती होत असे. त्यांच्या मुलाचे नाव शंभुनाथ. त्याने बापाजवळच वैद्यकशास्त्राचा अभ्यास केला होता. मुलगा वयात आल्यावर बापाने त्याचा विवाह करून दिला.

पं. रामनाथाला वार्द्धक्य आले होते. मुले मुली, सुना, नातवंडे घरात पुष्कळ होती. सर्व आनंदात व मजेत होती. म्हणून मरणसमयी रामनाथाला सुख लाभले होते. त्यांनी डोळे मिटले तेव्हां घरात लक्ष्मीचा वास होता. ते वारल्यावर सर्व जबाबदारी शंभुनाथावर आली. पं. रामनाथाच्या औषधावर लोकांचा जेवढा विश्वास होता तेवढा शंभुनाथाच्या औषधावर नव्हता. रोग्याची संख्या कमी होत गेली आणि प्राप्तीदेखील झपाट्याने कमी झाली.

तसं होण्याचे कारण काय हे शंभु-नाथाला कळेना. वडिलांवर लोकांचा जेवढा विश्वास होता, कदाचित तेवढा आपल्यावर नसेल, असे त्याला वाटले. परंतु त्याला हळूहळू संसाराचा गाडा कसा रेटायचा, हा प्रश्न जास्तजास्त सतावू लागला. कारण प्राप्ती कमी होत गेली आणि वडिलांनी जे मिळवून ठेवले होते त्यातला अर्धा अधिक भाग संपून गेला होता. दुसरा काही धंदा करावा म्हणावे तर त्याला वैद्यकीशिवाय दुसरे काही येत नव्हते.

एके दिवशी शंभुनाथ जेवायला बसला असतां त्याची बायको म्हणाली–"गावा-बाहेर डोंगराच्या एका गुहेत एक स्वामी आले आहेत. ते लोकांना भस्म मंत्रवून देतात आणि त्या भस्माने कोणताही आजार चांगला बरा होतो."

कु. अनसुया जोशी

ते ऐकून शंभुनाथ चकित झाला. मंत्रवलेल्या भस्मविभूतीने सर्व रोग कसे काय बरे होतील. सर्व त्याला खरेच वाटले नाही. तो त्या दिवशी संध्याकाळी गावातल्या लोकांना साधु राहातो तो जागेची खूण वगैरे विचारून त्या गुहेत गेला.

गुहेत स्वामी भगवी वस्त्रे नेसून बसले होते. त्यांनी कपाळाला भस्म लावले होते व हातात रुद्राक्षमाळा होत्या. बाजूला कमंडलू ठेवलेले होते. त्यांच्या चारीबाजूला लोकांची गर्दी होती. तरी ते सर्वांना भस्म घेणारे लोक स्वामींना फुले, फळे, वस्त्रे वाटीत होते. मंत्रवलेले भस्म देऊन व त्यांचा आशीर्वाद घेऊन निघून जात होते.

[illegible] [illegible] बदल झाल्याचे फक्त त्याच्या बायकोच्या लक्षात आले. तो दररोज सकाळी स्नानसंध्यादि करून आदिशक्ती व पराशक्ती देवींच्या समोर फुले व लिंबे ठेवून तासन् तास आराधना करीत बसू लागला. त्याची बायको शेजारपाजारच्या बायका भेटत त्यांना ते सर्व सांगायची. संसाराचा खर्च चालविण्यासाठी तिला याचे काम कर, त्याला मदत कर असे करावे लागे.

एकदां शंभूनाथ पूजा करीत असतां कोणीतरी बाई रडत जात असल्याचे ऐकू आले. त्याने बाहेर येऊन पाहिले. एक [illegible] जात होती. शंभुनाथाने तिला विचारले—"काय झालं ग बाई मुलाला ?"

"माझा मुलगा बेशुद्ध होऊन पडला आहे हो! स्वामीजींकडे जाऊन त्याला भस्म वगैरे देऊन पाहणार आहे. तेथवर हा जिवंत राहतो की नाही, त्या देवालाच माहीत!" ती बाई म्हणाली.

शंभुनाथने तिला आत यायला सांगितले. तिला आपल्या आराधनेच्या जागी घेऊन गेला आणि देवीला नमस्कार करून एक लिंबू उचलून मंत्रविले. नंतर त्याने एका पेल्यात लिंबाचा रस काढून त्यात थोडे पाणी शिपडले व लिंबाचा रस त्या मुलाला पाजला.

अर्ध्या तासाने मुलगा उठून आईबरोबर स्वतःच्या पायाने चालून गेला. त्याच्या आईने शंभुनाथाचे पाय धरून मुलाला वांचविल्याबद्दल त्याचे आभार मानले.

"आभार त्या देवीचे मान आणि तिच्या पायां पड!" शंभुनाथ म्हणाला.

तिने देवीला नमस्कार केला आणि मुलाला घेऊन निघून गेली. तिने शंभुनाथच्या मंत्रवलेल्या लिंबाची गोष्ट चार चौघांना सांगितली व ती क्रमाने गांवभर पसरली. त्या दिवसापासून शंभुनाथकडे रोगी येऊ लागले. शंभुनाथ त्यांना एक किंवा दोन लिंबे मंत्रवून देऊ लागला. तो कोणाला काय आजार झाला हेदेखील विचारीत नसे आणि ते देतील ती रक्कम घेऊं लागला.





हळूहळू शंभुनाथाच्या घरी रोग्यांची गर्दी होऊ लागली. त्याचे नशीव अनुकूल झाले. बायकोला आणि मुलांना अन्न वस्त्रांची चिंता उरली नाहीं. घराचे रूपच पालटले.

एकदां शंभुनाथचा सर्वांत धाकटा मुलगा डोळ्याच्या पापण्यावर पुरळ झाले म्हणून रडू लागला. मुलाच्या आईने शंभुनाथला ते पुरळ दाखविले.

"टोपलीतली दोन लिंबे घे आणि ती पिळून मीठपाणी घालून मुलाला चार दिवस आंघोळ घाल. सर्व पुरळ नाहीसे होईल." शंभुनाथ म्हणाला.

बायकोला आश्चर्य वाटले. तिने विचारले—"काय हो, लिंबे देवीला अर्पण करून मंत्रविल्यावर ना त्यांचा गुण पडतो?"

शंभुनाथ स्मित करून म्हणाला—"मला कोठे आहे मंत्रबित्र? माझे बाबा जिवंत होते तोंपर्यंत त्यांनी हे लिंबाचे वैद्यकच तर केले होते. सर्व रोगांवर रामबाण औषध म्हणजे हे लिंबू आहे. लिंबाबरोबर नुसते पाणी किंवा पाणी व मीठ, साखर किंवा [illegible] बाबांना त्याची चांगली माहिती होती. मला त्यांनी तेच शिकविले. परंतु स्वामींच्या भस्मावर लोकांचा विश्वास वाढला आणि लोक तिकडे धावले. त्यांच्या भस्मावर लोकांचा विश्वास फार दिवस टिकणे शक्य नाही, हे मी ओळखून होतो. माझ्यावर लोकांचा विश्वास बसावा म्हणून मी देवीची आराधना करू लागलो. परंतु माझे औषध खरे असल्यामुळे ते गुणकारी असल्याबद्दल लोकांची खात्री पटली आणि तो विश्वास आतां उडणे अशक्य!"

आतां शंभुनाथच्या बायकोला कळले की सासऱ्याने परसांत लिंबाची झाडे एवढी कशासाठी लावली होती आणि लिंबाची निरनिराळी औषधे त्यांनी कशी तयार करून ठेवली होती.

तिने नवऱ्याने सांगितल्याप्रमाणे लिंबांचा रस काढून त्या पाण्याने मुलाला दोनतीनदां स्नान घातले. मुलगा बरा झाला.





# सत्यभाषी

खलीफा हारून उल रशीद यांच्या नंतर बगदादच्या गादीवर आलेल्या खलीफांत अबदुल अजीज हा एक प्रमुख होता. तो स्वभावाने फार उदार होता. तो गोरगरिबांना नित्य दानधर्म करी. त्यात त्याची बरोबरी करू शकणारा कोणी त्या काळात तरी नव्हता. तो कोणाला कधी शिक्षा करी त्या विचित्र असत. तुरुंग, फाशी, हात कापणे फटके देणे वगैरे शिक्षा त्याने कधीच केल्यां नाहीत. अपराध्याने केलेल्या चुकीची जाणीव त्याला राहील अशी शिक्षा तो करीत असे. आरोपीला समाजात अपमान वाटून पुन्हां तसा गुन्हां त्याच्या हातून घडू नये असे वाटावे याचा प्रयत्न बादशाह करी. आणखी एक उल्लेखनीय गुण राजाच्या अंगात होता. सत्यवादी व इमानदार माणसाचा तो आदर करी. त्याला उचित बक्षिस देऊन त्याची पाठ थोपटी व इतरांना खरे बोलण्यास प्रोत्साहन देई. त्यामुळे त्याच्या काळात चोऱ्यामाऱ्या कमी होत. लोक नीतिनियमाने वागत.

एकदां फार काळानंतर अब्दुल अजीज बादशहाला एक मुलगा झाला. त्याने त्या आनंदात पुष्कळ दानधर्म केला. गोरगरिबांना अन्नधान्य वाटले. त्यांच्यापैकी एक गरीब मनुष्य एक पोते भरून धान्य घरी घेऊन गेला असतां त्याला पोत्यातले धान्य जमिनीवर ओतल्यावर त्यात एक सोन्याचे नाणे सांपडले. ते पाहून त्याला आश्चर्य वाटले. परंतु त्याने ते नेऊन बादशहाला परत द्यायचे ठरविले आणि निघाला. तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली—"तुम्हांला वेडबीड लागलं आहे का? घरी चालून आलेलं सोनं असं कोणी फेकून देतो का?" परंतु त्या गरिबाने तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व दरबारात

सय्यद अन्वरुल हक

जाऊन म्हणाला—" महाप्रभू! आज आपण मला पोते भरून धान्य दिले होते. त्यांत एक सोन्याचे नाणे सांपडलं. ते परत द्यायला आलो आहे."

बादशहा त्या गरीब माणसाचा खरेपणा पाहून इतका खूष झाला की त्याने वजिराला बोलवून त्या गरीब माणसाला शंभर सुवर्णमुद्रा द्यायला सांगितले.

ते सर्व त्या गरीब माणसाचा शेजारी बशीर नांवाच्या एका श्रीमंत माणसाला कळले. त्याने मोहाला बळी पडून एका गरीब माणसाचे सोंग घेतले आणि पांच सोन्याची नाणी घेऊन बादशहाकडे गेला आणि नम्रपणे कुनिसात करून म्हणाला—" गरीब परवर! आपण काल दिलेल्या पोतेभर धान्यात मला या पांच सुवर्णमुद्रा मिळाल्या. आपण या पांच सुवर्णमुद्रा मला दान म्हणून दिल्या नव्हत्या. पण पोत्यात मिळाल्या. या परत द्यायला आलो आहे. मेहरबानी करून परत घ्याव्या." त्याला परत पांचशे सुवर्णमुद्रा मिळण्याची आशा होती.

[illegible] तो खाऊन पिऊन अंगाने हृष्टपुष्ट झालेला दिसला. त्याच्या अंगावर मळके फाटके कपडे असले तरी त्याच्या दोन्ही हाताच्या बोटात अंगठ्या होत्या. गरिबाचा वेष करीत असतांना घाईत त्या काढून ठेवायला ही गोष्ट तो विसरला होता. त्यामुळे त्याचे खरे स्वरूप ओळखायला बादशहाला थोडादेखील वेळ लागला नाही. तो जास्त सुवर्णमुद्रा मिळतील या आशेने आला असल्याचे ओळखून बादशहाने त्याला धडा मिळेल अशी युक्ती योजली.

वजिराला बोलावून बादशहा म्हणाला— " या पांच सुवर्णमुद्रा खजिन्यात जमा करा व याला याच्या सत्यवादीपणाबद्दल एक प्रमाणपत्र लिहून द्या!"

बशीरचा चेहरा खाड्कन उतरला व तो निमूटपणे बादशहाने दिलेले ते खरेपणाचे प्रमाणपत्र घेऊन घरी गेला.





# महाभारत

धृतराष्ट्राने वानप्रस्थाश्रमास अनुसरून आपल्या अतिथींचा सत्कार कंदमुळे पुढे ठेवून केला. त्या दिवशी रात्री पांडव त्यांच्या मातेच्या चारी बाजूला वेटोळे करून झोपले. दुसऱ्या दिवशी ते स्त्रियांना व पुरोहितांना बरोबर घेऊन जवळपासचा प्रदेश पाहण्यास निघाले. एका जागी त्यांना यज्ञवेदिका दिसल्या. होम, यज्ञ वगैरे चालू होते. होमकुंडात मुनी हवी सोडीत होते. हरणे निर्भयपणे संचार करीत होती. त्याच प्रमाणे पक्ष्यांचा कलकलाट चालू होता. पांडव मुनींचे ते आश्रम पहात, मुनींना नमस्कार करून त्यांना वस्त्रादि दान करीत व त्यांचे आशीर्वाद घेत धृतराष्ट्र होता तेथे परतले.

त्याच वेळी व्यास मुनी आपल्या शिष्यवृंदासह तेथे आले. सर्वांना आनंद झाला. कारण कित्येक दिवसांनंतर त्यांचे दर्शन घडले होते. त्यांच्या तोंडी मनाला शांतिलाभ होईल अशी वचने ऐकायला मिळतील, ही आशा सर्वांच्या मनांत अंकुरली. व्यासांनी धृतराष्ट्राला विचारले—" वानप्रस्थाश्रम कसा काय वाटला? पुत्रशोकाचा त्रास तुला होत नाहीसा झाला का? तुझ्यामुळे गांधारीला मानसिक दुःख होत नाही ना? कुंती तुम्हां दोघांची सर्व प्रकारे काळजी वाहते आहे ना?"

व्यास मुनींनी वरील गोष्टींची चवकशी केल्यानंतर विदुराच्या विषयी ते पूर्ववृत्त सांगू लागले—" विदुरच खरोखरी धर्मराज

६४. धृतराष्ट्राचे परलोक गमन



युधिष्ठिर आहे. तुम्हां कोणाला माहीत नसेल, मांडव्य मुनींच्या शापामुळे स्वतः यमधर्मराजाला तुझा भ्राता म्हणून जन्म घेऊन या मर्त्यलोकात यावे लागले होते. तो यमधर्मराजच आपल्या योगबलाने धर्मराज युधिष्ठिर देखील झाला. म्हणूनच विदुराचा आत्मा धर्मराजाच्या देहात लीन होऊ शकला. यमधर्मराजाच्या जन्माची ही कहाणी फार थोड्यांना माहीत आहे. त्याच साठी त्याने आपल्या योगबळाचा उपयोग केला."

पांडव सपरिवार धृतराष्ट्राच्या आश्रमात एक महिनाभर राहले. त्यानंतर व्यासमुनी पुन्हां तेथे आले. पूर्वकालांतील कथा सांगून

केले. त्याच सुमारास तेथे नारद, पर्वत, देवल, विश्वावसू, तुंबर आणि चित्रसेन हे आले. धृतराष्ट्राच्या अनुज्ञेने धर्मराजाने सर्वप्रकारे त्या सर्व पूजनीय पाहुण्यांचा अतिथिसत्कार केला. व्यास व इतर अतिथी, पांडव, धृतराष्ट्र, गांधारी, कुंती, द्रौपदी, सुभद्रा वगैरे स्त्रिया सर्व एकत्र येऊन बसले आणि प्राचीन काळातल्या देवासुरांच्या आणि ऋषीमुनींच्या गोष्टी परस्परांना सांगू लागले.

एकदां धृतराष्ट्र व्यासांना म्हणाला– "आपल्या आगमनाने आमचा जन्म सार्थक झाला. आतां मला परलोकाची चिंता करण्याचे कारण उरले नाही. तरी माझ्या मनाला ही गोष्ट सतत बोचत आहे, माझ्या मुलांच्या पापबुद्धीमुळे पुण्यवान अशा पांडवांना विनाकारण अपमान सहन करावा लागला आणि युद्धात कित्येक तरुणांना प्राणांची आहुती द्यावी लागली. युद्धात मरण पावलेल्या माझ्या मुलांना व त्यांच्या मुलांना कोणती गती मिळाली आहे, कोणास ठाऊक? माझ्या मनाला रात्रंदिवस याच गोष्टीची चिंता वाटत आहे. मनाला क्षणभरदेखील शांती नाही."

धृतराष्ट्राने असे म्हटल्याबरोबर गांधारीचे हृदय दुखाने उचंबळून आले. तिच्याबरोबर

रडू कोसळले. गांधारी हात जोडून व्यासांना नमस्कार करून म्हणाली–"माझी मुले जाऊन सोळा वर्षे लोटली. इतके दिवस त्यांचे वडील त्या दुःखाने क्षीण होत गेले आहेत. त्यांचा एकही अंकुर उरला नाही. मेल्यानंतर पाणी द्यायलासुद्धां कोणी उरला नाही याचे त्यांना दुःख होत आहे. ते बोलून दाखवीत नाहीत, परंतु मी त्यांचे दुःख ओळखते. द्रौपदी आपल्या मुलांची आणि आपल्या भावंडांची आठवण काढून शोक करीत आहे. सुभद्राला अभिमन्यू गेल्याचे दुःख आहे. माझ्या सुनांना आपल्या पतींची आठवण येते आणि सारे आयुष्य वैधव्यांत घालवावे लागणार याचे दुःख वाटते आहे. भूरिश्रवाची ही बायको आपले सासरे, पती व पुत्र गेल्याच्या शोकाने रडत आहे. या सर्वांचे दुःख दूर करण्याचा काही उपाय असेल तर सांगा."

व्यास मुनी कुंतीला म्हणाले–"तुझ्या मनात काय आहे ते तू बोलून टाक." तिने कर्णाचा वध झाला त्याबद्दल तिला वाईट वाटत असल्याचे सांगितले.

व्यास गांधारीला म्हणाले–"तुला आपल्या मुलांना व इतर नातेवाइकांना भेटतां येईल. कुंती कर्णाला, सुभद्रा अभिमन्यूला, द्रौपदी आपल्या मुलांना, वडिलांना आणि



भावंडांना भेटेल. तुम्हां सर्वांचे दुःख हलके करतां येण्यासारखे आहे. मी तुमची तुमच्या मृत आप्तेष्टांशी भेट घालू शकेन. तो विचार माझ्या मनात पूर्वीच होता. तो तू व कुंती दोघींनी बाहेर जणुकाही ओढला. तुम्ही कोणीच कोणासाठी शोक करण्याचे कारण नाही. महाभारत युद्धात जे कोणी मरण पावले ते कोणत्यातरी रूपाने जन्मलेले देवांचे किंवा राक्षसांचे अंशच होते. धृतराष्ट्र हा एक गंधर्वराजा आहे. पांडू हा मरुत् गणांपैकी एक होता. विदुर व धर्मराज यमाचे अंश म्हणून जन्मले. दुर्योधन हा कली व शकुनी द्वापर होता. दुःशासन वगैरे सर्व राक्षसांचा अंश होते. भीम वायूचा अंश,



अर्जुन नर नावाच्या महर्षीचा अंश आणि नकुल व सहदेव हे अश्विनी अंश आहेत. अभिमन्यू चंद्राचा अंश आणि द्रौपदी धृष्टद्युम्न अग्नीचा अंश रूपे जन्मले. शिखंडी हा राक्षस अंश आहे. बृहस्पतीचा अंश द्रोण रूपे आणि शंकराचा अंश अश्वत्थामा रूपे जन्मले. भीष्म वसु पुत्रांपैकी एक होता. आतां तुम्ही सर्व जास्त वेळ न घालवतां भागीरथी काठी चला. युद्धांत मरण पावलेल्या सर्वांची तेथे भेट होईल. त्यामुळे तुमचा सर्वांचा शोकावेग कमी होईल."

ते ऐकून सर्वांना एक नवीन उत्साह वाटला. ती गोष्ट व्यासांनीच सांगितली [illegible] त्यांच्या तपोबलाची सर्वांना कल्पना होती. आणखी कोणी सांगितले असते तर त्या गोष्टीकडे कोणी लक्षच दिले नसते. सर्व गंगातीरी निघाले. धृतराष्ट्र पांडवांना, मुनींना व इतरांना बरोबर घेऊन निघाला. सर्व गंगातीरी पोचले व सोयीची जागा पाहून दिवसभर विश्रांती घेत बसले. सूर्यास्त झाला. सर्वांनी स्नान केले संध्यादि विधी उरकले.

नंतर सर्व व्यास मुनी होते तेथे आले. तेव्हां व्यासांनी गंगेत अवगाहन करून महाभारत युद्धात मरण पावलेल्या सर्व कौरव पांडव योद्धयांचे आवाहन केले.

त्या पाठोपाठ नदीतीरावर सहस्रावधी लक्षावधी लोकांचा कलकलाट ऐकू येऊ लागला. कौरव आणि पांडवांची सैन्ये यथापूर्व दिसू लागली. भीष्म, द्रोण वगैरे योद्धे एकेक करून नदीतून बाहेर येऊ लागले. विराट, द्रुपद, उपपांडव, अभिमन्यू, घटोत्कच, कर्ण, दुर्योधन वगैरे जो जो वेष करून युद्धाला निघाले होते तो तो वेष धारण करून व आपापल्या वाहनांत बसून गंगेबाहेर आले. आतां त्यांचे आपसांत वैर नव्हते. व्यासांनी आपल्या तपश्चर्येच्या बळाने धृतराष्ट्राला दिव्य दृष्टी दिली. गांधारी व धृतराष्ट्र दोघांनी आपल्या



आप्तबांधवांना प्रत्यक्ष पाहिले. इतरांना देखील मृत बांधवांना परत पहायला मिळा-ल्याबद्दल फार आश्चर्य वाटले, हे स्वप्न तर नाही असे वाटले.

जीवात्मे मृतात्म्यांना प्रेमाने भेटले व अपूर्व आनंदाचा अनुभव घेऊ लागले. पांडव कर्णाला, अभिमन्यूला आणि उपपांडवांना भेटले. ती रात्र फार आनंदाने गेली. त्या नंतर मृतात्मे जसे आले होते तसेच गंगेत परतले आणि अदृश्य झाले. ज्या ज्या लोकांतून जे जे आले होते ते ते त्या त्या लोकांत निघून गेले.

व्यासांनी ज्या कौरव स्त्रिया जिवंत होत्या त्या सर्वांना विचारले–"तुमच्यापैकी

निवास करीत आहेत तेथे त्यांच्याबरोबर जायचे असेल, त्यांना जातां येईल." धृतराष्ट्रांच्या सुनांनी सासूसासऱ्यांच्या अनु-मतीने गंगेच्या धारेत प्रवेश केला.

ही घटना घडल्यानंतर धृतराष्ट्राचा शोक पूर्णपणे दूर झाला. तो आपल्या आश्रमात परतला. एक महिनाभर पांडव त्याच्याबरोबर राहले होते. त्यांना त्याने परत हस्तिनापूरला परतण्यास आणि पुत्रवत् प्रजेचे पालन करण्यास सांगितले. धर्मराजाचे मन परतण्यास तयार नव्हते. राज्य करण्याची त्याला इच्छा नव्हती. त्याला राज्य सुनेसुने भासले. सहदेवाला कुंती शिवाय परत जाण्याची इच्छा नव्हती. परंतु कुंतीने सर्वांना हस्तिनापूरला परतायला आग्रहपूर्वक सांगितले. जाणे भाग होते सर्वांना. धृतराष्ट्र पांचही पांडवांना प्रेमाने निरोप देतांना भेटला. पांडव सपरिवार हस्तिनापूरला परत निघाले.

पुढे काही दिवसांनी धर्मराजाला भेटा-यला नारदमुनी आले. धर्मराजाने त्यांचे सर्वप्रकारे अर्घ्यपाद्य पूजा करून स्वागत केले व कुशल प्रश्न विचारले. गंगातीरी तपोवनांचे दर्शन घेऊन आल्याचे नारदाने सांगितल्यावर पांडवांनी त्याला विचारले–

आहेत ना ते? गांधारी, कुंती, संजय वगैरेंच्या तब्येती कशा आहेत?"

नारद म्हणाला–"धर्मराजा! तुम्ही भावंडे तेथून परतल्यावर धृतराष्ट्र, गांधारी व कुंतीला घेऊन कुरुक्षेत्राहून गंगाद्वारी गेला. संजय व यज्ञ करणारी याजक मंडळी अग्निहोत्र बरोबर घेऊन निघाली. गंगाद्वारी तुझ्या काकांनी वायुभक्षण करून सहा महिने खडतर तपश्चर्या केली. गांधारीने फक्त जलाहार घेतला. कुंतीने मासोपवास व्रत घेतले. संजयाने एक भुक्तव्रत घेतले. याजकांनी अग्निहोत्र सतत तेवत ठेवले. त्यानंतर धृतराष्ट्र कोणालाही बरोबर घेतल्याशिवाय वनात हिंडू लागला. तसा संजय नित्य त्याच्या बरोबर रहात असे. गांधारी व कुंती त्याच्या पाठोपाठ हिंडत होत्या. कुंतीची नजर सतत गांधारीवर असे. असाच एके दिवशी धृतराष्ट्र गंगेत स्नान करून आपल्या आश्रमाकडे परत येत असतां सोसाट्याचा वारा सुटला आणि अरण्यात वणवा पेटला.

"वणवा जवळ येऊ लागल्याचे त्याच्या झळांवरून ओळखून धृतराष्ट्र संजयाला म्हणाला–'ज्या दिशेला अग्नी नसेल त्या दिशेला जा. या अग्नीत आम्हांला उत्तम गती लाभेल!'



"संजय घाईघाईने पुढे येऊन म्हणाला–'महाराज! आपणास या वणव्यात मरण येणे मला मुळीच पटणार नाही. अग्नी तसा चारीबाजूने पुढेपुढे सरकत आहे.'

"'संजया! तपस्वी लोकांना वायू, जल आणि अग्नी यांपैकी ज्यात मृत्यू येईल तो इष्टच असतो. तू जास्त विचार करीत थांबू नकोस आणि बाजूला हो!' धृतराष्ट्र म्हणाला."

"संजयाने धृतराष्ट्राला, गांधारी व कुंतीला प्रदक्षिणा घालून योगसमाधीत प्रवेश करण्यास सांगितले. तिघांनी तसेच केले. त्यांची शरीरे काष्ठवत झाली. संजय वणव्यातून बाहेर आला आणि गंगातीरीच्या

आश्रमात येऊन नारदाला भेटला. धृतराष्ट्र, गांधारी, कुंती वणव्याच्या अग्नीत भस्म होऊन विलीन झाले. ही सर्व कथा नारदाला सांगून संजय हिमालय पर्वतात निघून गेला.

ही शोकवार्ता कळल्यावर पांडवच काय सर्व नागरिक शोक करू लागले. वणव्याच्या अग्नीत नव्हे, धृतराष्ट्र पश्चात्तापाच्या हृदयाग्नीत जळून गेला आणि त्याला उत्तम गती मिळाली आहे, असे सांगून नारदाने धर्मराजाचे सांत्वन केले.

धर्मराजाने गंगातीरी जाऊन मृत आप्तेष्टांचे तर्पणादी विधी उरकून श्राद्ध केले आणि बारा दिवस दानधर्म केला. महाभारत युद्ध संपल्यानंतर अठरा वर्षांनी धृतराष्ट्राने परलोक गमन केले. त्यांतली शेवटची तीन वर्षे तो वानप्रस्थाश्रमातच होता.

धृतराष्ट्र निवर्तल्यावर आणखी अठरा वर्षे धर्मराजाने राज्य केले. तेव्हां त्याला एक अति भयंकर वृत्त कळले. मुसळामुळे सर्व यादवांचा संहार झाला, मागे राहले ते फक्त कृष्ण व बलराम होते.

[illegible] होऊन त्यांचा संहार झाला आहे. तेव्हां आपले कर्तव्य काय ?"

त्यांचा संहार कसा झाला याचे वृत्त असे :

एकदां विश्वामित्र, कण्व आणि नारद द्वारकेला गेले असतां सारण वगैरे यादवांनी कृष्णाचा मुलगा सांब याला स्त्री वेषांत मुनींसमोर उभा करून विचारले–"ही बाई गरोदर आहे. हिच्या नवऱ्याला हिच्या पोटी मुलगा व्हावा असे वाटते आहे. हिला मुलगा होईल की मुलगी, सांगण्याची कृपा करावी !"

त्याचे उत्तर देत मुनी म्हणाले–"वृष्णी, अंधकांचा नाश करणारे एक मुसळ याच्या पोटी जन्माला येईल."

त्यानंतर मुनींनी कृष्णाला भेटून जे घडले ते सांगितले. ते ऐकून मुनींचा जसा शाप आहे तसेच होणार हे कृष्णाला कळले.





# मित्रभेद

[ १३ ]

खड्ड्यातून बाहेर आल्यावर तिघे प्राणी ब्राह्मणाला म्हणाले–"खड्ड्यातला तो मनुष्य महापापी आहे. त्याला काढू नकोस. त्याच्या बोलण्यावर विश्वास करू नकोस."

नंतर वाघ ब्राह्मणाला म्हणाला–"दूर तो डोंगर दिसतो आहे, पाहिलास का? त्याच्या उत्तरेकडल्या उतरणीवर माझी गुहा आहे. तू तिकडे आलास तर मी तुझे हे ऋण फेडण्याचा यत्न करीन." असे सांगून वाघ निघून गेला.

तो गेल्यावर माकड म्हणाले–"तो वाघ राहतो त्याच्या समोरच्या प्रदेशात एक धबधबा आहे. त्याच्या शेजारच्या वडावर मी राहतो. ये केव्हां तरी त्या बाजूला."

"तुझ्यावर एखादे प्राणसंकट आलं तर तू माझी आठवण काढ!" असे सांगून साप निघून गेला."

सर्व प्राणी निघून गेल्यावर खड्ड्यातला मनुष्य ब्राह्मणाला हाका मारून म्हणाला– "अरे ब्राह्मणा! मला सुद्धां काढ !"

आपल्याच मनुष्य जातीचा प्राणी आहे, असा विचार करून ब्राह्मणाने त्याला हात देऊन वर काढला.

वर आल्यावर तो ब्राह्मणाला म्हणाला– "मी भडोचचा एक सोनार आहे. तुला कधी सोन्याचे दागिने करायचे झाले तर माझ्याकडे ये." असे सांगून तो निघून गेला.

त्यानंतर ब्राह्मण बराच हिंडला फिरला. परंतु त्याला काही एक मिळकत झाली नाही. अगदी हताश होऊन तो घराकडे

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र



परत निघाला आणि माकड रहात होते त्या जागी येऊन पोंचला. माकडाने त्याला अमृततुल्य गोड फळे खायला दिली. ती खाल्यावर त्याची भूक भागली.

माकड त्याला म्हणाले—"फळेच हवी असली तर दररोज येत जा."

"तुझ्यावरच्या उपकारांची फेड झाली रे बाबा!" ब्राह्मण म्हणाला.

ब्राह्मणाला माकडाने वाघाची गुहा दाखविली. ब्राह्मण तेथे गेल्यावर वाघ त्याला एक चंद्रहार व इतर काही दागिने देत म्हणाला—"कोणीतरी राजकुमार होता. घोड्यावरचा ताबा न राहल्यामुळे येथे पडून मरण पावला. त्याच्या अंगावरचे हे

[illegible] म्हणून तू हे घेऊन जा आणि यांचा तुला हवा तो उपयोग करून घे!"

ब्राह्मण ते दागिने घेऊन सोनाराकडे गेला. तो ते दागिने विकून चांगली रक्कम देऊ शकेल असे त्याला वाटले.

सोनाराने त्याला प्रेमाने बोलावून बसायला सांगितले. पाय धुवायला पाणी दिले व म्हणाला—"माझ्याकडून आपली काही सेवा होण्यासारखी असल्यास, आज्ञा करा!"

"माझे हे थोडेसे सोने विकून देववू शकलास तर पहा!" ब्राह्मण म्हणाला.

सोनाराने ब्राह्मणाकडून ती आभूषणे घेतली व ती राजकुमारासाठी त्याने तयार केलेल्याचे त्याला आठवले. राजकुमाराचा शोध काढीत असतां त्याचे प्रेत एका किर्र झाडीत सांपडले होते. त्याची सर्व आभूषणे तेवढी त्याच्या देहावर नव्हती. आभूषणांच्या मोहाने कोणीतरी राजकुमाराला ठार केला असावा अशा संशयावरून चोराला शोधून देणाऱ्याला चांगले बक्षिस दिले जाईल असे राजाने जाहीर केले होते. हा ब्राह्मणच तो खुनी चोर असावा, असे समजून ब्राह्मणाला राजाच्या हाती सोंपवून चांगले इनाम मिळवावे असे सोनाराने मनात ठरविले.

तो ब्राह्मणाला म्हणाला—"तुम्ही येथेच थांबा. मी सोन्याच्या व्यापाऱ्यांकडे जाऊन

[illegible] येतो." असे सांगून सोनार राजदरबारी गेला आणि राजाला राजकुमाराची आभूषणे दाखवून ती घेऊन येणाऱ्या ब्राह्मणाला आपल्या घरी अडकवून ठेवले असल्याचे सांगितले.

राजाच्या शिपायांनी सोनाराच्या घरी जाऊन ब्राह्मणाला कैद करून राजासंमोर हजर केले. त्या ब्राह्मणाचे काय म्हणणे आहे ते ऐकल्याशिवाय राजाने त्याला शिरच्छेदाची शिक्षा सांगितली.

तेव्हां ब्राह्मणाला सांपाची आठवण झाली. लगेच साप आला आणि त्याने ब्राह्मणाला विचारले—"माझ्याकडून कोणत्या तऱ्हेच्या सहाय्याची अपेक्षा आहे?"

"मी कैदेत पडलो आहे, उद्यां परवांच माझा शिरच्छेद होणार आहे. तू मला वांचवू शकलास तर पहा." ब्राह्मण म्हणाला.

सांपाने ब्राह्मणाला त्याने काय करायचे ते सांगितले आणि राजवाड्यात जाऊन राणीला चावला. अंतःपुरांत गोंधळ उडून गेला. सर्व राजधानीभर चिंतेची छाया पसरली. वैद्यांनी, मांत्रिकांनी आपापल्या शक्तीची पराकाष्ठा करून पाहिली. परंतु गुण पडला नाही आणि आतां राणीला वांचविणे अशक्य वाटूं लागले.



राजाने हताश होऊन असे जाहीर केले की जो कोणी राणीला वांचवील त्याला मोठे इनाम दिले जाईल. दिंडोरा ऐकून ब्राह्मणाने कैदखान्याच्या अधिकाऱ्याकरवी राजाला कळविले की त्याला संधी मिळाल्यास तो राणीला बांचवू शकेल. राजाने हुकूम काढला की ब्राह्मणाला ताबडतोब कैदेतून सोडविण्यात यावे. त्याप्रमाणे ब्राह्मणाने राणीच्या हाताला स्पर्श केल्याबरोबर विष उतरले आणि राणीने डोळे उघडले.

राजाला परमानंद झाला. त्याने ब्राह्मणाला त्याने मागितले ते इनाम दिले आणि विचारले—"तुमच्याकडे ती आभूषणे कशी काय आली?" ब्राह्मणाने जे घडले ते सर्व








सांगितले. तेव्हां राजाने कृतघ्न सोनाराला शिक्षा केली आणि ब्राह्मणाला आपला प्रधान नेमले. त्याला कित्येक गांवांची जहागीरी दिली. ब्राह्मणाने आपल्या बायकामुलांना बोलावून घेतले आणि त्याचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.

पिंगलकाला कृतघ्न माणसाची गोष्ट सांगून दमनक पुढे म्हणाला–"तेव्हां महाराज! मित्र असो, भाऊबंद असो, गुरु असो की राजा असो, त्याच्या गुन्ह्याची शिक्षा त्याला झालीच पाहिजे, असे मनू सांगतो. हा बैल आहे तुमचा, वैरी त्याच्याशी शत्रूसारखेच वागले पाहिजे. त्याला जवळ राहू देणे हे सापाच्या बिळावर अंथरूण घालून झोपण्यासारखे किंवा आग लागलेल्या घरात राहण्यासारखे आहे."

"मित्रा! तू म्हणालास ते सर्व खरे आहे. तेव्हां मी त्याला सावध करतो!" पिंगलक म्हणाला.

"काय म्हणालात? सावध करणार त्याला? अशा लोकांविरुद्ध जो इलाज

गुलाबीने बोलण्याची गरजच काय? आपल्याकडे बरेच दिवस राहून तो माजला आहे. गोष्टीतल्या ढेकणासारखे त्याला तक्षण चिरडून ठार केले पाहिजे." दमनक म्हणाला.

कोणती गोष्ट रे ती?" पिंगलकाने विचारले.

दमनक ती गोष्ट सांगू लागला.

**ढेकणाची गोष्ट**

पूर्वी एक राजा होता. त्याच्या वाड्यात उत्तम शयनागार होते. उत्तम गाद्यागिर्द्या होत्या. गाद्यांच्या शिवणीत व गुंड्यांच्या खाचात स्वच्छ पांढऱ्या पलंग पोसाखाली धनसर्पिणी नावाची एक ऊ लपून असे. ती दररोज अंथरूण झाडून घालते वेळी चातुर्याने निसटून जाई. रात्री राजा झोपला की त्याच्या डोक्यात शिरून त्याचे रक्त शोषून घेई तरी राजाची झोप मोडत नसे. अशा तऱ्हेने ती ऊ राजाच्या रक्तावर पोसली जाऊन चांगली जाडजूड झाली.



# १५१. विचित्र डोंगर

चीन देशातील क्वांग्सी प्रांतात हे चुन्याचे खडकाळ डोंगर आहेत. यांच्याविषयी एक कथा सांगतात.

कित्येक शतकांपूर्वी एका चित्रकाराने या डोंगरात एका शिखरावर चढून तेथून दिसणाऱ्या पर्वताच्या रांगांचे चित्र काढले. त्याच्या चित्रांचा प्रजेत फार आदर होत असल्यामुळे सर्व प्रांतांतील लोकांनी डोंगरांची चित्रे तशीच काढायला सुरवात केली. तसे पाहिले तर असे डोंगर क्वांग्सी प्रांतात एका बाजूला कोठेतरी आहेत.





# मित्रभेद

[ १५ ]

दमनकने सांगितलेली कुकुद्रुमची गोष्ट ऐकून पिंगळकने विचारले–"संजीवक माझ्याशी द्रोह करायला तयार आहे हे मला कसे काय कळणार?"

"तो शिंगे दाखवून महाराजांच्याकडे पुढेपुढे येऊ लागला की समजावे की तो शिंगाने आपल्याला ठार करायलाच येत आहे." दमनकाने समजावून सांगितले. नंतर सिंहाचा निरोप घेऊन तो फार काळजीत पडल्यासारखा संजीवकाकडे आला.

"काय रे झाले, एवढा उतरलेला चेहरा का?" संजीवकाने दमनकाला विचारले.

"राजाच्या आश्रयाला राहू लागल्यावर नेहमी स्वतःचा जीव मुठीत घेऊन रहावे आणि आपल्या मित्रांच्या जिवाचे काही बरे वाईट तर होणार नाहीना ही काळजी वहावी लागते. हद्दपार झालेला, मूर्ख आणि राजसेवक हे चालती बोलती प्रेते असतात. इच्छा किंवा विचार असूच शकत नाहीत. त्याला यती संन्यासांसारखे निष्काम कर्म समजून पापाच्या चिखलात लोळावे व लोटांगण घालावे लागते. मित्रा, अद्याप तुझ्या लक्षात ही गोष्ट आली नाही का रे?" दमनकाने मित्रत्वाचा आव आणून विचारले.

"मी राजाच्या इतका जवळ असतो म्हणून माझ्या जिवाला धोका आहे, असे म्हणतोस का तर?" संजीवकाने विचारले.

"मला तरी तसेच वाटते. तू माझा मित्र आहेस, म्हणून खरे तेच मी सांगतो आहे. काय रे, आपला मालक पिंगळक तुझ्यावर एवढा रागवला का आहे रे? 'आज संजीवकाला ठार करून तुम्हां सर्वांना मी मेजवानी देतो.' असे तो म्हणाला, बुवा. ते ऐकून माझ्या मनाची जी स्थिती झाली ती मी सांगायला [illegible] तू तयार झाले पाहिजेस." दमनक म्हणाला.

ते ऐकून संजीवकाला डोक्यावर वीज पडल्यासारखे झाले. म्हणाला–"म्हणजे आकाशच कोसळले की रे! राजाची इमाने-इतबारे सेवा केली, हे त्याचे बक्षिस! राजाच्या मनात इतका क्रोध उत्पन्न व्हायचे कारण कळले तर तो राग दूर करायला प्रयत्न करता येईल. पण कारणाशिवाय राग आला तर काय करायचे बुवा?"

"राजाची बुद्धी अशीच विचित्र असते रे! थोडे बलवान वाटतात त्यांच्यावरच त्याचा डोळा असतो!" दमनक म्हणाला.

"बरोबर, बरोबर! माझीच चूक! मी सर्वांवर डोळे मिटून विश्वास करतो. गवत पाला खाऊन जगणाऱ्या माझ्यासारख्याने फक्त मांसाहार करणाऱ्या सिंहाशी मैत्री करणे बरोबर झाले नाही. पूर्वी एक हंस होऊन गेला, त्याच्या सारखी आपल्या बरोबरीचे जे नसतात त्यांच्याशी मैत्री केल्याचा परिणाम शेवटी आत्मनाशच होणार!" असे सांगून संजीवकाने हंसाची गोष्ट सांगितली.

### हंस व घुबड

एका जंगलात एक सरोवर होते. त्यात एक हंस एकटा रहात असे. तो त्या सरोवरात विहार करी व त्या तलावातच त्याला पोटापुरता आहार मिळत असे. अशा तऱ्हेने त्याचे आयुष्य सुखाने जात असे.

एकदा त्या बाजूला एक घुबड आले.



    

"कोठला राहणारा रे तू? इकडे कसा काय आलास?" हंसाने घुबडाला विचारले.

घुबड म्हणाले–"मी अशाच एका सरोवरातल्या कमलवनात राहतो. तुझ्या संगतीत आपली सर्व पापे धुवून निघतील व पवित्र जीवन घालविता येईल या विचाराने आलो आहे."

हंस ते ऐकून फुलून गेला. म्हणाला–"अरे वा! रहा की, तुला वाटेल तितके दिवस खुशाल रहा." घुबड त्याप्रमाणे राहू लागले.

काही काळ दोघे सुखाने आनंदाने राहले. परंतु त्यानंतर घुबड आपल्या गावी जायला निघाले तेव्हां निरोप घेत हंसाला म्हणाले–"तुझं माझ्यावर खरं प्रेम असेल तर तू माझ्या गावाला येऊन माझ्या घरी चार दिवस अतिथी म्हणून राहलं पाहिजेस!"

हंस एकदा सकाळी उडून त्या कमल वनाच्या बाजूला गेला. परंतु घुबड एका डोंगरातल्या गुहेत घोरत असल्याचे दिसले.

हंस म्हणाला–"अरे मी तुझा मित्र हंस! तुला भेटायला आलो आहे."

...ला दिवसा काही दिसत नाही. काळोख पडल्यावर भेटू." घुबड म्हणाले.

हंस काळोख पडेपर्यंत वाट पहात राहला. काळोख पडल्यावर घुबड बाहेर आले आणि हंसाचा कुशल समाचार विचारू लागले. त्यानंतर हंस गुहेबाहेर झोपला.

बनजारा जातीचे काही लोक त्या दिवशी रात्री त्या सरोवराच्या काठी येऊन उतरले. उजाडताच पुढच्या मुक्कामावर जाण्यासाठी निघतांना त्यांनी त्यांच्या रीतीप्रमाणे शंख वाजविला.

तो आवाज ऐकून घुबड दचकून मोठ्याने ओरडले आणि भुर्रकन् उडून गुहेत जाऊन बसले. हंस एकटाच गुहेबाहेर राहून गेला.

अगदी निघण्याच्या वेळी घुबडाचे ओरडणे अशुभ समजून बनजाऱ्यांच्या टोळीच्या नायकाने घुबडाचा आवाज आला होता त्या बाजूला शब्दभेदी बाण सोडून त्या दुष्ट घुबडाला ठार करायला आपल्या लोकांना सांगितले. त्याप्रमाणे एकाने बाण सोडला आणि तो नेमका हंसाला लागला आणि तो मेला





# तिळ्या बहिणी

[ ३ ]

[दानशील महाराज एकदां उद्यानात फिरायला गेले असतां त्यांना एक मोठी शिळा दिसली. त्यांनी ती थोडी बाजूला सरकवून पाहिली तर खाली त्यांना एक भूगृह दिसले. त्यांनी आपल्या तिघां मुलींना दासदासींच्या देखरेखीखाली त्या भूगृहात ठेवले आणि प्रगटपणे दुःख व्यक्त करीत राजवाड्यात आले. ते पाहून राणी बेशुद्ध होऊन पडली. पुढे–]

राजवाड्यात पोचल्यावर राजाला दुःखाचे कारण विचारून दासदासी व राजवाड्यातली इतर मंडळी त्याचे सांत्वन करू लागली व राणीला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्नदेखील करू लागली. काही वेळ तेथे जमलेल्या पैकी कोणाच्या तोंडावर हास्य किंवा आनंदाची छटा नव्हती. होती ती फक्त चिंता व काळजी. थोड्या वेळाने राजवैद्याने येऊन राणीला औषध दिल्यावर ती शुद्धीवर आली. तेव्हां राजाला जिवात जीव आल्यासारखे झाले.

त्यानंतर राजवैद्याने विचारल्यावर राजाने घडलेले वृत्त सांगितले ते असे:

"मी नेहमीप्रमाणे दासींबरोबर मुलींना घेऊन फिरायला निघालो. आम्ही उद्यानातच फिरत होतो. गेली चार वर्षे मुलींवर एकामागून जी संकटे ओढवली ती स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली असल्यामुळे



मी त्यांच्यावर सारखी नजर ठेवून होतो. याचसाठी मी एक नाही शंभर नोकर बरोबर घेऊन निघालो होतों. सर्व नोकर डोळ्यात तेल घालून मुलींच्या रक्षणार्थ त्यांच्या चारी बाजूंनी चालत होते. मी मुलींच्या अगदी जवळच होतो. एकाएकी सोसाट्याच्या चक्रीवारा आला. जमिनी-पासून आकाशापर्यंत धुळीचे लोट उठले. पापणी लवली असेल नसेल, डोळे उघडतो तों तीन गिधाडे तिघां मुलींना उचलून नेत असलेली दिसली." असे सांगून राजा पुढे काही सांगणार तेवढ्यांत राणी "आई आई ग!" असे मोठ्याने एकदां ओरडून बेशुद्ध होऊन पडली.

दासींनी राणीच्या तोंडावर पाणी शिंपडून तिला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. काही वेळाने राणीला शुद्ध आली. राजा पुढे सांगू लागला–"हे सर्व एका क्षणार्धात घडले. आम्ही सर्व ती गिधाडे उडत गेली त्या दिशेने धावू लागलो. चालायची संवय नसल्याने मी मागे पडलो. तरी दासदासी सर्व खूप जोराने पळत पाठलाग करीत धावले. परंतु थोड्या वेळाने ती गिधाडे दिसत नाहीशी झाली. सर्व हताश निराश होऊन, आतां पुढे काय या विचारात जागच्या जागी थबकलो. माझ्या पायाचे रक्तच जणुकाही गोठलं आणि 'हाय' खाऊन जमिनीवर बसलो.

"तेवढ्यात आणखी एक अद्‌भुत घटना घडली. परत येत असलेले शंभर नोकर व तीन दासी सर्वांच्या सर्व मी बसलो होतो तिकडे येत असतां एकदम पक्षी होऊन, ती गिधाडे गेली होती त्या दिशेने उडू लागले. हे सर्व स्वतःच्या डोळ्यांनी मी पाहिले. पण माझ्या डोळ्यावरच विश्वास होईना. आणखी देव कायकाय दाखविणार आहे हे त्याचे त्यालाच माहीत. तो मला हे सर्व पहायला जिवंत तरी कां ठेवीत आहे, कळत नाही." असे सांगून राजा गप्प झाला आणि डोळे पुसू लागला.

राजानें जे काही सांगि[illegible] सत्याचा अंश मुळीच नव्हता. परंतु राजाने मुली भुयारात आहेत हीं गोष्ट या कानाची त्या कानाला कळू नये, यासाठी एक एक कपोल-कल्पित गोष्ट पढून सांगितली होती व ती सर्वांना खरी वाटली.

हे सर्व तोंपर्यंत ज्योतिष्याला कळले आणि तो धांवत त्या जागी आला. त्याला पाहतांच राणी त्याच्या पायां पडली आणि म्हणाली–"तुम्ही त्या दिवशी सर्व सांगून आम्हांला सावध केले असूनही आम्ही मुलींचे रक्षण करु शकलो नाही. माझ्या लाडक्या मुली माझ्या डोळ्यासमोर नसल्या तरी हरकत नाही, परंतु त्या आहेत तेथे तरी सुखाने आणि खुशाल आहेत ना, हे सांगाल का? त्या जिवंत आहेत, खुशाल आहेत, एवढे कळले तरी मनाचे समाधान होईल." असे सांगून राणी रडू लागली.

ज्योतिष्याने पुन्हां मुलींच्या जन्मकुंडल्या आणवून आणि शांतचित्ताने पाहून म्हटले–"कुंडलीप्रमाणे मुलींना या वर्षभरात कोण-त्या ही प्राणघातक संकटाची भीती नाही. मग हे झाले कसे, हे मलादेखील कळत नाही. मुली या क्षणाला आहेत कोठे हे मला सांगता येणार नाही, परंतु मी एवढे नक्कीच सांगू शकतो की त्या आहेत तेथे खुशाल आनंदात आहेत. मुलीच काय त्यांच्याबरोबर गेलेले शंभरावर दासदासी-देखील सकुशलच आहेत. या तीन वर्षात त्या कोणत्यातरी दिवशी आपल्या स्वतःच्या





मनुष्य देहात प्रगट होतील हे मात्र स्पष्ट दिसते आहे. म्हणून देवाबर भरंवसा ठेवून तो सुदिन कोणत्या दिवशी येतो याची वाट पाहण्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाही, महाराणी!" असे सांगून ज्योतिष्याने राणीला धीर दिला.

राजाने त्यापूर्वी रडत येऊन जे वृत्त सांगितले तसे ते झालेच असणार असेच तेथे हजर असलेल्या प्रत्येकाला वाटले. कारण राजाने रडण्यात किंवा बोलण्यात दुसरा काही संशय यायला जागाच ठेवली नव्हती. आपल्या तिघी दासी आणि शंभर नोकर सर्व नाहीसे झालेले पाहून राणीने काही विचारले तर काय उत्तर द्यायचे याविषयी राजाने प्रथमच चांगला विचार करून ठेवला असल्या कारणाने त्याने रचलेले नाटक यशस्वी झाले होते.

त्यांना भूगृहात ठेवले असल्याचे सांगितले तर मुलींच्या विरुद्ध जे ग्रह आहेत त्यांना ती गोष्ट कळेल व ते काहीतरी विघ्न आणतील ही भीती राजाला वाटत होती. म्हणून पुष्कळ विचार करूनच राजाने फार सावधगिरी बाळगून बोलायचे व वागायचे ठरविले होते व त्याला त्या बाबतीत चांगलेच यश आले.

राजाच्या या नाटकावर राणीचा पूर्ण विश्वास बसला. परंतु जेव्हां ज्योतिष्याने सांगितले की मुली जेथे कोठे आहेत, खुशाल आहेत, तेव्हां राणीच्या मनाचे समाधान झाले. कोठेही असोत सुखी आहेत ना, या विचाराने तिच्या चित्ताला हलके वाटले. तिने नोकरांना पाठवून मुलींचा शोध काढावा व हेच काम ताबतोब करावे असे राजाला सांगितले. राजाने तसेच केले. मुली भूगृहात आहेत ही गोष्ट राजाला माहीत नव्हती का? परंतु ते खोटे लप-विण्यासाठी त्याला राणीच्या इच्छेप्रमाणे नोकरांना राज्यभर पाठवावे लागले.

राजाचे नोकर राजाचा हुकूम होतांच घोड्यावर बसून निघाले. परंतु जगात कोठे उघड्यावर त्या मुली असल्या तर ना त्यांना [illegible] ? [illegible] भूगृहात [illegible] होत्या. म्हणून सर्व स्वार हिंडहिंड हिंडले आणि काही दिवसांनी मुली कोठे दिसल्या नाहीत असे एकेकाने येऊन सांगितले.

दिवसामागून दिवस जात होते आणि मुलींविषयी काहीच अनुकूल निरोप घेऊन कोणी नोकर आला नाही. तेव्हां राणीची मुलीविषयीची काळजी व चिंता वाढतच गेली. राजाला मात्र सारखी हुरहूर लागली होती की ही शोधाशोध चालू असतां मुली भूगृहात असल्यांची बातमी तर कोणाला कळली नाहीना. कारण जर का कोणाला त्या गोष्टीचा सुगावा लागला तर सर्वत्र खटपट फुकट जाणार. परंतु त्याने चेहऱ्या-वर किंवा बोलण्यात व वागण्यात कधीच मुली आणखी कोठे असल्याचा संशय कोणाला येऊ नये, याची काळजी घेतली. तो इतरांच्या दुःखात सहभागी असल्याचे सोंग करीत राहिला.

राजाची मनःस्थिती फार नाजूक होती. एकीकडे मुलींना गुप्त जागी त्याने ठेवले होते व दुसरीकडे त्यांना गिधाडे उचलून घेऊन गेल्याचे त्याने सांगितले होते. ते गुपित लपविणे हा एक प्रसंगच होता.

मध्यंतरी राजा कोणाला काही कळू दिल्याशिवाय भूगृहात जात येत राहिला. आपण केलेल्या व्यवस्थेप्रमाणे भूगृहात नोकर



मुलींची काळजी घेत आहेत, मुली आनंदाने हसत खेळत आहेत हे पाहून तो दररोज येत होता. असाच एक आठवडा निश्चितपणे लोटला. परंतु पुन्हा राजाला आणखी एका गोष्टीची चिंता वाटू लागली. तो स्वतः दररोज भूगृहात जात होता, आणि एक दिवसदेखील तो गेला नाही असे झाले नाही. स्वतःच्या डोळ्यांनी मुलींना पाहून आल्याशिवाय त्याला चैन पडत नसे. परंतु त्याला वाटू लागले की आपण असे दररोज भूगृहांत जात येत राहिलो आणि कोणाला तरी ते कळले तर? एखाद्या दिवशी जरी कोणी चुकून पाहिले तर धोकाच नाही का? सहज कोणाची नजर बाहेरून आत



जातांना किंवा आतून बाहेर येतांना आप-त्यावर पडली तर सर्व गेलंच की! एकदां कोणाला शंका किंवा संशय वाटला की सर्व गुपित बाहेर येणार. तेव्हां काय करावे ही नवी काळजी राजाला वाटू लागली. या काळजीतच आणखी चार दिवस गेले.

एके दिवशी राजा भूगृहात जाऊन मुली तेथे खुशाल असल्याचे पाहून आला. थोडाच वेळ झाला होता. राजा आपल्या शयन-गृहात निश्चिंतपणे झोपला होता. त्याला छान झोप लागली असतां मध्यरात्रीच्या सुमारास कोणीतरी हलवून उठवीत अस-ल्याचा भास झाला. त्याने डोळे उघडून पाहिले, परंतु त्याचा स्वतःच्या डोळ्यांवरच विश्वास होईना. कारण त्याला उठवून जागी करणारी त्याची लाडकी मुलगी सुहासिनी होती.

राजा काही वेळ हे स्वप्न तर नसेल ना या विचारात पडून राहिला. परंतु सुहासिनी राजाच्या अंगावर चढून हसू खेळू लागली आणि आपल्या गोड शब्दात म्हणाली–"बाबा! अहो बाबा!" आतां मात्र राजाच्या मनातला संशय दूर झाला की हे स्वप्न नव्हे. त्याच्या डोळ्यासमोर त्याची लाडकी सुहासिनी हसत बोलत असतां तो विश्वास करणार नाही तर काय करणार? तिचे बोलणे हसणं स्पष्ट ऐकू येत असतां ते स्वप्न मानून स्वस्थ कसे बसता येईल? म्हणून मुलीला अंगा खांद्यावरून कुरवाळीत राजाने विचारले–"काय ग, या मध्य-रात्रीच्या वेळी तू येथे कशी काय आलीस? कोठे आहेत दासी वगैरे? बाकी नोकर कोठे आहेत सगळे? त्या सर्वांना सोडून तू एकटी कशी आलीस बाई? विचित्रच दिसते आहे सगळे!" असं एका बाजूने आश्चर्य करीत व दुसऱ्या बाजूने फार घाबरून भयशंकित होऊन मुलीला प्रश्न विचारीत असलेला राजा फार काळजीत पडला.

सुहासिनीने काही वेळ काहीच उत्तर दिले नाही. परंतु थोड्या वेळाने तिने राजाला पलंगावरून खाली उतरायला खूण [illegible] आणि त्यानंतर त्या शयनगृहातल्या एका मोठ्या तसबिरीकडे बोट दाखवीत म्हणाली–"ही तसबीर पाहिलीस का?" राजाला काहीच कळेना.

"तू इकडे कशी आलीस म्हणून मी तुला विचारले तर तू ही तसबीर काय दाखवते आहेस? तुला ती तसबीर पाहिजे आहे का? तीच काय तिच्यासारख्या कित्येक तसबीरी तुला देईन. तू इकडे आलीस कशी हे प्रथम सांग." असे राजा तिला फार आर्जवा करीत विचारू लागला.

तेव्हां सुहासिनी म्हणाली–"होय बाबा, त्याच तसबिरीतून मी बाहेर आले!" आणि बापाच्या तोंडाकडे पाहू लागली.

तसबिरीतून आणि येणे हे काय कोडे आहे, हे राजाच्या लक्षात येईना. मग त्याने तसबीर बाजूला सारून पाहिले. तसबीर बाजूला सारल्याबरोबर त्याला जे दिसले ते पाहून राजा थक्क होऊन काही वेळ अवाक, काही बोलल्याशिवाय उभा राहिला. कारण तसबीरीच्या मागे भिंतीला एक मोठे दार होते.

राजा चकित होऊन त्या दाराकडे पहात राहिला व नंतर मुलीला बरोबर घेऊन त्या चोर दाराने आत गेला. जात असतां ते एक भुयाराचे दार असल्याचे राजाच्या लक्षात आले. म्हणून राजाने मुलीला उचलून घेतले आणि एकेक पाऊल सावध-पणे टाकीत पुढे चालू लागला.



भुयाराची वाट अर्धी अधिक चालून गेल्यावर पाहतो तो सुहासिनीला पाळणारी दाई भेटली. सुहासिनी आपल्या झोपायच्या खोलीतून अदृश्य झाली त्या वेळी दाईला चांगली झोप लागली होती. परंतु थोड्याच वेळाने तिची झोप मोडली तेव्हां सुहासिनीला अंथरुणावर न पाहून व ज्या ठिकाणी आरसा होता ज्या जागी एक दार पाहून दाई घाबरूनच गेली. परंतु ती साहस करून त्या चोर दरवाज्याने आत शिरली. मुलगी कोठें गेली? राजाला काय उत्तर द्यायचे? असा आपला डोळा कसा लागला, हा विचार करीत ती चालू लागली.

ती मुलीला शोधीत न कळतच त्या भुयाराच्या वाटेने राजाला येऊन भेटली होती. मुलीला घेऊन राजाला येत असलेला पाहून तिला हायसे वाटले. नंतर तिघं मिळून त्या भुयाराच्या वाटेने पुन्हां परत चालत येत असतां भूगृहातले सुहासिनी होती त्या खोलीचे दार त्या तिघांनाही दिसले नाही. तेव्हां त्यांना भीती वाटली की आपण कोठे येऊन पोचलो. बहुतेक भुयारातल्या चोरवाटेने आपण आणखी कोठेतरी निघालो असू असे राजाला वाटले.

तेव्हां राजा, दाईला सुहासिनीला घेऊन तेथेच थांबायला सांगून स्वत: त्या वाटेच्या टोकापर्यंत गेला. परंतु त्याला एकच वाट सरळ आढळली, दुसरी फुटलेली वाट दिसली नाही. ती वाट पुन्हां राजाच्या खोलीतच येऊन पोचत होती. म्हणून राजाला जास्तच भीती वाटू लागली. काय करावे हे त्याला सुचेना व तो दाई होती तेथे परतला. परंतु एक कोडे सोडवायला गेला तर दुसरेच समोर आले. तो परत आला, परंतु तेथे दाई किंवा सुहासिनी दोघींपैकी कोणीच दिसले नाही. ते पाहून राजाला वेड लागल्यासारखे झाले. त्याला काहीच सुचेना आणि त्या भुयाराच्या वाटेतच तो एकदां पुढे तर एकदां मागे भटकत राहिला.

(क्रमश:)



# पड्याआड

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"तुझी ही परीक्षाच चालली आहे, असे वाटते आहे. परीक्षेचे फळ तुझ्या हातातून निसटेल की काय असे वाटते आहे. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला नारायण भट्टाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पूर्वी कधी काश्मीर प्रांतात नारायण भट्ट नावाचा एक विद्वान पंडित रहात असे. त्याने तो सर्व शास्त्रांत पारंगत होता आणि देशदेशांतरात फिरून अजिक्य पद मिळावें अशी महत्वाकांक्षा त्याच्या मनात उपजली.

म्हणून तो देशाटनास निघाला. तो प्रत्येक देशात जाड्या विद्वानांची चौकशी

## वेताळाच्या गोष्टी



कुरून त्यांना शास्त्रार्थासाठी आह्वान करी आणि त्यांचा पराभव करून मोठमोठी इनामे संपादन करी. असा प्रवास करीत तो कलिंग देशात येऊन पोचला.

कलिंग देशाच्या एका गावी थोर विद्वान मंडळी रहात असत. त्या गावी कमला नावाची एक विदुषी होती. तिने आपली अशी प्रतिज्ञा जाहीर केली होती की शास्त्रार्थात तिचा जो पराभव करील त्याच्याशी विवाह करून ती जन्मभर त्याची दासी म्हणून राहील. परंतु जो तिच्या हाती हारेल त्याने तिच्या पायांवर डोके ठेवून हारल्याचे कबूल करावे आणि निघून जावे. कित्येक थोर पंडित तरुण युवक तिच्याशी शास्त्रार्थ करून हारल्यावर तिने घातलेल्या अटीप्रमाणे तिच्या पायांवर डोके ठेवून निघून गेले.

कलिंग देशात पाऊल टाकतांच नारायण भट्टाने कमलेची पुष्कळ थोरवी ऐकली. तो तिच्या गावी गेला. त्या गावाच्या टोकाला रहात असलेल्या एका ब्राह्मणाच्या घरी तो उतरला.

नारायण भट्टाने गावातल्या तलावात स्नान केले आणि जेवायला बसला. त्याने आपल्या यजमानाला कमलेच्या विषयीं विचारले. त्या गृहस्थाने कमलेला फार लहानपणी कधीतरी ओझरते पाहिल्याचे आणि मोठी झाल्यावर त्याने किंवा इतर कोणी तिला न पाहिल्याचे सांगून म्हणाला– "शास्त्रार्थात आजपर्यंत ती कोणासमोर हारली नाही. ती शास्त्रार्थ करते तेव्हां ती एका बाजूला पडद्याआड बसते व तिच्याशी शास्त्रार्थ करणारा दुसऱ्या बाजूला बसतो."

जेवणखाण आटोपून नारायण भट्ट कमलेच्या घरी गेला व त्याने तो शास्त्रार्थ करण्यास आला असल्याचे सांगितले. ते कळल्यावर कमला एका खोलीत पडद्याआड येऊन बसली आणि पडद्याच्या दुसऱ्या बाजूला तिने नारायण भट्टाला आसन ठेवून त्याला आत बोलाविले.

तो येऊन बसताच कमलेने त्याला विचारले–"माझी प्रतिज्ञा काय आहे, हे तुम्हांला माहीतच असेल?"

"तुम्हीच सांगा ना!" नारायण भट्ट म्हणाला.

कमला म्हणाली–"तुम्ही हारलांत तर माझ्या पायांजवळ वंदन करून निघून जावे लागेल. मीच हारले तर तुम्ही माझ्याशी लग्न केले पाहिजे. या अटी कबूल असतील तरच शास्त्रार्थ करण्याची तयारी ठेवा."

"मी हारलो तर तुमच्या पायांसमोर नमस्कार करून निघून जाईन. तुम्ही हारलात तर तुमच्याशी विवाह करावयाचा का, मी विचार करतो आहे." नारायण भट्ट म्हणाला.

कमला क्षणभरच विचार करायला थांबली. म्हणाली–"ठीक आहे!"

दोघांमध्ये अनेक विषयांवर शास्त्रार्थ झाला. दोघे समसमान विद्वान व प्रतिभाशाली असल्याचे स्पष्ट होत गेले. प्रत्येकाने दुसऱ्याच्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिले. सुरवातीपासून नारायण भट्टाला भीती वाटत होती की एका स्त्रीसमोर मान खाली होणार की काय. त्याने विचारलेल्या सर्व गुंतागुंतीच्या प्रश्नांची उत्तरे कमलेने सहज दिली.

काही वेळाने नारायण भट्टाने कमलेला विचारले–"आपले गुरुवर्य कोण?"



"माझा सर्व विषयांचा अभ्यास माझ्या वडिलांजवळ झाला." कमला म्हणाली.

"आपलं वय काय?" नारायण भट्टाने थोडे धाडस करून विचारले.

"बावीस वर्षे!" कमला म्हणाली.

"तुम्ही अशा तऱ्हेने पडदा बांधून कोणाच्या दृष्टीस पडल्याशिवाय बसण्याचे कारण असेल की काही तरी?" नारायण भट्टाने पुन्हां धाडस एकवटून विचारले.

"तो माझा नियम आहे!" कमला म्हणाली.

नारायण भट्टाने काही वेळ विचार करून एका ताडपत्रावर कोणतातरी श्लोक लिहून

     



तो पडद्या पलीकडे टाकीत विचारले–"या श्लोकाचा अर्थ सांगता का?"

कमला ओक्साबोक्सी रडत म्हणाली– "मी हार मानते! माझ्याशी लग्न करा."

नारायण भट्ट आपल्या आसनावरून उठत म्हणाला–"ते मात्र अशक्य आहे!" आणि तेथून निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! नारायण भट्टाने बरोबरीचे पांडित्य असलेल्या त्या तरुण स्त्रीने हार मान्य केली तेव्हां तिच्याशी लग्नाला तयार व्हायचे सोडून तिला नकार कां दिला? याचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"नारायण भट्टाने कमला आंधळी असल्याचे ओळखले. त्याने तिचा पराभव केला असे नाही म्हणतां येणार. गूढ कोड्यांसारख्या प्रश्नाची जिने सहज हंसत हंसत उत्तरे दिली, ती एखाद्या श्लोकाचा अर्थ सांगू शकली नसेल, असे नाही मला वाटत. ती श्लोक वाचू शकली नाही आणि तावडतोब हारल्याचे कबूल करून रडू लागली म्हणजे ती आंधळी होती हे न कळण्या इतका नारायण भट्ट खुळा नव्हता. ती गोष्ट कळावी म्हणूनच त्याने प्रथम तिच्या गुरूचे नाव व तिच्या वयाची चौकशी केली होती. बापालाच गुरु व्हावे लागले याचे कारण तिचे ते गुपित आणखी कोणाला कळू नये हेच होते. तिचा विद्याभ्यास संपल्यावर फार काळ मुलीला घरी ठेवून घेणे बापाला बरे वाटत नव्हते. हे तिच्या वयावरून कळले. एका आंधळीशी लग्न करायला मनाची तयारी नसल्यामुळे आणि तिला आपण खरोखरी जिंकले असल्याची खात्री न झाल्यामुळे सुद्धा नारायण भट्ट तिच्याशी लग्न करायला तयार झाला नसावा."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# इंद्रजालविद्येने विवाह

समतट देशाचे साम्य महाराज यांना श्रावस्ती नावाचे एकुलते एक कन्यारत्न होते. ती आपल्या सखींबरोबर तप्तिका नदींत जलक्रीडेला गेली असतां मालागडचा युवराज माल्य आणि अवंतिका नगरीचा युवराज अवंत आपापल्या घोड्यावर बसून नदीच्या किनाऱ्या किनाऱ्याने आले.

श्रावस्तीचे अपूर्व सौंदर्य पाहून दोघे राजकुमार जागच्या जागी थबकले. तिच्याशी लग्न करण्याची इच्छा दोघांच्या मनात उत्पन्न झाली. त्यांनी श्रावस्तीच्या विषयी सर्व माहिती कळल्यावर समतट राजाला जाऊन भेटण्याचे ठरविले. दोघे पुरुष तिच्याकडे निर्भयपणे पहात असलेले ओळखून राजकन्या श्रावस्ती गोंधळली आणि पालखीत बसून आपल्या सखींबरोबर राजवाड्यात निघून गेली. दोघे राजकुमार तिच्या पाठोपाठ राजवाड्यात दाखल झाले.

मालागडचे राज्य समतट राज्याच्या पश्चिमेकडील हद्दीला लागून होते. तेथील राजा मालव्य हा क्रूर आणि युद्धपिपासू म्हणून प्रसिद्ध होता. त्याचा मुलगा बापासारखाच क्रूर, महत्वाकांक्षी व गर्विष्ठ होता. त्याने आपल्या पहिल्या बायकोला लग्नाच्या दुसऱ्याच दिवशी तलवारीने ठार केले होते. ती त्याच्या म्हणण्याप्रमाणे वागली नाही, म्हणे. आतां तो दुसरे लग्न करण्याच्या हेतूने वधू शोधनार्थ निघाला होता. बापलेक दोघे फार मोठे शिवभक्त होते.

अवंतिका समतट राज्याच्या उत्तरेला होती. तेथील राजा पराक्रमी व वैभव संपन्न असूनही दयाळू आणि गुणवान असा एक सज्जन राजा होता. त्याचा मुलगा अवंत हा सर्व तऱ्हेने बापासारखाच धर्मभीरु व अविवाहित होता.

श्री ए. सी. सरकार, जादुगार



दोघे राजकुमार राजधानीत आल्याचे कळताच श्रावस्तीचा बाप महाराज साम्य दोघांना सामोरा गेला.

माल्य महाराजांना म्हणाला–"मला तुमच्याशी एका अत्यंत आवश्यक अशा कामाबद्दल बोलावयाचे आहे."

त्याचे बोलणे पुरे होते न होते तोंच अवंत म्हणाला–"महाराज! मला आपल्याशी एका अगत्याच्या विषयासंबंधी बोलावयाचे आहे."

साम्य महाराज शांतपणे त्यांना म्हणाला–"तरुण मंडळींनो! तुम्ही दोघे कोठून दुरून आला असाल, दमला असाल. माझे आतिथ्य स्वीकारून काही दिवस थोडी विश्रांती घ्या. सावकाश बोलू या. मी तुमच्याशी अवश्य बोलेन. थोडा धीर धरा."

त्याने खूण केल्याबरोबर त्याच्या सेवकांनी दोघां राजकुमारांना बोलावून नेले. त्या दोघांची राहण्याची व्यवस्था निरनिराळ्या महालात करण्यात आली होती.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर अवंत अतिथिगृहासमोरच्या उद्यानात हिरव्यागार गवताच्या गालिच्यावर फिरत असतां माल्य एकाएकी आपली तलवार उपसून त्याच्यावर धावला. खड्गयुद्धांत अवंतदेखील प्रवीण होता. त्याने आत्मसंरक्षणासाठी तलवार उपसली आणि दोघांचे द्वंद्वयुद्ध सुरू झाले.

ते पाहून शेजारीच काम करीत असलेला माळी मोठ्याने ओरडून रक्षकांना हाका मारू लागला. त्याचा आवाज ऐकून राजाचे शिपाई व अधिकारी धावले. त्यांनी दोघां राजकुमारांना दूर केले आणि त्यांचे द्वंद्व थांबविले. रक्षकांच्या नायकाने माळ्याला विचारले–"हे द्वंद्व कसं काय झालं रे?"

माळ्याने अवंतकडे खूण करून म्हटले–"हे सरकार गवतावर हिंडत होते तेव्हां हे दुसरे सरकार ह्यांच्या अंगावर धांवले."

"सरकार! असे कां केलेत?" रक्षकदलाच्या नायकाने माल्यला विचारले.

"राजकन्येला प्रथम मी पाहिले. तिच्याशी लग्न करावे असे प्रथम मला वाटले.

म्हणायला याने कां पुढे यावे?" माल्य रागाने म्हणाला.

"चौकशी झाल्यावर आमचे महाराजच काय तो निर्णय करतील. तोंपर्यंत आपण दोघांनी स्वतःला आवरावे." असे सांगून नायकाने रक्षकदलाच्या शिपायांना जागोजागी नेमून सावध रहायला सांगितले.

राजकन्या श्रावस्ती नदीवरून परत आली त्याच वेळी तिने नदीवर घडलेले वृत्त आईवडिलांना येऊन सांगितले. राजाने अतिथिगृहाच्या जवळपास आपले हेर नेमले होते. त्यांच्याकडून राजाला अतिथि गृहासमोर घडलेले वृत्त राजाला कळलेच होते.

राजाने माल्य व अवंत दोघां राजकुमारांना एकामागून एक निरनिराळे बोलवून आपल्या मंत्रणागृहात त्यांच्याशी जे बोलायाचे होते ते विचारून घेतले.

तो अवंतला म्हणाला–"मुला! तू माझ्याशी काही महत्वाच्या विषयासंबंधी बोलावयाचे आहे, असे म्हणाला होतास?"

"महाराज! आपली कृपा झाली तर आपल्या राजकन्येशी विवाह व्हावा अशी माझी इच्छा आहे. तिला मी पाहिले त्याच वेळी मनाने वरले. मी अवंतीचा होणारा राजा, महाराज अविनाश यांचा मुलगा आहे. माझे नाव अवंत असे आहे." अवंत म्हणाला.



साम्य महाराज स्मित करून म्हणाले–"मला थोडा विचार करू दे. काही निर्णय होईपर्यंत माझा अतिथी म्हणून रहा."

अवंत निघून गेल्यावर राजाने माल्याला बोलावून विचारले–"तुला काही अत्यावश्यक असे माझ्याशी बोलावयाचे आहे, असे म्हणाला होतास नाही का?"

"माझे नाव माल्य. मी मालागडचे महाराज मालव्य यांचा युवराज आहे. आपल्या राजकन्येचे सौंदर्य पाहून तिच्याशी लग्न करण्याचा मी विचार केला आहे." माल्य म्हणाला.

राजा म्हणाला–"होय! दुसऱ्या राजकुमाराने सुद्धा त्याच इच्छेने तो आला असल्याचे मला सांगितले आहे."



"राजा! आपण राजकन्येशी माझा विवाह करून दिलाच पाहिजे. काय वाटेल ते होवो मी आपली ही इच्छा पुरी करू शकेन." माल्य उर्मटपणे म्हणाला.

"विचार करून निर्णय करायला मला थोडी सवड देशील की नाही? माझा अतिथी म्हणून रहा." साम्य महाराज म्हणाले.

राजाचे शिपाई समोर आले. अतिथि-गृहात जाण्याशिवाय दुसरा मार्ग नाही हे माल्यने ओळखले आणि निघून गेला.

साम्य महाराज विचारात पडले. दोघां राजकुमारांनी राजकन्येला मागणी घातली होती. दोघे योग्य वरच होते. परंतु अवंत-च्या बोलण्यावागण्यात काही गैर दिसले त्याच्याविषयी त्याने पूर्वीदेखील बरेच ऐकले होते आणि माल्यच्या बोलण्या वागण्याशी तुलना करून पाहिली आणि अवंतचा नम्रपणा व सौजन्य पाहून राजा-च्या मनावर चांगला परिणाम झाला. त्याच्याशी श्रावस्तीचे लग्न झाले तर तिचा संसार सुखाचा होईल, असे राजाला वाटले.

माल्यच्या क्रूरपणाविषयी राजाने त्या-पूर्वीच ऐकले होते. प्रत्यक्ष भेटीच्या वेळी त्याचा उद्धटपणा राजाला चांगलाच कळला. या दोघांपैकी कोणाची निवड करावी हा प्रश्न तसाच समोर उभा होता. अवंतशीच राजकन्येचा विवाह व्हावा, असे जरी राजाला वाटत होते तरी माल्यशी वैर करून तसे करणे हिताचे नाही हेदेखील त्याला दिसत होते.

राजाने आपल्या प्रधानाला बोलावून त्याला सर्व सांगून त्यांचा सल्ला विचारला.

सर्व गोष्टी ऐकून घेऊन प्रधान म्हणाला— "महाराज! राजकन्येचा विवाह अवंतशी व्हावा हे सर्व दृष्टीने तिच्या हिताचे आहे. परंतु माल्य राजकन्येसाठी आकाश-पाताळ एक करील. तो व त्याचा बाप डूक धरणाऱ्या नागसापासारखे आहेत. पाहणार नाहीत. म्हणून जे करायचे ते विचार करून केले पाहिजे."

"परंतु मला ... काय करावे, हेच सुचेनासे झाले आहे." राजा म्हणाला.

"थोडा धीर धरावा महाराज! मला एका दिवसाची सवड मिळाली तर मी आपले राजपुरोहित तंत्रशास्त्री यांचा सल्ला घ्यावा म्हणतो. आणखी हा माल्य आणि त्याचा बाप दोघे शिवभक्त आहेत नाही का?" प्रधानानं विचारलं.

"होय प्रधान! ते दोघे आपल्यासारखेच थोर शिवभक्त आहेत." महाराज म्हणाले.

"तर मग आपण आपल्या प्रयत्नात नक्कीच यशस्वी होऊ. आपल्या तंत्र-शास्त्र्यांचे इंद्रजाल आपल्याला उपयोगी होतं का पाहिलं पाहिजे." असे सांगून प्रधानाने राजाचा निरोप घेतला.

त्याने तंत्रशास्त्र्याकडे जाऊन सर्व गोष्टी सविस्तर वर्णन करून सांगितल्या आणि विचारले—"या परिस्थितीत तुम्ही आपल्या इंद्रजालविद्येचा उपयोग करून काही मदत करू शकलात तर महाराजांना, देशाला आणि प्रजेला फायदा होईल."

"एका दिवसाची सवड दिलीत तर मी प्रयत्न करून पाहीन." तंत्रशास्त्री म्हणाला.

सुमारे सहा तास काय करावे, याचा एक चित्ताने विचार करीत राहल्यावर



प्रधानाला जाऊन आपला विचार कळ-विल्यानंतर प्रधानाला अपार आनंद झाला.

तंत्रशास्त्र्याने सांगितल्याप्रमाणे महा-राजांनी माल्यला आणि अवंतला बोलावून विचारले—"मला तुम्ही दोघांनी फार मोठ्या संकटात टाकले आहे. मला तुम्ही दोघे सारखे आहां. तेव्हां मी कोणाला होकार देऊ आणि कोणाला नकार देऊ हे माझे मलाच कळत नाहीसे झाले आहे. दोघांचे कुळ गोत थोर आहे. एकाला होकार दिला तर दुसऱ्याला राग येणार. म्हणून या परिस्थितीत काय करावे याचा निर्णय राजपुरोहित तंत्रशास्त्र्यांनी करावा



पुजा करून देवाचा कौल मागणार आहेत. मग ते आहेना तुम्हा दोघांना मान्य?" त्यानंतर तंत्रशास्त्र्याकडे वळून म्हणाला– "तुम्ही काय करणार आहांत, हे या दोघांना सांगून टाका."

तंत्रशास्त्री उभा राहून सर्वांना नमस्कार करून म्हणाला–"महाराज! मी स्वत: काहीच निर्णय देणार नाही. मी तो निर्णय महादेवावर सोडला आहे. तो निर्णय देईल त्याला तुम्ही सर्व मान्य कराल ना?"

"मला तो निर्णय मान्य आहे." अवंत म्हणाला.

माल्य थोडा विचार करून म्हणाला– "मला तो निर्णय मान्य आहे."

तंत्रशास्त्री रात्रभर देवळातच राहिला. शंकराच्या नावाने आपण लबाडी करीत आहो, हे केवढे पाप आहे, यासाठी प्रथमच तो शंकराजवळ क्षमा मागीत होता.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर पानांची तोरणं व फुलांच्या माळा देवळात जागोजागी बांधून सर्व देऊळ अलंकृत करण्यात आले. त्यानंतर महाराज, माल्य व अवंत आणि राजपरिवार देवालयात आला. तंत्रशास्त्री दोघां राजकुमारांना म्हणाला– "देवाचा निर्णय मान्य असल्याबद्दल देवासमोर दोघांनी वचनबद्ध झालं पाहिजे."

दोघांनी त्याप्रमाणे देवाला नमस्कार करून प्रतिज्ञा केली.

तंत्रशास्त्र्याने पुढ्याच्या आगपेटीसारख्या दोन पेट्या बाहेर काढल्या. त्या पेट्यांना कप्पे होते. एका पेटीवर अवंतचे आणि दुसरीवर माल्यचे नाव लिहिलेले होते. तंत्रशास्त्र्याने पेट्यांच्या कप्प्यात काही ठेवलेले नाही हे प्रथम दाखवून त्या पेट्या देवासमोर ठेवल्या. नंतर दोन चिट्ठ्यांवर राजकन्या श्रावस्तीचे नाव लिहून एकेक प्रत्येक पेटीत ठेवून पेट्या बंद केल्या. नंतर त्याने पाणी मंत्रवून दोन्ही पेट्यांवर आणि दोघां राजकुमारांवर शिंपडीत म्हणाला– "महादेवा! कृपा करून आमच्या राजकन्येला योग्यवर कोण ते सांग!"

काही वेळाने तंत्रशास्त्र्याने माल्यचे नाव लिहिलेली पेटी घेऊन ती उघडली, परंतु तिच्या कप्प्यांत काहीच नव्हते. त्याचप्रमाणे त्याने अवंतची पेटी घेऊन ती उघडून पाहिली. तिच्या कप्प्यांत श्रावस्तीच्या नावाच्या दोन चिट्ठ्या होत्या.

"महादेवाने राजकन्या श्रावस्तीसाठी युवराज अवंतची निवड केली आहे." तंत्रशास्त्र्याने जाहीर केले.

राजकुमार माल्यला बोलायला जागाच उरली नाही. त्याने शंकराला लवून नमस्कार केला व त्याचा निर्णय मान्य असल्याचे दर्शवून अवंतला अभिनंदनार्थ आलिंगन केले आणि घोड्यावर बसून स्वदेशी निघून गेला.

अवंतला मंगलवाद्ये वाजवून थाटामाटाने राजवाड्यात नेण्यात आले. फक्त प्रधान मागे राहिला आणि तंत्रशास्त्र्याला त्याने विचारले–"शास्त्रीबुवा! इतक्या सहजी इंद्रजालविद्येच्या सहाय्याने तुम्ही हा कठीण प्रश्न सोडविला. परंतु यातले गूढ काय ते नाही कळले मला. सांगतां का जरा?"

"त्या पेट्या जरा लक्षपूर्वक पहा, म्हणजे तुम्हांला त्यांतले गूढ काय ते सर्व कळेल." तंत्रशास्त्री म्हणाला.

मंत्र्याने माल्यचे नाव असलेली पेटी घेऊन खालीवर आजूबाजूला पाहिली.



पेटीच्या दोन्ही बाजूला माल्यचेच नाव होते. अवंतचे नांव दुसऱ्या पेटीवर दोन्ही बाजूला लिहिलेले होते.

मंत्र्यानें माल्यचे नाव असलेली पेटी उघडून पाहिली. त्या पेटीचा कप्पा उघडला तेव्हां त्याच्या खालून एक चिट्ठी खाली पडली. त्या चिट्ठीवर श्रावस्तीचे नाव लिहिले होते. कप्पा बाहेर ओढून पाहिले तर त्यात वर एक पोटकप्पा व खाली एक पोटकप्पा होता. त्यांच्या मध्ये एक पुठ्ठा होता. त्याचप्रमाणे अवंतच्या पेटीत सुद्धा कप्याला वर व खाली दोन पोटकप्पे होते.

तंत्रशास्त्र्याने केलेल्या जादूचे गूढ प्रधानाला कळले. तंत्रशास्त्र्याने अवंतच्या पेटी-

च्या खालच्या पोटकप्प्यात पहिल्यानेच श्रावस्तीचे नाव लिहिलेल्या दोन चिट्ठ्या ठेवलेल्या होत्या. नंतर सर्वांसमक्ष मात्र सर्वांना दाखवून तिच्या नांवाच्या चिट्ठ्या वरच्या पोटकप्प्यात ठेवल्या. अवंतच्या पेटीत ती चिट्ठी ठेवतांना पूर्वी ठेवलेल्या दोन चिट्ठ्या खालच्या पोटकप्प्यातून पडू नयेत यासाठी बोटांचा आधार दिला होता. नंतर त्याने दोन्ही पेट्या उलट्या करून देवाच्या समोर ठेवल्या. पेट्यांवर आणि खाली नावे लिहिली असल्यामुळे खालची बाजू किंवा वरची बाजू कोठली हे सहजी कळणे शक्य नव्हते. पुन्हां पेट्या उघडून दाखविल्या तेव्हां अवंतच्या पेटीतल्या खालच्या कप्प्यातल्या दोन्ही चिट्ठ्या मिळाल्या. माल्यच्या पेटीतल्या खालच्या कप्प्यात चिट्ठीच नव्हती. सर्व पहात असतांना तंत्रशास्त्र्याने दोन्ही पेट्या उलट्या करून ठेवल्या होत्या. परंतु दोन्ही बाजूला नांवे लिहिली असल्याने ती हात चलाखी कोणाच्या ही लक्षात आली नाही. दुसऱ्या वेळी पेट्या उघडतांना दोन्ही पेट्यांच्या वरच्या कप्प्यात ठेवलेल्या चिट्ठ्या कप्पे उलटे झाल्यामुळे खाली पडू नयेत यासाठी शास्त्र्याला बोटांचा आधार द्यावा लागला.

"ही हात चलाखी होय?" असे म्हणत प्रधानाने तंत्रशास्त्र्याकडे पाहिले तर तो लहान मुलासारखा ढसढसा रडत होता.

"महादेव मला कसा क्षमा करील? मी त्याचे नांव सांगून केंवढी मोठी लबाडी केली? या पापाला प्रायःश्चित्त नाही. मला देव शिक्षा करणार!" तंत्रशास्त्री म्हणाला.

प्रधान त्याला धीर देत म्हणाला–"मित्रा! तू पाप मुळीच केले नाहीस. तू देवाचे नाव सांगून एका दुष्ट, क्रूर, पापी माणसाच्या हातून एका निरपराध मुलीला वांचविलेस. तू आपल्या राजाला, मातृभूमीला आपल्या राष्ट्राला वांचविलेस. एवढे मोठे पुण्यकार्य केल्याबद्दल देव तुला नक्कीच क्षमा करील. त्याला एवढे कळते!

तें ऐकून तंत्रशास्त्र्याच्या मनाचे समाधान झाले.





# चोरबुद्धी

महेंद्रवर्मा नावाचा राजा ज्या राज्याचा राजा होता त्या राज्यात चोरांचा सुळसुळाट फार वाढला. राजाने कित्येक चोरांना कैद करून तुरुंगात डांबून ठेवले. तरी चोऱ्या थांबल्या नाहीत. रंगा नावाचा एक अट्टल चोर होता. राजा त्या चोराला पकडू शकला नाही.

एकदा एक साधू राजाकडे आला. राजा साधूंचा आदर करी. म्हणून राजाने त्या साधूला अत्यंत आदरपूर्वक बोलावून त्याची पादपूजा वगैरे केली आणि त्याच्याजवळ राज्यात चोरांचा सुळसुळाट असल्याचे सांगून त्याचा सल्ला विचारला.

साधू म्हणाला–"राजा! तुझ्या राज्यात रंगा नावाचा एक अट्टल चोर आहे. त्याला तू पकडून तुरुंगात टाकलेस की चोऱ्यामाऱ्या कायमच्या बंद होतील." राजाने त्या साधूला काही दिवस आपले आतिथ्य स्वीकारण्यास विनंती केली. साधूने त्या गोष्टीस होकार दिला. त्यानंतर दररोज लागोपाठ तीन दिवस राजाच्या खजिन्यात चोरी झाली. राजाने ती गोष्ट साधूला कळविली.

"राजा! अरे, हे सर्व काम त्या रंगाचेच आहे. त्या रंगाने येऊन क्षमा मागितली तर त्याला क्षमाच नव्हे तर चांगले मोठे इनामही मिळेल अशी दवंडी पिटव. त्यानंतर पहा, तुला त्याच्याकडून काहीच कष्ट होणार नाही." साधूने सुचविले.

राजाने त्याप्रमाणे दवंडी पिटविली.

दुसऱ्याच दिवशी साधू राजाला भेटला व म्हणाला–"महाराज! क्षमा करा. आपल्या खजिन्यात चोरी करणारा दुसरा तिसरा कोणी नसून मीच आहे. मीच तो रंगा." असे सांगून त्याने आपली साधूची खोटी दाढी व वेष काढून टाकला.

ते पाहून राजा आश्चर्यचकित झाला. रंगाचे चातुर्य कमालीचे आहे, असे त्याला वाटले. दवंडी पिटविल्याप्रमाणे राजाने रंगाला इनाम तर दिलेच, त्याच बरोबर त्याला एक काम देण्याचे ठरवून त्याला एका हुद्यावर नेमले.

काही दिवसांनी राजाने रंगाला एक चिट्ठी देत म्हणाला–"ही चिट्ठी शेजाऱ्च्या राजाला नेऊन दे आणि त्याचे उत्तर काय ते आणून मला दे."

रंगा होकार देऊन घोड्यावर बसून निघाला. वाटेत जंगलात त्याला एक म्हातारा दिसला. त्याने रंगाला थांबायला विनंती केली आणि रंगा थांबला.

त्या म्हाताऱ्याने त्याला विचारले–"तुम्ही कोणत्या गावी जातां आहां?"

"शेजारच्या राज्यात जातो आहे." रंगा म्हणाला.

म्हातारा त्याला म्हणाला–"होय का? तर मलादेखील आपल्याबरोबर घोड्यावर बसवून त्या गावी नेता का? मला आवश्यक कामासाठी तेथे लोकर पोचले पाहिजे."

रंगाने त्याला विचारले–"तेथे तुम्हांला काम काय आहे हो?"

"मी आहे गरीब, कित्येक दिवसांपासून मी पैसे जमवून ठेवले आहेत मुलीच्या लग्नासाठी. चार दागिने खरेदी करून आणावयाचे आहेत!" म्हातारी म्हणाला.

रंगाने पापणी लवण्याच्या आंत सुरा दाखविला आणि म्हणाला–"कळलं कळलं! तो पैसा काढ कोठे आहे तो आणि मला देऊन चालू लाग घरच्या वाटेने."

दुसऱ्या क्षणाला झाडीत दबा धरून बसलेले राजाचे शिपाई बाहेर आले व त्यांनी रंगाला अटक केली.

राजाच्या शिपायांनी त्याला धरून राजाकडे नेले. राजा त्याला म्हणाला–"तू चोरी करायचे सोडले असलेस तरी तुझी चोरबुद्धी गेली की नाही हे पाहण्यासाठी मीच ही युक्ती योजली होती. आतां तू आजीवन कारावासातच रहा."





# सकाळ आणि संध्याकाळ

दानशील नावाचा एक उदार श्रीमंत एका गावी रहात असे. दानधर्म करण्यात त्याने आपली मिळकत खर्च केली. कोणी त्याच्याजवळ येऊन कर्ज मागे त्याला कर्जरोखे वगैरे काही एक लिहून घेतल्याशिवाय तो कर्ज देत राहिला. शेवटी तो स्वतःच एक गरीब म्हणून वारला. त्याचा मुलगा जगदीश यालादेखील गरीबीत दिवस काढावे लागले. कर्जरोखे न लिहून घेतल्यामुळे कोणी कर्जदार कर्ज घेतलेले मानायलाच तयार नव्हता. जगदीशला आपल्या गावावरचा व गावकऱ्यांवरचा विश्वास उडाला व तो गाव सोडून निघाला.

तो एक दिवस व रात्रभर चालत एका जंगलातून उजाडण्याच्या सुमारास एका नदीकाठी येऊन पोचला. नदीकाठी त्याला एक सुंदर वाडा दिसला. चालत वाड्यात गेला तोपर्यंत सूर्योदय झाला होता.

एक मनुष्य त्या वाड्यातून बाहेर धापा टाकीत पळत आला. त्याचे सर्व कपडे फाटले होते. त्याच्या अंगावर मार खाल्याचे वण स्पष्ट दिसत होते. जगदीशने त्या माणसाला विचारले–"काय रे बुवा! असा घाबरून पळत कोठे निघाला आहेस? तुझ्या अंगावर हे वण कसे काय?"

तो मनुष्य क्षणभर श्वास घेतल्यावर मागेपुढे भीतभीत पहात म्हणाला–"माहिती काल नव्हते म्हणून मी त्या वाड्यात पाऊल टाकले. त्या वाड्यात सकाळ आणि संध्याकाळ येतात हे मला माहीत नव्हते." असे सांगून तो पळाला आणि पाहतां पाहतां दृष्टीआड झाला.

जगदीशला तो मनुष्य म्हणाला त्याचा अर्थ काही एक कळला नाही. तो कुतूहल वश त्या वाड्यात शिरला. आंत मोठमोठी दालने, सुंदर दिवे, पडदे, पलंगावर बिछाने



आणि प्रेक्षणीय तसबीरी होत्या. परंतु कोठे माणसाची चाहूल नव्हती. जगदीश त्या वाड्यात खूप हिंडला. कोणी दिसले नाही तेव्हां त्याने सर्वांत आधी ज्या खोलीत पाऊल ठेवला होता त्या खोलीत आला.

"नमस्कार धनी! क्षमा करावी. आज मळभ असल्या कारणाने सूर्योदय उशिरां झाला. म्हणून मला यायला उशीर झाला." असा गोड आवाज ऐकून जगदीश दचकला.

त्याने मान वर करून पाहिले तर दारात एक अपूर्व सुंदरी उभी असलेली त्याला दिसली. तिची सर्व वस्त्रे पांढरी शुभ्र दुधासारखी स्वच्छ होती. तिच्या गळयात एक मोत्यांचा हार चमकत होता. तिच्या हातात मोरपंखांचा एक सुंदर पंखा होता.

"कोण ग बाई तू? इकडे कशासाठी आली आहेस?" जगदीशने तिला विचारले.

"माझे नाव सकाळ! मी या महालात अतिथींच्या सेवेसाठी आले आहे. तेच माझे काम!" असे सांगून तिने पदर खोचला आणि कामाला लागली. तिने सर्व खोल्या व दालने झाडून काढली. चूल पेटवून पंच-पक्वान्नांचे जेवण तयार करून ताटत वाढून आणले. जगदीश आश्चर्यचकित होऊन तिची ती कामे पहात होता.

"जेवण तयार आहे. जेवायला येतां का?" असे सांगून तिने जगदीशला एका मेजाजवळ बोलावून नेले. जगदीशने पोट भरून जेवून घेतले.

जेवणखाण आटोपून जगदीश विडा खात बसला असतां ती त्याच्या करमणुकीसाठी गोड गळयाने गाणे म्हणून नाचू लागली. दुपार झाल्यावर जगदीश विश्रांतीसाठी पलंगावर झोपला तेव्हां ती मोरपंखांच्या पंख्याने त्याला वारा घालू लागली.

जगदीशची झोप मोडली तोंपर्यंत काळोख पडू लागला होता.

ती जगदीशला म्हणाली—"सूर्यास्त होऊ लागला आहे आतां मी येते. पुन्हां उद्यां उजाडल्यावर येईन."

ते ऐकून जगदीशला [illegible] वाटले तो म्हणाला—"पण तू जाण्याचे कारण काय? नाही गेलीस तर चालणार नाही का?"

"वा हो, संध्याकाळ येऊन मला गिळणार नाही का?" असे सांगून ती घाईघाईने निघून गेली. जगदीश निराश होऊन ती गेली त्या दाराकडे पहात बसला असतां एकाएकी दचकून मागे सरकला. कारण त्याला दारात एक काळीकुट्ट वस्त्र धारण करून एक विक्राळ रूप असलेली एक स्त्री दिसली. तिने जणुकाही कोळशाच्या पाण्यात आंघोळ केली होती. इतकी ती काळी होती. तिच्या गळयात काळ्या मण्यांची माळ होती. तिच्या हातात एक कोरडा होता.

जगदीशला जागच्या जागी बसलेला पाहून ती दांत ओठ चावीत दरडावून म्हणाली—"चरबी चढली आहे वाटते डोक्यात? मी संध्याकाळ येथे येऊन समोर उभी आहे आणि तू लोडाला टेकून बसला आहेस? ये, समोर येऊन उभा रहा!"

तिच्या आवाजात एक तऱ्हेची अधिकार-वाणी होती. तिचा तिरस्कार करण्याची छाती जगदीशला झाली नाही. तो उभा राहिला आणि ती होती त्या बाजूला एकेक पाऊल टाकीत चालू लागला.

"पाठ करून उभा राहा!" संध्याकाळ कडाडली. जगदीश पाठ फिरवून उभा



राहिला. तिने त्याच्या पाठीवर जोराने कोरडा ओढला. त्याच्या पाठीची चामडीच निघाली आणि पाठीची आग होऊ लागली. त्याचा सदरा फाटला. फटक्याचा वण पाठीवर जाड दिसू लागला.

त्याच्या पाठीवरच्या वणातून कळा येत होत्या आणि ती खदखदां हसत म्हणाली—"आत्तांच एवढा घाबरून गेलास तर कसे चालेल? उजाडण्यापूर्वी एकेक करून आणखी तीन फटके खावे लागतील, एकेक प्रहर उलटल्यावर! वेळ कळावा म्हणून तुझ्या पाठीवरचे वणच मला खूण आहेत. माझा स्वभाव विसरभोळा आहे! मी वेळ विसरून गेले तर सकाळ नाही का येणार?



ती आली म्हणजे तिच्या उष्णतेने मी विरघळून नाही का जाणार?"

नंतर संध्याकाळने त्याच्याकडून सर्व घर झाडून धुवून पुसून काढविले. चूल पेटवून घेतली आणि सर्व सैंपाक करवून घेतला. तो चांदीच्या ताटात वाढून घेऊन आल्यावर तिने जेवून घेतले. नंतर ती विडा खात जगदीशला म्हणाली–"आतां माझी करमणूक कर."

जगदीशला गावे लागले व नाचावे लागले. एक प्रहर रात्र लोटल्यावर तिने पाठीवर दुसरा फटका ओढला. नंतर ती त्याला सुया बोचून तो 'हाय हुइ' करू लागला म्हणजे हसू लागली. दोन प्रहर रात्र उलटल्यावर तिने तिसरा फटका मारला आणि त्याला पंख्याने वारा घालायला सांगून स्वत: पलंगावर झोपली.

नंतर ती जागी झाली तेव्हां जगदीशच्या पाठीवर तीन वण पाहून तीन प्रहर रात्र लोटल्याचे कळल्यावर तिने चवथा फटका त्याच्या पाठीवर ओढला. नंतर काही वेळ जगदीशाचे केस धरून ओढले आणि त्याचे कपडे फाडून त्याला निरनिराळ्या तऱ्हेने त्रास दिल्यावर सूर्योदय व्हायची वेळ झाली तेव्हां म्हणाली–"आतां पुन्हां सूर्यास्त झाल्यावर येईन. नाही तर मरणच!" असे घाईघाईने म्हणत ती पळाली.

ती गेल्यावर थोड्या वेळाने सकाळने येऊन त्याला आदरपूर्वक नमस्कार केला. तिने आल्याबरोबर जगदीशाच्या पाठीवरचे वण पाहून आपल्या मोरपंखाचा पंखा त्यांवर हलक्या हाताने फिरविला आणि आश्चर्य म्हणजे की सर्व वण नाहीसे झाले. नंतर तिने घर झाडून स्वच्छ केले आणि उत्तम सैंपाक करून चांदीच्या ताटात जेवण वाढून आणले. जगदीश जेवून खाऊन विश्रांती घेण्यासाठी पलंगावर झोपल्यावर ती पंख्याने वारा घालीत जवळ बसली.

झोपेचे सोंग करून पडून राहलेला जगदीश एकदम उठून बसला आणि म्हणाला–"पाणी प्यायला!" तिने [illegible] तेथेच [illegible] ठेवून दिला आणि पाणी आणायला गेली. जगदीशने ती संधी साधून पंख्यातला एक मोर पंख काढून बिछान्याखाली लपवून ठेवला.

सूर्यास्ताची वेळ झाल्यावर सकाळ निघून गेली. थोड्या वेळाने संध्याकाळ आली. पहिल्या दिवसासारखा तिने जगदीशच्या पाठीवर एक कोरडा ओढला आणि त्याच्याकडून लहान मोठी सर्व कामे करवून घेतली. दुसरा प्रहर सुरू होण्यापूर्वी तिने जगदीशच्या पाठीवर आणखी एक कोरडा ओढला आणि तिसरा प्रहर सुरू होण्यापूर्वी तिसरा कोरडा ओढून ती पलंगावर झोपली.

जगदीशनं बिछान्याखालचा मोरपंख काढून तिसऱ्या वणावर तो फिरविला. त्याबरोबर तो वण नाहीसा झाला.

चवथा प्रहर सुरू होण्यापूर्वी संध्याकाळ जागी झाली व कोरडा घेऊन म्हणाली–"ही शेवटची प्रहर आहे, नाही का?"

"तुला बराच विसर पडलेला दिसतो आहे! आतां तर दुसरा प्रहरच संपला आहे! पाहिजेतर माझ्या पाठीवरचे वण मोजून पहा." असे सांगून त्याने आपल्या पाठीवरचे वण दाखविले."

"तरमग आणखी एक प्रहर झोपायला हरकत नाही." असे सांगून तिने जगदीशच्या पाठीवर आणखी एक कोरडा ओढला आणि पुन्हा झोपली. संध्याकाळची झोप मोडली तेव्हां सूर्योदय झाला होता. तोपर्यंत सकाळने देखील वाड्यात प्रवेश केला होता.

तिला पाहतांच संध्याकाळ मोठ्याने ओरडली आणि बाहेर पळू लागली. परंतु सूर्यकिरणे तिच्या अंगाला लागतांच तिचे सर्व अंग विरघळून गेले.

"मी तरी आतां येथे कशाला राहू? ती येत होती म्हणून मीसुद्धां येत होते" असे म्हणत सकाळसुद्धां निघून गेली.

त्याच्याजवळ जो मोरपंख होता त्याच्या सहाय्याने जगदीश लोकांचे रोग, जखमा वगैरे बरे करून खूप पैसे मिळवू लागला. नंतर त्याने एका सुंदर मुलीशी लग्न करून आपला संसार थाटला.





# सवतीचा वाटा

फार पूर्वी बगदाद शहरात एक श्रीमंत व्यापारी रहात असे. त्याची बायको फार सुंदर होती आणि पतीला आपले दैवत मानून नेहमी त्याच्या सेवेत लीन होती. त्यांचे परस्परांवर प्रेम होते. म्हणून दोघं परस्परांच्या आवडी निवडीची फार काळजी वहात असत.

त्या बाईचा नवरा प्रत्येक महिन्यातला एक पंधरवडा गावात रहात नसे. व्यापारासाठी परगावी जात असे. ते पंधरा दिवस तो कोठे जाई. काय खाई, कोठे राही, यापैकी काही एक त्या बाईला माहीत नव्हते व तिने कधी ते त्याला विचारले देखील नाही. तो पंधरवडा भर घरी राही तेव्हां बायकोला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू देत नसे. त्याच्या प्रेमात काही अंतर आल्याचे बायकोला कळत किंवा भासत नसे. बायकोला शारीरिक किंवा मानसिक कोणत्याही प्रकारचा कष्ट होऊ नये याची तो काळजी वहात असे. म्हणून तिने कधी नवऱ्याला एका शब्दाने देखील, तो पंधरा दिवस कोठे जातो, म्हणून विचारले नाही. नवरा स्वत: कधी त्याविषयी चुकून सुद्धा बोलत नसे. परंतु बायकोला, त्याविषयी कळावे, याची हुरहुर लागली होती.

असेच बरेच दिवस गेले. नवऱ्याच्या वागणुकीत काही फरक पडला नाही. तो दर महिन्यात एक पंधरवडा बाहेर राही आणि एक पंधरवडा घरी राही. तो पंधरवडाभर बायकोशी इतक्या प्रेमाने वागे की तिला नवऱ्याला तो कोठे जातो हे विचारण्याचे धाडस होत नसे. पण तिच्या मनाची हुरहुर मात्र थांबेना.

शेवटी नवऱ्याचे ते गुपित जाणून घेण्याची इच्छा आणि तो कोठे जातो, कोठे राहतो हाच एक विचार तिच्या मनात दिवसेदिवस [illegible] गेला. म्हणून तिने [illegible] विश्वासातल्या एका वृद्ध स्त्रीला सर्व गोष्टी समजावून सांगून व तिला खर्चासाठी आवश्यक पैसे देऊन नवऱ्याच्या त्या गुपिताची माहिती काढून आणायला सांगितले. त्या वेळी नवरा गावात नव्हता.

काही दिवसांनी ती म्हातारी परत आली आणि तिने व्यापारी ज्या गावात पंधरा दिवस जाऊन राही, त्या गावी त्याची आणखी एक लग्नाची बायको असल्याचे व तिच्याबरोबर तो तितक्याच प्रेमाने वागत असल्याचे सांगितले.

व्यापाऱ्याच्या बायकोने त्या म्हातारीला इनाम देऊन तिचे आभार मानले आणि ती गोष्ट तिने कोणाजवळ बोलू नये असे बजावून सांगितले. ती बातमी कळल्यापासून तिच्या मनात सवतीमत्सर वाढत गेला. तिला नवऱ्याचा राग आला की त्याने इतके दिवस त्या गुपिताविषयी चकार शब्दसुद्धा कसा काढला नाही. परंतु नवऱ्याने कधी तिच्यावरच्या प्रेमात अंतर येऊ दिले नाही. म्हणून तिला त्याविषयी नवऱ्याला विचारणे बरोबर वाटले नाही. त्याचे गुपित बायकोला कळल्याचे पतीला देखील माहीत झाले नाही.

असाच काही काळ गेला. तो व्यापारी एकाएकी हृदयक्रिया बंद पडल्याने मरण पावला. त्याला मूलबाळ नसल्यामुळे त्याची सर्व इस्टेट त्याच्या नातेवाइकांना मिळाली. त्याच्या बायकोला फक्त पोटगी मिळाली.



पतिमरणाचे दुःख थोडे ओसरल्यावर व्यापाऱ्याच्या बायकोला आपल्या सवतीची आठवण झाली. तीसुद्धा तिच्यासारखीच आपल्या नवऱ्याची बायको आहे. तिला देखील आपल्यासारखेच त्याने सुखी केले असणार. म्हणून तिचा देखील वाटा आपल्याचसारखा नवऱ्याच्या इस्टेटीत आहे. त्यांनी परस्परांची तोंडदेखील पाहिलेली नव्हती. तरी तिने धर्माला साक्षी ठेवून आपल्या वांट्याला आलेल्या इस्टेटीपैकी अर्धाभाग सवतीच्या नावे लिहून एक पत्र त्या वृद्ध स्त्रीच्या हाती सवतीकडे पाठविले. ते पत्र असे होते.

"धाकटे! आपली भेट कधी झाली नाही. आपल्या पतीने तुझ्याशी लग्न झाल्याचे मला सांगितले नाही. तरी तुझ्याबरोबर त्याने संसार थाटल्याचे मला कळले. परंतु मी मला कळल्याचे त्यांना मी कळू दिले नाही. आतां ते या जगाचा कायमचा निरोप घेऊन गेले आहेत. म्हणून माझ्या वांट्याला त्यांच्या इस्टेटीतला जेवढा भाग आला आहे त्याच्या [illegible] अधिकार आहे. मी तो तुला पाठवीत आहे, तो तू स्वीकार कर. माझ्या पतीचे तुझ्याशी झालेल्या विवाहाचे गुपित तू, मी, ही वृद्ध स्त्री आणि अल्लांशिवाय आणखी कोणास माहीत नाही."

आणखी काही दिवसांनी त्या वृद्ध स्त्रीने त्या पत्राचे उत्तर आणून दिले, ते असे :

"ताई! माझ्या त्यांच्या संबंधविषयी सर्व कळले असूनही तू कोणाला सांगितले नाहीस, हा तुझा थोरपणाच आहे. तसेच तुझे औदार्यही थोर आहे. परंतु तुझ्या वांट्यातला अर्धा भाग न्यायाने माझा नाही. कारण ते जाण्यापूर्वी आम्ही घटस्फोट घेतला. मी त्यांची बायको नाही. तेव्हां तू माझी सवत म्हणून नाही तर धाकटी बहीण म्हणून स्वीकार कर. आपण दोघी पुढील आयुष्य बहिणीबहिणी म्हणून घालवू."

ते पत्र वाचून व्यापाऱ्याची बायको आश्चर्यचकित झाली. दोघींचे परस्परसंबंध त्यानंतर सख्ख्या बहिणीसारखे वाढले.





# १५३. प्राचीन ग्रीक नाट्यगृह

एपिडोरस नजीक एक प्राचीन नाट्यगृह पोलिक्लिटस या नावाच्या एका शिल्पकाराने निर्मिले होते. चित्रातल्या वर्तुळाकार रंगभूमीवर नट उभे रहात. या नाट्यगृहात १६००० प्रेक्षकांना बसण्याची सोय होती. या नाट्यगृहाच्या निर्मितीचे विशेष हे की नट दूर असून ही त्यांचे संभाषण प्रेक्षकांना चांगले ऐकू येत असे.





# ऐटीचे मोल

एका गावी शंकर नावाचा एक तरुण युवक रहात असे. त्याचे लग्न नवीनच झाले होते. बायको माहेरी गेली होती आणि दिवाळसणासाठी त्याला सासुरवाडी जायचे होते. बघणाऱ्यांना कोणी मोठा माणूस येतो आहे असे वाटावे म्हणून शंकरने घोड्यावर बसून जायचे ठरविले. त्यासाठी त्याने एक भाड्याचे घोडे ठरवून घेतलं. घोड्यावर बसून सामान्य माणसासारखं जाऊन कसे चालेल? सरदार घराण्यातल्या माणसासारखं जायचे ठरवून त्याने उंची रेशमी कपडे घालून एक फेटा बांधला आणि त्याला समोर तुरा लावला. अशी तयारी करून तो सासुरवाडला निघाला.

परंतु घोडे स्वाराच्या म्हणण्याप्रमाणे वागणारे नव्हते. शंकरला तरी घोड-स्वारीचीसंवय कोठे होती? म्हणून मोठ्या कष्टाने काही अपघात घडल्याशिवाय शंकर सासुरवाडच्या गावापर्यंत पोचला तोंपर्यंत संध्याकाळ झाली होती. रात्री काळोखात आपला पोशाख कोणाला दिसणार? तेव्हां उजाडल्यावरच जायचे ठरवून शंकरने गावाबाहेरच धर्मशाळेसारख्या दिसणाऱ्या घरात उतरायचे ठरविले. त्या घराच्या बाहेरच्या ओसरीत एक जण फाटके व मळके कपडे घालून बसलेला होता. तो होता एक भिकारी.

शंकरने त्याला विचारलं–"काय हो या धर्मशाळेचा मालक कोण आहे?"

"आणखी कोण? मीच!" तो भिकारी म्हणाला.

"तरमग मला आजची रात्रभर या धर्मशाळेत उतरू द्याल का?" शंकरने त्या भिकाऱ्याला विचारले.

भिकाऱ्याने बराच विचार केल्यासारखं करून म्हटले–"हो. रहायला काही हरकत नाही. परंतु एक अट आहे. तू गावात जाऊन माझ्यासाठी भीक मागून आणली पाहिजेस. तुलादेखील खायला हवेच की नाही?"

"पण मला भीक कशी मागता येईल?" शंकरने त्याला विचारले.

"ती काय अशी मोठी ब्रह्मविद्या आहे का? हे कपडे घालून गेलास तर तुला कोणी भिक्षा घालणार नाही. माझे फाटके कपडे घालून गेलास आणि "आई! गरी-बाला एक घास वाढा!" म्हणत चार घरे फिरलास तर खूप भिक्षा मिळेल. दोघांची पोटे भरतील. रात्रभर तू येथे रहा. सकाळी आपले कपडे घालून, घोड्यावर बसून तू जा."

शंकरने आपले कपडे काढून ठवले आणि त्याचे फाटके कपडे घालून आणि त्याची झोळी खांद्याला टांगून भीक मागायला निघाला. दोनतीन घरांसमोर जाऊन त्याने भिकाऱ्याने सांगितल्याप्रमाणे "आई! गरि-बाला एक घास वाढा!" म्हटले. भीक मिळते आहे असे कळल्यावर त्याची हिंमत थोडी वाढली. आणखी चार घरे फिरला. झोळी भरू लागल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले. भिकाऱ्यांना पोटभर खायला मिळते हे त्याला त्या वेळेपर्यंत माहीत नव्हते.

त्या उत्साहात तो देहभान विसरून आपल्या सासुरवाडच्या घरासमोर येऊन म्हणाला–"आई! गरिबाला घास वाढा!"



तो आवाज त्याच्या सासूने व बायकोने ओळखला. ती बाई धाईगाईने बाहेर धावली आणि पाहते तर तिचा जांवईच होता तो.

"अहो, हे काय हो! हे कपडे काय, ही झोळी काय आणि भिक्षा मागतां आहां हे काय? असं घडलं तरी काय एकाएकी?" तिने विचारले. आईचा चढलेला आवाज ऐकून मुलगी बाहेर धावत आली आणि दोघींनी शंकरला घरात बोलावून नेले.

शंकरचा पूर्ण पाणउतारा झाला. त्यानं सासुरवाडी केवढ्या ऐटीत व थाटात एखाद्या सरदारासारखं यायचे ठरवून केवढी तयारी केली होती आणि त्याला भिकाऱ्या-सारखं यावं लागलं! ही काय बुद्धी झाली आपल्याला? त्याला काय बोलावं काय करावं, हेच सुचेना.

"काय सांगू आता? मी जरीचा रेशमी पोशाख करून फेटा बांधून तुरा लावून घोड्यावर बसून निघालो होतो. वाटेत चोरांनी मारहाण करून माझ्या अंगावरचे [illegible] घोडं घेऊन गेले. काळोख पडला म्हणून, नाहीतर चोरांना असा हात दाखविला असता की!" शंकर फुशारक्या मारीत म्हणाला.

सासूने जावयावर आलेल्या प्रसंगाबद्दल त्याचं सांत्वन करून धीर दिला. नंतर आंघोळ करायला सांगून त्याला चांगले कपडे घालायला दिले. शंकर जेवून खाऊन झोपला. परंतु त्याला झोप लागली नाही. घोड्याची आणि कपड्यांची फिकीर लागली होती त्याला. सर्वांना झोपा लागल्यावर शंकर उठला आणि धर्मशाळेकडे धावला. धर्मशाळेचा मालक आपल्या विषयी काय विचार करीत असेल त्याला काय उत्तर द्यायचे वगैरे गोष्टींचा विचार करीत तो धर्मशाळेत आला. पण तेथे होते कोण? तो भिकारी नव्हता, घोडं नव्हतं की रेशमी कपडे नव्हते. भिकाऱ्याने, झोपून उठल्यावर त्या दिवशी कोणा चांगल्या माणसाचं तोंड पाहिलं होतं, म्हणून त्याला एवढी मोठी भिक्षा मिळाली असा विचार केला असावा.





# अदृष्ट देवता

फार पूर्वी चीनमधील एका गावी वांग नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याला आपला म्हणेल असा कोणी नातेवाईक नव्हता. वाडवडिलांची दीड एकर जमीन काय ती होती. वांग शेती करून स्वतःच्या खर्चापुरते पीक काढून चार पैसे शिलकेत टाकीत होता.

वांगच्या शेताला लागून थोडी पडीत जमीन होती. ती जमीन घेऊन आपल्या जमिनीबरोबर नांगरून काढल्यास चांगला फायदा होईल असे वांगला वाटत होते. ती जमीन एका सावकाराची होती. तो सावकार चांगला श्रीमंत होता. त्याने कित्येक शेतकऱ्यांना कर्जे देऊन त्यांच्या जमिनी गहाणखत करून आपल्याकडे ठेवून घेतल्या होत्या व मुद्दल आणि व्याज न फेडू शकल्याचे कारण सांगून त्याने त्या जमिनी आपल्या नावी करून घेतल्या होत्या. ती पडीत जमीन अशीच लुबाडलेली कोणाची तरी जमीन होती.

एके दिवशी वांग त्या सावकाराला जाऊन भेटला आणि ती पडीत जमीन विकत मागितली. ती वांगच्या शेताला लागून असल्यामुळे तो घेत असल्याचे कळल्यावर सावकाराने खूप वाढवून किंमत सांगितली.

परंतु वांगजवळ तितके पैसे नव्हते. सावकाराने किंमत सांगितली त्याच्या अर्ध्या किंमती एवढीच रक्कम होती. म्हणून अर्ध्या किंमतीचा कर्जरोखा लिहून घेतला. वांगने जमीन आपल्याला विकल्याचे लिहून द्यायला सांगितले तेव्हां सावकार म्हणाला– "बाकी रक्कम दिलीस म्हणजे विक्रीखत लिहून देईन."

वांगने जास्त आग्रह केला नाही आणि ती पडीत जमीन विकत घेतल्याच्या आनंदात वांग घरी गेला.

काही दिवसांनी आपल्याकडून विकत घेतलेल्या जमिनीत वांग काय करतो आहे हे पाहण्यासाठी सावकार त्या पडीत जमिनीच्या बाजूला गेला. त्यावेळी वांग जमीन नांगरीत होता आणि सावकाराला आपली जमीन ओळखतां आली नाही. कारण त्या जमिनीचे रूपच पूर्णपणे पालटले होते.

सावकार वांगकडे तो नांगरीत असता पहात होता. तेवढ्यात नांगराच्या फाळाला काहीतरी लागलं आणि नांगर थांबला. वांगने नांगर सोडून फावड्याने ती जगा खणली तर तेथे सोन्याचे दोन तांब्रे सांपडले. ते फार जुने ऐतिहासिक काळातले होते. अदृष्ट देवता कोणाला मदत करायचे ठरवी तेव्हां अशी अकस्मात मदत करते, अशी समजूत त्या काळात होती. ती गोष्ट वांगला माहीत नव्हती, परंतु सावकाराला माहीत होती. म्हणून सावकार म्हणाला– "हे तांबे माझे आहेत. परंतु वांग त्या गोष्टीस कबूल झाला नाही तेव्हां दोघे न्यायाधिशाकडे गेले.

वांगने सावकाराकडून पडीत जमीन विकत घेतली असल्याचे आणि ती जमीन नांगरीत असतां ते तांबे मिळाल्याचे वांगने न्यायाधिशालां सांगितले.

तेव्हां सावकार न्यायाधिशाला म्हणाला– "प्रभो! हा माणूस लबाड आहे. ती जमीन माझीच आहे. मी ही त्याला कधीच विकली नाही. याच्याकरवी मी ती जमीन नांगर[illegible] तांबे सापड[illegible] देवतेने या रूपे माझ्यावर कृपा केली. वांग लोभाने हीं त्याची असल्याचे सांगतो आहे.

वांग म्हणाला–"प्रभो! ही जमीन मी या सावकारांकडून विकत घेतली आहे हो!"

"त्याला काही प्रमाण आहे का?" न्यायाधिशाने वांगला विचारले. वांगला उत्तर सुचेना. त्याने घडलेली गोष्ट जशीच्या तशी न्यायाधिशाला सांगितली.

न्यायाधिशाला सावकाराची लबाडी कळली. परंतु त्याने वरकरणी तसे काहीच दर्शविले नाही आणि म्हणाला–"अदृष्ट देवतेने सावकारालाच वर दिला, तेव्हां ती भांडी त्याचीच आहेत." असा निवाडा सर्वांसमक्ष सांगून दोन्ही तांबे न्यायाधिशाने सावकाराला देवविले. व्यापारी आनंदाने तांबे घेऊन घरी गेला.

वांग तो न्याय नसून अन्याय आहे असा विचार करीत थक्क होऊन न्यायाधिशाला म्हणाला–"प्रभो! ते तांबे गेले, तर गेले न्यायाप्रमाणे जमीन तरी माझीच असल्याचे नको का सांगायला?"

"होय रे बाबा! थोडा धीर धर!" असे सांगून न्यायाधिशाने वांगला त्याच्या घरी पाठविले.

दुसऱ्या दिवशी सकाळी न्यायाधीश काहीं शिपायांना घेऊन सावकाराच्या घरी आला आणि सावकाराला अटक केली. ती बातमी थोड्याच वेळात गांवभर पसरली आणि सारे गाव तेथे जमले.













"लखू! सकाळी आंबोणात घालून हे औषध म्हशींना देत जा." असे सांगून औषधाची किंमत म्हणून दोन रुपये घेतले.

अशा तऱ्हेने दररोज दोन दोन रुपये देऊन लखुअण्णा औषध आणून म्हशींना घालू लागला. परंतु म्हशी वाळत चालल्या होत्या. तेव्हां लखुअण्णा एके दिवशी शास्त्रीबुवांना जाऊन म्हणाला–"काय हो, शास्त्रीबुवा! दररोज दोन रुपये घेऊन औषध देतां आहां, परंतु तुमच्या औषधाचा परिणाम काहीच होत नाही की हो!"

शास्त्रीबुवा शांतपणे म्हणाले–"असं पहा, हल्ली पावसाळा आहे ना, मुळचा व पानांत पाणी जास्त शिरते. म्हणून त्यांच्या औषधांचा परिणाम सावकाश होतो."

ते ऐकून लखुअण्णा चिडला. तो गावच्या पाटलांकडे गेला आणि फिर्याद नोंदविली की शास्त्रीबुवांनी दररोज माझ्याकडून दोन रुपये घेतले व रंगवलेले पाणी देऊन मला औषध सांगून फसविले. औषधाला गुण पडला नाही हे विचार-

त्यावर शास्त्रीबुवांनी त्याला असे बेफिकी-रीने उत्तर द्यावे, यांचे पाटलाला आश्चर्य वाटले. कारण गावात शास्त्रीबुवांचा एक धर्मभीरु व्यक्ती म्हणून नावलौकिक होता.

पाटलाने शास्त्रीबुवांना बोलावून जाब विचारला. तेव्हां शास्त्रीबुवा म्हणाले–"काही नाही, उन्हाळ्यात दूध पातळ कां येते आहे रे, असे मी लखुअण्णाला विचारले. तेव्हां तो म्हणाला कडक उन्हामुळे म्हशी पाण्यात बसतात व पाणी जास्त पितात म्हणून दूध पातळ येते. मी म्हटलं की पावसाळा आला आहे; पाने मुळे वगैरेत पाणी जास्त मुरते. म्हणून औषधाचा परिणाम बेताचा होतो. त्यात चुकले का?"

जे लोक जमले होते त्या सर्वांना लखू-अण्णाच्या दुधात पाणी असते हे माहीत होते. त्यांनी लखुअण्णाच्या विरुद्ध शास्त्री-बुवांची तक्रार बरोबर असल्याचे सांगितलं.

लखुअण्णाला आपली चूक पदरात बांधून दिल्यासारखं झालं. त्या दिवसापासून लखु-अण्णा लोकांना चांगले दूध देऊ लागला.





# महाभारत

धर्मराजाने त्यानंतर ऋषीमुनींसाठी भोजन वगैरेची व्यवस्था केली आणि त्यांचा सर्वप्रकारे सत्कार करून त्यांना तृप्त केले. त्याने श्रीकृष्णाच्या वतीने दानधर्मदेखील केला. त्याने परीक्षिताला कृपाचार्यांचे शिष्यत्व ग्रहण करण्यास पाठविले. नंतर त्याने महाप्रस्थान करण्याचे ठरविले असल्याचे आपल्या मंत्री प्रधानांना बोलावून सांगितले. त्यांनी त्याविरुद्ध धर्मराजाचे मन वळविण्याचा अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिला. परंतु धर्मराजाने त्यांना महाप्रस्थान करणे त्याने कां ठरविले आहे कां आवश्यक आहे, हे समजावून सांगितले.

त्यानंतर पंचपांडव व द्रौपदीने आपले वस्त्रालंकार काढून वल्कलवस्त्रे धारण केली. त्यांनी आपल्या अग्निहोत्रांचे विसर्जन केले आणि महाप्रस्थानास निघाले. त्यांना त्या वेषात पाहून मागे द्यूत हारल्यानंतर त्यांना जो वनवास भोगावा लागला होता त्या दृश्याची आठवण होत होती. नागरिक स्त्रीपुरुष ते दृश्य पाहून दुःखी झाले. परंतु पांडवांच्या तोंडावर किंवा मनात कोणत्याही प्रकारचे दुःख नव्हते.

ते राजधानी सोडून निघाले तेव्हां एक कुत्रा त्यांच्याबरोबर निघाला. अशा तऱ्हेने त्या कुत्र्यासह सात जण महाप्रस्थानास निघाले. त्यांचे मन वळवून त्यांना परत-विण्यासाठी काही नागरिक त्यांच्याबरोबर काही अंतर चालून गेले होते, तेदेखील परतले. द्रौपदीसह पंचपांडवांनी महाप्रस्थान

६६. स्वर्गारोहण



केल्यानंतर उलूपीने गंगानदीत प्रवेश केला व चित्रांगदा मणिपूरला गेली.

प्रथम पांडव पूर्वेकडे निघाले. ते एक-मागून एक पुढच्याच्या पावलावर पाऊल टाकीत चालू लागले. अनेक देश पहात पर्वत व नद्या ओलांडून ते ताहित्य नावाच्या समुद्र-काठी येऊन पोचले. अर्जुनाजवळ तोंपर्यंत त्याचे गांडीव धनुष्य व अक्षय तूणीर होते.

त्यांना अग्निदेव पर्वताकार शरीर धारण करून वाटेत भेटला. तो म्हणाला—"पांडव हो! मी अग्निदेव आहे. आतां अर्जुनाला गांडीव धनुष्याची गरजच काय? त्याने त्याचा त्याग करावा. ते वरुणदेवाचे धनुष्य आहे, त्याचे त्याला परत द्यावे."

अर्जुनाने इतर पांडवांच्या सांगण्याप्रमाणे आपले गांडीव धनुष्य व अक्षय तूणीर समुद्रात टाकले. अग्निदेव अंतर्धान पावला.

नंतर पांडव दक्षिण दिशेकडे वळले. समुद्र किनाऱ्या किनाऱ्याने नैऋत्य दिशेने जाऊन पश्चिमेकडे वळले. समुद्रात बुडालेली द्वारकापुरी त्यांना दिसली. तेथून ते उत्तरेकडे निघाले. त्यांना हिमालय पर्वत लागला. तो चढून गेल्यावर त्यांना मेरु-पर्वत दिसला.

अशा तऱ्हेने ते चालत असतां द्रौपदी दमून भागून मरण पावली. भीमाने ती गोष्ट धर्मराजाला सांगितली. परंतु धर्म-राजाने ते ऐकले असून ही मागे वळून पाहिले नाही व चालत राहिला.

त्यानंतर काही काळ लोटल्यावर सहदेव मृत होऊन पडला. अशा तऱ्हेने क्रमाने नकुल व अर्जुनदेखील मृत होऊन पडले. त्यांच्या मरणाची गोष्ट भीमाने धर्मराजाला सांगितली. त्यानंतर स्वतः भीम खाली पडत असतांना धर्मराजाला सांगून मृत होऊन पडला. परंतु धर्मराजाने मागे वळून पाहिले नाही व पुढे चालतच राहिला. आतां फक्त कुत्रा धर्मराजाच्या पाठोपाठ चालत होता.

काही काळ लोटल्यावर इंद्राचा रथ घरघर आवाज करीत येऊन पोचला. इंद्राने धर्मराजाला रथात [illegible] विनंती केली. तेव्हां धर्मराज इंद्राला म्हणाला—"मागे सर्व भाऊ मरण पावले. त्यांना सुद्धा माझ्याबरोबर नेले पाहिजे. द्रौपदीसुद्धां आमच्या बरोबर असली पाहिजे. ती गोष्ट तू मान्य कर. त्यांच्याशिवाय मला स्वर्ग-प्राप्तीची इच्छा नाही."

तेव्हां इंद्र म्हणाला—"त्या सर्वांनी देह-त्याग केला आणि यापूर्वीच ते स्वर्गलोकी पोचले आहेत. तुला सदेह स्वर्गप्राप्ती होईल."

"तरमग हा कुत्रा किती इमाने इतबारे माझ्याबरोबर येथपर्यंत आला आहे. त्याला देखील स्वर्गप्राप्ती झाली पाहिजे." धर्मराज इंद्राला म्हणाला.

"तू माझ्या इतका थोर आहेस व माझ्या-बरोबर स्वर्गात प्रवेश करीत आहेस. तुला आतां या कुत्र्याची कशाला फिकीर? त्याला दे सोडून?" इंद्र म्हणाला. पण धर्मराजाने ती गोष्ट मान्य केली नाही. "कुत्र्यांना स्वर्गात जागा नाही रे, बाबा!" असे इंद्राने सांगितले तरी धर्मराजाने ते मान्य केले नाही.

तेव्हां कुत्र्याच्या रूपाने असलेला यम प्रगट होऊन म्हणाला—"तुला तू वनवासात असतांना यक्ष-रूपे मीच प्रश्न विचारले होते आणि तुझी परीक्षा घेतली होती. आतां कुत्र्याचे रूप घेऊन मी तुझी परीक्षा घेतली. तुझ्यासारखा थोर या स्वर्गातदेखील दुसरा कोणी नाही. तुला सदेह उत्तम-लोकाची प्राप्ती होईल."





इंद्र, यम, मरुत्, अश्विनीकुमार व इतर देवांनी मिळून धर्मराजाला रथात आदरपूर्वक बसविले व आपापल्या विमानात बसून त्याच्याबरोबर निघाले.

"कित्येक राजर्षी या उत्तम लोकात आले, परंतु सदेह उत्तम लोक मिळविणारा धर्मराजासारखा इतर कोणीच आजपर्यंत झाला नाही." नारद म्हणाला.

"सुख असो की दुख असो, माझे भाऊ नाहीत अशा जागी राहण्याची मला मुळीच इच्छा नाही." धर्मराजाने निक्षून सांगितले.

इंद्र त्याला म्हणाला—"तू उत्तम लोकात प्रवेश करीत असतां तू मानव लोकातले संबंध सोडून टाकीत नाहीस हे कसे काय? तुझे भाऊ उत्तम लोकात प्रवेश करू शकणार नाहीत. या स्वर्गाकडे, देवांकडे, सिद्धांकडे आणि देवर्षीकडे पहा."

"मी आपल्या भावंडांना सोडून राहू शकत नाही. ते, द्रौपदी व आमची मुले कोठेही असोत, मी तिकडेच जाणार." धर्मराज म्हणाला.

स्वर्गात पोचल्यावर धर्मराजाने तेथे एका उत्तमासनावर बसल्यानंतर देवांच्या मध्ये बसलेल्या दुर्योधनाला पाहिले. त्याला आश्चर्याबरोबर राग आला व उठून पाठ फिरवून मागे जात म्हणाला—"या लोभी दुर्योधनाबरोबर मला स्वर्गसुखाची इच्छा नाही.

नारद ते पाहून हसत म्हणाला—"राजा! स्वर्गात सर्व जुने राग द्वेष विसरावे लागतात. या दुर्योधनाला शूर पुरुषाला शोभेल असे मरण आल्यामुळे वीरगती, हा स्वर्ग मिळाला आहे."

तेव्हां धर्मराज नारदाला म्हणाला—"सर्व पापे करूनही या दुर्योधनाला स्वर्गप्राप्ती होणार असेल तर पुण्यवान अशा माझ्या भावांना कोणत्या लोकाची प्राप्ती झाली आहे, हे मला पहावयाचे आहे."

कर्णासारखा शूर पुण्यवान आणि त्याच्यासाठी प्राणार्पण करणारे राजे स्वर्गात नाहीत हे पाहून धर्मराजाला आश्चर्य वाटले. त्याने तसे म्हणून दाखविल्यावर देव म्हणाले—"ते आहेत तेथे चल. तुझ्या इच्छेप्रमाणे करण्यास इंद्राची आज्ञा आहे." देव म्हणाले. त्यांनी एका दूताला बोलाविले आणि त्याला धर्मराज विचारील ते कोठे आहेत हे नेऊन त्याला दाखविण्यास सांगितले. तो दूत धर्मराजाला बरोबर घेऊन भीम वगैरे होते तिकडे निघाले.

त्यांना वाटेत सर्व पापीच भेटले. त्या वाटेने चालण्यात आनंदाऐवजी धर्मराजाला त्रास वाटू लागला. त्या वाटेवर रक्त मांसाचा चिखल होता. माशा डासांचा सुळसुळाट चालू होता. जिकडे पहावे तिकडे केसांचे व हाडांचे ढीग पडलेले होते व त्यांवर किडे रांगत होते. याशिवाय भयंकर अग्नि ज्वाळा जिकडे पहाव्या तिकडे दिसत होत्या. माणसांच्या व जनावरांच्या ओकाऱ्यांनी झालेले ओहोळ मधूनमधून वहात असलेले दिसत होते.

धर्मराज पुढे वाट दाखवीत जाणाऱ्या देवदूताला म्हणाला—"असं आणखी किती पुढे जायचं आहे रे बाबा?"

"तुला त्रास होतो आहे का? परत जाऊया तर. यापुढची वाट तर चालण्यासारखी सुद्धा नाही." देवदूत म्हणाला.

धर्मराज निराश झाला. त्याशिवाय ती घाण आणि दुर्गंधी इतकी असह्य झाली की त्याला डोके फिरल्यासारखे वाटू लागले तेवढ्यात त्याला काही आवाज दीनवाणीने





बोलबीत असल्याचे ऐकू आले–"धर्मराजा! तू आल्याने आम्हांला थोडे बरं वाटतं आहे. घडीभर थांब ना!"

"कोण तुम्ही सर्व? आणि इकडे कसे काय आलात?" धर्मराजाने त्या आवाजांना विचारले.

"मी कर्ण! मी भीम! मी अर्जुन! मी नकुल! मी सहदेव! मी द्रौपदी!" त्या आवाजांनी उत्तर दिले.

ते उत्तर ऐकून धर्मराज स्वतःशीच विचार करू लागला–"ह्या सर्व पुण्यवानांनी असे कोणते पाप केले की यांना येथे यावे लागले? असे कोणते पुण्य कार्य करून दुर्योधन स्वर्गसुख उपभोगीत आहे? मी झोपेत तर नाही? जागाच आहे ना? मला वेड तर लागले नाही?" असे अनेक विचार येऊन त्याला मानसिक वेदना होऊ लागली. त्याला देवांचा, धर्माचा फार राग आला. नंतर तो देवदूतांकडे वळून म्हणाला–"तू ज्यांचा दूत असशील त्यांच्याकडे निघून जा. मला त्यांच्याकडे यायचे नाही, असे सांग. मी आपल्या भावांना सोडून यायला तयार नाही, असे त्यांना सांग. मी येथे आल्याने त्यांना अल्पमात्र का होईना सुख वाटत आहे."

देवदूत इंद्राकडे गेले आणि घडलेले वृत्त त्यांनी त्याला सांगितले.

धर्मराज दोन घडीभर तेथेच राहला. तेवढ्यात इंद्र वगैरे देव तेथे आले. ते आल्याबरोबर तेथला अंधःकार नाहीसा झाला. पापी लोकांचे आक्रंदन थांबले. वैतरणी नदी अदृश्य झाली. मंदमारुताची झुळुक सर्वांना सुखकर वाटू लागली. गोड वास सर्वत्र दरवळू लागला.

इंद्र धर्मराजाला म्हणाला–"धर्मराजा! तुझ्या या वागणुकीबद्दल सर्व देव तुझी वाखाणणी करीत आहेत. आता पुरे कर. चल आमच्याबरोबर. तुला सिद्धी प्राप्त झाली. तुला व तुझ्या भावंडांना उत्तम लोक प्राप्त झाला आहे. तू रागावू नकोस. जो राजा झाला त्याला सुद्धा नरकाचे दर्शन

चुकत नाही. प्रत्येक व्यक्तीने केलेल्या पाप पुण्यात प्रथम पुण्य उपभोगले तर त्याला त्यानंतर पाप उपभोगावे लागते. तसेच प्रथम पाप उपभोगले तर त्यानंतर पुण्य उपभोगायला मिळते. कमी पाप करणाऱ्याला प्रथम नरकवास भोगावा लागतो. म्हणून तुला प्रथम नरक दर्शन घडले. तुझे धाकटे भाऊ व द्रौपदी यांनी जे थोडे पाप केले होते त्याबद्दल प्रथम नरकवास भोगत राहले आणि आतां पाप विमुक्त झाले आहेत. आतां ते सर्व स्वर्गलोकात वास करीत आहेत. पाहिजेतर स्वतः येऊन पहा. तुला कर्णाबद्दलसुद्धां विनाकारण चिंता करण्याचे कारण नाही. त्यालादेखील स्वर्गप्राप्ती झाली आहे. थोर राजांना प्राप्त होणाऱ्या पुण्यापेक्षा तू फार जास्त पुण्य संपादन केले आहेस. हरिश्चंद्र, मांधाता, भगीरथ, दुष्यंताचा मुलगा भरत यांना जे गौरवनीय स्थान लाभले ते तुला लाभत आहे. ही पहा समोर आकाशगंगा दिसत आहे. तू या गंगेत स्नान केलेस म्हणजे तु[illegible] मनातील रागद्वेषादिक मानवानुकूल भाव नाहीसे होतील.

धर्मराजाने आकाशगंगेत मानवदेह सोडला आणि सरळ त्याचे स्वजन होते तेथे जाऊन पोचला. तेथे त्याला कृष्ण भेटला. तो अद्याप ओळखता येण्यासारख्या रूपातच तेथे होता. अर्जुन कृष्णाबरोबरच होता. धर्मराजाला पाहून ते आनंदाने त्याला जाऊन भेटले.

आणखी एका स्थानी आदित्यासारखा ज्योतिर्वलय असलेला कर्ण धर्मराजाला दिसला. भीम आपल्या जुन्या रूपात मरुद्गणांमध्ये दिसला. त्याचप्रमाणे नकुल सहदेव अश्विनीकुमारांच्या जागी दृष्टीस पडले.

इंद्राने धर्मराजाला द्रौपदी, तिचे पुत्र, धृतराष्ट्र, अभिमन्यू, पांडुराजा, कुंती, माद्री, भीष्म, द्रोण व इतर आप्त व वीरपुरुषांचे दर्शन करवून त्यांच्या विषयी इतर सर्व वर्णन सांगितले.

(महाभारत संपूर्ण)





# अमरवाणी

लक्ष्मीवंतो न जानंति
प्रायेण परवेदनाम्
शेषे धराभर क्लान्ते
शेते नारायण: सुखम् ॥ १ ॥

[श्रीमंत लोकांना इतरांचे दु:ख कष्ट कळत नाही पहाना, भूमीचा भार आपल्या डोक्यावर वाहणाऱ्या शेषनागाच्या शय्येवर नारायण कसा आनंदाने झोपत असतो.]

प्राप्यचलानधिकारान्
शत्रुषु, मित्रेषु, बंधुवर्गेषु
नापकृतम्, नोपकृतम्, न
सत्कृतम्, किं कृत तेन? ॥ २ ॥

[नश्वर असे अधिकार मिळाले असूनही शत्रूचा अपकार, मित्रावर उपकार आणि नातेवाइकांचा सत्कार जो करू शकला नाही त्याने काय केले म्हणावयाचे?]

अप्रकटीकृत शक्ति: शक्तोपि
जन स्तिरस्क्रियां लभते;
निवस न्नंतर्दारुणि लंघ्यो
वह्नि र्नतु ज्वलित: ॥ ३ ॥

[शक्तिवान असून आपली शक्ती व पराक्रम न दर्शविणाऱ्याला अपमान सहन करावा लागतो! पहाना, लाकडातला अग्नी जळू लागेपर्यंत लाकडाची पर्वा कोणी करीत नाही.]

---

## थोरांच्या उणीवा











# चांदोबा

संस्थापक : नागिरेड्डी
संचालक : 'चक्रपाणी'

या अंकाबरोबर बहुरंगी दीर्घकथा "महाबली हनुमान" प्रारंभ होत आहे. रामायणातली हनुमानाची गोष्ट सर्वांना माहीतच आहे. परंतु आमच्या बाल-वाचकांस कदाचित माहीत असेल की हनुमानाची कथा अनेक पुराणांतही वर्णिली आहे. म्हणून निरनिराळ्या पुराणांचे मंथन करून नवनीतासारखी मृदुमधुर अशी ही कथा बालमित्रांच्या ज्ञानवृद्धीसाठी या अंकापासून देण्यात येत आहे. ही गोष्ट नक्कीच लहान थोर सर्वांस आवडेल.

वर्ष : २४ डिसेंबर १९७४ अंक : ६





# मित्रभेद

[ १६ ]

संजीवकाने दमनकाला हंसाची गोष्ट सांगितली व म्हणाला–"विश्वास करणारा मूर्ख वेडा माणूस, पूर्वी जसा एक उंट लबाड वस्तादांच्या भुलावण्यावर फसला होता तसा फसतो."

"ती गोष्ट ऐकू दे तरी!" दमनकाने गोष्ट सांगायला सांगितले.

संजीवक गोष्ट सांगू लागला.

**फसवणुकीला बळी पडलेला उंट**

सागरदत्त नावाचा एक मोठा व्यापारी होता. तो एकदां शंभर उंटांचा एक तांडा घेऊन परदेशी निघाला. उंटांवर मूल्यवान वस्तूंची मोठमोठी गाठोडी होती.

त्या उंटांपैकी विकेट नावाच्या उंटावर थोडा जास्त माल लादला गेला. शेवटी त्याला चालवेनासे झाले तेव्हां तो एका जागी बसला. व्यापाऱ्याने त्याच्या पाठीवरचा माल थोडा थोडा करून इतर उंटांच्या पाठीवर टाकला आणि त्या उंटाला त्या अरण्यातच सोडले व तांडा घेऊन पुढे निघून गेला.

व्यापारी निघून गेल्यावर बऱ्याच वेळाने त्या उंटाला जागचे थोडे हालतां येऊ लागले. तो हिरवळ खात व खड्ड्याखाचीतले पाणी पीत थोडा हिंडू फिरू लागला.

त्या अरण्यात मदोत्कट नावाचा एक सिंह रहात असे. त्याच्या सेवेला एक चित्ता, एक कावळा आणि एक कोल्हा नित्य रहात असत. त्या सिंहाला तो उंट दिसला. त्याने आपल्या सेवकांना विचारले–"हा कोणता तरी विचित्र प्राणी दिसतो आहे! कायपण रूप आणि रंग! हा जंगलात राहणारा हिंस्र पशू आहे की … आहे?"

कावळ्याने उंटाला पूर्वी पाहिले होते. तो सिंहाला म्हणाला–"हे पाळलेले जनावर आहे. याला उंट म्हणतात. याचे मांस फार चवदार असते."

ते ऐकून सिंह म्हणाला–"माझ्यावर विश्वास ठेवून माझ्याकडे अतिथी म्हणून आलेल्याशी मी कधी दगलबाजी करणार नाही. अतिथी देवासमान असतो. त्याच्या हत्येचे पाप ब्रह्महत्येसारखे महा पाप मानले जाते. म्हणून त्या उंटाला माझ्या वतीने अभयवचन देऊन त्याला माझ्याकडे बोलावून घेऊन या. तो कशासाठी आला आहे, माझ्याजवळ त्याचे काय काम आहे, मी विचारून घेतो!"

सिंहाचे सेवक उंटाला जाऊन भेटले आणि सिंहाच्या वतीने अभयवचन देऊन त्याला सिंहाकडे बोलावून घेऊन आले. उंटाने येऊन पायावर डोके ठेवल्यावर सिंहाने त्याला विचारले–"काय रे बाबा! तू या अरण्यात कसा काय आलास?"

उंटाने आपल्यावर गुदरलेला सर्व प्रसंग थोडक्यात सांगितला. तेव्हां सिंह म्हणाला–"तू आपल्या गावी पुन्हां जाऊ नकोस आणि ओझे वाहू नकोस. माझ्याबरोबर अरण्यातच राहून हिरवे गवत व पाला खा."



त्याप्रमाणे उंट निश्चितपणे अरण्यात राहू लागला. सिंहाचा चौथा सेवक झाला.

असाच काही काळ लोटला आणि सिंहाची एका हत्तीशी झुंज झाली. त्यात सिंहाला हत्तीचा दांत लागला. त्यामुळे त्याला गुहेबाहेर येणे जाणे अशक्य झाले.

त्या स्थितीत पांच दिवस गेले. सिंह व त्याचे तीन सेवक उपाशी राहले. कारण सिंह शिकार करून आला म्हणजे स्वतः पोटभर खाऊन उरलेले सर्व आपल्या सेवकांसाठी ठेवीत होता. त्यावर सर्वांचे पोट भरत असे. परंतु आतां सिंहाची शिकार बंद झाली होती. फक्त उंट एकटा हिरवळीवर हिंडून फिरून पोटभर खाई

आणि तो चांगला गलेलठ्ठ होत चालला होता.

आपल्या अनुयायांना त्या दीन स्थितीत पाहून सिंह त्यांना म्हणाला–"मी जखमी होऊन आजारी पडलो आहे, तेव्हां तुम्हीच जंगलातल्या एखाद्या प्राण्याला मारून त्या-वर आपला उदरनिर्वाह चालवा."

"आमच्या महाराजांची ही स्थिती असतां आम्ही खुशाल पोट भरून खाणे कसे काय जमेल?" कोल्हा म्हणाला.

सिंह म्हणाला–"तुमची स्वामि भक्ती पाहून माझ्या मनाचे समाधान झाले. तुम्ही जाऊन एखाद्या प्राण्याची शिकार करून आणा. आपण सर्व मिळून खाऊ या."

परंतु त्याचे सेवक काहीच बोलले नाहीत. तेव्हां सिंह म्हणाला–

"अरे! यात संकोच करण्यासारखे काय आहे? जाऊन वाटेल तो प्राणी धरून घेऊन या, मी या स्थितीतही त्याला ठार करून तुमची पोटे भरण्याची व्यवस्था करीन."

[illegible] शोधार्थ निघाले. परंतु त्यांना एकदेखील शिकार मिळाली नाही. तेव्हां कोल्हा व कावळा दोघे इतर कोणाला ऐकू जाणार नाही इतक्या हलक्या आवाजात बोलू लागले.

कोल्हा म्हणाला–"कावळोबा! आपले हे फिरणे वघ अगदी फुकट आणि निरर्थक आहे! या उंटाची चरबी वाढलेली दिसते आहे ना तुला? याला ठार केले तर आपल्याला कित्येक दिवस मेजवानी उडवा-यला मिळेल!"

तेव्हां कावळा म्हणाला–"कोल्होबा! तू म्हणालास ते खरं आहे रे, पण या उंटाला आपल्या धन्याने अभयवचन दिले आहे ना!

"तसं असेल तर मी धन्याकडे जाऊन उंटाला ठार करण्याची परवानगी विचारून येतो." असे कावळ्याला कानात सांगून कोल्हा इतरांना म्हणाला–"मित्र हो! तुम्ही सर्व येथेच थांबा! मी आपल्या धन्याकडे जाऊन पुढे काय करायचे ते त्याला विचारून येतो!"





# तिळ्या बहिणी

**[ ४ ]**

[ आपल्या तिघां मुलींना गिधाडे उचलून घेऊन गेल्याचे राजाने सांगितल्यावर सर्व जणांचा विश्वास बसला. एकदां रात्री त्याची मुलगी सुहासिनी त्याच्या शैयागृहात आली. राजा तिला तिच्या दाईजवळ सोडून शैयागृहाकडे जाणाऱ्या भुयाराची वाट पाहून परतला तर त्याला सुहासिनी किंवा तिची दाई कोणीच भेटल्या नाहीत. पुढे–]

भुयाराच्या वाटेने बाहेर निघायला आणखी एकादी चोरवाट तर नाही, असा विचार करून राजा काही वेळ वाट शोधत राहिल्यावर त्याला एकाएकी एक दार दिसले. दारातच दाई व सुहासिनी भेटल्या. राजाला जिवात जीव आल्यासारखे झाले. तो त्या दारातून आत गेला तेव्हां सुहासिनी-साठी त्याने नेमलेले शैयागृह असल्याचे त्याला आढळले.

त्या विचित्र चोरवाटेचे गुपित काय बरे असेल याचा शोध काढल्यावर त्याला कळले की सुहासिनीच्या खोलीत भिंतीला लागून जे मोठेमोठे आरसे होते ते जमिनी-पासून छप्परापर्यंत चिकटलेले होते. त्या आरशात एक आरसा विचित्र होता. जमिनीवर एका जागी एक कळ होती. ती दाबली की आरसा जमिनीत गडप होऊन जाई आणि त्या जागी एक मोठे दार होई.



त्या दारानेच भुयारातली वाट राजाच्या शैयागृहात जात होती. खोलीत कळ होती तशीच दाराबाहेर एक कळ होती. ती दाबली म्हणजे दार आपोआप बंद होई. पुन्हां दाबले की आरसा जमिनीत जाई आणि दार असल्याचे कळे.

आता सुहासिनी राजाच्या झोपायच्या खोलीत कशी पोचली पाहू या. नेहमी-प्रमाणे दाईने सुहासिनीला तिच्या पलंगा-वर झोपविले व ती झोपली असेल असे समजून स्वतः झोपली. परंतु त्या दिवशी रात्री सुहासिनीची झोप मध्येच मोडली. तिला काय करावे, सुचेना. म्हणून ती खोलीत फिरत असतां तिचे

जी कळ होती तिच्यावर पडले. लगेच आरसा जमिनीत गेला आणि एक मोठे दार दिसू लागले.

ती अद्‌भुत गोष्ट घडल्यावर ती भिण्या-ऐवजी भुयाराच्या वाटेने गमतीखातर चालू लागली आणि राजाच्या खोलीत एका मोठ्या तसबीरीमागे जे दार होते तेथे येऊन पोचली. पुढे वाट नाही असे पाहून तिने चाचपून आणखी कोठे वाट आहे का पाहिले तेव्हां राजाच्या खोलीतली तसबीर तिच्या हाताचा जो हलकासा धक्का लागला तेवढ्यानेच पाठीमागून ढकलली जाऊन दारासारखी खोलीत जायला वाट झाली. तेव्हां तिला पलंगावर तिचे बाबा झोपत असलेले दिसले. ती धावतच आत गेली आणि आपल्या बाबांच्या अंगावर चढून बसली. त्यानंतर राजा त्या भुयाराच्या वाटेने बराच वेळ वाट शोधीत भटकत राहला होता.

अशा तऱ्हेने भुयाराच्या त्या वाटेचे गुपित कळल्यानंतर राजाला एकाबाजूने आनंद झाला तर दुसऱ्या बाजूने त्याच्या मनांत शंकाकुशंका येऊ लागल्या. कारण वाट उद्यानातून होती, म्हणून इतके दिवस कोणाच्या दृष्टीस पडल्याशिवाय राजाला भुयारात जाऊन भीतभीत बाहेर यावे लागत

होते. परंतु आता त्याच्या स्वतःच्या शैया-गृहातून भुयारात जाऊन कोणाची नजर पडल्याशिवाय परत येणे त्याला शक्य होते. म्हणून मुलींना वाटेल तेव्हां भेटून यायाला सोयीचे झाले होते. अर्थात् या गोष्टीचा राजाला आनंद वाटत होता.

परंतु राजाला आणखी एक भीती वाटू लागली. जास्त काळजी घेतली नाही तर सुहासिनी अगर तिच्या इतर दोघी बहिणी वाटेल तेव्हां त्याच्या शैयागृहात येतील व त्यांना कोणी पाहिले तर ज्या गोष्टीसाठी त्यांना इतके दिवस भुयारात ठेवले होते तीच गोष्ट नेमकी होणार नाही. मग त्या शैयागृहातच नव्हे तर राजवाडाभर आणि त्यानंतर राजवाड्याबाहेर देखील हिंडू फिरू लागतील. तेव्हां काय करावे, या विचारात राजा गढून गेला.

शेवटी त्याला एक उपाय सुचला. त्या वेळेपर्यंत राजाने आपल्या तिघां मुलींना भुयारातल्या वाड्यात निरनिराळ्या तीन खोल्यात त्यांच्या दाईबरोबर ठेवले होते. परंतु राजाने त्यापुढे तो चोर दरवाजा होता ती खोली कायमची रिकामी ठेवायचे ठरविले आणि उरलेल्या दोन खोल्यात तिघां मुलींना ठेवण्याची व्यवस्था केली. म्हणजे तो चोर दरवाजा मुलींना कळणार नाही आणि त्यांना त्या वाटेने



शैयागृहात येतां येणार नाही. त्याने मुलीं-च्या दाईंना ती गोष्ट समजावून सांगितली आणि जास्त सावधगिरी बाळगण्यास सांगितले. तेव्हां कोठे त्याचे चित्त थोडे शांत झाले.

त्यानंतर बरेच दिवस राजा मुलींना भेटायला गेलाच नाही. परंतु एके दिवशी तो आरशाच्या खोलीत चोरवाटेने आला. चोर वाटेतली कळ दाबताच आरसा जमि-नीत गेला. नंतर खोलीत आल्यावर पुन्हां आतली कळ दाबल्याबरोबर आरसा वर आला आणि दार बंद झाले.

राजाने ती चोरवाट दाखविणाऱ्या देवाचे व आपल्या भाग्याचे आभार मानले.



नंतर मुलींना भेटून तो निश्चिंतपणे आपल्या खोलीत परत गेला.

*  *  *

त्या दिवसापासून राजा निदान एकदां तरी आपल्या खोलीतून भुयारात जाऊन मुलींना भेटून येऊ लागला. दिवसामागून दिवस जात होते. मुलींना त्या भुयारातल्या महालातले जीवन आवडेनासे झाले. बाप भेटायला येई तेव्हां तेव्हां मुली त्याला बरोबर घेऊन जायला हट्ट करू लागल्या. त्या राजाला धरूनच बसायच्या व म्हणायाच्या–"बाबा! आज नाही सोडणार आम्ही तुम्हांला! आम्हांला बरोबर घेऊन चला आईकडे! आज घेऊन गेलेच पाहिजे."

जाणार. त्याला तेवढे धैर्य होईना. इतके दिवस केलेली खटपट फुकट जाण्याची भीती होती. म्हणून तो त्यांना म्हणे– "आतां नको, बेटा! पुन्हां केव्हां तरी घेऊन जाईन!" अशा तऱ्हेने मुलींची समजूत घालून तो निघून जाई.

हळूहळू म्हणतां महिन्यांमागून महिने लोटले. तिघी मुली आनंदाने कोणत्याही प्रकारचे विघ्न आल्याशिवाय वाढत होत्या. राजाच्या आनंदाला पारावार नव्हता. परंतु राणीमात्र मुलींच्या काळजीने दिवसेंदिवस खंगत चालली होती. कारण मुलींना शोधून आणण्यासाठी गेलेले नोकर एकेक करून परत येऊ लागले व मुली कोठे ही न दिसल्याचे सांगू लागले. मधून मधून राणी ज्योतिष्याला बोलवून विचारी– "ज्योतिषीबुवा! माझ्या मुलींच्या जिवाला धोका तर नाहीं ना?"

"महाराणी! आपण निश्चिंत असावे, मुली, आहेत तेथे नक्कीच खुशाल आहेत. त्यांच्या बरोबर गेलेल्या दासी व नोकर-चाकर सर्व खुशाल आहेत. महाराणींनी व्यर्थ काळजी करू नये. काही दिवसांनी सर्व सुखरूप परत येतील अशा सूचना मुलींच्या कुंडलीत आहेत." असे ज्योतिषी राणीला सांगे. ते ऐकून राणी मनाचे

गप्प राही.

अशा तऱ्हेने दोन वर्षे लोटली. राजा दररोज चोर दरवाजाने भुयारातल्या वाड्यात जाऊन मुलींना भेटून येत होता. मुलीदेखील अगदी सुरक्षित होत्या. त्यांच्या विषयी काळजी वाटण्याचे कारणच राहले नाही. तरी राजा त्यांना भेटून परत येई तेव्हां मुली बरोबर घेऊन जायला अधिकाधिक आग्रह करू लागल्या.

"बाबा! आम्हांला तुम्ही इकडे एकट्या सोडून कां हो जातां? आईला भेटायचे आहे आम्हांला. फक्त एकदां आईकडे घेऊन जा!" असे सांगत. त्या राजाला धरूनच बसत व राजाने किती सांगितले तरी ऐकत नसत. त्यांना रडत असलेल्या पाहून राजाचे हृदय कळवळून येई. तो मनात म्हणे–"काय हरकत आहे, एकदां आईजवळ जाऊन आल्या म्हणजे त्यांना व आईला बरे वाटेल." परंतु तसे करायला त्याचे मन धजेना आणि तो मनाशी म्हणे–"काय वाटेल ते होवो, मन घट्ट करून एक वर्षभर मुलींना असेच भुयारातच राहू द्यावे." म्हणून मुली किती रडल्या तरी राजाने, या ना त्या तऱ्हेने त्यांची समजूत घालून त्यांना घरी नेले नाही.

असेच आणखी काही दिवस गेले. मुलींना सातवे वर्ष लागायला फक्त चारच दिवस उरले. ते चार दिवस गेले की मुली निश्चिंतपणे आपल्या घरी जाऊन आईला





भेटतील. त्यांना या कैदेतून सुटका मिळेल. इतके दिवस, लागोपाठ तीन वर्षे त्यांना भुयारातल्या वाड्यात निश्चितपणे मी ठेवू शकलो ही काय सामान्य गोष्ट झाली? आतां भिण्याचे काही कारण उरले नाही. आणखी चार दिवस, फक्त चार दिवस सुरक्षितपणे निघून जातील आणि कुंडली-तल्या विघ्नासंकटांतून त्यांची सुटका होईल. मायलेकींची भेट होईल. राजा या विचा-रात थोडावेळ स्वत:ला विसरून गेला.

त्या मन:स्थितीत राजा गुप्तमार्गाने मुलींना भेटायला भुयारातल्या वाड्यात आला. तो अगदी शेवटचा दिवस होता. त्या भूगृहात दुसऱ्या दिवसापासून राहण्याची [illegible] पाहून मुलींनी त्याच्या पायांना विळखाच घातला आणि म्हणाल्या–"बाबा! या खेपेस तुम्ही आम्हांला बाहेर घेऊन गेलां नाही तर तुम्हांला आम्ही जाऊच देणार नाही." असे म्हणत त्यांनी बापाच्या पायांना घट्ट मिठीच मारली.

राजाचे मन द्रवले. त्याला धीर धरवेना. तो विचार करू लागला–"ही तीन वर्षे निर्विघ्न पार पडली. आता उरले ते फक्त चोवीस तास काय होणार आहे? याशिवाय इतके लोक पाहारा देत आहेत! मुलींवर कोणतेच संकट येण्याची शक्यता नाही." असा मनाशी विचार करून व मनातले सर्व साहस एकवटून तिघां मुलींना, त्यांच्या दाईंना आणि शंभर नोकरांचाकरांना बरोबर घेऊन तो उद्यानात आला आणि स्वत: त्यांच्या बरोबर बसला.

मुलींच्या चारी बाजूला शंभर नोकर पाहारा देत बसले होते. इतक्या दिवसांनी उघड्या हवेत आल्याचा सर्वांना आनंद झाला. मुली आनंदाने उड्या मारू लागल्या. त्यांना नाचत बागडत असलेल्या पाहून राजाला स्वर्गसुख मिळाल्यासारखे झाले.

इतक्यात पूर्वी कधी ऐकले नाही की कधी पाहिले नाही असे एक मोठे चक्री वादळ एकाएकी आले. जमिनीपासून

आकाशापर्यंत धुळीचे लोट उठले. सर्वांनी एक क्षणभरच डोळे मिटले. पुन्हां डोळे उघडून पाहतात तर तीन घारी आल्या आणि तिघां मुलींना उचलून उडत असलेल्या आकाशात दिसल्या. ते पाहून राजा बेशुद्ध होऊन पडला. दाईनी राजाला शुद्धीवर आणण्यासाठी खूप प्रयत्न केला. शंभरचे शंभर नोकर त्या घारी उडाल्या होत्या त्या दिशेला पळत निघाले.

राजाने शुद्धीवर येतांच विचारले की नोकर सगळे कोठे गेले? त्याच वेळी ते परत येत असलेले दिसले. ते काही करू शकले नव्हते. मुलींचा शोध न लागल्यामुळे त्यांचे चेहरे उतरलेले होते. बरोबर तीन वर्षांपूर्वी राजाने जी कल्पित गोष्ट रचून राणीला व सर्वांना सांगितली होती ती अक्षर अक्षर त्याच्या डोळ्यांसमोर घडली होती. त्यामुळे राजा मनातल्या मनात स्वनिंदा करू लागला.

"आज हे घडणार होते, म्हणूनच त्या दिवशी माझ्या कोणत्या तरी दुष्ट ग्रहाने मा[illegible] डोक्यात तो शिरला. म्हणतात ना, 'देवाच्या मनात जे असते ते देव आपल्या तोंडी वदवितो' अगदी तसेच झाले." अशा तऱ्हेने निरनिराळ्या प्रकारे राजा मनातल्या मनातच स्वत:ची निंदा करीत होता.

विधिलिखित जे असते तेच घडते! हेच खरे ठरले. कोणत्या तरी अतीत शक्तीच्या प्रेरणेमुळेच नाही का राजाला मुलींना बाहेर घेऊन यायची बुद्धी झाली? त्या दिवसापर्यंत त्याने मनाला किती घट्ट आवळून ठेवले होते. परंतु ऐन वेळी त्याच्या बुद्धीने त्याच्याशी दगा केला. व्हायचे ते झाले.

आतां राणीजवळून लपवून ठेवण्यासारखे तरी काय उरले होते? म्हणून राजा आपल्या नोकरांचाकरांबरोबर राजवाड्यात गेला आणि त्याला बोलवत नव्हते तरी थोडक्यात जमले ते सांगून मोकळा झाला. राजा व राणी दोघे दु:खसागरात बुडून गेले.

(क्रमश:)



# सुयोग्य वारसाहक्क

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाकडे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा! तू आपल्या समोर जे ध्येय ठेवले आहेस ते प्राप्त करण्यासाठी तू आपले सर्वस्व पणाला लावले आहेस. परंतु किती कष्ट सहन करून ध्येय प्राप्ती झाली तरी त्याचे अपेक्षित फळ मिळेलच असे नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला पुन्हां अमरध्वजाची गोष्टच सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

अमरावती नगराचा युवराज अमरध्वज शिकारीला गेला असतां वाट चुकून दाट रानात शिरला. तेथे एका भिल्लकन्येला पाहून तिच्या सौंदर्यावर इतका भाळून

## वेताळाच्या गोष्टी



गेला की त्याला एका भिल्ल तरुणाशी द्वंद्वयुद्ध करून त्याला जिंकावे लागले तेव्हां कोठे त्या भिल्ल तरुणीशी त्याचे लग्न झाले व तो तिला राजधानीत घेऊन आला.

परंतु त्या भिल्लकन्येने अंत:पुरात पाऊल ठेवले त्या घटकेपासून अनेक गुंता गुतीचे प्रश्न उभे राहू लागले. तिला राजवाड्यातले वातावरण अगदी वेगळे वाटू लागले. राज-घराण्यातला चालीरीती तिला नवख्या वाटू लागल्या. या नव्या वातावरणात दासदासी अनेक होत्या, परंतु तिला आपल्या दासी-जवळ बोलायलासुद्धा संकोच होऊ लागला. कैद्यासारखी तिची स्थिती झाली होती.

[illegible] अमरध्वज काय तो तिला आपला आप्त वाटे. म्हणून ती त्याला नेहमी आपल्या महालातच अडकवून ठेवण्याचा प्रयत्न करी.

अमरध्वजला वाटे की तिच्यात हळूहळू थोडा बदल होईल. म्हणून तो तिच्या महालात राहू लागला. ती चार चौघांत मिसळून हंसू खेळू लागावी यासाठी तोच प्रयत्न करीत होता. परंतु त्याला आपल्या प्रयत्नात अपेक्षिल्याप्रमाणे यश मिळेलसे वाटेना.

अमरध्वज नेहमी अंत:पुरात राहात असल्यामुळे राज्यकारभराची सर्व कामे मंत्र्यावर व त्यांच्या विश्वासावर सोडून द्यावी लागली. परंतु हे सर्व प्रजेच्या हिताचे नव्हते.

अशा परिस्थितीत शेजारच्या राजाने अमरावती राज्यावर स्वारीची तयारी सुरू केल्याचे अमरध्वजाला कळले. तेव्हां तो अंत:पुरा बाहेर आला. त्याने आपल्या मंत्रिमंडळाची सभा बोलावून आलेल्या संकटाला कसे तोंड द्यायचे विचारले.

त्या वेळी भिल्ल तरुणी त्याचा शोध काढीत मंत्रीमंडळाच्या सभेत येऊन दाखल झाली आणि म्हणाली–"इतका वेळ मला एकटीला सोडून तू इथे बसला आहेस? चल, जाऊं या!" असे म्हणत तिने त्याचा हात धरून त्याला बाहेर ओढून नेले.

ते पाहून तेथे [illegible] ती सर्वच मंडळी चकित झाली. काही डोळे मिजकावून हंसली. अमरध्वजचा तो अपमान होता. तो तिच्या बरोबर अंत:पुरात गेला आणि तिला खूप रागावून म्हणाला–"मी इतके दिवस तुला काही बोध व्हावा यासाठी, केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झाले. मी फक्त तुझा नवराच आहे का? या देशाचा युवराजसुद्धा आहे. आज तू त्यांच्यासमोर माझी मान खाली केलीस, उद्यां बरोबरीच्या राजपुरुषांमध्येसुद्धा माझा अपमान होण्याची शक्यता आहे. मी तुझ्या सौंदर्याच्या मोहाला बळी पडून तुला राजवाड्यात घेऊन आलो त्याची फळे पुष्कळ चाखली. परंतु तुझ्यात काहीच बदल घडवून आणू शकलो नाही."

तो काय म्हणतो आहे, आपली काय चूक झाली, हेदेखील तिला कळेना. त्याला आलेला राग पाहून ती वेड्यासारखी त्याच्या तोंडाकडे फक्त पहात राहली.

त्या दिवसापासून अमरध्वज फक्त रात्रीच्या वेळी तिच्या महालात जाऊ लागला. दिवसा तो तिच्या दृष्टीस पडत नाहीसा झाला. त्याच्यावरची राज्यकार-भाराची जबाबदारीसुद्धां बरीच वाढली होती. त्यानंतर शत्रूशी मोठे युद्ध झाले. त्या युद्धात अमरध्वजाने शत्रूला पिटाळून लावले व पुन्हां त्याला डोके वर काढतां



येणार नाही अशी त्याची खोड मोडली. नवऱ्याचे जाणे येणे कमी झालेले पाहून भिल्ल तरुणीला आपल्या सभोवतीच्या वातावरणाची घृणा वाटू लागली. तिच्यात झालेला बदल अमरध्वजाच्या लक्षात आल्याशिवाय राहला नाही. या नवीन जीवनात ती समरस व्हायची तर दूरच, तिच्यावर त्याचा काही एक परिणाम झाल्याची चिह्नेसुद्धां दिसत नाहीशी झाली. तिला भिल्लांच्या वस्तीतून बाहेर घेऊन आल्याबद्दल त्याला फार वाईट वाटू लागले. त्याला तिची कीव आली. त्याने तिला पुन्हां भिल्लांच्या वस्तीत पाठवायचा विचार केला, परंतु ती गरोदर होती.



अमरावतीला दर वर्षी दसऱ्याचा उत्सव मोठ्या थाटाने होत असे. त्या वेळी मोठी जत्रा भरे. निरनिराळ्या चढाओढीचे कार्यक्रम होत. सर्वात महत्वाची चढाओढ किंवा बलप्रदर्शन म्हणजे अमरध्वज एक अत्यंत प्राचीन अशी दगडी गदा घेऊन एका हत्तीशी द्वंद्व युद्ध करी व हत्तीला ठार करी. ती गदा अमरध्वजा-शिवाय आणखी कोणाला उचलता येत नसे इतकी ती जड होती. ती गदा घेऊन हत्तीशी युद्ध करणे म्हणजे सामान्य गोष्ट नव्हती.

दसऱ्याच्या उत्सवप्रसंगी या खेपेस अमरध्वज आपल्याबरोबर गंमत पहायला म्ह[illegible] भिल्ल तरुणीला घेऊन गेला. लक्षा-वधी लोक उत्सव पहायला जमले होते. तो विशाल जनसमुदाय पाहून भिल्ल कन्या चकित झाली व म्हणाली–"आम्ही देखील मोठमोठ्या जत्रा भरवितो, परंतु इतके लोक कधी जमत नाहीत."

"हे सर्व लोक माझा पराक्रम पाहण्या-साठी जमतात. तू असे बलप्रदर्शन पूर्वी कधी पाहिले नसशील. थोड्याच वेळात तुला दिसेल." अमरध्वज म्हणाला.

प्रदर्शन पाहण्यासाठी आलेल्या राज-घराण्यातल्या लोकांना बसण्यासाठी उंच जागेवर व्यवस्था करण्यात आली होती. अमरध्वजाने पटांगणात पाऊल टाकल्या बरोबर प्रजेने टाळ्या वाजवून त्याचे स्वागत केले. त्याने दगडी गदा सहज उचलली. त्यानंतर एका मदोन्मत्त हत्तीला त्याच्यासमोर आणण्यात आले. हत्ती आणि अमरध्वज यांचे परस्परांशी भयंकर युद्ध झाले. हत्ती जोरजोराने चीत्कार करीत आपल्या सोंडेत अमरध्वजाला पकडण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु त्याच्या पकडीत न येता अमरध्वजाने हत्तीला ठार केले.

अमरध्वजावर प्रजेने पुष्पवृष्टी केली. त्याने आपल्या बायकोकडे पाहिले तेव्हां ती खदखदां हसली. जवळ येऊन त्याने विचारले–"कां हसलीस?"

"तू [illegible] राज-विलास की तुझी प्रजा आनंदाने पुष्पवृष्टी करते आहे?" तिने विचारले.

"ती दगडाची गदा उचलणे कोणा मानवास शक्य नाही. मी ती गदा फक्त उचललीच नाही तर ती घेऊन एका हत्तीला ठार केले. हे आश्चर्य करण्यासारखे नाही का?" अमरध्वजाने विचारले.

"ती गदा कोणाला उचलता येणार नाही, असे म्हणतोस?" तिने विचारले.

"ते उचलणारास मी आपले राज्य देईन." अमरध्वज म्हणाला.

भिल्ल तरुणी आश्चर्यचकित होऊन म्हणाली–"ती उचलण्याची शक्ती असलेले आमच्या गावात अनेक आहेत."

"आहेत तर जाऊन बोलावून घेऊन ये. जा नीघ, आतांच घेऊन ये बोलावून ही गदा उचलून दाखविणाराला. घेऊन आली नाहीस तर मात्र तू परत येण्याची गरज नाही." अमरध्वज आपल्या भिल्ल बाय-कोला म्हणाला.

त्याने बायकोला तिच्या भिल्लांच्या वस्तीत पाठवून दिले. ती परत आली नाही.

पंधरा वर्षे लोटली. दरवर्षी दसऱ्याचा उत्सव जत्रा व चढाओढी होत राहल्या.

सोळाव्या वर्षी दसऱ्याला त्याने दगडी गदेने एका हत्तीला ठार केले. त्या वेळी



प्रेक्षकांपैकी एका भिल्ल तरुणाने पुढे येऊन विचारले–"महाराज! मी एकदां ती दगडी गदा उचलून पाहू का?"

अमरध्वजाने त्या मुलाकडे फक्त एकदांच पाहिले व म्हणाला–"पहा, कदाचित तुला उचलतां येईल ही. ती उचलून दाखविलीस तर मी माझे राज्यच तुला देईन."

लगेच तो भिल्ल तरुण पुढे आला आणि त्याने ती गदा उचलून गरगर फिरवून आकाशात उडविली. मुलाचे बळ पाहून अमरध्वज त्याचे कौतुक करू लागला.

तेव्हां भिल्ल तरुणी पुढे येऊन म्हणाली–"पाहिलेत महाराज! आमच्या वस्तीत तुमच्याहून जास्त पराक्रमशाली वीर

आहेत !" अमरध्वजाने आपल्या बायकोच्या रूपात व त्या तरुणाच्या रूपात साम्य असल्याचे पाहून तो मुलगा आपलाच असल्याचे देखील ओळखले. त्याने, अत्यंत आनंदाने आपल्या बायकोचे स्वागत करून, मागे तिचा अपमान केल्याबद्दल तिची क्षमा मागितली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा ! मला हे कळत नाही की भिल्ल तरुणी तिच्या वस्तीत दगडी गदा उचलणारे अनेक लोक आहेत असे सांगून पंधरा वर्षे कोणाला बोलावून घेऊन आली नाही आणि अशा तऱ्हेने ती खोटे बोलल्याचे स्पष्ट झाले असूनही अमरध्वजाने तिची क्षमा मागण्याचे कारण काय होते ? या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला– "रानटी जातीचे लोक खोटे बोलत नाहीत. इतर लोकांत जे[illegible] जास्तच असते. भिल्ल तरुणी खोटे बोलली नव्हती. तिच्या नवऱ्याच्या बरोबरीची शक्ती असलेले भिल्ल तरुण त्यांच्या वस्तीत होते. परंतु त्यांना आणून नवऱ्याला राज्यच्युत करणे तिला इष्ट वाटले नसावे. तिचा मुलगा मोठा होऊन बापाच्या बरोबरीचा निघाला तर तोच बापाच्या वारसा हक्काला योग्य ठरेल असे वाटून तिने तो सोळा वर्षांचा होईपर्यंत वाट पाहिली आणि तिच्या वस्तीत नवऱ्याच्या बरोबरीने शक्ती असलेले तरुण असल्याचे तिने सिद्ध करून दाखविले. अमरध्वजाने विचार केला की त्याचा वारसा चालू ठेवण्यास योग्य मुलगा त्या भिल्लणीच्या पोटी जन्मलेला आहे. अशा बायकोचा आपण अपमान केला होता, ते आठवून त्याने क्षमा मागितली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# वृत्ति देवता

कित्येक वर्षे होऊन गेली चीन देशातल्या एका गावी चँगला नावाचा एक टोप्या विकणारा व्यापारी रहात असे. टोप्या शिवण्याचा धंदा त्याच्या घरात पिढ्यान् पिढ्या चालत आला होता. चँगच्या बापाने त्या धंद्यात अलोट संपत्ती संपादन केली आणि मरते वेळी ती सर्व संपत्ती मुलाला देत त्याने त्याला टोपी शिवण्याचा धंदा न सोडण्यास बजावून सांगितले.

परंतु चँगला याला टोपी शिवण्याचा धंदा करणे हीनपणाचे वाटले. परंतु तो धंदा सोडून दिला तर वृत्तिदेवतेला कदाचित राग येईल असा विचार करून त्याने ती वृत्ती म्हणजे धंदा सोडला नाही. तो बेफिकीरपणे टोप्या शिवू लागला आणि जास्त किंमत मागू लागला. तेव्हां गावकऱ्यांनी शेजार गावच्या वांगला नावाच्या टोपीवाल्याला बोलावून आणले.

वांगला हा टोपी शिवण्याच्या धंद्यात निष्णात होता. तो टोप्यांबरोबर निरनिराळ्या प्रकारच्या पिशव्यासुद्धा शिवत असे. त्याने चँगला याच्या दुकानासमोरच आपले दुकान उघडले. गावकऱ्यांनी त्याच्या दुकानातल्या टोप्या घ्यायला सुरवात केली.

एकदां चँगला आपल्या दुकानात स्वस्थपणे बसला असतां त्याने समोरच्या वांगला याच्या दुकानात एका साधूला शिरतांना पाहिले. त्या साधूजवळ सोन्यासारखे चमकणारे एक मृगचर्म होते. ते त्याने वांगला याला दिले व त्याची एक झोळी शिवून द्यायला सांगून तो निघून गेला.

वांगलाने त्या दिवशी सर्व काम संपवून त्या साधूला हवी होती तशी झोळी शिवली आणि ती भितीला टांगून ठेवली.

दुसऱ्या दिवसापासून वांगला गावकऱ्यांना फुकट टोप्या देऊ लागला व साधू

संन्याश्यांना मेजवान्या देऊ लागला. काल नाहीतर परवां आलेला हा वांगला इतका दानधर्म करू लागला आहे तर त्यात काहीतरी गुपित असले पाहिजे आणि ते काय, हे माहिती करून घेतले पाहिजे असे चँगलाने मनाशी ठरविले.

एके दिवशी वांगलाने आपले दुकान बंद केल्याबरोबर चँगला त्याच्या दुकानाजवळ जाऊन फळयांच्या सांधीतून आत वांगला काय करतो आहे, पाहू लागला. वांगला आत साधूसाठी त्याने शिवून तयार केलेली झोळी झाडीत होता. त्या झोळीतून सोन्याची नाणी जमिनीवर पडत होती.

चँगलाला स्वतःच्या डोळयावर विश्वास बसेना. दुसऱ्या दिवशीसुद्धां पुन्हां तेच दृश्य पाहिल्यावर ती झोळी उडविण्याची दुर्बुद्धी चँगलाला झाली.

वांगला कोणत्यातरी कामासाठी दुसऱ्या दिवशी दुकानातून आत गेला असतां चँगला वांगलाच्या दुकानांत शिरला आणि भिंतीला टांगलेली झोळी काढून घेऊन त्या जागी अ[illegible] तशीच एक नकली झोळी ठेवून आपल्या दुकानात निघून आला.

त्या दिवशी काळोख पडल्यावर चँगला आपले दुकान बंद करून चोरून आणलेली झोळी झाडू लागला. त्या झोळीतून सोन्याची नाणी तर पडलीच नाहीत, त्याबद्दल चँगच्या घरात ज्या सोन्याच्या काही वस्तू होत्या त्यातल्या काही नाहीशा झालेल्या दिसल्या.

चँगला हताश झाला आणि वांगला याच्याकडे गेला आणि घडलेली गोष्ट सांगून म्हणाला–"तूच माझे या संकटातून रक्षण कर!" वांगलाच्या दुकानात पुष्कळ गर्दी जमली. गर्दीतून तो साधू बाहेर आला आणि म्हणाला–"चँगला! तुला तुझ्या धंद्यावर श्रद्धा निष्ठा नाही. आतां तुला ती झोळीच कायमची लाभली आहे." असे सांगून साधू अदृश्य झाला.

त्या दिवसापासून चँगला ती झोळी खांद्याला अडकवून भीक मागू लागला. 'वृत्ति देवता त्या साधूच्या रूपाने प्रगट झाली होती' असे लोक म्हणू लागले.



# १५४. पांढरा हत्ती

ऐरावत हा पांढरा हत्ती असतो असे म्हणतात. हत्तींत रंग नसलेल्या त्वचेचा "अल्बीनो" नावाचा एक हत्ती असतो. सयाम देशात त्या हत्तीला फार पवित्र मानतात. अशा हत्तींमध्ये बुद्धाचा आत्मा असतो असा त्यांचा विश्वास आहे. जंगलातून या पांढऱ्या हत्तींना धरून आणल्यावर बौद्ध पुजारी त्या हत्तीजवळ जाऊन "तू परत जंगलात जाऊ नकोस. तेथे तुझी सेवा करायला कोणी नाही. धुळीत पडून राहणे चांगले नाही." असे म्हणतात. सयामातल्या एका राजाने, त्याच्या पकडीत न येणाऱ्या सेवकाला एक पांढरा हत्ती दिला आणि त्याला पोसता पोसतां त्या सेवकाचे दिवाळे निघाले.

